# राजपुत्र वुइल्यम ऑरेंज

अथवा

# नेदर्लंडांतील बंडाचा इतिहास.



श्रीनिवास त्र्यंबक द्रवीड,

बी. ए. एलएल्. बी. (सातारा)






Je Maintiendrai le droit

" सत्यातें जोडावें सूज्ञें धर्मासि पळ न सोडावें. "



पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत छापिलें.



सन १९०१.

# प्रस्तावना.

सोळाव्या शतकांत डच् लोकांनीं स्पॅनिश बादशाहीशीं स्वराज्याकरितां केलेला घोर व अद्भुत संग्राम हा यूरोपच्या अर्वाचीन इतिहासांत फार महत्त्वाचा प्रसंग आहे. सतराव्या, अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत यूरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रांत जी राज्यक्रान्तीची लाट उसळली तिची उत्पत्ति सोळाव्या शतकांत प्रथम या वायव्यसमुद्रालगतच्या छोटेखानी हॉलंड देशांत झाली. "या बर्फाच्छादित द्वीपकल्पांतून स्वातंत्र्याचा उज्वळ प्रकाश यूरोपच्या आर्त समाजांवर पुढें पुष्कळ वर्षे पडत गेला व हेच (डच्) लोक यूरोपच्या इतर राष्ट्रांना जुलुमाच्या खवळलेल्या समुद्रांतून मार्गदर्शक झाले (पा. २१६)." या प्रसंगांतून निर्माण झालेल्या लोकसत्तात्मक राज्याचें यूरोपच्या राष्ट्रमालिकेंत दोन शतकें बरेंच प्राधान्य होतें. या ऐतिहासिक प्रसंगाची संक्षिप्त माहिती मॉट्ले, प्रेस्कॉट प्रभृति विख्यात इतिहासकारांच्या ग्रंथांतून प्रस्तुत पुस्तकांत उतरली आहे. शिलरनें या प्रसंगास दिलेलें "Revolt of the Netherlands" हें नांव यों पुस्तकास योजिलें आहे. "Revolt" शब्दांतील "अन्यायाचा व जुलुमाचा दीर्घ तिरस्कार व तद्विरुद्ध न्याय्य, राजरोस व संघशक्तियुक्त खटपट" हा गंभीर व जोरदार अर्थ कदाचित् हल्लीं बंड शब्दानें व्यक्त होणार नाहीं; तथापि हा अर्थ व्यक्त करणारा नवा शब्द शोधून काढण्यापेक्षां किंवा बनविण्यापेक्षां रूढ शब्दांतच ती नवी कल्पना नित्यसंबंधानें लौकर बसेल असें वाटून बंड शब्दाचाच या पुस्तकाच्या नामकरणांत उपयोग केला आहे. हा चमत्कृतिपरिप्लुत इतिहास वाचून कल्पनाशक्तीलाही अगम्य अशा भासणाऱ्या अनेक गोष्टी जगाच्या इतिहासांत पूर्वी घडून गेल्या आहेत, व अनुकूल परिस्थिति आली असतां त्या तशाच पुनः पुनः नियमानें घडतात अशी वाचकांची खात्री होईल.

"आमच्या राज्यावर सूर्य कधींही मावळत नाहीं" या गर्वोक्तीचा मूळ ध्वनि ग्रीस देशांत झाला. परंतु ग्रीक अमदानीच्या पूर्वी व नंतर झालेल्या

कित्येक राष्ट्रांना व राजांना वरील विशेषण जास्त हक्कानें लावतां येणार आहे; व त्यांपैकीं बहुतेकांचा आजमितीस मागमूसही नाहीं! सुधारलेल्या रोमन राष्ट्राला हॉलंडच्या दलदलींत राहणाऱ्या मूळच्या कोळ्यांवरही राज्य करण्याची हाव उत्पन्न झाल्यावांचून राहिली नाहीं. या सर्वशक्तिमान राष्ट्राला सिविलिस क्लॉडियस नामक बटेव्हियन वीरानें अर्धचंद्र दिला. हीच या इतिहासाची खरी प्रस्तावना होय. त्यानंतर फ्रँक लोकांचा उदय होऊन शार्लमेनप्रभृति इतिहासविश्रुत बादशहा अवतीर्ण झाले. इ. शकाच्या चवदाव्या व पंधराव्या शतकांत स्पॅनिश राजसत्तेचा विकास झाला. सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत इतिहासप्रसिद्ध पांचव्या चार्लस बादशहाचा अवतार झाला. याचा राज्यविस्तार दोन्ही गोलार्धांत मिळून जवळ जवळ निमी पृथ्वी व्यापून राहिला होता. त्यानें आपली बादशाही वळणाची राज्यनीति राज्यांत सर्वत्र लागू करून चोहोंबाजूनें मोठा करडा अंमल गाजविला (७). स. १५५५ सालीं युवराज फिलिप यास आपलें राज्य नेदर्लंडांत अर्पण करून चार्लसनें वानप्रस्थाश्रमाचा अंगिकार केला. दुसरा फिलिप बादशहा हा शरीरानें व मनानें कमकुवत व कोता, परंतु दुष्ट, दुराग्रही व घातकी स्वभावाचा होता. बापाच्या मोठेपणावर आपण कर्तुमकर्तुं समर्थ आहों असें त्यास वाटून त्यानें कॅथोलिकधर्माचा पुरस्कार करण्याकरितां राष्ट्रांत पसरत चाललेला नवीन मतांचा ओघ बंद करून व जुलमी राजसत्तेची बिडी दृढतर बसवून नेदर्लंडमधील प्राचीन स्वातंत्र्यांकुर खोडून काढण्याची अव्वलपासून खटपट सुरू केली. या दिशेनें पहिला प्रयत्न ह्मणजे पुरातन धर्मशासनांचा जीर्णोद्धार व नव्या धर्माध्यक्षांच्या नेमणुका हा होता. या दोहोंचा अंमल चालविण्याकरितां बापाच्या कारकीर्दीपासून नेदर्लंडांत अवशिष्ट राहिलेलें सैन्य कायम ठेवण्याचाही त्यानें निश्चय केला. फिलिपनें स्वदेशीं जाण्यापूर्वी आपली बहीण राणी मार्गरेट पार्मा इजला नेदर्लंडच्या सुभेदारीचीं वस्त्रें देऊन तिच्या मदतीकरितां निरनिराळ्या खात्यांचा कारभार चालविणाऱ्या प्रधानमंडळ्या नेमून दिल्या. परंतु एकंदर सत्ता ॲंटनी पेरेनो नामक सचिवाच्या हातांत एकवटली होती; व त्याच्याच द्वारानें गुप्त रीतीनें सर्व कारभार चालविण्याचा राजानें विचार केला होता. हें नव्या कारकीर्दीचें स्वरूप दिसतांच राष्ट्रांत एकच खळबळ माजून राहिली. धर्मच्छलाच्या तीक्ष्ण

कुठारांखालीं राष्ट्र अगदीं विव्हल होऊन गेलें. धर्मसंशोधन ह्मणजे काय वस्तु होती व त्याचा नेदर्लंडांत किती प्रकारानें अंमल चालला होता याची व्यक्ति पुढें झाली आहे ( ५६,५७ ). लोकांना या नूतन व्यवस्थेचा कल्पक राजाचा मुख्य सचिव ग्रॅनूव्हिलू व त्याची बजावणी करण्याचें मुख्य साधन स्पॅनिश सैन्य आहे असें पाटून त्यांनीं या दोघांस दूर करण्याची खटपट कायदेशीर व राजनिष्ठ मार्गानें सुरू केली. सैन्यास इतरत्र कांहीं जरूरीची कामगिरी आल्यामुळें त्याचें कांहीं काल आपोआप उच्चाटन झालें; ग्रॅनूव्हिलसंबंधानें लोकांत अत्यन्त द्वेषभाव वाढलेला पाहून त्याचीही राजानें मोठ्या खुबीनें नेदर्लंडाबाहेर रवानगी केली. परंतु राजाच्या धर्मविषयक प्रवृत्तींत यत्किंचितूही फरक पडला नाहीं. टिटलूमन नामक धर्मशासकाचे अत्याचार अव्याहत चालले होते. शिवाय सन १५१७ सालीं ल्यूथरनें आपलीं धर्ममतें प्रसिद्ध केल्यापासून नवीन धर्मतत्त्वांचा झपाट्यानें प्रसार होत चालला होता. अशा स्थितींत कॅथोलिक धर्मवेत्त्यांनीं आपली एक महापरिषद् सन १५४५ साल अखेर ट्रेंट येथें भरविली. ही सभा जवळ जवळ अठरा वर्षें चालली होती. या सभेंत कॅथोलिकधर्मासंबंधाचे कांहीं सिद्धान्त ठरविण्यांत आले ( खालीं टीप पहा व पान ७६. ) यांत कॅथोलिक धर्माबाहेरचा मनुष्य केवळ समाजशत्रु ठरविला होता. हे नियम नेदर्लंडांत प्रसिद्ध करून त्यांची बजावणी करण्याचें धर्मकृत्य फिलिपनें आतां हातीं घेतलें. या नियमांत धर्मभ्रष्टांस ठरविलेली शिक्षा अमलांत न आणण्याविषयीं लोकांनीं एकच उचल केली. परंतु राजा आपला दुराग्रह सोडीना. "अभूतपूर्व असें शोकपर्यवसायी नाटक आतां आपणास पहावयास मिळणार" असे ऑरेंजचे या वेळीं उद्गार निघाले. देशांत एकच हाहाकार माजला. आगामी संग्रामाचीं दुश्चिन्हें सर्वत्र भासूं लागलीं. सन १५६६ त या बंडाच्या नाटकास खरोखर सुरवात झाली. प्रथम नेदर्लंडांतील खालावलेल्या तरुण सरदार मंडळींनीं अंशतः या परकीय जुलुमास कंटाळून व अंशतः आपलें नष्ट वैभव पुनरुज्जीवित करण्याच्या हेतूनें धर्मच्छलास विरोध करण्याकरितां एक गुप्त कट केला. या बडबड्या, पोषाकी व विचारशून्य कटवाल्यांचा संमेलन करार, विज्ञप्ति-अर्ज, मेजवान्या, व मद्याच्या धुंदींत देशोद्धारार्थ केलेली भिक्षावृत्तीची प्रतिज्ञा हे

प्रसंग फार मौजेचे व बोधपर आहेत. हे प्रयत्न व्यर्थ गेलेले पाहून या सालच्या उन्हाळ्यांत लोकांनीं स्वतः इत्यारबंद भजनी मेळे मैदानांतून भरविण्याचा क्रम सुरू केला; व त्वेषाच्या झटक्यांत गांवोगांव कॅथोलिक मंदिरांचा विध्वंस केला. हे प्रकार बंद करण्याच्या कामीं बड्या सरदार लोकांनीं सरकारास मनोभावानें मदत केली; परंतु सरकारचा त्यांजविषयीं संशय उलट दृढतर होत चालला. सरदार लोकांचे वकील स्पेनमधून हताश होऊन परत आले. त्या-नंतर या लोकांच्या बंडाचा उपक्रम करण्यासंबंधानें गुप्तमसलती होऊं लागल्या. या सुमारास मार्गरेट पार्मा शहरोशहरीं शिबंदी ठेवण्याची खटपट करूं लागल्यामुळें व्हॅलेन्सिनीज वगैरे ठिकाणीं युद्धप्रसंग होऊन सरकार पक्षाची सरशी झाली. ऑरेंजनें अँट्वर्प शहरांतील धामधूम बंद केली; तथापि नव्या आज्ञांकितपणाच्या शपथा घेण्याविषयीं त्यास सरकारचा आग्रह पडला; व स्पेनमधून नवें सैन्य येत असल्याची व कांहीं सरदार लोकांचा शिरच्छेद होणार असल्याची गुप्त बातमी त्यास समजली; तेव्हां त्यानें जर्मनीस प्रयाण केलें. कटवाल्यांचा शेवट झाला. देशस्थिति फार शोचनीय झाली. लोक सैरावैरा पळूं लागले. आल्व्हाचें सैन्य सरहद्दीपर्यंत येऊन भिडलें.

आल्व्हा हें नांव यूरोपच्या इतिहासांत घोर जुलुमास पर्याय शब्द होऊन बसलें आहे. आल्व्हाला बरोबर दहा हजार सैन्य देऊन राजानें नेदर्लंडला घोर शासन करण्याकरितां पाठविलें होतें. त्यानें येतांच धर्मद्रोह्यास व राज-द्रोह्यास शासन देण्याकरितां "यमासन" नांवाचें एक अपूर्व न्यायासन निर्माण केलें (१४५). बड्याबड्या लोकांत धराधरी सुरू झाली; बहुतेक सरदारांच्या मिळकती सरकारांत जप्त झाल्या. सामान्य लोकांच्या यमासनास हजारों आहुती पडूं लागल्या. एग्मॉन, हॉर्न, बर्घेन, मॉंटिनी वगैरेंच्या चौकशीची व शिक्षेची हकीकत फार मासलेवाईक व हृदयद्रावक आहे. ऑरेंजच्या मुलाची लीडनच्या विद्यापीठांतून काढून स्पेनला अटकेंत रवानगी झाली. ऑरेंजप्रभृति सरदारांस यमासनापुढें पाचारण झालें. एकंदर वस्तुस्थिति अवलोकन करून ऑरेंजनें आतां उघडपणें बंड करण्या-स कंबर बांधली. त्यानें सर्व यूरोपभर ठळक ठळक व्यक्तींशीं पत्रव्यवहार सुरू केला; व वर्गणी गोळा करण्यास सुरवात केली. सैन्य गोळा करून त्यानें चार बाजूनें नेदर्लंडावर स्वारी करण्याची तयारी केली. प्रथम फ्रान्स-

मधून एक व जर्मनींतून एक अशा दोन टोळ्या नेदर्लंडांत शिरल्या; त्यांची पूर्ण वाताहत झाली. तिसरी लुई नॅसाची टोळी फ्रुँडझमध्यें शिरली व तिनें होलीलायन येथें शत्रूवर जय मिळविला; परंतु जेमिंगेनच्या लढाईंत त्याचा सर्वस्वी नाश होऊन फ्रीजलंडमधील बंडाचा शेवट झाला. नंतर ऑरेंजनें स्वतः चवथी मोहीम पश्चिमेकडून सुरू करून थेट राजधानीच्या शहरापर्यंत मजल गाठली. परंतु लोक अद्याप त्याला मिळण्यास तयार नव्हते. आल्व्हाचें युद्धकौशल्य अद्वितीय. त्यामुळें सैन्यास फाटा देऊन ऑरेंजला फ्रान्समध्यें निघून जावें लागलें. याच सालीं (१५६८) जर्मन बादशहानें फिलिपशीं नेदर्लंडच्या वतीनें मध्यस्थी करण्याचा पोकळ आव घातला. सन १५६९ सालीं आल्व्हानें नवे जुलमी कर बसविण्याची प्रस्तावना ब्रुसेल्सच्या सभेंत केली. हें भांडण साल अखेर चालून शेवटीं दोन साल कांहीं ठरीव रक्कम देऊं करून लोकांनीं तूर्त या ओझ्यापासून आपली मुक्तता करून घेतली. स. १५७०।७१ या सालांत बर्घेन व मॉंटिनी यांचा वध, करासंबंधीं भांडणाची पुनरावृत्ति, व ऑरेंजची युद्धाची तयारी वगैरे गोष्टी चालल्या होत्या. स. १५७२ च्या प्रारंभीं समुद्रावर चांचेपणा करीत भटकणारे देशभक्त आरमारासह ब्रिलवर उतरले; व तेथें त्यांनीं डच्चूस्वराज्याची मुहूर्तमेढ रोंवली. हॉलंड, फ्रीजलंड, यूट्रेक्ट, ईसल वगैरे प्रांतांतील बहुतेक शहरांत स्वराज्याची जबरदस्त लाट आपोआप उसळली. याच समयीं लुईनें फ्रान्समध्यें फार बेमालुम कारस्थान करून दक्षिणेकडून मॉन्स शहरावर अकस्मिक छापा घालून तें शहर काबीज केलें (२१८।१९). या वेळीं जर्मनींत सैन्य गोळा करून मॉन्सला कुमक करण्याकरितां ऑरेंज पश्चिमेच्या बाजूनें नेदर्लंडांत शिरला. आतां ब्राबंटमधील शहरेंसुद्धां भराभर त्याच्या आश्रयाखालीं जाऊं लागलीं. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं फ्रान्सच्या राजानें नेदर्लंडच्या बंडवाल्यांस साहाय्य करण्याचीं आश्वासनें देऊन व तिकडे रवाना करण्याकरितां सैन्याची सुद्धां तयारी करून, आपल्याच राष्ट्रांतील सुधारकांची निष्कारण, अकस्मिक व भयंकर कत्तल केली (२२८). त्यामुळें लुईला मॉन्स येथें शत्रूस शरण जावें लागलें; ऑरेंजला जर्मनींत पळून जावें लागलें; व दक्षिण नेदर्लंडांतील बंडाचा शेवट झाला. आतां युद्धाचें उत्तरेकडे स्थलांतर झालें. दर्गों

शहरास राष्ट्रभक्तांनीं दिलेला वेढा उठल्यानंतर डॉन फ्रेडरिक, झुट्फन, नार्डेन वगैरे शहरांस घोर व अपूर्व शासन देऊन शेवटच्या निकराच्या संग्रामास लोकांचीं मनें तयार करीत होता. बाहेरून स्वाऱ्या करून जुलमी सत्तेच्या तावडींतून देश सोडविण्याचे यत्न विफल झाले होते; त्यामुळें ऑरेंज आतां हॉलंडमध्येंच ठाणें देऊन बसला. नंतर स्पॅनिश सैन्याचा हार्लेमला वेढा पडला. या वेढ्यांत हार्लेमच्या स्त्रीपुरुषांनीं दाखविलेलें अमानुष शौर्य व साहस यांच्या योगानें त्यांनीं आपलें व आपल्या जन्मभूमीचें नांव स्वातंत्र्याच्या इतिहासांत अतिपवित्र व अजरामर करून ठेविलें आहे. मागोमाग आल्कामारचा वेढा झाला.

इकडे पोलंडची गादी रिकामी पडल्यामुळें ती प्राप्त करून घेण्याच्या खटपटींत फ्रान्सच्या राजानें पुन्हा नेदर्लंडच्या बंडवाल्यांशीं बोलणीं सुरू केलीं. ऑरेंजनें लुई व जर्मन वकील यांच्या मार्फत पुन्हा फ्रान्सशीं सख्य जुळविलें. स. १५७३ त रेकिसन्सनें कामाचा चार्ज घेतला. या कारकीर्दींतील पहिला महत्वाचा प्रसंग ह्मणजे फ्रान्सच्या मदतीनें लुईची नेदर्लंडवर मोहीम, त्यांत देशभक्तांस अपयश व लुईचा अंत हा होय. नंतर लीडनला दुसरा प्रसिद्ध वेढा पडून, ऑरेंजच्या खटपटीनें या शहराची मुक्तता झाली. स. १५७६ च्या एप्रिल महिन्यांत हॉलंड-झीलंड प्रांतांनीं आपल्या स्वातंत्र्याचा उच्चार केला. ' येथपर्यंत ऑरेंज हा शंभर मैल लांब व दहापासून चाळीस मैल रुंद अशा चिमुकल्या हॉलंड-झीलंड प्रांतांतील मूठभर शहरांच्या साहाय्यानें एशिया, आफ्रिका, अमेरिका खंडांच्या बादशहाशीं नऊ वर्षें झगडत होता; व शेवटीं त्यानें त्यास पूर्ण जेरीस आणिलें होतें. ' रेकिसन्स एकाएकीं मृत्यु पावला. स्पॅनिश सैन्यांत पगाराकरितां भयंकर बंड उद्भवलें. हें भडकलेलें सैन्य मुलुखभर लोकांस अतोनात त्रास देऊं लागलें. त्यामुळें दाक्षिणात्य प्रांतांतही स्पॅनिश अंमल असह्य झाला. यासमयीं ऑरेंजनें सर्व प्रांतांची परिषद्‌ घेंट येथें भरवून तींत नव्या जुन्या धर्मांच्या लोकांनीं धर्मभेद विसरून स्वराज्याकरितां झटावें असें ठरविलें. डॉन जॉनची कारकीर्द हा केवळ बुद्धिबळाचा खेळ आहे. यांतील उभयपक्षांचीं तहाचीं बोलणीं, त्यांत जॉनची फजिती, नंतर निराशेच्या झटक्यांत त्यानें केलेले चाळे, कॅथोलिक सरदारांचे ऑरेंजविरुद्ध डाव वगैरे प्रसंग फार रमणीय आहेत.

जॉनच्या मृत्यूनंतर ॲलेक्झँडर पार्मानें राज्यसूत्रें धारण केलीं. त्यानें बड्या बड्या कॅथोलिक सरदारांचें वळण ओळखून त्यांस द्रव्याच्या आशेनें स्ववश करून घेतलें; व वाॅलून प्रांत सरकारास परत मिळविले. त्यामुळें ऑरेंजला स्वतंत्र झालेल्या प्रांतांचा नवा संयोग यूट्रेक्ट येथें घडवून आणणें जरूर झालें. नंतर कोलोन येथील तहाची शुष्क वाटाघाट, ऑरेंजविरुद्ध बहिष्कार, त्याचें आत्मसमर्थन वगैरे प्रसंग घडून आले. पुढें स्वतंत्र झालेल्या प्रांतांचा राजसत्तापरित्याग, अँजूस राजपद देण्याचा समारंभ, त्याचें विश्वासघातकी वर्तन, व पुढील व्यवस्थेसंबंधीं वाटाघाट चालली असतां ऑरेंजचा अपमृत्यु वगैरे प्रसंगांचें वर्णन देऊन या इतिहासाचें कथानक संपविलें आहे.

या इतिहासांतील व्यक्तिवैचित्र्य व प्रसंगवैचित्र्य, मानवी स्वभावांचे व राजकारस्थानांचे विविध व अपूर्व मासले अन्यत्र क्वचितच आढळतील. विशेषतः ईश्वराच्या न्यायीपणाविषयीं दृढ विश्वास, मनुष्यसमाजाच्या भावी सद्गतीसंबंधीं पक्की खात्री व आपल्या कर्तव्यासंबंधीं अभिमान व तत्परता या खऱ्या देशभक्ताच्या मनोधर्माचा हा दुर्लभ ऑरेंजचा वृत्तान्त केवळ आत्मानुभव आणून देणारा आहे. या इतिहासांतील विशेष नामें वाचकांस अपरिचितपणामुळें प्रथम अवघड वाटतील. परंतु एखाद्या अशिक्षितास वात्स्यायन, याज्ञवल्क्य हीं नांवेंही तशींच भासण्याचा संभव आहे.

## ख्रिस्ती धर्म.

अवभृत ( ख्रिश्चन ) येशू ख्रिस्तानें आपल्या शिष्यवर्गास सांगितलेला धर्म. या धर्मांत ख्रिस्तमंडळ, त्यांच्या विशिष्ट धर्मकल्पना व नीतितत्त्वें, शिवाय ख्रिस्त व त्याचे भक्त यांच्या चरित्रकथा यांचा समावेश होतो. ख्रिस्ताचा अवतार व त्याचा मुमुक्षूंना उपदेश हें या धर्माचें केवळ बाह्य-स्वरूप आहे. या उपदेशावर विश्वास ठेवून त्याचा आपल्या ठिकाणीं अनु-भव घेणें हें त्याचें अध्यात्म स्वरूप आहे. बायबल हा धर्मग्रंथ सामान्यतः सर्व ख्रिस्ती लोक ईश्वरप्रणीत व आपल्या धर्माला आधारभूत मानतात. त्यांतही सृष्टिक्रमवादी वगैरे लोक बायबलचे कर्तृत्व सर्वस्वी अगर अंशतः साधूलोकांकडे देतात. भक्तिमार्गांतील लोक मात्र बायबल ही भगव-दुक्ति समजून ती ख्रिस्ती समाजाची आत्मिकशक्ति समजतात. बायबल हें स्वतः प्रमाण आहे अशी या लोकांची समजूत आहे. कॅथोलिक लोक

ख्रिस्तीमंडळ ठरवील तोच बायबलचा खरा भावार्थ समजतात. निरनिराळ्या ख्रिस्तीपंथांचीं धर्मतत्त्वें खालीं दिलीं आहेत.

**कॅथॉलिक** अगर **रोमन कॅथोलिक पंथ**–कॅथोलिक ( विश्वव्यापी ) हें नांव प्राचीन ख्रिस्तीलोकांनीं आपल्या धर्माची व्यापकता व आपल्या धर्मतत्त्वांची जगमान्यता दर्शविण्याकरितां धारण केलें. धर्मतत्त्वें: १. ईश्वर एकच असुन त्याची कार्यवशात् पिता, पुत्र व चिच्छक्ति अशीं तीन रूपें झालीं आहेत: हीच ईश्वरी त्रयी. प्रथम निर्माण झालेल्या मनुष्याचें पाप क्षालन करण्याकरितां ईश्वरानें आपला अंश ( येशू ख्रिस्त ) मेरी नामक अविवाहित कुमारिकेच्या पोटीं निर्माण केला. येशूनें आपला देह खर्ची घालून मानवी प्राण्यास पापापासून मुक्त केलें: २. या पंथाचा पोप हा मुख्य शंकराचार्य; त्याची या समाजावर पूर्ण सत्ता; त्याचा शब्द त्यांस श्रुतिप्रमाण. पोपची निवडणूक आचार्य ( Cardinals ) करितात. या आचार्यांच्या लहान लहान मंडळ्या करून पोपमहाराज त्यांच्या सह्यानें आपला धर्माधिकार चालवितात. **धर्मसंशोधकमंडळीचें** काम पाखंडमत, अशास्त्र विवाहसंबंध, प्रायश्चित्तदोष, दांभिक धर्माचरण, मूर्तीचा उपहास, दुष्टमन्त्रप्रयोग, आचारोल्लंघन वगैरे गुन्ह्यांची चवकशी करून त्यांस शिक्षा देणें हें असे. शिवाय मंदिरस्थापक, मठनियामक, आचारपरीक्षक, सम्यगादेशक वगैरे मंडळ्या असतात. स्थानिक धर्माध्यक्षांच्या हाताखालीं निरनिराळ्या वर्गाचे पाद्री धर्मखात्याचें काम चालवितात: ३. बायबलशिवाय परंपरागत व अलिखित अशी एक प्रकारची स्मृति कॅथोलिक लोक प्रमाण मानतात: बायबलचा अर्थ ठरविण्यांत कॅथोलिकख्रिस्ती धर्मगुरूंचा अभिप्राय प्रमाण मानतात. प्राटेस्टंट लोक बायबलग्रन्थावांचून कोणालाही प्रामाण्य देत नाहींत. त्यांच्या मतें बायबलचा अर्थ प्रत्येकास आपल्या ज्ञानशक्तीप्रमाणें करण्यास पूर्ण अधिकार आहे. या मतासंबंधानें कॅथोलिक लोकांस त्वेष चढून त्यांनीं बायबल खासगी रीतीनें वाचण्यासंबंधानें अगर निरूपण करण्यासंबंधानें सक्तीचे नियम केले: ५. ईश्वरी प्रसाद–यापासून मुक्ति अगर अद्भुत सामर्थ्य प्राप्त होतें. प्राटेस्टंट लोकांच्या मतें हें तत्त्व यत्नवादाला विघातक आहे: ६ ईश्वरप्राप्तीचे विधि ( Sacraments ), –धर्मदीक्षा ( Baptism ), पवित्र शक्तीचा समारोप ( confirmation ), येशूच्या शरीराचें रूपांतर

होऊन होमांतून निघालेल्या मद्याचा व भाकरीचा प्रसादसेवन ( एक प्रकारचा यज्ञ ) ( Holy Ucharist of Transubstantiation ), प्रायश्चित्त ( penance ), रुग्णप्रायश्चित्त ( Extreme unction ), धर्माधिकार दीक्षा, विवाह, तन्त्र व प्रयोग, प्रायश्चित्तविक्रयः७ ( Indulgences ), यमलोक ( purgatory ) , शारीरतप ( mortifications ).

**प्राटेस्टंट**–धर्मतत्त्वें: ईश्वर सायुज्य हें या नव्या पंथाचें आदितत्त्व आहे; बायबलचें स्वतः प्रामाण्य व भक्तीपासून मुक्ति ह्या सुधारकांच्या मुख्य कल्पना होत. यांना ते चिच्छक्तीची साक्ष व आधार देतात. या तत्त्वांवरून पोपची सत्ता व ख्रिस्तीमंडळाचें प्रामाण्य, कॅथोलिकधर्माचे विधि व त्यांचें फल, तन्त्र प्रयोग, सत्कर्माचें तात्कालिक फल, मठवास, प्रायश्चित्तविक्रय, यमलोक वगैरे मतांचा या ल्यूथरमतानुयायी वर्गानें अव्हेर केला. नवीनधर्मीयांनीं त्रिविध सुधारणा हातीं घेतली: १. आचार व नीति-सुधारणा, विचारसुधारणा (खऱ्या प्राचीन धर्मकल्पनांचा उद्धार), तात्त्विक सुधारणा (मतस्वातंत्र्याचा पुरस्कार). ह्यूजेनॉट-फ्रान्समधील अव्वल सुधारकांना अशी संज्ञा असे.

**ऑग्सबर्गचीं धर्मतत्त्वें**– स. १५३० सालीं जर्मनीतील नवीनधर्मी संस्थानिकांनीं व मोठमोठ्या शहरांच्या प्रतिनिधींनीं पांचव्या चार्लसपुढें ऑग्सबर्गच्या परिषदेंत वाचून दाखविलेल्या नवीन धर्मतत्त्वांचा सारांश:— ईश्वराच्या दयालुत्वावर भरंवसा ठेवण्यानें मनुष्य पापापासून मुक्त होतो. मात्र ईश्वराची कृपा होण्यास त्याच्याप्रमाणें निर्मल व दयाभूत आचरण ठेविलें पाहिजे. ख्रिस्तीमंडळ ह्मणजे बायबल प्रमाण मानणारा व धर्मदीक्षा वगैरे मुख्य विधि पाळणारा श्रद्धावान ख्रिस्तीसमाज. प्रत्येक प्राणिमात्राची विचारशक्ति हाच खरा मोक्षमार्ग होय. तन्त्र व प्रयोग हे व्यर्थ आहेत. सन १५५५ सालीं ऑग्सबर्ग येथें पुनः जर्मन राष्ट्राची महापरिषद् भरून त्यांत प्रत्येक संस्थानिकानें ऑग्सबर्गचीं धर्मतत्त्वें अगर कॅथोलिक तत्त्वें आपल्या इच्छेप्रमाणें स्वीकारावीं; परंतु रयतेवर धर्ममतांबद्दल कोणत्याही प्रकारें सक्ती करूं नये असें ठरलें.

**ट्रेंट महापरिषद** ( कॅथोलिक महामंडल : १५४५–६३ )–धर्मशास्त्र,

स्मृति, मूळ पाप, ईश्वरी प्रसाद, सात मुख्य विधि यांचें विवरण करुन तद्विरुद्ध आक्षेपांचें खंडण, व नीति व आचार यासंबंधानें नियमन करण्यांत आलें.

( पुढें पा. ७६ पहा )

---

शोध–पान १४९, ओ. ४ " पूर्वीच आपण मेलों " च्या ठिकाणीं " पूर्वीच मेला " असें वाचावें.

याशिवाय क्वचित्स्थळीं निरुपायामुळें काना, मात्रा, विराम वगैरेचे दोष आहेत. त्यासंबंधीं विशेष अडचण पडणार नाहीं. मराठी लेखनपद्धतीची हल्लीं कान्तिक स्थिति असल्यामुळें कांहीं शब्द अपरिचित वं विविध वेषांत प्रगट झाल्याचें दिसून येईल.

---

# राजपुत्र वुइल्यम ऑरेंज

अथवा

# नेदर्लंडांतील बंडाचा इतिहास



इ० स० १५५५ पासुन १५८४ पर्यंत.

## भाग १ ला.

### डचूराष्ट्राची पूर्वपीठिका.

यूरोपच्या वायव्य कोनाकडील देशास नेदर्लंड असें नांव आहे. फ्रान्स, जर्मनी व समुद्र यांनीं वेष्टिलेल्या या लहान त्रिकोनाचे हल्लींच्या बेल्जियम् व हॉलंड या दोन राष्ट्रांनीं सारखे दोन भाग झाले आहेत. ऱ्हाईन, म्यूज व शेल्ड यीं तीन मोठ्या नद्यांच्या मुखांपाशीं समुद्राच्या भरतीनें बनलेल्या वाळूच्या उंचवट्यावर नद्यांतून वाहून आलेली रेती बसून मनुष्यास राहण्याजोगा हा प्रदेश प्रथम तयार झाला. निसर्गतः ही मोठी दलदलच असून त्यांत ठिकठिकाणीं रेताड बेटें व भयंकर जंगलें होतीं. हा प्रदेश समुद्राच्या सपाटीपेक्षां सखल असल्यामुळें समुद्राच्या भरतीनें व नद्यांच्या पुरांनीं वारंवार वाहून जात असे. कालांतरानें नेदर्लंडच्या सभोंवार, झाडीच्या बाहेरच्या तोंडाशीं, समुद्राची वाळू सांचून आंतल्या प्रदेशाच्या बचावाकरितां त्याचे नैसर्गिक धक्के बनले. ऱ्हाईन् नदी सातपर्वतांतुन बाहेर निघून सपाट प्रदेशांत आल्यावर तिच्या दोन शाखा होतात; या दोन भुजांतरांत बटेव्हिया बेट आहे. शेल्ड नदीच्या मुखाजवळील वालुकामय प्रदेशांत व जंगलांत न्यूझीलंड व हॉलंड हा बेटांचा समुदाय निर्माण झाला आहे. या जलमय प्रदेशांत

ऊद् प्राण्यासारख्या अश्रांत मेहनतीनें मातीचे उंचवटे करून त्यावर राहणारी मत्स्याहारी लोकांची एक जात होती. या ठिकाणीं याच लोकांनीं कांहीं कालानें महासागर व त्यास मिळणारे प्रवाह आपले अंकित करून, मोठमोठे कालवे खणून हा प्रदेश सुपीक केला व त्याचें क्षेत्रही वाढविलें; मोठमोठे जलमार्ग काढून सृष्टिकर्त्याकडून हक्क नष्ट झालेल्या आपल्या देशाचें सर्व जगाशीं दळणवळण सुरू केलें; आणि पृथ्वी व सागर या दोघांनींही बाहेर ढकललेल्या या राष्ट्रानें शेवटीं दोहोंपासूनही आपला संपत्तीचा वांटा मेहनतीनें परत मिळविला. याप्रमाणें क्षुब्ध महाभूतांशीं कित्येक वर्षे झगडण्यांत गुंतलेल्या या डच लोकांस मानवी प्राण्याच्या घोर जुलुमाशींही टक्कर देण्याचे कामीं हळू हळू एक प्रकारचें शिक्षण मिळत चाललें होतें.

असा हा नेदर्लंड ( सखल देश ) किंवा हॉलंड ( पोकळ प्रदेश ) सुधारलेल्या रोमन लोकांच्या दृष्टीच्या फेऱ्यांत यावा, हें राज्यतृष्णेस सुपीक व नापीक, सुंदर व भयाण वगैरे भेद दिसत नाहींत, याचें एक उदाहरण आहे. रोमन लोकांनीं या देशावर स्वारी केली त्या वेळेपासून-च या देशाच्या इतिहासास प्रारंभ होतो. या वेळीं या देशांत ऱ्हाईन नदीच्या पश्चिमेस बेल्जी, पूर्वेस फ्रीजी व बटेव्हिया बेटावर बटेव्ही नांवाचे लोक राहत असत. थोड्याच अवकाशांत रोमन लोकांनीं या सर्वांना जिंकिलें. तथापि त्यांच्या शौर्याची विजयी रोमन लोकांनीं फार शिफारस लिहून ठेविली आहे.

रोमन सत्तेचें जूं झुगारून देऊन देशांत स्वराज्य स्थापण्याच्या इराद्यानें क्लॉडियस सिव्हिलिस नामक एका उच्च कुलांतील बटेव्हियन सरदारानें बंड केलें. पुढें सोळाव्या शतकांत स्थापन झालेल्या डच् प्रजासत्ताक राज्यास जी स्पेनच्या राजसत्तेशीं टक्कर द्यावी लागली तिचें हें पूर्व स्वरूपच होतें. दोन्ही वेळचीं पात्रें, प्रसंग, पाण्यांतील लढाया, निकराचे वेढे, धरसोडीचे तह, औदार्याचे, धाडसाचे व क्रौर्याचे प्रकार, मोकळ्या मनानें वेळोवेळीं ठेवलेला विश्वास व त्याचा घात यांत इतकें साम्य आहे कीं, पात्रें व पोषाक बदलून तेंच नाटक, इतिहास पुनः पुनः घडवीत असतो, असें त्यावरून वाटतें. दोन्ही प्रसंगांचे नायक जर्मन जातीचे असून

शत्रूच्या बादशाही गोटांत सामदामादि कला शिकून तरबेज झाले होते. दृढनिश्चय, एकनिष्ठा, संकटसमयीं मनोनिग्रह, प्रसंगानुरूप वर्तन करण्यास लागणारा अमानुष चिवटपणा, स्वार्थत्याग, सामभेदादि राजविषेंत पूर्ण नैपुण्य, शौर्य व निःसीम देशभक्ति हीं महापुरुषाचीं लक्षणें दोघांतही सारखींच वसत होतीं. दोन्ही प्रसंगीं दाक्षिणात्य बेल्जी लोक स्वभावानें तापट, तिरसट व साहसी असल्यामुळें प्रथम शत्रूवर तुटून पडले; परंतु उत्तरेकडील लोक जास्त धिमे असल्यामुळें, त्यांच्या अंगांत क्रोधाग्नीचा संचार होण्यास जरा उशीर लागला, तथापि त्यांनींच शेवटपर्यंत टिकाव धरून पल्ला पोहोंचविला. फ्रीजलंडच्या लोकांनीं आपलें स्वातंत्र्य प्रथम परत मिळविलें.

इसवी सनाच्या सहाव्या व सातव्या शतकांत रोमन साम्राज्यापैकीं गॉल प्रांतांत क्रांति होऊन जी फ्रँक लोकांची राजसत्ता स्थापन झाली, तिच्या सपाट्यांत सर्व नेदर्लंड देश सांपडून त्यांत ख्रिस्तीधर्माचा झेंडा फडकूं लागला. फ्रँक लोकांनीं बरेच युद्धप्रसंग करून फ्रीजलंड हा प्रांत अखेर फ्रेंच राज्यास जोडला व त्यायोगानें ख्रिस्तीधर्माचा मार्ग सुलभ करून दिला. प्रसिद्ध राजा शार्लेमन यानें जर्मनी, फ्रान्स, लाँबर्डीप्रमाणें सर्व नेदर्लंडचा एक निराळा परगणा केला होता. पुढें त्याच्या वंशजांच्या कारकीर्दींत नेदर्लंड देश जर्मनीच्या ताब्यांत गेला. रोमन लोकांच्या अ-मलापूर्वीं लोकांनीं निवडलेल्या मुखत्यारांची सभा असून राजा आणि सेनापति वगैरे अधिकारीही निवडून देण्याची पद्धति होती; ती पुढें सर्व नाहींशी झाली. राजा व त्यानें नेमलेले अधिकारी यांच्या मार्फत सर्व कारभार चालू लागला.

पुढें पांच शतकें ( फ्यूडॅलिझमचीं ) सरंजामदारी अमलाचीं गेलीं. या कालांत तरवारीचें माहात्म्य विशेष होतें. धर्माधिकारी व सरदार लोक यांची आपसांत वतनाचीं भांडणें सतत चालू असत; व त्या भांडणांत उभीं पिकें लुटणें, गांवें जाळणें, किल्ले बांधणें, दरवडे घालणें, विधर्मी लोकांस जिवंत जाळणें व अशा दुष्कर्मांनीं मिळविलेल्या पैशांतून धर्मगुरू पोपची भर करून, स्वर्गप्राप्तीचे दाखले मिळविणें हे धंदे सारखे चालले होते. सर्व देशां-च्या अनुभवाप्रमाणें हे सरंजामीदार पुढें दहाव्या, अकराव्या व बाराव्या

शतकांत राजाचें स्वामित्व झुगारून देऊन स्वतंत्र संस्थानिक बनले; व हीं संस्थानें व ह्या जहागिरी पुढें वंशपरंपरेनें चालणाऱ्या झाल्या. त्याचप्रमाणें पाद्री लोकांचें माहात्म्यही या शतकांत फार वाढलें. समाजांत त्या वेळच्या मानानें सुशिक्षित वर्ग तेवढाच असल्यामुळें धर्माचरण करून लोकांस सन्मार्गदर्शक या नात्यानें व शापाच्या दहशतीमुळें राजापासून तों तहत रंकापर्यंत सर्व दर्जाच्या व वयाच्या लोकांवर त्यांचें वजन जबरदस्त बसलें होतें. याच अवधींत या देशाचा इंग्लंड, बाल्टिक समुद्रांतील व भूमध्य समुद्रांतील बंदरें, व पूर्व देश यांशीं अनेक जिनसांचा व विशेषतः लोंकरीचा व्यापार अतोनात वाढला. राजे जरी स्वैर होते, तथापि त्यांस आपल्या मिजाशीप्रमाणें व कलाप्रमाणें वागण्यास पैशाची अवश्यकता असे; व हे पैसे व्यापारी लोकांकडून मिळविण्याचें साधन असल्यामुळें, त्यांस नानाप्रकारच्या सवलती देऊन व्यापारास उत्तेजन द्यावें लागत असे. शिवाय नेदर्लंडदेशाची नैसर्गिक ठेवणच अशी आहे कीं, त्यांत व्यापाराची वृद्धि व्हावी. देश लहान आहे, परंतु त्याची सरहद्द समुद्रवेष्टित आहे; व मोठमोठ्या नद्या या देशांतून वहात जाऊन समुद्रास मिळत आहेत; त्यामुळें या देशाच्या बहुतेक भागाचा परदेशांशीं संबंध जडण्यास जलमार्गाची फार सोय आहे. सारांश, व्यापार वाढल्यामुळें चारही दिशांकडून नेदर्लंडदेशांत संपत्तीचा पूर लोटला. लहान खेड्यांच्या जागीं अनेक मजली घरांचीं व मोठमोठ्या मनोऱ्यांचीं शहरें बनलीं; अन्नार्थी फ्लेमिश कोष्टी मोठमोठे कारखानेवाले झाले; आणि कोळी व नद्यांमधील होडीवाले मोठे नौकाधीश व धनाढ्य व्यापारी बनले. अर्थातच पोलादाची सत्ता पिंवळ्या धातूस प्राप्त झाली. संपत्तीमुळें व्यापारी बलिष्ठ होऊन बेगुमान झाले, आणि त्यामुळें शहरांचें स्थानिक माहात्म्य वाढून देशाच्या राज्यव्यवस्थेंत त्यांस जास्त वजन मिळूं लागलें. तथापि राज्यव्यवस्थेचें बाह्य स्वरूप पूर्वीचेंच कायम राहिलें. फक्त सरंजामीदारांच्या ठिकाणीं व्यक्तित्व प्राप्त झालेल्या ह्या नवीन उदयास आलेल्या शहरांची गणना क्रमाक्रमानें होऊं लागली. सामान्य जनसमूहाची स्थिति मात्र पुष्कळ कालपर्यंत सुधारली नव्हती. गुलामगिरीचा व्यवहार आपखुषीनें व बळजबरीनें

चाललाच होता. नादार लोक अन्नाकरितां आपला देह विकीत असत, व भित्रे लोक बलिष्ठांपासून आपणास अपाय न व्हावा ह्मणून देहविक्रय करीत असत. परंतु पुढें त्यांच्या सुधारणेची एक नामी संधि आली. सर्व ख्रिस्ती राष्ट्रांची जन्मभूमि व आदिपीठ जें जेरूसलेम, तें परधर्मी लोकांच्या हातून सोडविण्याकरितां जेव्हां मोठें धर्मयुद्ध सुरू झालें, त्या वेळीं लढाईवरून परत आलेल्या लोकांस शरीरस्वातंत्र्य देण्याचा परिपाठ पडला. तसेंच या युद्धास जाण्यापूर्वी पुष्कळ सरदारांनीं पैसे जमविण्याकरितां आपले गुलाम देवस्थान व मठ यांस विकून टाकले. या लोकांची स्थिति या नवीन अवस्थेंत बरीच सुधारली. शिवाय मुलुखगिरीवर गेलेल्या गुलामांच्या ऐवजीं शेतकाम करण्यास मोलानें लोक लावण्याचा प्रघात पडला. या सर्व कारणांमुळें सामान्य लोकांस बरेंच स्वातंत्र्य मिळून कारागीर, व्यापारी, शेतकरी वगैरे लोकांचा मोठा वर्ग फुगत चालला; व त्यांनीं आपापल्या धंद्याचे निरनिराळे वर्ग केले. व त्यांस प्रथम हॉलंडमध्यें राजाची मान्यता मिळून पुढें या मंडळ्यांस विशिष्ट स्वरूप मिळत चाललें. राजाकडून ज्या सनदा अव्वल मिळाल्या, त्यांत या मंडळ्यांस कायद्याप्रमाणें वागविण्याचें आश्वासन मिळाल्याचें दिसून येतें; परंतु कायदे करण्याचा व त्यांची बजावणी करण्याचा सर्व अधिकार राजाकडेच होता. कांहीं कालानें आपले मॅजिस्ट्रेट व ग्रामाधिपती निवडण्याचा अधिकार सर्व शहरवासी लोकांस, व पुढें ग्रामसभेस व निरनिराळ्या मंडळ्यांच्या प्रमुख लोकांस मिळाला. तेराव्या शतकाच्या अखेर नेदर्लंडमधील शहरांचा व्यापार इतका भरभराटीस आला होता कीं, केवळ कायद्याच्या अमलाखालीं राहून त्यांची तृप्ति होईना; व हळू हळू प्रांतिक व राष्ट्रीय कारभारांत त्यांचा पगडा बसत चालला. तेराव्या व चवदाव्या शतकांत फ्लँडर्झ व हॉलंड या प्रांतांतील सर्व मुख्य शहरांच्या वतीनें प्रांतिक सभेंत प्रतिनिधि पाठविण्याचा प्रघात पडून, हे प्रतिनिधि व जहागिरदार मिळून येथील पार्लमेंट (राष्ट्रीय संसद) बनत चालली होती. या शहरांना आपले ग्रामाधिपती व कांहीं प्रांतिक सभेचे सभासद निवडण्यासाठीं दिलेल्या हक्कांच्या सनदा, संस्थानच्या मालकांकडून याच सुमारास मिळाल्या. तेराव्या शतकांत समुद्राचें पाणी भरतीच्या वेळीं

हॉलंड व फ्रीजलंडचे दरम्यानच्या खाडींत फार आल्यामुळें झूडरझीचें आखात रुंद होऊन फ्रीजलंडचा पश्चिमभाग व पूर्वभाग हे अगदीं तुटक झाले. पश्चिमभाग हॉलंडमध्यें सामील झाला व पूर्वभागांत राहिलेल्या सात लहान संस्थानांनीं आपापला कारभार निराळा चालवून सर्व संस्थानांची राष्ट्रीय संसद् पूर्ववत् चालविली होती; व त्या सर्वांवर एक लोकनियुक्त पोडेस्टा अगर सुभेदार असे. या सुभेदाराची अठरापासून वीस इसमांची सल्लागार मंडळी असे. सर्व संस्थानांचा लोकनियुक्त पोडेस्टा-जनरल अगर सरसुभेदार असे. या दोन्ही अधिकाऱ्यांची नेमणूक कांहीं मुदतीची अगर तहाहयात असे; व त्यास प्रांतिक व राष्ट्रीय सभेपुढें लोकांशीं व त्यांचे प्रतिनिधींशीं इमान राखण्याबद्दल शपथ घ्यावी लागत असे. यावरून फ्रीजलंडमध्यें तेराव्या व चवदाव्या शतकांत नांवाशिवाय बाकी सर्वस्वी लोकसत्ताक राज्यच होतें. हॉलंड व फ्लँडर्स या प्रांतांस या काळीं बऱ्याच अंशानें स्वराज्याचे हक्क मिळाले होते. एवंच ज्या तन्मात्रामधून सोळाव्या शतकांत एक सुंदर लोकसत्ताक राज्याचा देह निर्माण व्हावयाचा होता त्याचा अंकूर पूर्वीपासून फुटत चालला होता. स्वातंत्र्यप्रीति, तत्प्रीत्यर्थ घाव घालण्यास व रक्तपात करण्यास सदैव तत्परता, सत्तेच्या घोर व सर्वव्यापी जुलुमाचा प्रतिकार करण्यास अवश्य लागणारी मर्दुमकी हे या लोकांचे सर्वत्र व सर्वकालीन गुण आहेत. राजकीय व धार्मिक स्वातंत्र्य मिळविण्याचे कामीं हॉलंड व फ्लँडर्स या प्रांतांत दंगेधोपे, मारामाऱ्या व रक्तपात नेहमीं होत असत; परंतु बंडें व दंगे हीं संपत्ति व उन्माद यांचीं बाह्य चिन्हें होतीं; व यावरूनच या लोकांत स्फुरण आहे असें लोकांस कळून येत होतें. या राष्ट्राच्या नाड्यांत खरें रक्त वाहत होतें. या लोकांतील स्वाभाविक उद्दामपणा व मानहानि होतांच अंगावर तुटून पडण्याची दृढ संवय, ह्या गुणांमुळेंच त्यांस स्पेनसारख्या अवाढव्य राष्ट्राच्या जबरदस्त जुलुमाशीं टक्कर देण्याचें धैर्य पोहोंचून, तें काम त्यांनीं मोठ्या नेटानें शेवटास नेलें.

इ. स. १४३७ सालीं बर्गंडीच्या फिलिप राजाच्या ताब्यांत नेदर्लंडचे अकरा प्रांत, कांहीं खरेदी हक्कानें, कांहीं लग्नसंबंधांत, कांहीं वारसानें, व कांहीं तरवारीच्या जोरानें आले होते. त्यांतच आणखी दोन प्रांतांची

भर फिलिपचा मुलगा चार्लस यानें घातली. इतका मुलूख ताब्यांत आल्या-
कारणानें, त्याचें महत्व यूरोपच्या राजांत फारच वाढलें. पोर्तुगालची
राणी इजाबेला इजबरोबर लग्न झाल्यावर या राजानें इतिहासांत गोल्डन-
फ्लीस अथवा सोन्याची लोंकर या नांवानें प्रसिद्ध असलेली राजे
लोकांची जमात स्थापन केली; या जमातीचे सुमारें पंचवीस ख्रिस्ती
सामंतचक्राचे राजे व संस्थानिक सभासद होते. प्रत्येक सभासदाच्या
गळ्यांत ख्रिस्ताच्या कोंकराची सुवर्णप्रतिमा घालण्याचा संकेत होता;
यावरून लोंकरीच्या व्यापारापासून फ्लेमिश व्यापाऱ्यांना मिळालेली
अपार संपत्ति व ख्रिस्ताप्रमाणेंच आपल्या मोठेपणास शोभेल, असा सर्व
सभासदांनीं स्वीकारलेला नम्रपणा या दोन्ही गोष्टी सुचविल्या जात
होत्या. सदस्यांची संख्या अध्यक्ष धरून पंचवीस कायमची ठरली होती.
या संस्थेंत असलेल्या जहागिरदारांनीं इतर कोणांशीं स्नेहसंबंध ठेवाव-
याचा नाहीं असा ठराव होता. फिलिप गादीवर आला त्यावेळीं मध्यम
प्रतीच्या लोकांची सत्ता, शहरच्या व्यवस्थेंत, प्रांताच्या सभेंत व त्या
द्वारानें खुद्द राष्ट्रसंसदेंत फारच वाढली होती. प्रांतिक सभेंत कोणताही
नवीन कायदा उपस्थित झाल्यास तो सरदारमंडळापुढें संमतीकरितां
प्रथम मांडण्याचें काम अध्यक्षाचें असे. त्यांची मंजुरी मिळाल्यावर
तो लोकसभेपुढें विचाराकरितां येत असे. निरनिराळ्या शहरच्या
प्रतिनिधींस त्या बाबतींत कांय मत द्यावयाचें हें पूर्वी शहरवासी
लोकांकडून समजलें असल्यास, त्याच बैठकींत सदर विषयाचा
अखेरचा निकाल होत असे. परंतु शहरवासी लोकांकडून मुख-
त्यारांस कांहीं अभिप्राय मिळाला नसल्यास मुदत घेऊन तो ठिक-
ठिकाणच्या मतदारांपुढें मांडावा लागे. फिलिपनें राज्यारोहण करतांच एक-
दम प्रजेचे सर्व हक्क, इमान राखण्याबद्दलच्या शपथा वगैरे पूर्वापार सं-
प्रदायांस फांटा दिला. राजाची सत्ता यापुढें निरंकुश झाली; व ही स्थिति
अंशतः सोळाव्या शतकांत प्रजासत्ताक राज्य स्थापन होईपर्यंत कायम
राहिली. देशाची सांपत्तिक स्थिति मात्र दिवसेंदिवस अधिक सुधारत
होती. मासे धरण्याचे कारखाने फारच वाढत चालले व त्याच्या योगानें
खलाशी तयार होण्यास सुरवात झाली व हाच डच् आरमाराच्या वर्च-

स्वाचा पाया झाला. समुद्रावरील "भिक्षेकरी" अगर "भणंग" या नांवाखालीं ज्यांनीं स्पेनच्या राजांस भयकंपित करून सोडिलें, ते याच कोळ्यांचे वंशज होत. याच सुमारास स्वातंत्र्यप्राप्तीच्या पवित्र संग्रामांत अगदीं अमूल्य असें दुसरें एक हत्यार निर्माण झालें. हार्लेमच्या लॉरेंझ कॉस्टर अथवा लॉरेन्स सेक्स्टन नांवाच्या एका गरीब रहिवाशानें सन १४२३ व १४४० च्या दरम्यान, लहर लागल्या वेळीं एकेक असे पाडलेले अक्षरांचे खिळे जुळवून एक लहानसें व्याकरण छापून काढिलें. ह्या कलेची जन्मवार्ता ऐकून आनंदाश्चर्याची लाट कोठेंही उमटली नाहीं; परंतु मानवी प्राण्याच्या संस्कृतीवर या गरीब सेक्स्टनच्या लांकडी अक्षरांचा काय परिणाम झाला आहे, हें आबालवृद्धांस मशहूर आहेच.

फिलिपच्या मागून त्याचा मुलगा चार्लस गादीवर आला. हा राजा साहसी, बलिष्ठ व रणशूर होता; परंतु या समयीं मुत्सद्दीगिरीची ज्यास्त अपेक्षा असल्यामुळें, ह्या राजाच्या हातून मुलूखगिरीचें कामही बरोबर झालें नाहीं. आपली महत्वाकांक्षा तृप्त करण्याकरितां त्यानें नेदर्लंडराष्ट्राकडून जबरदस्तीनें पैसे मागविण्याचा क्रम सुरू केला; व राष्ट्रांतील लोकमतास गुंडाळून ठेवून प्राचीन प्रतिनिधिसभांस त्यानें बहुतेक जमीनदोस्त केलें. नवे जुलमी कर बसूं लागले, ते न देण्याविषयीं शहरोशहरीं दंगेधोपे, बंडाळ्या व रक्तपात होऊं लागले. चार्लस यास आकस्मिक मरण येऊन ही कारकीर्द संपली नसती तर फार मोठे अनर्थ झाले असते. या राजानें हेग येथें असलेली मुख्य न्यायसभा मेलिन येथें नेऊन व कदिम फौज ठेवून नेदर्लंडच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यावर मोठेच घाव घातले. या न्यायसभेचे अधिकारी सर्वस्वी राजावलंबी करून ती हॉलंडच्या बाहेर नेल्यामुळें प्रत्येक हॉलंडरचा आपल्या देशांत न्याय मिळण्याचा हक्क नाहींसा झाला. ह्या न्यायसभेचें स्थलांतर हें पुढील युद्धाचें एक अनुषंगिक कारण झालें. चार्लसची वारस एकुलती एक मुलगी लेडी मेरी ही राज्यपदारूढ होतांच नेदर्लंडचा स्वातंत्र्यकंदुक पूर्वीप्रमाणें किंबहुना पूर्वीपेक्षां जास्त उडूं लागला. राष्ट्रांतील सर्व प्रांतांची परिषद् घेंट शहरीं भरली. त्यावेळीं आपलीं जुनींपुराणीं भांडणें एकीकडे ठेवून, सरदार व सामान्य लोक, लोकपक्षीय व राजपक्षीय लोक आपल्या

राष्ट्राच्या राज्यव्यवस्थेचें पूर्वीचें स्वरूप पुनः कायम करण्याकरितां घेंट शहरीं धांवून गेले. फ्रान्सचा अकरावा लुई यानें बर्गंडी प्रांत खालसा केला, व लेडी मेरी इजला आपली सून होण्याविषयीं मागणी चालविली. लेडी मेरीनें नेदर्लंडच्या लोकांपुढें आपलें संरक्षण करण्याकरितां पदर पसरला. लोकांची राजभक्ति उत्तेजित करण्याकरितां त्यांस न्यायानें व सदयपणानें वागविण्याविषयीं शपथा व इमानें केलीं. लोकांनीं मेरीच्या बापाच्या कारकीर्दींत झालेला जुलूम व घावे लागलेले जबर कर यांचा या प्रसंगीं उद्धार केला. त्यावरून लेडी मेरीनें पूर्वीचे हक्क कायम करून नेदर्लंडच्या लोकांस एक नवीन "ग्रेट प्रिव्हिलेज" नांवाची बडी सनद दिली. या सनदेवरच पुढील प्रजासत्ताक राज्याची इमारत उभारण्यांत आली. सनदेचा सारांशः—"आह्मी राज्ञी मेरी प्रतिज्ञा करितों कीं, आह्मी राजसभेच्या परवानगीवांचून कोणाशीं विवाहसंबंध करणार नाहीं; आमच्या अधिकारांतील सर्व जागा नेटिव्हां (एतद्देशियां) शिवाय इतरांस देणार नाहीं; दोन अधिकार एकाच इसमास देणार नाहीं; कोणतेंही सरकारी अमलाचें काम मक्त्यानें लावणार नाहीं; हॉलंडची मोठी राष्ट्रसंसद् व न्यायसभा पुनः स्थापन करूं. ही न्यायसभा खालील कोर्टांवर फक्त अपिलें ऐकेल. प्रांतिक व स्थानिक कोर्टांप्रमाणें अव्वल दावे ऐकण्याचा या सभेस अधिकार नाहीं. आपापल्या प्रांताच्या अगर शहराच्या बाहेर न्याय मागण्याचा प्रसंग लोकांस आह्मी येऊं देणार नाहीं. सर्व प्रांत व शहरें यांनीं आपली राष्ट्रसभा कोठें वाटेल तेथें व हवे तितके प्रसंगीं भरवावी. प्रांतिक सभेच्या संमतीवांचून नवे कर बसविले जाणार नाहींत. आह्मी अगर आमचे वारस आगळिकीची अगर बचावाची लढाई करणें झाल्यास लोकसभेच्या विचारावांचून करणार नाहीं; केल्यास तिच्या खर्चाचा बोजा त्या सभेनें आपले अंगावर घेऊं नये. सर्व सरकारी कागदपत्रांत राष्ट्राची भाषा वापरली जाईल. सनदी हक्कांविरुद्ध राजानें केलेले हुकूम मोडणें हें अन्यायाचें होणार नाहीं. नवीन नाणें पाडणें अगर नाण्याची किंमत कमजास्त करणें हें लोकांचे विचारावांचून केलें जाणार नाहीं. प्रतिनिधिसभेनें मंजूर केल्यापेक्षां अधिक पैसा जबरदस्तीनें खजिन्यांतून घेतला जाणार नाहीं; व

पैशाची मागणी करण्याकरितां राजा प्रतिनिधींच्या समक्ष वेळो-वेळीं येत जाईल. " एवंच न्याय, खड्ग व खजिना हे तिन्ही राजाच्या हातून लोकांनीं हिसकावून घेतले. या राज्यव्यवस्थेच्या स्वरूपावरून या लोकांस डोकें, काळीज व हात असल्याचें राजे मान्य करीत होते असें दिसतें. लेडी मेरीनें मॅक्सिमिलियनशीं लग्न लाविलें. या दंपत्याचा मुलगा साधा फिलिप हा चार वर्षांचा असतांना मेरी स्वर्गवासी झाली. अर्थातच मॅक्सिमिलियन हा अज्ञानीचा पालक झाला. त्यानें प्रथम लोक-पक्षास मिळून सर्व सत्ता आपल्या स्वाधीन करून घेतली; व नंतर त्यानें ज्या शिडीवरून तें उच्चपद प्राप्त करून घेतलें होतें, ती लाथेनें झुगारून दिली. त्यानें लोकांच्या "ग्रेट प्रिव्हिलेज" व इतर जुन्या सनदा यांस हरताळ लाविला. मॅक्सिमिलियन हा आपल्या वडिलांचे तख्तावर आरूढ होतांच, त्याचा मुलगा फिलिप यानें वयाच्या सतरावे वर्षी नेद-लँडच्या राज्याचें स्वामित्व स्वतः स्वीकारिलें. या फिलिप राजानें स्पेनच्या फर्डिनंड व इझाबेला या विख्यात दंपत्याची वारस मुलगी ' जोआना ' इच्याशीं लग्न केलें; व त्यांच्या पोटीं सोळाव्या शतकाच्या पहिल्या सालीं दुसरा शार्लमेन जन्मला. हाच पांचवा चार्लस राजा. यास स्पेन, सिसि-लीज, अमेरिकेंतील नवीन मिळविलेलें स्पेनचें राज्य, नेदर्लंड वगैरे मिळून जवळ जवळ निम्या पृथ्वीचें राज्य प्राप्त झालें. ट्यूटॉनिक कुळीची एकच भाषा बोलणारी व एकाच ऐतिहासिक परंपरेंत गोंवलेली, व आपा-पले निरनिराळे स्थानिक कायदे व रूढी यांच्या अनुरोधानें चालणारी फ्रँक, फ्रीजियन, सॅक्सन, लॉंबर्ड, बर्गंडियन लोकांचीं निरनिराळीं संस्थानें एका सामंतचक्रांत घेऊन त्यांचें एक बलाढ्य ख्रिस्ती जर्मन साम्राज्य बनविण्याचा पहिल्या शार्लमेन राजाचा प्रशंसनीय हेतु होता. दुसऱ्या शार्लमेन राजाचे मनांत फार भिन्न विचार घोळत होते. सातशें वर्षेंपावेतों सर्वतोपरी तुटक राहून एकमेकांचीं पूर्ण हाडवैरी बनलेलीं निरनिराळीं राष्ट्रें जुलमानें आपल्या अमलाखालीं आणावीं; एका छत्रा-खालीं लक्षावधि लोक आणून आपल्या राज्यपदवीचें महत्व वाढ-वावें; स्थानिक संस्था मोडून टाकून त्यांस सर्वत्र एक स्वरूप द्यावें; लोकांस मिळालेल्या प्रशस्त राजकीय सनदा रद्द करून त्यांचे ऐवजीं जुलमाचे

बादशाही हुकूम सोडावे; देशस्थितीकडे लक्ष न पुरवितां मन मानेल त्याप्रमाणें स्वतंत्र रीतीनें बागावें; आपल्या ताब्यांतील जनसमूहाचे देह व आत्मा हे दोन्ही आपल्या खाजगी मालमत्ता आहेत असें लेखावें; आपल्या घराण्यांत दैववशात् येऊन पोहोंचलेलीं राज्यपदें अशींच निरंतर चालण्याबद्दल खटपट करावी; व धर्मगुरू पोप याचा मुकूट येऊन आपल्या घराण्यांतील वंशजांचे मस्तकावर बसावा: अशा अचाट आणि अतर्क्य स्वार्थपर कल्पना दुसऱ्या शार्लमेन राजाच्या डोक्यांत रात्रंदिवस येत होत्या. हा राजा तक्तावर आल्यामुळें स्पेन व नेदर्लंड या दोन राष्ट्रांचा नवा संबंध उत्पन्न झाला; तो फारच स्वभावविरुद्ध व अहितकारक होता. स्पेनच्या नवीनच एकवटलेल्या राष्ट्रांतील सरदार लोकांचा एककल्ली व मानी स्वभाव, स्पॅनिश लोकांचा कॅथोलिक धर्मासंबंधानें तीव्र अभिमान, स्पेनची पातळ लोकसंख्या, व देशाचें डोंगराळ व उग्र स्वरूप, स्पॅनिश लोकांचा व्यापाराविषयीं तिरस्कार, व गरीब स्थितींतही शिपाई पेशानें राहण्याचा लष्करी बाणा, ह्यांचा नेदर्लंडशीं अगदींच विरोध होता. नेदर्लंड देशांत लोक मोठे उद्योगी, चळवळे व साहसी असत. त्यामुळें देशभर जिकडे तिकडे व्यापारानें भरभराटीस आलेलीं शहरें व देशाचा विस्तार लहान होता, तथापि हंगामाच्या दिवसांत मुलूखभर उफाड पिकें नजरेस येत; हॉलंड देशांतील गलबतें सर्व जगाचा माल आणण्यानेण्याचा व्यापार करीत; तेथील व्यापारी परकीयांपासून कांहीं उपद्रव झाल्यास आपलीं खाजगी जहाजें व पदरचा पैसा घेऊन शत्रूंवर तुटून पडत; हॉलंड देशच्या कापडचोपड वगैरे जिनसांस सर्व देशांत विशेष किंमत असे; येथील व्यापारी लोक केवळ मूर्तिमंत कुबेर असल्यामुळें राज्यकारभाराचे कामीं त्यांचें जबरदस्त वजन असे; स्वातंत्र्यप्रीति हा त्यांच्या मनाचा मुख्य धर्म होता; त्यांचें मन धर्माच्या बाबतींत नव्या पंथास अनुकूल असे. अशा या नेदर्लंड देशाला स्पेनचा राजा दुसरा शार्लमेन अगर पांचवा चार्लस याच्या अमलाखालीं गेल्या दिवसापासून, फार शोचनीय स्थिति प्राप्त झाली. या देशाचा राज्यकारभार राजा आपल्याजवळच्या आप्तांकडे सोपवीत असे; व ते लोक या देशाचा कारभार राष्ट्राच्या हितापेक्षां राजघराण्याच्या हिताकडे विशेष लक्ष देऊन

चालवीत असत. या राज्यपद्धतीचें खरें स्वरूप घेंट शहरीं झालेल्या बंडाचे वेळीं चांगलेंच प्रत्ययास आलें. घेंट शहर विस्तार, बल, राजकीय संस्था व शिक्षण, या सर्व बाबतींत सर्व खिस्ती राष्ट्रांत अप्रतिम होतें. शहरवासी लोकांची संपत्ति आणि उद्योग हीं इतर शहरांस लाजविण्यासारखीं होतीं. हें शहर एक लहानसें स्वतंत्र राज्यच होतें. कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांची संख्या इतकी अगणित होती कीं, हे लोक कामावर जाण्याच्या वेळीं व कामावरून घरीं परत येण्याच्या वेळीं शहरची मोठी घंटा वाजवून रस्त्यावरील सर्व रहदारी बंद करावी लागत असे. शहरचें लढाऊ सैन्य ऐंशी हजार होतें. या शहरांतील देवळें व सार्वजनिक इमारती फार भव्य व शोभिवंत होत्या. येथील सार्वजनिक देवळावरील रोलंड नांवाची घंटा इतिहासप्रसिद्ध आहे. या शहरची राज्यव्यवस्था फार अर्वाचीन पद्धतीची होती. शहरच्या लोकांत कारखानदारांच्या बावन्न मंडळ्या व कोष्ट्यांच्या बत्तीस मंडळ्या असे वर्ग होते; प्रत्येक वर्गांतील लोकांचे लोकनियुक्त कामगार असत. शहरची मुख्य लोकसभा सव्वीस सदस्यांची होती; तिला कायदेकानू व निवाडे करण्याचा व सर्व राज्यकारभार पाहण्याचा पूर्ण अधिकार होता; मात्र या सभेच्या कामास मेलिन येथील राष्ट्रसभा व राजा किंवा त्याचा प्रतिनिधि यांच्या मंजुरीची अवश्यकता असे. याशिवाय या शहरास लेडी मेरीनें दिलेल्या मोठ्या सनदेवरून बरेच हक्क मिळाले होते. फ्लँडर्स प्रांतांतून स्पेनच्या राजास द्यावयाची खंडणी घेंटच्या लोकसभेच्या संमतीवांचून जाऊं नये, अशा बाबतींत घेंटच्या शहरवासी लोकांनीं मोठें बंड केलें; व पांचव्या चार्लस राजानें शहरचे पूर्वापार हक्क रद्द करण्याकरितां काढिलेला जाहिरनामा रस्त्यांत आणून, त्याचे फाडून हजारों तुकडे केले. तसेंच लोकसभेपैकीं एक सभासद राजाच्या पक्षास सामील आहे अशा संशयावरून बिथरलेल्या लोकांनीं त्यास यमसदनास पाठविलें. या प्रसंगीं राजा आपल्या लवाजम्यासह स्वतः घेंट येथें आला. कित्येक लोक तोफेच्या तोंडीं गेले. घेंटशहरचे सर्व जुने हक्क, सनदा आणि कायदे रद्द झाले. घेंटच्या लोकसभेची सर्व मिळकत, रोकड, तोफखाना, दारूगोळा वगैरे जप्त करण्यांत आला; खंडणीचा पैसा ताबडतोब देण्याचा हुकूम

झाला. यापुढें राजानें नेमलेल्या अधिकाऱ्यांच्या हातून राज्यकारभार चालविण्याचा ठराव झाला; व शेंपन्नास ठळक ठळक लोकांनीं अंगांत काळा झगा व गळ्याभोंवतीं फांस बांधून राजापुढें गुडघे टेकून शरण जावें असें ठरलें. व तसें त्यांनीं केल्यावर सर्व डच् लोकांस त्यांच्या उच्छृंखलपणाबद्दल माफी मिळाली. याप्रमाणें पांचव्या चार्लसच्या कारकीर्दींत नेदर्लंड देशाच्या स्वातंत्र्याची अगदीं पायमल्ली होत होती.

नेदर्लंड देशांत बाराव्या शतकापासून नवे नवे धर्मपंथ निघूं लागले होते. प्रारंभीं हे नवीन पंथाचे लोक निव्वळ पाखंडी व भोंदू असत. परंतु थोड्याच कालांत खऱ्या भावाचे नवे पंथ निर्माण होऊन, त्यांनीं ( आपल्या अंगांत विशेष सामर्थ्य नसतांही ) जुन्या धर्माशीं झगडण्यास कंबर बांधली. या नवीन मताच्या लोकांचा नेदर्लंडांत फार छळ होत असे. नुसत्या संशयावरून पुष्कळ लोकांस दिव्य करण्याच्या कामीं असह्य यातना सहन कराव्या लागत; व शेवटीं पुष्कळ प्रसंगीं सजीव देह अग्नीस अर्पण करण्याचा प्रसंग येत असे. तापलेलीं उलथनीं, नांगराचीं टोंकें, उकळी फुटलेल्या कढया वगैरेंच्या खात्रीलायख पुराव्यानें आरोपींचा गुन्हा शाबीत झाल्यावर त्यांस खांबास बांधून, गळ्यापासून बेंबीपर्यंत त्यांचें पोट सोलून, त्यांत हजारों भुंगे सोडून, अत्यंत तीव्र वेदनांनीं मरण आणण्याचें अपूर्व शासन या वेळीं फार प्रचारांत होतें. इकडे कॅथोलिक धर्माध्यक्षांची सत्ता आणि संपत्ति दिवसेंदिवस वाढत चालली. त्यांनीं सर्व राजेरजवाड्यांकडून आपली हक्कदारी वसूल करण्याचा क्रम झपाट्यानें चालू ठेविला होता. कांहीं गुन्ह्याची तोहमत आल्यास दिवाणी, फौजदारी कोर्टाचाही अधिकार ते मानीत नसत. त्यांच्या मठांत शिरलेल्या गुन्हेगार व परागंदा असलेल्या लोकांवर कायद्याचा अंमल चालत नसे. ह्या कॅथोलिक धर्माध्यक्षांवर गुन्ह्याची शाबिती होण्यास बहात्तर साक्षीदार लागत. उपाध्यक्षावर शाबिती होण्यास सत्तावीस साक्षीदार असावे लागत. त्याहीपेक्षां कमी दर्जाच्या कामगाराविरुद्ध सात साक्षीदारांची जरूर असे; परंतु एखाद्या सामान्य मनुष्यास सुळीं चढविण्यास दोन साक्षीदार बस्स होत. बाराव्या शतकांत कॅथोलिक धर्माच्या पाद्री लोकांनीं राजापासून तों तहत गरीब शेतकऱ्या-

पर्यंत सर्वांपासून नानाप्रकारचे कर घेऊन अपार संपत्ति जमविली होती. त्यांचे विरुद्ध कोणी न काढल्यास त्यावर भयंकर शापास्त्राची योजना होत असे. तेराव्या चौदाव्या शतकांत त्यांचें माहात्म्य बरेंच कमी झालें; त्यांचे स्थावरजंगम मिळकत संपादन करण्याचे व धारण करण्याचे हक्क बरेच संकुचित झाले. मुद्रणकलेचा शोध यावेळीं लागल्यामुळें धर्म-सुधारणेचें पाऊल फार जलद् पुढें पडलें. धर्मपुस्तकें थोडक्या किंमतीस सर्वांस मिळूं लागलीं. त्याचप्रमाणें प्रायश्चित्तें विकण्याचा क्रमही या सुमारास बंद् झाला. धर्माधिकाऱ्यांनीं न्यायाच्या बाबतींत बळकाविलेली राजाची सत्ता त्यांस परत द्यावी लागली. सोळाव्या शतकांत इरॅस्मस यानें नवीन मतांचें थोडेंसें दिग्दर्शन केलें; परंतु हा सुधारक पोंचट, स्वार्थसाधु व सुखाभिलाषी असल्यामुळें त्याच्या हातून धर्मक्रांतीच्या कामीं विशेष उपयोग झाला नाहीं. त्याच्या मागून आपल्या मतार्थ जीव अर्पण करण्यास तयार असलेला अस्सल धर्मसुधारक **मार्टिन ल्यूथर** हा हातांत धनुष्य व भात्यांत ८५ सिद्धांतरूपी बाण घेऊन ते चोहोंकडे फेकण्यास अवतीर्ण झाला.

मार्टिन ल्यूथरच्या नवीन धर्ममतांचा फैलाव **नेदर्लंड** देशांत झपाट्यानें सुरू झाला. त्यास प्रतिबंध करण्याकरितां बादशहाचे फर्मान वेळोवेळीं बरेच सुटले. इ. स. १५२१ सालीं असा जाहिरनामा प्रसिद्ध झाला कीं जर्मनी देशावर कोणत्याही प्रकारची धर्माच्या बाबतींत सक्ती करितां येत नाहीं; तथापि नेदर्लंडदेश ही चार्लस राजाची खाजगी मिळकत आहे; या देशांत ल्यूथरसांप्रदायी लोक किंवा त्याचीं मतें स्वीकारलेले लोक यांस एकदम देहांत प्रायश्चित्त देऊन त्यांची सर्व मालमत्ता सरकारांत जप्त करावी. दुसरा जाहिरनामा असा प्रसिद्ध करण्यांत आला कीं, लोकांनीं प्रार्थनेकरितां एकत्र जमूं नये; तेथें धर्मपुस्तकें वाचूं नयेत; व धर्मतत्त्वांवर, संस्कारविषयांवर अगर धर्मगुरूंच्या अधिकाराबद्दल चर्चा करूं नये; केल्यास देहांत प्रायश्चित्त मिळेल. याच मासल्याचा जास्त कडक तिसरा हुकूम पुढें कांहीं कालानें सुटला. त्यांत धर्मपुस्तकें एकांतांत अगर मंडळींत पाद्र्याच्या मदतीवांचून कोणी पठण केल्यास त्यांस देहांतप्रायश्चित्ताची शिक्षा ठरविली होती. या हुकुमांचा शब्दशः

अंमलही कडक रीतीनें वारंवार होत असे. इकडे अशा प्रकारचा जुलूम चालल्यामुळें उलट पक्षांत त्याच मानानें आवेश उत्पन्न होऊन निरनिराळे असंख्य चमत्कारिक मतांचे नवे पंथ अस्तित्वांत येऊं लागले. इ. स. १५३५ सालीं ब्रुसेल्स येथें बादशहाचा नवा जाहीरहुकूम प्रसिद्ध झाला. त्यावरून सर्व पाखंडी लोकांस यमसदनास पाठवावें असें फर्माविण्यांत आलें. त्यांत विशेष भेद एवढाच केला होता कीं, अनुताप पावलेल्या पुरुषांस तरवारीनें कापावें; अनुतप्त स्त्रियांस सजीव पुरून टाकावें; दुराग्रही स्त्रीपुरुषांस जिवंत जाळावें. या हुकुमांच्या आधारानें सर्व नेदर्लंड देशांत पुढील दहावीस वर्षांत सारखी कत्तल चालली होती. इ. स. १५४९ सालीं एक नवीन हुकूम निघाला, त्याच्या योगानें पूर्वींचे सर्व हुकूम कायम करण्यांत आले.

सोळाव्या शतकांत राष्ट्रांतील राजकीय संस्थांपैकीं स्थानिकसभांस फारच महत्व प्राप्त झालें होतें; स्थानिकस्वराज्याविषयीं लोकांस इतका अभिमान उत्पन्न झाला होता कीं, सर्व देशभर गांवोगांवच्या स्थानिकसभांनीं सर्व राज्यकारभार आटोपिला होता. प्रत्येक शहराच्या अधिकाराखालीं मोठमोठे परगणे व लहान लहान गांवें असत. प्रत्येक स्थानिकसभा ह्मणजे एक स्वतंत्र संस्थानच असे. मुख्य कायदे करण्याचा आणि राज्यकारभार पाहण्याचा हक्क वस्तुतः राजाचा होता; परंतु आपापल्या अधिकारापुरतें राजाच्या मंजुरीनें हें काम स्थानिकसभाच करूं लागल्या. याशिवाय प्रत्येक शहरचे पूर्वींच्या राजांनीं वेळोवेळीं मान्य केलेले कायदे व सनदा अमलांत होत्याच. या स्थानिकसभेंतील सभासद निवडून देण्याचा हक्क निरनिराळ्या सनदी मंडळ्यांस असे. प्रत्येक मंडळी मत देण्याचे कामीं एक व्यक्ति समजली जात असे; व प्रत्येक शहरचें प्रांतिक सभेंत एक मत असे. हें स्थानिकस्वराज्याचें तत्त्व इतकें खोल जात चाललें होतें कीं, नेदर्लंडदेशांतील लोकांस राष्ट्राच्या सामान्य संस्थांपेक्षां आपल्या स्थानिकस्वराज्यांतच विशेष अभिमान वाटूं लागला. सोळाव्या शतकांत शेल्ड नदीच्या कांठचें अँट्वर्प हें शहर सर्वांत विशेष उदयास आलें होतें. सगळ्या यूरोपचा व्यापार ह्या शहरच्या बाजारांत चालत असे. या शहरची लोकसंख्या व व्यापाराचें वैभव यांची

बरोबरी पारिसशिवाय कोणत्याही शहराच्यानें होत नव्हती. या शहरची राज्यव्यवस्था फार स्वतंत्र होती. अँट्वर्पचा संस्थानिक या नात्यानें जुन्या सनदा व कायदे यांना धरून राज्य चालविण्याविषयीं राजाला शपथ वहावी लागत असे. राजाचा मुखत्यार स्टॅड्हहोल्डर हा मंत्रीमंडळाच्या सल्लयानें राज्यकारभार चालवीत असे. अठरा सभासदांची एक मुख्य लोकसभा असे. ही सभा सर्व राज्यकारभार पाहत असे; व न्यायसभेच्या निकालांवर अपिलें ऐकत असे. याशिवाय दोन ग्रामाधिपती व दोन कायदे जाणणारे मंत्री व इतर मॅजिस्ट्रेट वगैरे नेमण्याचा अधिकार या सभेसच असे.

स्थानिक राज्यव्यवस्थेची अशी स्थिति असल्यामुळें राष्ट्रसभेची सत्ता फारच मर्यादित झाली होती. या सभेचे सभासद निरनिराळ्या प्रांताचे केवळ वकील असत; आणि तेही विविक्षित व्यक्तींचे अगर वर्गांचे मुखत्यार नसत. त्यांची निवडणूक लोकांकडून होत नसे. ह्या सभेचें काम केवळ फडणिशी असे. राजा अगर त्याचा मुखत्यार यांस या सभेस खर्चाकरितां पैशाची मागणी करावी लागे; व कोणत्याही एका शहरास ती नाकबूल करण्याचा हक्क होता.

लोकांची स्थिति या वेळीं फार भरभराटीची होती; गरीब लोक अगदीं थोडे असून, धर्म करणें झाल्यास त्यांस शोधून काढावें लागत असे. शाळागृहें फार सुव्यवस्थेंत असून शिक्षण अति स्वस्त असे. प्रत्येक जाणत्या मुलास निदान दोन भाषा लिहितां, वाचतां आणि बोलतां येत असत. श्रीमान् लोकांच्या मुलांस आपला विद्याभ्यास पुरा करण्यास लुव्हेन, डुए, पारिस आणि पॅडूआ वगैरे ठिकाणीं प्रसिद्ध विद्यापीठें होतीं. या विद्यापीठांतून धर्मशास्त्र, व्यवहारनीति, वैद्यक, साहित्यशास्त्र, प्राचीन व अर्वाचीन भाषा, वगैरेंचा अभ्यास करण्यास सोई होत्या. याशिवाय शिल्पी लोकांच्या साहित्य-प्रयोगी-मंडळ्या या देशांत या वेळीं होत्या. ह्या मंडळ्या सुट्टीचे दिवशीं कांहीं पदें गाऊन, संगीत व नाट्य प्रयोग करून, व कांहीं नाट्यप्रसंगांतील पात्रांच्या मिरवणुका वगैरे काढून लोकांची करमणूक करून ज्ञानप्रसाराची खटपट करीत. येथवर नेदर्लंड देशचा इसवीशकाच्या पहिल्या पंधरा शतकांचा इतिहास

थोडक्यांत सांगितला. या अवकाशांत दलदलींत व जंगलांत राहणाऱ्या रानटी लोकांच्या ठिकाणीं तीस लक्ष लोकांचें सुधारलेलें राष्ट्र निर्माण झालें होतें. या लोकांची शेतकी व शिल्पकला यासंबंधीं विलक्षण दक्षता व प्रावीण्य, व्यापारांत अविश्रांत खटपट व तदनुरूप फलप्राप्ती, विद्या व कला ह्यांत लोकोत्तर नैपुण्य, राजकीय व सामाजिक संस्थांत आश्चर्यकारक व्यापकता व अर्वाचीनत्व, व सर्वांत विशेष अनिवार्य स्वातंत्र्यप्रीति हे गुण फारच अप्रतिम होते. स्वातंत्र्य व स्वराज्य यांचा कट्टा अभिमान याच्या प्रेरणेनें मागील पंधरा शतकांत वेळोवेळीं डच् लोकांनीं जुलुमाशीं झुंज खाल्ली होती. सोळाव्या शतकांत धर्मस्वातंत्र्याचें वारें या राष्ट्राच्या अंगीं शिरून त्यास विशेषच स्फुरण चढलें. या लहान नेदर्लंड देशास मानवी प्राण्यानें पुष्कळ घातक प्रहार केले असतांही त्यांतून बचावून उलट पारध्यावरच उलटून त्यानें त्यास गर्भगळीत करून सोडिलें. हॉलंडांतील स्त्रिया फार देखण्या व सदृढ असल्याची ख्याति असे. लहानपणापासून त्यांस सर्व ठिकाणीं व सर्व व्यवसायांत पुरुषांप्रमाणें मोकळेपणानें व स्वतंत्रपणें वागतां येत असे. पुरुषांशीं बरोबरीच्या नात्यानें बोलणें चालणें वगैरे व्यवहार त्यांस करण्यास कोणताही प्रतिबंध नसे. त्यांस प्रवासास सुद्धां एकटें जाण्यास बिलकुल भीति वाटत नसे. इतकें असूनही त्यांचें आचरण अगदीं शुद्ध, व त्यांची वागणूक फार मर्यादेची असे. पुढील राज्यक्रांतीच्या इतिहासांत या देशांतील स्त्रियांनीं कित्येक प्रसंगीं जें अवर्णनीय धैर्य व जी लोकोत्तर देशभक्ति दाखविली, ती त्यांच्या शिक्षणाचें फल होय.

नेदर्लंडचे या वेळीं ब्राबंट लिंबुर, लुक्सेंबर्ग, हेल्डर्स, आर्ट्वा, हेनो, फ्लँडर्ज, नेमुर, झुट्फन, हालंड, झीलंड, अँट्वर्प, फ्रीजलंड, मेलिन, लमॅलेन, यूट्रेक्ट, ओव्हरीसल, ग्रोनिंजन, असे सतरा परगणे होते. त्यांत एकंदर २०८ तटबंदी शहरें व १५० सनदी शहरें होतीं; ६३०० मोठीं गांवें, व शिवाय असंख्य लहान सहान खेडीं सर्व देशभर पसरलीं होतीं, व त्यांभोंवतीं साठ भक्कम किल्ल्यांचा गराडा होता.

# भाग २ रा.

## इ. स. १५५५—१५६०.

फिलिपचें राज्यारोहण-फ्रान्सशीं लढाई-नवी राज्यव्यवस्था-फिलिपचें स्वदेशीं प्रयाण-राणी मार्गरेट पार्मा राजपुत्र ऑरेंज-भटनी पेरेनो ऊर्फ आरासचा बिशप-लोकस्थिति-धर्मशासनांचा जीर्णोद्धार-नवी धर्मव्यवस्था-स्पॅनिश सैन्याची अपेक्षा.

पांचव्या चार्लस राजानें अवलंबन केलेली स्वैर राजनीति लक्षांत घेतली असतां त्याच्या मुलाच्या कारकीर्दीत जें भयंकर बंड उद्भवलें ते बापाच्या कारकीर्दीत दबून कसें राहिलें होतें याचें सकृद्दर्शनीं आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. या राजानें नेदर्लंडचा पैका व सैन्य यांची परमुलखांत अतोनात खराबी केली; डच् लोकांचे स्वराज्याचे हक्क बहुतांशीं उलथून पाडिले; व देशांत नवीन पंथी लोकांचा नायनाट करण्याकरितां धर्मसंशोधक न्यायसभा सुरू केली. परंतु चार्लसचा सर्व यूरोपभर दबदबा असल्यामुळें नेदर्लंडच्या व्यापाऱ्यांस चारही मुलुखांत निर्भय प्रवेश व विशेष सवलती मिळून त्यांचा व्यापार अमर्याद वाढला होता. शिवाय स्पेनच्या साम्राज्यांत बऱ्याच राष्ट्रांचा समावेश होत असल्यामुळें हॉलंडच्या मालाचा त्या सर्वांत पुष्कळ खप होत असे; खेरीज नेदर्लंडच्या सर्व संस्थानांचें स्पेनच्या अमलाखालीं एकीकरण झाल्यामुळें यूरोपच्या राष्ट्रमालेंत त्यास बरेंच महत्व प्राप्त झालें होतें; यामुळें डच् लोकांस कांहीं कालपर्यंत आपल्या परावलंबी स्थितींतच एका प्रकारचें सुख भासूं लागलें. शिवाय चार्लस हा तत्कालीन महायोद्धा असल्यामुळें त्याच्या पराक्रमानें लोक अगदीं दिपून गेले होते. त्यांतूनही चार्लसचा जन्म हॉलंडांत झाला होता, त्यामुळें त्याचें त्या देशावर विशेष प्रेम असे. त्याचें या देशांत वारंवार जाणें येणें होतें. त्यानें आपली न्यायपद्धति बरीच करडी ठेविली होती. लहानसान कामांत लोकांची अप्रीति उत्पन्न होईल या भीतीनें सर्व लहान लहान जागेवर त्यानें तद्देशीय लोक नेमिले होते. डच् भाषा तो स्वभाषेप्रमाणें साफ बोलत असे; आचारविचारांत तो त्यांचें अनुकरण फार सहज व बेमालूम करी;

त्याची वागणूक फार साधी, नम्र व मनमिळाऊ असे; या सर्व कारणां-मुळें डच् लोकांचें मन त्याच्या विरुद्ध जाण्यास कचरत असे.

हा रयतेचा संबंध आपल्या मुलाच्या कारकीर्दींत कायम रहावा या हेतूनें युवराज फिलिप यास स्पेनमधून आणवून, व भर दरबारांत उपदेशपूर्वक राज्यसूत्रें त्याच्या हातीं द्यावीं असा विचार करून ता. २५ आक्टोबर १५५५ इसवी रोजीं ब्रुसेलसच्या राजवाड्यांत चार्लसनें मोठा दरबार भरविला. त्या समयीं पुढील इतिहासांत निरनिराळ्या प्रसंगीं प्रसिद्धीस आलेले कार्डिनल ग्रॅन्व्हिल, एग्मॉन, हॉर्न, बर्गेन, मॉंटिनि, बर्लेमॉन, ब्रेडेरोड, ब्वार्कार्मिजि, मेघेम, अरेम्बर्ह, व्हिग्लियस, व राजपुत्र ऑरेंज अगर यलबाक् वुइल्यम वगैरे बहुतेक पुरुष हजर होते. चार्लसनें दुसऱ्या फिलिप राजाला राज्यपद अर्पण केल्यानंतर मुलानें बापापुढें गुडघे टेकले व त्याच्या हाताचें चुंबन केलें. मुलास आशीर्वाद देतेवेळीं उभयतांच्या डोळ्यांतून अश्रु आले. नंतर निरनिराळ्या अधिकारी मंडळांचे नवीन पदारूढ राजास मुजरे झाले. या समयीं फिलिपनें शपथपूर्वक अभिवचनें दिलीं तीं येणेंप्रमाणें:–' ईश्वररूपेनें स्पेन, सिसिलीज वगैरे देशांचा मालक झालेला, मी प्रतिज्ञा करितों कीं, या देशास व त्यांतील संस्थानिक, जहागिरदार, शहरें व सामान्य प्रजा यांस पूर्वींच्या राजाकडून मिळालेले हक्क व स्वातंत्र्य, व हल्लीं त्यांच्यांत व्यक्तिशः व समवायानें चालू असलेल्या रूढी, रिवाज व हक्क यांत मी कोणतीही ढवळाढवळ करणार नाहीं. न्यायी व सदय राजाला अनुरूप असें मी आपलें वर्तन ठेवीन. या कामीं ईश्वर व सर्व सत्पुरुष मला पाठबळ देवोत.' अधिकारी मंडळींनीं उलट शपथा घेतल्या. त्यांत आपल्या राष्ट्राचे हक्क संभाळून पाळवेल तितकी राजाज्ञा आपण पाळूं; व राजाचे अधिकारी आपापलीं कामें कायद्याची मर्यादा उल्लंघन न करतां बजावतील तों-पर्यंत त्यांस आपली पूर्ण मदत मिळेल, अशीं त्यांनीं वचनें दिलीं. या शपथेच्या स्वरूपावरून लोकांपाशीं या राजाची पत कितपत होती याचें अनुमान थोडक्यांत करतां येईल. यानंतर कांहीं स्तुतिपर भाषणें होऊन दरबार बरखास्त झाला. यापुढें चार्लसनें जस्टी येथें मरणकालपर्यंत एकांतवासांत आपला वृद्धापकाळ घालविला.

या समयीं फिलिपला बापाचें बहुतेक सर्व राज्य प्राप्त झालें; स्पेनचीं सर्व संस्थानें व सिसिलीज यांचा तो मालक झाला; इंग्लंड, फ्रान्स, जेरूसलेम या राजपदांचा परंपरागत मान त्याजकडेसच आला; एशिया, आफ्रिका, अमेरिका यांत तो "अजातशत्रुच" होता; मिलन व बर्गंडी या संस्थानांचें स्वामित्वही त्याजकडेसच आलें; व नेदर्लंड देशाचा मुकुट वारसहक्कानें त्याचे शिरावर येऊन बसला. वरील अधिकारदानाचे वेळीं फिलिपचें वय अठावीस वर्षांचें होतें. फिलिपचें पहिलें लग्न त्याच्या वयाच्या सोळाव्या वर्षीं ह्मणजे इसवी सन १५४६ मध्यें झालें. लग्नाच्या पहिल्याच वर्षी त्यास इतिहासांत पुढें डॉन कौर्लास या नांवानें प्रसिद्धी पावलेला मुलगा झाला; व त्याच प्रसंगांत त्यास विधुर-पणा प्राप्त झाला. इ. स. १५४८ सालीं फिलिपची नेदर्लंडांत पहिली फेरी झाली. त्यावेळीं ब्रुसेलसच्या लोकांनीं त्याचें स्वागत मोठ्या उत्साहानें आणि थाटानें केलें. या वर्षाचा सर्व वसंतऋतु युवराजानें नेदर्लंडमधील मोठमोठीं शहरें पाहण्यांत घालविला. शहरोशहरीं त्याच्या सन्मानार्थ लोकांनीं निर्मळ अंतःकरणानें मोठमोठे उत्साहही केले. या समयीं युवराजानें ठिकठिकाणीं मेजवान्यांच्या आणि महोत्सवांच्या भरांत, नेदर्लंडचे व त्यांतील शहरांचे हक्क व राजकीय संस्था अबाध चालविण्याविषयीं लोकांस अघळपघळ आश्वासनें दिलीं; पुढें आपणावर ओढवणाऱ्या संकटाची कल्पनाही नसल्यामुळें, अँट्वर्प शहरानें फिलिपचें स्वागत विशेष उत्साहानें केलें; आणि त्यावेळेच्या प्रसंगाचें स्मारक ह्मणून राजपुत्रानेंही या शहरच्या लोकांस "सानंद-प्रवेश" नांवाची एक नवी सनद करून दिली. या भेटीच्या वेळीं एकंदरींत फिलिपची वागणूक फार उदास, तुटक व बेपर्वाईची होती. इसवी सन १५५४ मध्यें फिलिपचा इंग्लंडची राज्ञी मेरी ट्यूडर इजबरोबर द्वितीयसंबंध झाला. या वधुवरांचें गुणसाम्य एवढेंच होतें कीं, दोघेही कॅथोलिक धर्माचें वर्चस्व राखणें हें आपल्या आयुष्याचें पहिलें कर्तव्य समजत होते; व तत्प्रीत्यर्थ विधर्मी लोकांस देहांतशासन करणें हें ईश्वरी संकेताप्रमाणें राजांचें पहिलें कर्तव्यकर्म आहे अशी उभयतांची समजूत होती; आणि अशा तऱ्हेनें आपल्या राज्याची केवळ यमपुरी

बनविणें हाच कायतो स्वर्गप्राप्तीचा मार्ग उभयतांस दिसत होता. नवऱ्यावर मेरीचें निःसीम प्रेम होतें, व त्याची मर्जी संपादन करण्याकरितां प्रसंगीं आपला प्राणही खर्ची घालण्यास ती तयार असे; परंतु मेरी ट्यूडरपासून पुत्रप्राप्तीची निराशा झाल्यावर फिलिपनें तिचें नांव अजीबात सोडून दिलें.

फिलिप हा शरीरानें फार ठेंगणा व सडपातळ होता; त्याचे पाय अगदीं काठीसारखे हडकाळ असून छाती अरुंद होती; नेहमीं अजारी असणाऱ्या मनुष्याप्रमाणें त्याचा चेहरा अगदीं भेकड आणि निस्तेज दिसे; शरीराप्रमाणेंच त्याचें मन कमकुवत असून स्वभाव भित्रा होता; फिलिप हा दीर्घसूत्री असून कोणत्याही आणीबाणीच्या प्रसंगीं टिकण्यासारखा नव्हता; त्याला लढाईचा मनापासून तिरस्कार असे; समरांगणांत कीर्ति संपादन करण्याकरितां त्याचा जन्मच नव्हता. परचक्राचें निवारण करण्याचा प्रसंग आल्यास सेनापतींच्या हातून जय मिळविण्याशिवाय त्यास गत्यंतर नव्हतें. त्याच्या बापास मोठमोठे युद्धप्रसंग घडवून आणण्याची मोठी हौस असे; मुलाला असल्या प्रसंगांची कल्पनासुद्धां भीति उत्पन्न करण्यास पुरे होती. चार्लस बादशहा कोणाच्या धमकावणीस जुमानीत नसे; मुलगा फार संकोचवृत्तीचा, भेकड, फाजिल सावध, चंचलवृत्तीचा व दीर्घसंशयी होता. बाप उद्यमप्रिय होता व मुलगा थोडा विश्रामप्रिय होता. बाप सर्व लोकांचे विचार घेत असे, व त्यांचें मंथन करून जें आपलें मत ठरेल तें कोणापाशीं प्रगट न करितां परिपक्व दशेस आल्यावर त्याच्या धोरणानें एकदम मोठ्या अतर्क्य उमेदीनें काम करण्यास सुरवात करी; फिलिप हा परप्रत्ययनेयबुद्धि, क्षणिकवृत्तीचा व एखादें मत ठरल्यावरही तदनुरूप वर्तन करण्याच्या कामीं अनिश्चित स्वभावाचा असा होता. सामान्य बुद्धीच्या लोकांपेक्षांही त्याची मानसिक शक्ति कमी प्रतीची होती. त्याचें मन फार संकुचित होतें. बैठकी काम करण्याचा मात्र त्याला बिलकुल कंटाळा नव्हता; लहानपणापासून क्षुल्लक गोष्टीमध्यें विशेष लक्ष घालण्याचें त्याला वेड असे. आमरणांत सामान्य तत्त्वांचें महत्व त्याला कधींच समजलें नाहीं; व एकटा मनुष्य कितीही दक्ष राहिला तरी पांच कोट प्रजेचे सार्वजनिक व खाजगी व्यवहार त्यास पूर्णपणें

समजणें अशक्य होय, ही गोष्ट त्याच्या मनास कधींच भासली नाहीं. पुष्कळ प्रसंगीं तो कित्येक प्रहर आपल्या मंत्रिमंडळाशीं राज्यकारभाराची वाटाघाट करण्यांत घालवीत असे. त्याची बसती नेहमीं कचेरीच्या दिवाणखान्यांतच असे. परराष्ट्रांचे वकील व प्रतिनिधी यांस तो मोठ्या खुबीनें पाहिजे तेव्हां भेट देई, व त्यांचें बोलणें लक्षपूर्वक ऐकून घेऊन त्यांस सूत्रासारख्या भाषेंत जबाब देत असे. तो टाकाचा मात्र खंबीर होता. वाग्देवतेचा हा शत्रु होता; तथापि मनुष्य शेजारच्या खोलींत असला तरी अगदीं क्षुल्लक बाबींसंबंधींसुद्धां त्यास वीस वीस पानांचें लांब पत्र तो मोठ्या हौसेनें लिहीत असे. त्याची कल्पना अशी होती कीं, जगाच्या सर्व चलनवलनादि क्रिया, खलिते व पत्रव्यवहार ह्यांच्या सूत्रांनीं चालावयाच्या असतात. त्याच्या राज्यांत कोणत्याही सरकारी कामाचा जन्म त्याच्या लेखणीची कवाईत प्रथम झाल्याशिवाय होत नसे; त्याच्या कलमबहाद्दरीचें कारण विचारबाहुल्य हें नसून, विचार-दारिद्र्य हें होतें. शब्दांचें धुकें पसरून त्यांत लपून बसण्यांत त्याचा हेतु आपला भावार्थ दुसऱ्यास समजूं नये एवढाच नसे, तर आपल्या लिहि-ण्यांतील अर्थाभावही लोकांस समजूं नये म्हणून ह्या कृतीची योजना तो करीत असे. कित्येक प्रसंगीं दुसऱ्यासच काय, पण त्याच्या लिहिण्याचा अर्थ त्याचा त्यासही समजण्यास पंचाईत पडे. लहानपणा-पासून एक जबरदस्त कल्पना त्याच्या माथ्यांत शिरली होती आणि तिचा पगडा मरेपर्यंत पूर्णपणें त्याजवर होता. जुन्या ख्रिस्तीधर्माबद्दल स्पॅनिश लोकांचा भयंकर उत्साह मुसलमानी धर्माशीं झगडतांना अखेर अखेर इतक्या उत्कट दशेस जाऊन पोहोंचला कीं, त्या राष्ट्रास त्या गोष्टीचें एक चमत्कारिक वेडच लागल्यासारखें झालें; मुसलमानी धर्माचा उच्छेद करून स्वधर्माची स्थापना करणारे हे अस्सल ख्रिस्ती स्पॅनिश लोक कालांतरानें आपल्या धर्मांतीलच नवीन पंथी लोकांस केवळ शत्रू-प्रमाणें पाहूं लागले; व या नवीन धर्मपंथी लोकांचा छल करून त्यांचा नायनाट करणें हें आपलें मुख्य कर्तव्यकर्म आहे असें त्यांस वाटूं लागलें. या अघोर नवीन कल्पनेचा फिलिपराजा हा केवळ मूर्तिमंत पुतळा होता. अस्सल ख्रिस्तीपदपादशहा हें नांव सार्थ करणें हेंच

त्याच्या महत्वाकांक्षेचें बीज होतें आणि ती गोष्ट साध्य करण्याकरितां आपल्या वडिलांच्या वेळचीं सर्व धर्मशासनें शब्दशः अमलांत आणण्याचा त्याचा निश्चय होता. फिलिप हा जन्मतः, स्वभावानें व शिक्षणानें सर्वस्वी स्पेनदेशीय होता; त्यामुळें नेदर्लंड देशांतील आनंदी, उद्योगी व साहसी लोकांच्या आचारविचारांचा आणि सामाजिक व राजकीय संस्थांचा त्याला पूर्ण तिरस्कार होता. तेथील लोकांचा वाचाळपणा त्यास सहन होत नसे, व स्पेन व हॉलंड यांचें पूर्वापर वैमनस्य त्याच्या मनांत सदैव जागृत होतें. त्याचें शिक्षण फार कोतें होतें. त्याला स्वभाषेशिवाय कोणतीही भाषा विशेषशी येत नव्हती. त्याची दिनचर्या फार नियमबद्ध होती. उपासनेच्या कामीं त्याच्या ठरलेल्या वेळा कधींही चुकत नसत. वादग्रस्त धर्मविषयावर पाद्री लोकांशीं चर्चा करण्याची त्याला फार आवड असे. कोणत्याही कामास आरंभ करण्यापूर्वीं शास्त्रीयदृष्ट्या त्याचा परिणाम काय होईल याची चिकित्सा केल्याशिवाय तो त्यास हात घालीत नसे. तो फार विषयलंपट होता. सामान्य मनुष्याचा पेहराव करून रात्रौ साधारण हलकट अशा वारांगनांचीं घरें धुंडाळण्याची त्याला नेहमीं संवय असे. त्याच्या कारकीर्दींत पैशाची खजिन्यांत नेहमीं टंचाई असल्यामुळें त्याचें दातृत्व लोकांच्या अनुभवास येण्यास मार्गच नव्हता. एकांतांत असतांना अगदीं जिवलग मित्रांशीं ग्राम्य थट्टा करून मोकळेपणानें अमर्याद खिदळण्याची त्याला संवय होती. त्यावेळच्या औपचारिक भाषेंत त्याला दयाळू, आनंदी व सभ्य अशीं विशेषणें दिल्याचें आढळतें.

राज्यारोहणानंतर ब्रुसेल्स येथें असतांना त्यानें १५० दरबारी लोक आपल्यापाशीं ठेविले होते. त्यांपैकीं नऊदशांश स्पॅनिश होते व बाकी राहिलेल्या पंधरा सोळा इसमांत फ्लेमिंग, इटालियन, इंग्लिश आणि जर्मन या सर्व राष्ट्रांतील लोकांचा समावेश झाला होता. येथपासूनच त्यानें आपल्या बापाचें वळण सोडलें. स्पॅनिश राष्ट्राशिवाय इतर राष्ट्रांची त्याजपाशीं कांहींच किंमत नव्हती; स्पॅनिश लोकांशीं त्याची सल्लामसलत चाले; त्यांच्याशींच त्याचीं सर्व खलबतें व्हावयाचीं; व त्यांच्या हातूनच त्यानें सर्व राज्यकारभार चालविला होता. त्यायोगानें स्पॅनिश लोकां-

विषयीं नेदर्लंड देशांत जबरदस्त वैमनस्य वाढून, त्याचा शेवटीं फार घातक परिणाम झाला. स्पेनमधील त्याचें मंत्रीमंडळ पांच सहा स्पॅनिश सरदारांचें होतें; त्यांपैकीं रायगोमेथ आणि आल्व्हा हे राज्याचे केवळ आधारस्तंभच होते. ह्या दोघांचा परस्परांशीं अहिनकुलसंबंध असे. आल्व्हा हा युद्धानुवादक पक्षाचा पुढारी होता; त्यानें यापूर्वीं बराच पराक्रम गाजविला होता; तथापि या वेळीं त्याचें विशेष तेज पडलें नव्हतें. रायगोमेथच्या राजनीतीचें धोरण शांततेकडे होतें; त्यामुळें फिलिपची त्याजवर विशेष भक्ति असे. यावेळीं खिजमतगार, मंत्री आणि फडणीस हे तिन्ही अधिकार रायगोमेथकडे होते.

चार्लस बादशहानें राज्यपद सोडिलें त्या वेळीं नेदर्लंडच्या सुभेदारीच्या कामावर असलेली हंगेरीची राणी इनेंही कंटाळून आपल्या कामाचा राजिनामा दिला. तिच्या जागीं प्रथम आपला चुलतभाऊ फिलिबर्ट सॅव्हॉय याची नेमणूक फिलिपनें केली. हा मोठा पराक्रमी योद्धा होता. याची जहागीर वगैरे नाहींशी झाल्यामुळें युद्धांत मिळणाऱ्या लुटीवर याचा बरेच दिवस निर्वाह चालला होता. ही नवीन जागा मिळाल्यामुळें फिलिबर्ट यास बरेंच वार्षिक उत्पन्न मिळूं लागलें; तथापि कांहीं कारण उपस्थित करून लढाईचे प्रसंग आणण्याचे विचार नेहमीं त्याच्या डोक्यांत घोळत होते. आपल्या मुलाच्या कारकीर्दीचा प्रारंभ शांततेंत व्हावा या उद्देशानें इ० स० १५५६ सालीं व्हॉसीलीस येथें फ्रान्स, स्पेन व पोप या सर्वांच्या दरम्यान पांच वर्षांच्या मुदतीचा एक तह चार्लस राजानें ठरविला होता. याच्यापूर्वीं पोपनें स्पॅनिश लोकांस इताली देशांतून हांकलून लावण्याकरितां फ्रान्सचा राजा दुसरा हेनरी यानें आपलें सैन्य व पैसा ह्यांचा पुरवठा करावा, अशा आशयाचा एक अंतःस्थ करार करून घेतला होता! व्हॉसीलीस येथील तहाची बातमी ऐकून नेदर्लंड देशांत चोहोंकडे आनंदी आनंद झाला. पैसे, शिपाई आणि लढण्यास जागा ह्यांचा पुरवठा करण्यापलीकडे नेदर्लंड देशास या लढायांपासून यत्किंचितही फायदा नव्हता; उलट यांत्रिक कारखाने, शेतकी आणि व्यापार या व्यवसायांत सदैव निमग्न असणाऱ्या या राष्ट्राची या लढायांपासून अत्यंत खराबी होत असे. या अंतस्थ तहाची बातमी फिलिपच्या

कानावर गेल्यामुळें पुन्हा फ्रान्सशीं जोरानें लढाई सुरू करण्याचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले; त्यामुळें त्याच्या मनांत अव्वलपासून घोळत असलेले, मेलिनची न्यायसभा व नवी धर्मसभा सुरू करून नेदर्लंडच्या लोकांचा धर्मछल करण्याचें काम त्यास कांहीं कालपर्यंत तहकूब ठेवावें लागलें. फिलिपनें या लढाईच्या खर्चाकरितां कांहीं कराच्या नवीन बाबी बसाविण्याची प्रांतिकसभांस परवानगी विचारली. तें मागणें कबूल न करतां लढाईकरितां सदर सभांनीं कांहीं ठरीव रकम "देणगी" म्हणून राजास देण्याचें ठरविलें.

पोपच्या दरबारांतील कांहीं कारस्थानी परंतु क्षुद्र लोकांच्या चिथावणीवरून फ्रान्स व स्पेन यांच्यामध्यें लवकरच लढाई जुंपली. इ. स. १५५७ सालीं फ्रान्सच्या सैन्याची दुसरी तुकडी फ्लँडर्झ प्रांतांत उतरली. फिलिपला या वेळीं आपल्या बायकोची आठवण झाली. मेरी ट्यूडरनें पतिव्रता धर्मास स्मरून आपल्या नवऱ्याची बाजू एकदम उचलली, आणि आठ हजार सैन्याची कुमक कांहीं नामांकित सरदार बरोबर देऊन फ्लँडर्झच्या सरहद्दीकडे रवाना केली. इकडे फिलिपनें सुमारें पस्तीस हजार पायदळ आणि बारा हजार घोडेस्वार इतकें सैन्य नेदर्लंड व जर्मनी यांतून तयार करून, नेदर्लंडचा सुभेदार सरदार सॅव्हॉय याच्या आधिपत्याखालीं जीव्हेच्या रोखानें रवाना केलें. या सैन्याबरोबर नेदर्लंडचे बरेच प्रमुख सरदार गेले होते. सरदार एग्मॉन हा या सैन्याचा आधारस्तंभ होता; त्याचें वय या वेळीं पस्तीस वर्षांचें होतें. तरुण, उच्चकुलोत्पन्न, श्रीमान्, देखणा आणि शूर अशा या बटेव्हियन वीरास नांव मिळविण्यास या थाटामाटाच्या संग्रामांत फार चांगली संधि येऊन पोहोंचली. एग्मॉनचा किल्ला आणि जहागीर हॉलंडच्या उत्तर भागांत असून या घराण्याच्या प्राचीन इतिहासांत पुष्कळ पराक्रमी पुरुषांचीं नांवें प्रसिद्ध असल्याचें लोकांच्या सांगण्यांत येत असे. लहान वयांत असतांना लॅमोरल एग्मॉन हा चार्लस बादशहाच्या हुजऱ्याच्या पेशांत होता. शस्त्रें धारण करण्याचें सामर्थ्य आल्यावर तो शिपाईगिरीच्या पेशांत शिरला; व आपल्या वयाच्या एकोणिसाव्या वर्षीं बार्बरीच्या मोहिमेंत एक स्वारांची पलटण हाताखालीं घेऊन त्यानें मोठा अद्भुत पराक्रम

गाजविला. इ. स. १५४५ सालीं बव्हेरियाची राजकन्या सॅबिना इच्याशीं त्याचें लग्न झालें; इ. स. १५४६ सालीं बादशहानें त्यास फ्लीसच्या जमातीचा सभासद केलें; इ. स. १५५३ सालीं मेट्झ येथील वेढ्याच्या प्रसंगीं तो हजर होता; इ. स. १५५४ सालीं फिलिपचें मेरी ट्यूडरशीं लग्न जुळविण्याच्या कामांत मध्यस्थी करण्याकरितां तो इंग्लंडास गेला होता; घरंदाजपणा, संपत्ति आणि शौर्य या बाबतींत नेदर्लंडमध्यें त्याचा दर्जा सर्वांत मोठा होता. लोकप्रियतेची त्याला हाव होती, तथापि तो स्वभावानें फार गर्विष्ठ व बेगुमान असे; त्याचा राग क्षणिक, अनावर आणि भयंकर असे; पोकळ गर्व त्याच्या स्वभावांत अमर्याद होता; त्यामुळें त्याच्या स्वभावांतील वैगुण्य माहीत असणारांस त्याला पाहिजे त्या रीतीनें बोटावर नाचवितां येत असे; त्याला शिक्षण फार बेताचें मिळालें होतें; आणि रणभूमीशिवाय इतर ठिकाणच्या कामांविषयीं त्याची पात्रता फार कमी होती; यामुळें लढाईच्या कामीं तो जितका धीट व तडफदार तितकाच राजकीय व्यवहारांत अनिश्चित आणि नालायख होता. जात्या मोठा नामांकित शिपाई; परंतु दुर्दैवानें बुद्धिमान्, दूरदर्शी आणि प्रामाणिक पुरुषांचाही ज्यांत टिकाव लागणें दुरापास्त अशा मुत्सद्यांच्या अंधार आणि भयंकर प्रवृत्तींत पडून अविचार, अनिश्चितपणा, अपात्रीं विश्वास आणि दांडगेपणा या गुणांनीं ह्याचा सर्वस्वी नाश व्हावा यांत नवल नाहीं.

इ. स. १५५७ च्या आगष्ट महिन्यांत सेंट क्वेंटिन् येथें उभय पक्षाची मोठी लढाई झाली. तींत फ्रान्सच्या तर्फे कॉन्स्टेबल मॉंट मॉरेन्सी, ॲडमिरल कॉलिनी वगैरे अतिरथी, महारथी सेनापती असतां त्यांचा, सरदार एग्मॉन यानें पूर्ण पराभव केला; लढाईनंतर विजयी सैन्यानें क्वेंटिन् शहरावर हल्ला करून तें हस्तगत केलें व शहरांत शिरून असंख्य अघोर कृत्यें केलीं. याच संधीस फिलिपचा पूर्ण विश्वासपात्र आरासचा बिशप ( धर्माध्यक्ष ) आणि फ्रेंच सेनापतीचा भाऊ धर्मज्ञ लॉरेन यांची एकांतांत गांठ पडून उभयतांचा एक गुप्त संकेत ठरला, तो असाः- ‘.फिलिप व फ्रान्सचा राजा या उभयतांचें जुन्या धर्माचें संस्थापन करणें हें जगांत मुख्य कर्तव्य असून उभयतांचेही खरे शत्रु नवीन

धर्ममताचे लोक हे होत. करितां या सामान्य शत्रूंचा उच्छेद करण्या-करितां दोन्ही देशांच्या राजांनीं एकमेकांस खऱ्या भावानें साह्य केलें पाहिजे. हा उद्देश सिद्धीस नेण्याकरितां दोन्ही राष्ट्रांनीं नेहमीं एक विचारानें चाललें पाहिजे.' या भेटीचा व्यवहार अर्थातच गुप्त ठेवावा लागला; त्यामुळें उभय सैन्याची दुसरी एक लढाई होऊन फ्रेंच सैन्यास पुन्हा अपयशाचा वांटा पदरीं घ्यावा लागला. या दोन जयांची धर्माध्यक्षांच्या गुप्त मसलतीस भर पडल्यावर तहाचा मार्ग सुलभ झाला. फ्रान्सच्या तर्फे मॉंट मॉरेन्सी व स्पेनच्या बाजूनें सरदार ऑरेंज हे तहाचीं कलमें ठरविण्यास वकील होते; काटो कॉम्ब्रेझी येथील तहांत असें ठरलें कीं:—'दोन्ही राजांनीं हरप्रयत्न करून कॅथोलिक धर्म अबाध चालेल अशी तजवीज करावी; आणि धर्ममतांत उत्पन्न होत चाललेले नवे भेद नाहींसे करण्याकरितां व धर्म विचारांत वाढत चाललेलें स्वातंत्र्य नष्ट करण्याकरितां एक नवी धर्मसभा स्थापन करावी. मागील आठ वर्षांत संपादिलेला मुलूख दोन्ही पक्षांनीं ज्याचा त्यास परत द्यावा.' ह्या तहाची वार्ता ऐकून नेदर्लंड देशांत पुन्हा सर्वत्र आनंद व महोत्सव यांचा पूर लोटला. बिचाऱ्या नेदर्लंडच्या लोकांस त्यांच्यांत वाढत चाललेले नवीन धर्मविचार हे फिलिपचे सर्वांत कट्टे शत्रु होते, व त्यांच्याशीं एकदिलानें झगडण्यास तो आतां मोकळा झाला, या गोष्टीची अद्याप कल्पनाही नव्हती.

फिलिपचें नेदर्लंड देशावर कधींच विशेष प्रेम नव्हतें. तो या तहानंतर नियंत्रित राजसत्तेच्या या देशांतून स्पेनला परत जाण्याचा विचार करूं लागला. त्यानें मनांत योजिलेल्या कामाचीं सूत्रें स्पेनमधील सभागृहांतून चालविणें त्यास जास्त सोईचें वाटलें. काम्ब्रेझीच्या तहावरून फिलिबर्ट सॅव्हॉयला फ्रान्सच्या राजाकडून त्याची जहागीर परत मिळाली; व आपल्या जहागिरीची व्यवस्था पाहणें त्यास भाग पडलें. यामुळें नेदर्लंडच्या सरसुभेदारीच्या जागेवर दुसऱ्या एखाद्या योग्य इसमाची योजना करणें हें स्वदेशीं जाण्यापूर्वीं पहिलें महत्वाचें काम फिलिपला करावयाचें होतें. या जागेस तद्देशीय आणि विदेशीय उमेदवार बरेच होते; त्यांपैकीं पांचव्या चार्लस राजाच्या राखेची मुलगी राणी मार्गरेट पार्मा हिची योजना

फिलिपनें केली. राज्यकारभाराच्या कामांत तिला मदत करण्याकरितां तीन मंत्रीमंडळ्या नेमण्यांत आल्या. पैकीं फडणीस-मंडळाचें काम एकंदर वसूल-जमाबंदीवर देखरेख ठेवण्याचें व खर्चाचीं अंदाजपत्रकें तयार करण्याचें होतें; या मंडळाचा अध्यक्ष सरदार बर्लेमॉन हा होता. खास-मंडळाचे (Privy Council) दहा विद्वान् पंडित सभासद असून त्याचा अध्यक्ष व्हिग्लियस हा होता; या मंडळाकडे न्यायखात्याची देख-रेख व व्यवस्था होती. तिसरें दरबारी-मंडळ (State Council) हें सर्वांत विशेष महत्वाचें होतें. राज्यांतील सर्व मोठमोठीं कामें-लढाया, तह, परराष्ट्रांशीं व्यवहार, स्वराष्ट्रांतील सर्व महत्वाचीं राज्यकारभाराचीं कामें, निरनिराळ्या संस्थानांतील अन्योन्य व्यवहार, या मंडळाच्या द्वारें होत असत. याचे सभासद आरासचे बिशप, व्हिग्लियस, बर्लेमॉन, राजपुत्र ऑरेंज, ग्लेन, सरदार एग्मॉन, आर्शो आणि हॉर्न हे होते. पैकीं सरदार हॉर्न यास राजानें स्पेनला जातेवेळीं नेदर्लँडच्या राज्यकारभाराची माहिती करून घेण्याकरितां आपल्याबरोबर नेण्याचें ठरविलें होतें. हा पुढें दोन वर्षांनीं स्वदेशीं परत आला. या तीन मंडळांचा परस्परांशीं बिलकुल संबंध नव्हता. मात्र फडणिशी आणि खाजगी मंडळांच्या सभासदांस दरबारी-मंडळाच्या सभेस हजर राहण्याची परवानगी होती; वास्तविक सर्व कारभार व्हिग्लियस, बर्लेमॉन आणि आरास या त्रयीची एक गुप्त कमिटी होती, तिच्या द्वारें चालला होता. या कमिटींतही आरासच्या बिशपच्या हातांत सर्व सत्ता एकवटली होती.

ब्राबंट प्रांतावर निराळा सुभेदार नव्हता; कारण या प्रांतांत राजाचा सरसुभेदार स्वतः राहण्याची वहिवाट असून तेथील राज्यकारभार तो स्वतःच पहात असे. बाकीच्या प्रांतांचे स्टॅडहोल्डर्स (सुभेदार) होते तेः—

१. फ्लँडर्स, आर्टवा-सरदार एग्मॉनः २. हॉलंड, झीलंड, यूट्रेक्ट-राजपुत्र ऑरेंजः ३. हेल्डर्स, झुट्फन-सरदार मेघेमः ४. फ्रीजलंड, ग्रोनिंजन, ओव्हरीसल-सरदार अरेंबरः ५. हेनो, व्हॅलेन्सिनीज, कॅम्ब्रे-सरदार बर्घेनः ६. टुर्ने-स. मॉंटिनीः ७. नेमुर-स. बर्लेमॉनः ८. लुक्सेंबर-स. मन्स्फील्डः ९. रीसल, ड्रुए, आर्चीज-स. क्रूरिए.

हे स्टॅडहोल्डर्स आपापल्या प्रांतांतील सैन्याचे मुख्य अधिपती होते; फ्लँडर्सशिवाय इतर प्रांतांत हे स्टॅडहोल्डर्स मुख्य न्यायाधीशही असत. नेदर्लंड देशांत नेहमीचें कदीम सैन्य कायमें तीन हजार लोकांची एक नामांकित घोडेस्वारांची पलटण होती; या पलटणीच्या चवदा तुकड्या निरनिराळ्या प्रांतांत वांटून दिल्या होत्या; याशिवाय विदेशीय सैन्य या देशांत सुमारें चार हजार राहिलें होतें. तेंही सरहद्दीवरील महत्वाच्या ठिकाणीं राज्याचें रक्षण करण्याकरितां वांटून दिलें होतें. हें सैन्य आतां नेदर्लंड देशांत ठेवण्याची अवश्यकता नव्हती; असें असून तें कायम ठेवल्यामुळें लोकांच्या मनांत राजाच्या हेतुविषयीं संशय येऊन एका प्रकारची अस्वस्थता उत्पन्न झाली. राजाच्या मनांत ह्या सैन्याची संख्या वाढवून त्याच्या धाकानें नेदर्लंड देशांत आपला सक्तीचा अंमल चालविण्याचा विचार होता. नेदर्लंड देश सोडण्यापूर्वीं निरनिराळ्या महत्वाच्या प्रसंगीं व ठिकाणीं जातीनें जाऊन राजानें लोकांचा निरोप घेतला. मेलीन येथील न्यायसभेंत जाऊन त्यानें असें प्रतिपादन केलें कीं, धर्मसंबंधांत वेळोवेळीं सुटलेले वटहुकूम शब्दशः अमलांत आणण्याची खटपट त्या सभेनें अवश्य केली पाहिजे; आणि पाखंडी लोकांचा संशय येतांच त्यांस जिवंत जाळून नवीन धर्ममताचें अगदीं निर्मूलन केलें पाहिजे. ता. ७ आगष्ट इ. स. १५५९ रोजीं घेंट येथें सर्व प्रांतांचे प्रतिनिधी, सर्व प्रमुख सरदार, व पुढारी लोक यांचा राजानें मोठा दरबार भरविला; त्या समयीं राजाच्या वतीनें शेवटचें निरोपाचें भाषण आरासचा बिशप यानें केलें; तो ह्मणालाः—“ राज्यकारभाराच्या नडीमुळें ही प्रिय भूमि महाराजांस सोडून जावें लागत आहे, त्याबद्दल ते फार कष्टी आहेत. तथापि लोकांच्या कलाकडे लक्ष देऊन सरकारांनीं सुभेदारीच्या जागीं एतद्देशीय उच्चकुलीन राणी पार्मा इची योजना केली आहे, तिचा योग्य मान राखून प्रजाजनांनीं सरकारचा हुकूम चालवावा. महाराजांनीं राज्याच्या खर्चाकरितां राष्ट्रसभेपाशीं केलेली तीस लाख फ्रँकची (एक फ्रँक=॥=) मागणी सभेनें मंजूर करावी. हल्लीं पुष्कळ देश व विशेषतः आसपासचे मुलूख धर्मभ्रष्ट व भिन्नमतवादी लोकांनीं व्यापले आहेत. या लोकांची उत्पत्ति व त्यांस प्रेरणा दैत्यगुरूपासून असून त्यांनीं सर्व देशांत गोंधळ, दुही व

अनर्थ माजविला आहे. हें पाहून महाराजांनीं नवीन नेमलेल्या सुभे-दारीणसाहेबांस सद्धर्माच्या स्थित्यर्थ अशी आज्ञा केली आहे कीं, नवीन धर्ममतांचें आणि पंथाचें उन्मूलन करण्याकरितां त्यांच्या विरुद्ध वेळोवेळीं सुटलेले हुकूम अक्षरशः अमलांत आणावे; व जरूर वाटल्यास तशा प्रकारचे आणखीही हुकूम वेळोवेळीं प्रसिद्ध करावेत." मात्र स्पॅनिश सैन्य परत नेण्याविषयीं, अगर लोकांस असह्य झालेलें करांचें ओझें कमी करण्याविषयीं या वक्तृत्वपूर्ण भाषणांत कोठेंही उल्लेख आला नाहीं. राजानें मागितलेली पैशाची मागणी मंजूर करावी कीं नाहीं याचा विचार करण्याकरितां प्रतिनिधींनीं एक दिवसाची मुदत मागून घेतली. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं आर्टवाच्या प्रतिनिधींनीं आपल्या हिश्शाची रक्कम देण्याची आपली तत्परता राजास विदित केली; मात्र या राजसेवेबद्दल त्यांनीं उलट एवढेंच मागणें मागितलें कीं, नेदर्लंड देशांत आतां सैन्याची बिलकुल अवश्यकता नसल्यामुळें देशांत असलेल्या परदेशी सैन्यास एकदम स्वस्थानीं जाण्याचा हुकूम व्हावा. हें शेवटचें मागणें मागतांच राजाचें पित्त खवळलें. दुसऱ्या प्रांतांच्या प्रतिनिधींचेंही तेंच मागणें पडलें; याशिवाय सर्व नेदर्लंडच्या राष्ट्रसभेच्या वतीनें याच आशयाचा सरदार ऑरेंज व एग्मॉन वगैरेंच्या सहीचा अर्ज राजापुढें आला. राजा प्रथम रागाच्या आवेशांत सभासद लोकांस सांगूं लागला कीं,–' मीही स्पेन देशापैकीं आहें, करितां सर्व राजसत्ता तुमच्या हातीं देऊन मी निघून गेल्यास अर्थातच तुमचें समाधान होईल.' जमलेल्या प्रतिनिधींस, फिलिपचे पूर्वज दीनभावानें त्यांच्यापुढें वेळोवेळीं आल्याचें स्मरण असल्यामुळें, त्यांना या उद्गारांचा विशेष कांहींच वाऊ वाटला नाहीं. राजाला कांहीं वेळानें आपल्या अविचाराचा पश्चात्ताप होऊन त्यानें बोलण्याचा झोंक बदलला. स्पॅनिश सैन्याच्या बाबतींत त्याचें असें ह्मणणें पडलें कीं, तें नेदर्लंडांत आतां फार थोडें राहिलें आहे; व परचक्रापासून नेदर्लंडच्या शहरांचें रक्षण करण्याचा प्रसंग आल्यास त्याची फार जरूर भासेल. शिवाय या सैन्याच्या पगाराची राहिलेली बाकी स्पेनमधून आली पाहिजे.

तसेंच आपला मुलगा डॉन कार्लोस नेदर्लंड देशांत येईल त्यावेळीं सदर सैन्य त्याच्या तैनातीला लागेल; तथापि चार दोन महिन्यांत, सैन्य स्पेनला परत रवाना करण्याची तजवीज होईल. तोंपर्यंत फिलिपनें सरदार ऑरेंज आणि एग्मॉन यांस या सैन्याचें आधिपत्य देण्याची योजना केली. सरतेशेवटीं सर्व न्यायाधीश व दण्डनायक (मॅजिस्ट्रेट) यांस धर्माच्या बाबतींत दरोबस्त हुकूम योग्य पाळण्याबद्दल पुन्हा ताकीद देऊन, राजा फ्लशिंग बंदरांतून स्वदेशीं जाण्यास निघाला. फ्लशिंगपर्यंत पोहोंचविण्याकरितां सर्व प्रमुख सरदार व कामगार आले होते; त्यांत सरदार ऑरेंज हाही होता. जहाजावर चढण्याच्या वेळीं राजानें त्याजकडे पाहून, गुप्त कारस्थानें करून आपले बेत फसविल्याबद्दल त्यास अनेक दूषणें दिलीं. त्यावर वुइल्यम नम्रतेनें ह्मणाला, "ज्या गोष्टी घडल्या त्या सर्व प्रांतिकसभांनीं आपसांत विचार करून बहुमतांनीं केल्या आहेत." हे शब्द ऐकतांच त्याचें मनगट धरून राजानें त्यास जोरानें हिसडा दिला; आणि ह्मणाला, "सभा कशाच्या? तूंच! तूंच! तूंच!" इतका संवाद झाल्यावर ऑरेंजनें राजास जहाजावर पोहोंचविण्यास जाण्याचा विचार रहित केला; कदाचित् त्यानें जहाजावर पाय ठेविला असता तर त्यास त्याचक्षणीं स्पेनमध्यें अटकेंत जावें लागलें असतें; अशा प्रकारचा त्याचा दुरदर्शीपणा पुढें पुष्कळ प्रसंगीं दिसून आला आहे.

पार्मा ही जरी पांचव्या चार्लस राजाच्या रखेची मुलगी होती; तरी तिच्या नात्याचा संबंध त्यानें कबूल करून आपली आत्या मार्गरेट इजपाशीं शिक्षणासाठीं तिला लहानपणीं ठेविलें होतें; यावेळींच तिला शिकारीचा वगैरे नाद लागून त्या व्यवसायांतील कसब तिनें पूर्णपणें संपादन केलें. तिचें पहिलें लग्न वयाच्या बाराव्या वर्षी सत्तावीस वर्षांचा व्यसनी इटालियन सरदार ॲलेक्झँडर याजबरोबर झालें. लग्न झाल्या-नंतर एका वर्षानें तिचा नवरा दुर्व्यसनानें मरण पावला. तिचें दुसरें लग्न दयाच्या विसाव्या वर्षी ऑटोव्हिओ फार्नीस नामक दुसऱ्या एका तेरा वर्षांच्या अल्पवयी इटालियन जहागिरदाराशीं झालें. हा नवरा अल्पवयी असल्यामुळें त्यावर तिचें प्रेम प्रारंभीं बिलकुल नव्हतें; परंतु पुढें वयांत आल्यावर ऑटोव्हिओनें चार्लस राजाबरोबर बार्बरीच्या

मोहिमेवर जाऊन बादशहाची सेवा अनेक संकटसमयीं एकनिष्ठपणें केली; मोठा अलौकिक पराक्रम केला; त्याचें वर्तमान ऐकल्यापासून तिचे त्याजविषयीं मनोविकार बदलले होते. या ऑटोव्हिओस संतुष्ट राखण्याकरितां राजानें नेदर्लंडच्या सुभेदारीची जागा मार्गरेटला दिली असा पुष्कळ लोकांचा समज होता. वास्तविक मार्गरेटची या जागेवर नेमणूक करण्यांत तिचा नेदर्लंडमधील जन्म अगर तिच्या नवऱ्याची नोकरी हे मुख्य हेतू नव्हते. राजानें नेदर्लंडचा कारभार पाहण्यास आरासचा बिशप हा खात्रीचा मनुष्य निवडून काढला होता; त्याच्या तंत्रानें वागणारें एक बाहुलें त्यास पाहिजे होतें; आणि तसें बाहुलें शोधून काढण्यांत त्याचे इतर कांहीं इष्ट हेतू सहज सिद्धीस गेले. ऑटोव्हिओ फार्नीस हाही आपल्या प्रेमळ परंतु तामसी बायकोच्या जाचांतून मुक्त झाला; व फिलिप राजास इटाली देशांत तिच्या नवऱ्याचें पाठबळ झालें; नेदर्लंडमध्यें ती आपल्या अधिकाराच्या जागीं येऊन दाखल झाली त्या वेळीं तिचें वय सदतीस वर्षांचें होतें; बुद्धिमत्ता, मानीपणा व तेजस्विता यांबद्दल तिची फार ख्याति होती. कॅथोलिक धर्माबद्दल तिला कट्टा अभिमान होता. जेझुइट (कॅथोलिक धर्माचा पोटभेद) पंथाचा स्थापक लयोला हा तर तिचा उपदेशक आणि गुरू होता. नवीन धर्ममतांच्या लोकांबद्दल तिला पूर्ण तिटकारा असून त्यांच्या विरुद्ध तिच्या बापानें केलेले कडक हुकूम ती केवळ श्रुतीप्रमाणें पूज्य मानीत असे. कॅथोलिक धर्माचे सर्व नियम ती मोठ्या भक्तीनें पाळी. माकिआव्हेली आणि मेडिसि या घराण्यांच्या कुटिल राजनीतींत ती तरबेज होती; याशिवाय तिजपाशीं इतर विद्या अगर कला फारच थोड्या होत्या. तिला इटालियन भाषाच तेवढी अवगत होती. तिचा चेहरा मर्दानी असून तिच्या ओठावर मिशांची लव होती. तिला संधिवाताची व्यथा होती. तिच्या वरील शारीरिक पौरुष धर्मानुरूप पुरुषांचे इतर व्यवसाय करण्यास तिचें मन तयार असावें, असा लोकांचा समज होत असे. दरबारी-मंडळींपैकीं बर्लेमॉन हा राजनिष्ठ आणि नीतिमान् सरदार होता, असें कॅथोलिक धर्मी ग्रंथकारांचें ह्मणणें आहे. प्रॉटेस्टंट पक्षाचे लोक सरसकट तो अपमतलबी, लोभी आणि अत्यंत निर्दय

होता अशी त्याची निंदा करतात. एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं, तो शूर आणि एकनिष्ठ शिपाई, पक्का कॅथोलिक आणि पूर्ण राजभक्त होता. व्हिग्लियस हा जात्या फार बुद्धिमान् आणि सुशिक्षित फ्रीजियन गृहस्थ होता. त्यानें लूव्हॅन, पारिस, आणि पॅडुआ येथील विद्यालयांत पुष्कळ वर्षें अध्ययन केलें होतें. त्यानें एका सुप्रसिद्ध विद्यालयांत कांहीं दिवस अध्यापकाचें कामही केलें होतें. इ. स. १५४२ त मेलिनच्या सभासदाची जागा बादशहानें त्यास दिली व त्याच सभेचा तो इ. स. १५४५ त अध्यक्ष झाला. इ. स. १५४८ सालीं फ्रान्सशीं तह ठरविण्याचे कामीं तो मध्यस्थ होता. या वेळीं तो खासगी-मंडळाचा अध्यक्ष होता व दरबारी मंडळाचा सभासद होता; आणि गुप्तमंडळाचाही तो सभासद होता. इ. स. १५५० सालच्या सुप्रसिद्ध जाहिरनाम्याचा हाच उत्पादक या समजुतीनें त्याच्या नांवानें लोकांत बराच गवगवा झाला होता. त्याचीं धर्ममतें जुन्या पंथाचीं असून मतस्वातंत्र्य हें धर्मनाशक आहे अशी त्याची कल्पना होती. नवीन धर्ममतें स्वीकारणें हा त्याच्या समजुती-प्रमाणें गुन्हा होता. धर्माच्या कामांत निराळे अंमलदार नेमून त्या बाबतींत सक्तीचा अंमल चालविणें हें तो कॅथोलिक राजाचें मुख्य कर्तव्यकर्म समजत असे.

यापुढें ज्या महापुरुषाच्या कृतींच्या धोरणानें नेदर्लंडच्या इतिहासास नवी दिशा मिळाली, अल्प वयांतच ज्याला प्रमुखपद प्राप्त होऊन पुढील सर्व महत्वाच्या राजकीय घडामोडी व इतिहासांतील पात्रें स्वाभाविकपणें त्याच्या अनुषंगानें चालूं लागलीं, आणि जो ईश्वरी संकेतानुरूप यापुढें प्रतिवर्षीं सर्व राष्ट्रास मार्गदर्शक दिवा, टेंकण्याची काठी किंवा केवळ राष्ट्रीय जीविताचा झरा होत गेला त्या नॅसाघराण्यांतील वुइल्यमचा अथवा राजपुत्र ऑरेंजचा पूर्ववृत्तांत या ठिकाणीं थोडक्यांत देणें अवश्य आहे. नॅसाघराणें स्पष्टपणें लोकांच्या नजरेस अकराव्या शतकाच्या मध्यभागीं आलें व या वेळींच त्याच्या दोन मोठ्या शाखा झाल्या. वडील शाखा जर्मनींत राहिली; व तेराव्या शतकांत त्यापैकीं नॅसाचा अडोल्फो हा जर्मनीच्या तक्तावर बसला; व त्याच्या वंशजांत पुष्कळ धर्मगुरु, न्यायाधीश व चतुर सेनापती निपजले. धाकट्या शाखेकडे नॅसा

डिलेनबूरचें छोटें संस्थान चाललें होतें. पुढें या शाखेचे लोक नेदर्लंड-मध्यें येऊन राहिले. तेथें त्याची सत्ता व मिळकत बरीच वाढली. वुइल्यमचे पूर्वज हे हेल्डर्सचे जहागिरदार असल्यामुळें नेदर्लंड देशांत ते पिढीजात सत्ताधारी होते, व बर्गंडी घराण्यापैकीं राजांच्या दरबारीं त्यांचें फार महत्व होतें. वुइल्यम्च्या बापाच्या वांटणीस जर्मनींतील कांहीं जहागिरी असल्या-मुळें तो तिकडेच रहात असे; व तेथें त्यानें प्रॉटेस्टंट धर्म स्वीकारला व त्याचा प्रसार आपल्या जहागिरीच्या मुलुखांत केला. वुइल्यम्चा चुलत भाऊ राजपुत्र रेनी हा निपुत्रिक मरण पावल्यामुळें त्याच्या वांट्यास आलेलें लुक्सेंबर, ब्राबंट, फ्लँडर्स आणि हॉलंड हे परगणे वुइल्यमास प्राप्त झाले. रेनीच्या वारसाईतच त्याला ऑरेंजचें संस्थानही प्राप्त झालें. नेदर्लंडमधील नॅसाघराण्यापैकीं ओथोस, इंगलबर्स आणि हेनरी वगैरे विख्यात पुरुषांचा हा वंशज होता. जर्मनीमधील नॅसा घराणें जरी संपत्तीच्या मानानें जरा कमी दर्जाचें होतें, तरी त्याचा मानमरातब मोठा असून सुधारणेच्या महत्त्वाचा पुरस्कार केल्यामुळें मनुष्यसमाजावर त्याचे महत् उपकार झाले होते; आणि या घराण्याचाही कर्ता पुरुष या वेळीं आमचा चरित्रनायकच होता. त्याच्या बापास संपत्तिमान वुइल्यम ही संज्ञा असे. मुख्यत्वेंकरून त्याचीं मुलें हींच त्याची संपत्ति होती. त्याची बायको ज्यूलीआना स्टॉलवर्ग हिच्या पोटीं त्याला सात मुलगे आणि पांच मुली झाल्या; ही स्त्री फार कित्ता घेण्यासारख्या स्वभावाची आणि अति निर्मळ, भक्तियुक्त अंतःकरणाची होती; आणि आपल्या स्वभावाचा मुख्य धर्म जो भक्तिभाव त्याचीं तत्त्वें मुलांच्या मनांत तिनें लहानपणापासून पेरून ठेविलीं होतीं. कालांतरानें या वृक्षांस भरपूर फळेंही आलीं. तिनें आपल्या कीर्ति-मान मुलांस संकटाच्या अगर दुःखाच्या समयीं वेळोंवेळीं लिहिलेलीं पत्रें अद्यापि उपलब्ध आहेत; तीं वाचलीं असतां कोणाही मनुष्याचें हृदय सद्गदित झाल्यावांचून राहणार नाहीं. या पत्रांत लहानपणीं आपल्या मांडीवर खेळत असतांना जसा उपदेश करावा त्याप्रमाणें बिनवून मोठ्या साध्या भाषेंत, आयुष्यांत संकटाच्या आणि परीक्षेच्या वेळीं सर्व शक्ति-मानें ईश्वरावर अनन्यभावानें भरंवसा ठेवावा, असा तिनें आपल्या मुलांस वारंवार उपदेश केल्याचें आढळून येतें. वीरमातांमध्यें ज्यूलिआना

स्टॉलबर्ग इची गणना फार उच्च स्थानीं होईल; बुइल्यम, लुई, ऑडो-ल्फस, हेनरी आणि जॉन नॅसा या वीरपंचकाला शोभण्यासारखी ती आई होती, एवढ्या कथनानेंच तिची योग्यता थोडक्यांत समजून येईल. वयाच्या अकराव्या वर्षीं बुइल्यम यास एकदम चोहोंबाजूनें एवढ्या मोठमोठ्या जहागिरी प्राप्त झाल्यामुळें त्याची ब्रुसेल्सला वियाभ्यासासाठीं रवानगी झाली. या तरुण सरदाराच्या नशिबीं प्रथम बादशहाच्या दरबाराचें शिक्षण, नंतर मुलुखगिऱ्या, परकीय राजांचे दरबारीं वकिलीचें काम, सुभेदारीची जागा आणि चैनबाजी व ऐषआरामाचें आयुष्य, हेंच लिहून ठेवल्यासारखें दिसलें. लहानपणींच तो बादशहाच्या खाजगी नौकरींत राहिला. चार्लसनें त्या मुलाची विलक्षण बुद्धिमत्ता तेव्हांच ओळखिली. वयाच्या पंधराव्या वर्षीं तो बादशहाचा अगदीं विश्वासुक मसलतगार बनला. राजाच्या ठिकाणीं त्याची इतकी व्याप्ति झाली कीं मोठमोठ्या लोकांशीं अत्यंत महत्वाच्या कामासंबंधीं संभाषणें होत असतांना देखील तो हजर असल्यास त्याबद्दल राजास संशय अगर भीति बिलकुल वाटेनाशी झाली. आपल्या अल्पवयी खिजमतगारास न समजण्यासारखी कोणतीही गुप्त गोष्ट राजापाशीं नव्हती. त्याचें अवलोकन आणि विचार करण्याची शक्ति स्वभावतःच फार तीक्ष्ण आणि खोल असल्यामुळें या सहवासानें ती विलक्षण वाढली. जगाचीं मोठमोठीं नाटकें दररोज ज्या रंगभूमीवर चाललीं होतीं, त्याच्या पडद्यामागील शिक्षण त्यास लहानपणींच मिळालें. ज्या कृत्रिम पेहरावानें आणि थाटानें इतिहासांतील पोकळ व दिखाऊ प्रसंग घडून येतात, त्याचा त्याला आतां बिलकुल बाऊ राहिला नव्हता; दरबारांत असतांना बारकाईनें लोकांची हालचाल पाहून आपल्याशीं त्यांच्या मनोविकारांचा विचार करणें हा या राजपुत्राचा आवडता व्यवसाय असे. जसजसा तो वयांत येऊं लागला तसतसा राजानें मोठमोठीं जोखमीचीं कामें त्याच्यावर सोपाविण्याचा क्रम सुरू केला. वयाचे एकविसावे वर्षीं त्यास फ्रेंच सरहद्दीवर सैन्याचें आधिपत्य प्राप्त झालें. यावेळीं बादशहास मोठमोठ्या नामांकित वीरांस दुखवून ही नेमणूक करावी लागली. या अल्पवयी सरदारानें हें काम इतक्या उत्तम रीतीनें बजाविलें कीं, त्याची नेम-

णूक करणारासही त्यापासून वाहवा मिळाली. राज्यपद सोडण्याचे वेळीं बादशहानें याच्याच खांद्यावर हात दिला होता. येथें ऑरेंजचा चार्लसशीं संबंध संपला. फिलिपच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं कार्डी प्रांतांत युद्ध-प्रसंग झाला त्यांत हा हजर होता. इ. स. १५५९ सालीं तहासंबंधीं वाटा-घाट करण्याच्या वेळीं हा फिलिपचा वकील होता व तहाचीं कलमें त्याच्याच मार्फत ठरलीं. हें काम ह्यानें फार शिताफीनें केलें. तहाची पूर्ण बजावणी होण्याकरितां फ्रेंच राजानें घेतलेल्या ओलिसांपैकीं हा एक होता. फ्रान्समध्यें असतांना त्याला जी महत्वाची गुप्त बातमी लागली तिच्या योगानें त्याच्या पुढील आयुष्याचा ओघ सर्वस्वी पालटला. फ्रान्सचा राजा दुसरा हेनरी याजबरोबर एके दिवशीं शिकारींत असतां हेनरी व बुइल्यम हे दोघे एकटेच एका ठिकाणीं राहिले. राजाचें मन स्पेनतर्फे आलेला दुसरा ओलिस स० आल्व्हा याच्या मार्फत नुकत्याच ठरलेल्या गुप्त तहानें भरून गेलें होतें. या गुप्त तहांत दोन्ही राजांचें, फ्रान्स आणि नेदर्लंड या दोन्ही देशांतील नवीन धर्म स्वीकारलेल्या सर्व लोकांची सरसकट कत्तल करावी, असें ठरलें होतें. हा गुप्त ठराव भोळेपणानें फ्रेंच राजानें ऑरेंज यास कळविला. धर्मसुधारणेच्या मिषानें दोन्ही राष्ट्रांत राजां-विरुद्ध बंडाची खटपट चालली आहे, असा या राजाला भास झाला होता. कारण राष्ट्रांतील बरेच प्रमुख लोक आणि राजाच्या आप्तांपैकींही कांहीं मंडळी या नवीन धर्मपंथास जाऊन मिळत होती. फ्रान्सच्या राजानें याबेळीं ऑरेंजला नवीन धर्मपंथाविरुद्ध चाललेलीं एकंदर कारस्थानें सविस्तर कळविलीं. आणि वर असें कळविलें कीं, नेदर्लंड देशांतील पाखंड मताचा उच्छेद करण्यास तेथें असलेल्या स्पॅनिश सैन्याचा फार उपयोग होईल. ही हकीगत ऐकून बुइल्यम फार चकित झाला. परंतु चेहऱ्यांत कांहीं बदल होऊं न देतां त्यानें ती सर्व हकीगत निमुटपणें ऐकून घेतली. या प्रसंगावरूनच त्यास "वाक्संयमी" यतवाक् बुइल्यम अशी संज्ञा प्राप्त झाली. फिलिप आणि आल्व्हा यांनीं विणलेलें धर्म-च्छलाचें जाळें तोडण्याकरितां ज्या पुरुषाचा अवतार होता, त्यास ही वेळींच मिळालेली सूचना फार अमूल्य होती. या वेळेपासून पुढील वर्तन-क्रमाबद्दल त्याचा निश्चय कायमचा ठरत चालला. स्वदेशीं परत येतांच,

ज्या स्पॅनिश सैन्यावर एग्मॉन आणि ऑरेंज यांस राजानें बळजबरीनें मुख्य अंमलदार नेमिलें होतें, तेंच सैन्य नेदर्लंडमधून घालविण्याबद्दल त्यानें आपलें सर्व वजन खर्च करून लोकांत जबरदस्त गवगवा उत्पन्न केला. या वेळींच त्याची खात्री झाली कीं, स्पेनपेक्षां अधिक घोर स्वरूपाची धर्मसंशोधक सभा नेदर्लंडमध्यें स्थापन करण्याचा संकेत ठरला असावा. सुधारकांशीं त्याची यावेळीं यत्किंचित्‌ही सहानुभूति नव्हती. केवळ असंख्य निरपराधी व सदाचारसंपन्न स्त्रीपुरुष विनाकारण धर्मच्छलास बळी पडणार, या विचारानें त्याचें अंतःकरण कळवळून गेलें; व त्यानें आपल्या शक्त्यनुसार त्यांचा धर्मशासनांपासून बचाव करण्याचा निश्चय केला. फिलिपनें स्वदेशीं जाण्यास निघतेवेळीं हॉलंड, फ्रीज़्लंड आणि यूट्रेक्ट या प्रांतांच्या सुभेदारीच्या कामासंबंधीं त्यास कांहीं प्रसिद्धपणें व कांहीं गुप्तपणें सूचना केल्या होत्या. त्यांत नवीन धर्मपंथी लोकांस कायद्याप्रमाणें शिक्षा करून त्यांचा बीमोड करावा असें सांगून कांहीं प्रमुख लोकांविषयीं संशय असल्यामुळें त्यांस एकदम देहांत प्रायश्चित्त देण्याविषयीं हुकूम केले होते. ऑरेंजनें या लोकांस पळून जाण्याविषयीं खाजगी रीतीनें इषारा दिला. फिलिप स्पेनला परत गेला त्यावेळीं वुइल्यमचें वय २७ वर्षांचें होतें. त्याची पहिली बायको मरून एक वर्षच झालें होतें. त्याला या वेळीं फिलिप आणि मेरी अशीं दोन मुलें होतीं. हा वेळपर्यंत त्यानें पुढें जें साहसाचें, धोक्याचें, आणि श्रमाचें काम हातीं घेऊन व आमरणांत श्रम करून शेवटास पोहोंचविलें त्याचा त्याच्या मनाला गंधही नव्हता. हा वेळपर्यंत त्याचें आयुष्य ऐश्वर्य, सत्ता आणि राजपद यांच्या उपभोगांतच गेलें होतें. मात्र त्याच्यापुढील बुद्धिप्रकाशाचें आणि नीति-विकासाचें बीज त्याच्या अंगीं एव्हांपासून दिसत होतें. ज्या नवीन धर्मपंथाचा तो पुढें जगमान्य पुरस्कर्ता झाला, त्याबद्दल यावेळीं त्याच्या मनांत बिलकुल अभिमान उत्पन्न झाला नव्हता. तो नांवाचा कॅथोलिक होता, आणि त्या धर्माप्रमाणें त्याचें सामान्यतः वर्तन असे. परंतु धर्मतत्त्वांसंबंधानें त्यानें अद्याप विशेष विचारच केला नव्हता. या वेळच्या सर्व मोठमोठ्या लोकांची धर्मासंबंधानें हीच स्थिति

होती. या वेळीं नेदर्लंड देशांत कातडीं रंगविणारे रंगारी व कांहीं धर्मभ्रष्ट पाद्री हेच कायते प्रॉटेस्टंट धर्मांत शिरले होते. त्याच्या धार्मिक मातापितरांनीं लहानपणीं पेरलेलें बीज हेंच त्यानें पुढें प्रॉटेस्टंट धर्म स्वीकारण्यास कारणीभूत झालें असल्यास तें बीज पुष्कळ कालपर्यंत गर्भावस्थेंत होतें असें म्हणावें लागेल. या मधील अवकाशांत मेजवान्या, नाच, तमाशे, शर्यती, व इतर मर्दानी खेळ, शिकार व मुलकी आणि फौजदारी सरकारी कामें यांमधून त्याला एक क्षणभरसुद्धां मोकळीक मिळत नसे. त्याच्या ऐश्वर्याप्रमाणेंच त्याचें आदरातिथ्य हेंही एखाद्या राजाला शोभण्यासारखें होतें. राजा आणि परदेशस्थ वकील हे नेदर्लंडमध्यें आल्यावेळीं ब्रुसेल्स येथील नॅसावराण्याचा भव्य राजवाडा सर्वकाळ त्या मंडळींस खुला असे. हें आगतस्वागत व मेजवान्या राजाच्या तर्फे होत असत; परंतु राजापाशीं सुर्तीची नेहमीं टंचाई असल्यामुळें हा सर्व खर्च ऑरेंजवरच पडत असे; व तोच थाट राजा स्वदेशीं परत गेल्यावरही पुढें तसाच चालला होता. चोवीस सरदार आणि अठरा उच्च कुलांतील खिजमतगार त्याच्या कुटुंबांत नेहमीं कामावर असत. त्याचा एकंदर खाजगी लवाजमा इतका मोठा होता कीं, एके दिवशीं खर्च कमी करण्याचा बेत ठरल्यावरून अठ्ठावीस मुख्य आचाऱ्यांस बडतर्फ करावें लागलें. जर्मनींतील सर्व राजेलोक आपल्या आचारीलोकांस सूपशास्त्र शिकण्याकरितां त्याच्या मुतपाकखान्यांत पाठवीत. एके प्रसंगीं खुद्द फिलिप राजानेंही एका आचाऱ्याबद्दल वुइल्यमकडे मागणी केली होती. या अतिथि-प्रिय वाड्यांत रात्रंदिवस जेवणाचा कारखाना चालत असे. सकाळीं सूर्योदयापासून तों दोनप्रहरपर्यंत पाहिजे त्या वेळीं येईल त्या मनुष्यास उंची मदिरा व फराळाचे पदार्थ ताटें भरभरून मिळत. दोनप्रहरीं व सायंकाळीं जेवणाच्या वेळीं प्रतिदिवशीं पाहुण्यांची गर्दी असल्यामुळें दररोज रात्रंदिवस मेजवान्याच चालल्या होत्या, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मोठमोठ्या सरदारांप्रमाणेंच सामान्य लोकांचाही पाहुणचार या घरीं होत असे. तत्कालीन सर्व पक्षांचे लोक, राजपुत्र ऑरेंज याचें मनमिळाऊ भाषण आणि सभ्य चालरीत यांची तारीफ करतात. एका कॅथोलिक इतिहासकाराचें असें ह्मणणें आहे कीं, त्याच्या तोंडांतून उद्धट

किंवा अविचाराचा शब्द कधींच आला नाहीं. त्याची वाणी फार मधुर आणि गोड होती. एकंदर जनसमूहाचें त्याच्यावर प्रेम होतें, व सर्वांस त्याच्याबद्दल पूज्यबुद्धि वाटत होती. त्याची वागणूक फार प्रेमळ, परोपकारी, भारदस्त व मर्यादशील होती. तो जात्याच फार सुशील होता; व लहानपणापासून सर्व प्रकारच्या लोकांशीं त्याचें दळणवळण असल्यामुळें त्याला एक प्रकारचें सुंदर वळण लागलें होतें. ब्रुसेल्सशिवाय इतर ठिकाणींही त्याच्या राहण्याच्या अशाच प्रकारच्या व्यवस्था होत्या. त्याला ससाण्याची पारध विशेष आवडत असे. त्याचा पारध्यांचा सालीना खर्च दीड हजार फ्लोरिनचा ( फ्लोरिन=नऊ आणे ) होता. एवढें ऐश्वर्य असून त्याला या वेळीं सुमारें आठ नऊ हजार फ्लोरिनचें कर्ज होतें. त्याला कर्ज होण्याचें कारण त्याचें थाटाचें राहणेंच केवळ नव्हतें; त्याला मोठमोठ्या हुद्यांच्या जागीं आपला इतमाम चालवावा लागत असे. लढाईवर सेनापतीचें काम करीत असतां त्यास मिळालेला पगार त्याच्या खासगत नौकरांच्या खाण्यासमुद्धां पुरत नसे. परराष्ट्रांत वकील ह्मणून एक दोन वेळ तो गेला असतां तेथील दरबारी लोकांस मेजवान्या आणि मजालसी करण्यांत त्याचा खर्च सुमारें १५ लाख फ्लोरिन झाला होता. त्याच्या जहागिरीचें वार्षिक उत्पन्न फार मोठें होतें व त्याला इतर मिळकतही बरीच असे. असा हा ऑरेंजचा धुइल्यम उदार, वैभवशाली आणि बलिष्ठ सरदार होता. लहान वयांत रणभूमीवर यानें आपलें धैर्य दाखविलें होतें; भित्रेपणाबद्दल त्याजवर आणिलेला आरोप सर्वस्वी खोटा असावा असें दिसतें. प्रथमतः जरी तो कांहीं अंशीं दुर्बल अंतःकरणाचा आणि भित्रा असला तरी मानसिक धैर्य आणि दृढ निश्चय हे गुण पुढें विकास पावल्यामुळें तो अगदीं निर्भय वीर बनला हें निर्विवाद आहे. त्याला पुढील आयुष्यक्रमांत निरनिराळ्या स्वरूपाचीं अनेक संकटें पावलोंपावलीं भोगावीं लागलीं आणि त्याच्या मार्गांत ठिकठिकाणीं अनेक दगेही होते. तथापि त्याची उल्हासवृत्ति आणि ईश्वरावर भरंवसा, समता व धैर्य हीं कधींच ढळलीं नाहींत; मात्र एवढी गोष्ट निःसंशय आहे कीं, सावधगिरी हा या सरदाराचा मुख्य गुण होता; आणि हेंच त्याच्या मोठेपणाचें मुख्य बीज होतें. एग्मॉनप्रमाणें लोकांस

दिपविणारे पराक्रम त्याच्या हातून होणें शक्य नव्हतें. लोकांत अशी ह्मणच पडली होती कीं, "ऑरेंजची मसलत आणि एग्मॉनची मर्दुमकी." ऑरेंजच्या बुद्धिमत्तेविषयीं तर कोठें वादच नाहीं. त्याच्या बुद्धीचा तीक्ष्णपणा आणि विशालपणा, त्याचें मानवी स्वभावाचें ज्ञान, राज्यकारभार चालविण्याचें चातुर्य व दूरदृष्टि, व त्याच्या विचार-शक्तीचा प्रगल्भपणा यांविषयीं त्याच्या शत्रूंनींही कधीं आक्षेप घेतले नाहींत. याला 'यतवाक्, वाक्संयमी' ह्मणण्यास वास्तविक बिलकुल जागा नाहीं. खाजगीसंबंधांत तो मंडळींतला, आनंदी आणि विनोदी होता; आणि पुष्कळ सार्वजनिक प्रसंगीं लेखणीनें आणि भाषणानें त्या कालांत तो अद्वितीय वक्ता होता असें त्यानें पूर्णपणें निदर्शनास आणून दिलें होतें; त्याच्या मेंदूस शिक्षणाचे संस्कारही चांगले झाले होते. त्यानें इतिहासाचा अभ्यास काळजीपूर्वक केला होता. जर्मन, लॅटिन, फ्रेंच, फ्लेमिश आणि स्पॅनिश या पांच भाषा त्याला चांगल्या येत होत्या.

ॲन्टनी पेरीनो अथवा आरासचा बिशप (पुढें ग्रॅन्व्हिल या नांवानें प्रसिद्धीस आला) याच्या हातांत या वेळीं नेदर्लंडचीं राज्यसूत्रें वास्तविक आलीं होतीं. ज्या गुप्त मंत्रित्रयाच्या धोरणानें वागण्याची श्रीमती सुभेदारीण इजला आज्ञा होती, त्यांत हा अध्वर्यु होता. याचा बाप चार्लस बादशहाचा आवडता प्रधान होता. ॲंटनी हा तेरा भावंडांपैकीं वडील असून याचा जन्म इ. स. १५१७ सालचा होता. लहानपणापासून त्याच्या बुद्धीविषयीं ख्याति होती. त्यानें डोल, पॅडुआ, पारिस, आणि लूव्हॅन येथील विद्यापीठांत अध्ययन केलें होतें. वयाच्या विसाव्या वर्षीं त्याला सात भाषा उत्तम रीतीनें बोलतां येत होत्या. त्याची कायद्याची आणि धर्मशास्त्राची माहिती फार आकटोविकट होती. वयाच्या तेविसाव्या वर्षीं लीज येथील प्रार्थनामंदिरांत त्यास उपाध्यक्षाची जागा मिळाली; व थोडक्याच अवकाशांत तो आरासचा बिशप ह्मणजे धर्माध्यक्ष झाला. इ. स. १५४३ सालीं ट्रेंटच्या परिषदेंत त्यानें एक विद्वत्त्व व वक्तृत्व यांनीं पूर्ण असें भाषण करून इतकी ख्याति संपादन केली कीं बादशहास त्याचा मोठा अभिमान वाटून त्यानें आपल्या मंत्रिमंडळांत त्यास जागा दिली. पुढें त्यास दुसऱ्या हुद्याच्या व किफायतीच्या जागा

वेळोवेळीं मिळाल्या. त्याची जाडी आणि व्यापक विद्वत्ता, उपजत सूक्ष्मबुद्धि आणि चलाखी आश्चर्यजनक होती. तो प्रत्युत्पन्नमति, बोलण्यांत गोड व रसाळ, युक्तिबाज, धैर्यवान् व पक्का निश्चयी होता. त्याला लोकांस वागविण्याची विशेषेंकरून छंदानुवर्तनाच्या मिषानें आपणापेक्षां वरिष्ठ लोकांस वळविण्याची कला पूर्ण अवगत होती. आपल्यापेक्षां अतिशय उन्नत पदवीच्या परंतु अवनत बुद्धीच्या लोकांच्या स्वभावांचें इंगित त्यास तेव्हांच समजत असे. राजे लोकांचे कल संभाळण्याविषयीं त्याची मोठी शिताफी होती. ज्याची तो भाकरी खात असे त्याच्या धोरणानें वागत असे. फिलिपशीं व्यवहार करतांना तो प्रतिफिलीप बनत असे. मात्र उद्गास, अनिश्चित आणि गोंधळलेला फिलिफ तो दिसत नसे; परंतु वाक्पटु, कार्यतत्पर आणि वाकबगार अशा फिलिपचें स्वरूप त्याच्या ठिकाणीं दिसे. मोठ्या शिताफीनें व नम्रपणानें तो राजाच्या मनांतील गोष्टी ओळखून त्याच्या मनांत अर्धवट आलेल्या कल्पना एकदम मोठ्या प्रौढ व निश्चयात्मक भाषेनें त्यास सुचवून देई. यापेक्षां खुबीदार खुशा-मत ती कोणती ? राजाप्रमाणेंच या बिशपनें लांब लांब पत्रें लिहिण्याची संवय आपणास लावून घेतली. स्वतः मोठा वक्तृत्वपटु आणि तार्किक असतांही राजाच्या सांच्यांत आपणास बसविण्याकरितां त्यानें बोलण्या-च्या ऐवजीं लिहिण्याचा परिपाठ ठेविला. फिलिप, मार्गरेट पार्मा, व. इतर सर्व मुत्सद्यांशीं त्यानें प्रत्यक्ष भाषणाची संधी असतांही चाळीस चाळीस पन्नास पन्नास बंद लांब लांब पत्रें लिहिण्याचा सपाटा सुरू केला. हा आपला मुख्य गुण दिवाणाचे अंगीं पूर्णपणें प्रतिबिंबल्याचें पाहून त्याच्या मुत्सद्दगिरीची राजास बालंबाल खात्रीच झाली. या उद्योगीं राजानें आपल्या अद्भुत प्रधानाची हातांत लेखणी घेऊन बरोबरी करण्याची खटपट दरीच केली, परंतु ती व्यर्थ झाली. आरासच्या बिशप-चा फिलिप कारकून शोभला असता; परंतु त्याची अशी भावना होती कीं, आपल्या हुकमतीनें व सल्ल्यानें त्याचीं कामें चाललीं आहेत. हा बिशप करावयाच्या सर्व गोष्टी राजाच्या तोंडीं वदविल्यावांचून कधींही करीत नसे; व स्वतः पूर्ण सत्ताधीश असतां आपण केवळ राजाची सावली आहों असें भासवीत असे. त्याच्या क्लृप्त्या फार सोप्या होत्या. त्यांनीं

फिलिप व मार्गरेटसारखे अल्पबुद्धीचे लोकच फसावयाचे. खऱ्या राज्य-व्यवहारनिपुण आणि नीतिमान् पुरुषाशीं सामना करण्यास त्यांची फार थोडी मदत होण्यासारखी होती. त्याची राजनीति अगदीं ठरीव होती; परंतु सांप्रदायिक, लौकिकी व परोपकारी भाषणांचें तिजवर आवरण असल्यामुळें अज्ञलोकांचा तिजसंबंधीं गैरसमज होत असे. तो अनियंत्रित राजसत्तेचा कट्टा भक्त होता. परमेश्वर आणि त्याचा यजमान फिलिप या दोघांस तो सारखाच मानीत असे. अर्थातच नेदर्लंडच्या राष्ट्रीय हक्काचा तो पूर्ण द्वेष्टा होता. खर्चास पैसे मागण्याकरितां राष्ट्रसभा भरवून तीस विनंति करूं नये असें त्यानें फिलिपला आग्रहपूर्वक कळविलें होतें. प्रजेच्या हक्कासाठीं भांडणारे लोक अपमतलबी व गांवगुंड असून लोकांची प्रीति संभाळण्यापलीकडे त्यांचा कांहीं हेतु नसतो असें त्याचें ठाम मत होतें.

नेदर्लंडच्या सनदा या पुष्कळच मर्यादित होत्या. मानवी प्राण्याच्या हक्कांचा त्यांत एक चकारशब्दही नसून, उलट मानवी प्राण्याच्या नैसर्गिक दुःखांचा त्यांत विचार केला होता. 'राजा ह्मणजे ईश्वरी अवतार' या कल्पनेविरुद्ध या वेळीं कोणाला शंकाही आली नव्हती. नेदर्लंडच्या कांहीं विशेष हक्कांसंबंधीं राजांशीं या सनदांत करार होते. मानवी समाजाच्या सामान्य हक्कांचा प्रश्न यावेळीं उद्भवलाच नव्हता. या कालीं लोक सवलती मागत होते; पूर्ण स्वातंत्र्याचा उच्चारही नव्हता. त्यांचें मागणें कांहीं विशिष्ट हक्कांसंबंधीं होतें: सामान्य तत्त्वांसंबंधीं नव्हतें. यावेळीं पूर्वापार चालत आलेल्या, व रणशूर पूर्वजांनीं मोठ्या श्रमानें आणि आपले देह खर्ची घालून संपादन केलेल्या राजकीय हक्कांचें नेदर्लंडचे लोक सावधगिरीनें रक्षण करावयास झटत होते. हे हक्क केवळ शाब्दिक किंवा तात्त्विक नव्हते. जुलमी सत्तेच्या लाटा एकसारख्या या देशावर येऊन आदळत होत्या. त्यांचा प्रतिकार करण्यास अनेक वर्षें श्रम करून लोकांनीं हे भक्कम धक्के उभारले होते. ग्रँन्व्हिल व त्याच्या शिक्षण-संप्रदायांतील लोक यांचे या धक्क्यांचा पाया खणून काढण्याविषयीं विचार व यत्न सतत चालले होते. अर्वाचीन कालांत समाजस्वातंत्र्या-संबंधाचे जे एकदेशीय विचार जुलमी राजे व समाजभक्त या उभयतांसही

भयप्रद वाटूं लागले आहेत, त्यांच्याशीं तुलना करितां या वेळचे नेदर्लंडच्या लोकांचे हक्क राजसत्तेच्या अनुवादकांस असह्य वाटावे, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. नेदर्लंडच्या लोकांच्या या वेळीं दोनच मागण्या होत्या. एक आपण कष्टानें मिळविलेल्या संपत्तीचा वांटा राजास आपल्या संमतीशिवाय मिळूं नयेः व दुसरी पुनर्जन्म नाहीं असें ह्मणण्याबद्दल आपणास देहांतप्रायश्चित्त मिळूं नये. ग्रॅन्व्हिलचें मत या दोन्ही बाबतींत अगदीं विरुद्ध होतें. "नीच आणि दगलबाज प्राणी, लोकसमाज," असे नेहमीं त्वेषानें त्याचे उद्गार निघत. तो काम करणारा फार जबर होता. त्याची मुत्सद्दिरी कितपत होती हें पुढील इतिहासावरून दिसून येईल. त्याची मिळकत आणि उत्पन्न फार मोठें होतें. परंतु त्याची आशा अनिवार होती.

नेदर्लंडचीं सरदार घराणीं अवाढव्य खर्चानें व दुर्व्यसनानें यावेळीं अगदीं खालावलीं होतीं. ऑरेंजप्रमाणेंच इतर सरदारांची राहणी फार डौली आणि खर्चाची होती. जुगार, मद्यपान व स्त्रीपुरुषांचे परस्परांशीं अशास्त्र व्यवहार हे अगदीं सर्वत्र झाले होते. ह्या वड्या सरदारांचें अनुकरण छोटे जमीनदार व श्रीमान् मध्यम प्रतीचे लोक हे हळू हळू करूं लागले होते. यामुळें साहजिकच हे लोक अगदीं कंगाल व कर्जबाजारी होऊन त्यांच्या मिळकती व्यापारी, उदयास आलेले वकील व पाद्री लोक, ह्यांच्या हातीं गेल्या. त्या त्यांचे हातून परत घेण्यास दुसरा मार्ग न राहिल्यामुळें त्यांनीं बंडाचा व्यूह रचला; व राष्ट्रांत दंगेधोपे सुरू केले असा पुष्कळ इतिहासकारांचा अभिप्राय आहे. युरोपांतील बहुतेक राष्ट्रांत झालेल्या धर्मक्रांतीस मठ व देवस्थानें यांच्या मिळकती दांडगाईनें झोंबडून घेण्याची सरदार लोकांची इच्छा ही अंशतः कारणीभूत झाली. हीच कल्पना नेदर्लंडांतही कांहीं लोकांचे डोक्यांत होती व तसे त्यांचे उद्गारही निघत होते; परंतु नेदर्लंडमधील राज्यक्रांतीस ही कल्पना मुख्य कारण झाली, असें बिलकुल ह्मणतां येत नाहीं. ही क्रांति लोकांनीं घडवून आणिली. या क्रांतीच्या आरंभीं सरदार लोक दर्शनीं दिसत होते; परंतु तिचा आरंभही त्यांच्यापासून झाला नाहीं व पुढें तिचीं सूत्रेंही त्यांच्या हातीं राहिलीं नाहींत. लोकस्थिति

फार भिन्न होती. नेदर्लंडांत लोकवस्ती दाट असून लोक फार उद्योगी, स्वातंत्र्यभाक्त व अस्सल व्यापारी असल्यामुळें त्यांच्या मनाची वाढ पुरातन सांप्रदायिक विचारांनीं खुंटली नव्हती. व्यापार हाच नेदर्लंडच्या राजकीय स्वातंत्र्याचा जनक होता. त्यापासूनच पुढें धर्मस्वातंत्र्याचीही उत्पत्ति झाली. नेदर्लंड देश यूरोपच्या मध्यभागीं वसला असून चोहोंबाजूंनीं जलमार्गानें वेष्टिलेला असल्यामुळें या देशाशीं सर्व जगाचें दळणवळण सारखें चालू होतें. व्यापाराच्या मालाबरोबरच कल्पनांचाही मोबदला साहजिक रीतीनें होत असे. दुसऱ्या कमी किमतीच्या मालाबरोबर नवीं धर्मतत्त्वें देशांत येऊं लागलीं. जुलमी सरकाराच्या सक्तीच्या उपायांनीं हा नवीन कल्पनांचा व्यापार बंद होणें शक्य नव्हतें. प्रत्येक मालाच्या गठ्याबरोबर छपून येणारे व वाऱ्याच्या झुळुकेबरोबर चोहोंकडे फैलावणारें धर्ममतांचें विष देशांत न शिरूं देण्यास योग्य "क्वारन्टाईनचा" उपाय धर्माग्रही लोकांस सुचेना. नेदर्लंड देशांत तर बहुतेक सर्व नवीन पंथांचे संस्थापक उदयास आले. धर्मस्वातंत्र्याच्या खटपटीस या देशांत लोकमताचा जोर विशेष होता. असें असून या राष्ट्रांत धर्ममतांकरितां लोकांचे देहयज्ञ बरेच दिवस चालले होते व पुढेंही कित्येक दिवस चालावयाचे होते. या धर्मच्छलापासून उत्पन्न झालेली राष्ट्राच्या मनाची आधि अगदीं विकोपास जाण्याचीं चिन्हें दिसत होतीं. ती बरेच दिवस परिपक्व होत चालली होती. ज्या सोळाव्या शतकांत अमेरिकेचा शोध लागला व मुद्रणकला प्रथम अस्तित्वांत आली, त्या शतकांत धर्मच्छल व जुलूम फार दिवस टिकणें संभवनीय नव्हतें. बादशहाचे हुकूम लोकांनीं सहन केले होते; परंतु ते त्यांस मान्य नव्हते. या प्रखर हुकुमांस हजारों बळी पडले होते. त्यांच्या रक्तानें भिजलेल्या नेदर्लंड देशांत राजकीय व धार्मिक स्वातंत्र्याचीं रोपें अधिकच जोरानें वाढून त्यांची सावली चिरकाल लोकांस मिळावयाची होती. कुऱ्हाड, फांस व अग्निकुंडें हीं लोकांस प्रत्यहीं मूर्तिमंत दिसत होतीं; परंतु त्याबरोबरच लोक एकमेकांच्या हातांत हात घालून कुंडांत मोठ्या धैर्यानें शिरतांना व स्त्रियांना सजीव पुरण्याकरितां त्यांच्या तोंडावर खोऱ्यानें मांस माती. ओढीत

असतां, त्या निर्भयपणें ईश्वरस्तवन करीत असतांना लोकांच्या नजरेस नित्यशः येत. या धर्मच्छलाचा परिणाम, त्याचा प्रतिकार करण्यास लोकांत दृढनिश्चय व अलौकिक धैर्य उत्पन्न करण्यापलीकडे कांहीं झाला नाहीं. नेदर्लंडच्या पूर्व, पश्चिम, या दोन्ही बाजूंकडील देशांत नवीन धर्मतत्त्वांचा पगडा पूर्णपणें बसला होता. जर्मनींतील ल्यूथर पंथ व फ्रान्समधील कॅल्व्हिन पंथ या उभयतांचाही नेदर्लंडच्या क्रांतीवर अंशतः परिणाम झाला. प्रथम हीं नवीन तत्त्वें नेदर्लंड देशांत नैर्ऋत्येकडून फ्रान्सच्या बाजूनें शिरलीं. डच् लोकसत्ताक राज्याचा संस्थापकही शेवटीं कॅल्व्हिन पंथाचाच अनुवादक झाला. पुढें जर्मनींतील ल्यूथर पंथाचाही नेदर्लंडच्या धर्मक्रांतीवर बराच परिणाम झाला. ऑक्सबर्ग येथील धर्मविषयक तह ( यांत कोणत्याही धर्माचा छल करणें निषिद्ध ठरविलें होतें. ) नुकताच अमलांत आल्यामुळें नवीन धर्मप्रसाराचें काम यावेळीं जर्मनींत अगदीं बंद पडलें होतें. फ्रान्समध्यें तशीच स्थिति झाली होती. यामुळें हा वाद नेदर्लंड देशामध्येंच या शतकाच्या अखेरपर्यंत चालावयाचा होता; व त्याचा परिणाम काय होतो हें पाहण्याकडे सर्व ख्रिस्ती राष्ट्रांचे डोळे लागले होते.

लोकस्थिति अशी असतां सरकारची राज्यव्यवस्था आगींत तेल ओतण्यासारखी होती. फिलिप राज्यपदारूढ होतांच त्यानें इ. स. १५५० सालचा जाहिरनामा पुन्हां प्रसिद्ध केला. त्याचा सारांश असा होता कीं, ' कोणीही इसमानें ल्यूथर, कॅल्व्हिन, झ्विंग्ली वगैरे धर्मबाह्य लोकांनीं लिहिलेलें पुस्तक अगर लेख यांच्या हस्तलिखित अगर छापील प्रती करूं नयेत व त्या आपणांपाशीं ठेवूं नयेत; त्या कोणास विकत अगर फुकट देऊं नयेत किंवा घेऊं नयेत. पवित्र कुमारी मेरी अगर कॅथोलिक पंथाचे साधू यांच्या मूर्तींचा भंग अगर उपमर्द करूं नये; खाजगी जागेंत प्रार्थनेकरितां किंवा नवीन धर्माचीं मतें शिकविण्याकरितां मंडळी जमवूं नये. सामान्य लोकांनीं धर्मविषयासंबंधीं भाषण अगर वाद करूं नये. धर्मशास्त्रांचा एखाद्या सुप्रसिद्ध धर्मपीठांत अभ्यास केल्याशिवाय धर्मपुस्तकें वाचूं नयेत, दुसऱ्यास शिकवूं नयेत किंवा त्यांचा अर्थ सांगूं नये. वर लिहिलेल्या पाखंडी उपदेशकांचीं मतें कोणींही स्वीकारूं नयेत अगर त्यांचा

उपदेश दुसऱ्यास करूं नये. या नियमाविरुद्ध वर्तन करणाऱ्या पुरुषांस तरवारीनें तोडून टाकावें व करून पश्चात्ताप पावलेल्या स्त्रियांस जिवंत पुरावें; अनुतापशून्य स्त्रीपुरुषांस जिवंत जाळून टाकावें. व अशा या सर्व गुन्हेगारांची मिळकत सरकारांत जप्त करावी. पाखंडमती लोकांस कोणीही थारा देऊं नये; पाखंडी लोकांचा पत्ता माहीत असणारांनीं तो न कळविल्यास ते साथीदार समजले जातील; पाखंडी लोकांसंबंधीं माहिती कळविणारास त्यांच्या जप्त केलेल्या मिळकतींचा निंमा वांटा मिळेल; अशा लोकांची चौकशी करून त्यांस योग्य शिक्षा करण्याचे कामीं धर्माध्यक्षांनीं फौजदारी व दिवाणी कोर्टाची जरूर ती मदत घ्यावी. या जाहिरनाम्याच्या अंमलबजावणीच्या कामीं कोणत्याही अंमलदारानें कोणास कांहीं सवलत दिल्यास किंवा क्षमा केल्यास तो पुढें कोणत्याही सरकारी हुद्याच्या कामास नालायख समजला जाईल.' हा निरंतरचा कायदा ह्मणून बादशहानें केला होता, व दर सहा महिन्यांनीं नेदर्लंडमधील प्रत्येक गांवांत तो प्रसिद्ध करावा अशी त्यांत शर्त होती. आरासच्या बिशपच्या सल्लयानें हा जाहिरनामा राजानें प्रसिद्ध केला. ही राजा व त्याचा मुख्य प्रधान यांची नेदर्लंड देशास पहिली देणगी होती. शिवाय सरकारी धर्मखात्यावर चार कॅथोलिक-धर्माध्यक्ष होते; त्यांची संख्या वाढविण्याचा राजानें विचार केला. पूर्वीच्या धर्माध्यक्षांची संपत्ति फार वाढल्यामुळें ते अगदीं बेगुमान होते; व त्यांस स्पॅनिश संस्थांचा विशेष अभिमानही नव्हता. त्यांची संख्या वाढविली असतां पूर्वीच्या धर्माध्यक्षांची संपत्ति वांटून जाईल, व नवीन लोकांची त्या मंडळींत भर पडल्यामुळें आपल्या तंत्रानें ते वागतील असें राजास वाटूं लागलें. धर्माध्यक्षांची संख्या वाढविण्यास पोपची परवानगी इ. स. १५५९ च्या मे महिन्यांत येऊन पोहोंचली. धर्मगुरू पोप यांणीं आपल्या खलित्यांत असें लिहिलें होतें कीं, "नेदर्लंड देशांतील लोकसंख्या पूर्वीपेक्षां फार वाढली आहे, व लोकांत पाखंडमताचा प्रसार फार जोरानें होत आहे; करितां नवे धर्माध्यक्ष नेमण्याची राजास आह्मीं परवानगी दिली आहे. हे धर्माध्यक्ष आमच्या पसंतीनें राजानें नेमावेत; प्रत्येक धर्माध्यक्षानें आपल्या हाताखालीं धर्मसंशोधनार्थ आपल्या

अधिकाराच्या स्थलसीमेंत मदतीकरितां नऊ उमेदवार नेमावेत, व त्यांपैकीं दोघांस धर्मशासन करण्याचा अधिकार असावा. ही परवानगी येतांच तीन सरधर्माध्यक्ष अनुक्रमें मेलिन, कँब्रे आणि यूट्रेक्ट येथें नेमण्यांत आले, व या तीन सरधर्माध्यक्षांच्या अधिकाराखालीं अनुक्रमें सहा, चार व चार अशीं धर्माध्यक्षांचीं पीठें स्थापन करण्यांत आलीं.

या दोन नवीन व्यवस्था अमलांत आणण्यास नेदर्लंड देशांत हा वेळपावेतों अवशिष्ट राहिलेलें स्पॅनिश सैन्य कायम ठेवण्याचा फिलिपनें विचार केला. हें सैन्य अवघें चार हजार लोकांचें होतें; परंतु हे लोक फार अघोरकर्मी व अस्सल लढवय्ये होते. कडक लष्करी व धर्मच्छलात्मक अंमल देशांत पुढें मार्गे स्थापन करण्यास हें लहानसें पाचर फारच अमूल्य होतें. शिवाय अगदीं शांततेच्या वेळीं नेदर्लंड देशांत निवळ पगारी स्पॅनिश सैन्य ठेवल्यापासून लोकांच्या मनावर धाक राहील असा अंदाज होता; त्यामुळें युक्तिप्रयुक्तीनें हें सैन्य कायम राखण्याविषयीं फिलिपनें आपल्या मनांत निश्चय केला.

---

# भाग ३ रा.

## इ. स. १५६०—१५६४.

सर्व वर्गांत असंतोष—नव्या व्यवस्थेविरुद्ध खटपट—ग्रॅन्व्हिलचें वर्तन—सरदार लोकांच्या तक्रारी—खजिन्याची स्थिति—धर्मसंशोधन—धर्मच्छल—सरदार व सामान्य लोकांत चळवळ—कार्डिनलची थट्टा—जमातीची सभा—माँटिनीची शिष्टाई—मार्चांतील यादी—पुढील पत्रव्यवहार—खाकीचा पोषाक—ग्रॅन्व्हिलचें प्रयाण—राज्यव्यवस्थेंत बेबंदशाही—टिटल्मनचे पराक्रम—राजाचा दुराग्रह—एग्मॉनचें दौत्य.

धर्मसंबंधीं जाहिरनामा, नवीन धर्माध्यक्षांच्या नेमणुका व विदेशीय सैन्याची कायमची स्थापना यांत राजानें स्वीकारलेल्या स्वैर व जुलमी राजनीतीविरुद्ध नेदर्लंडच्या लोकांनीं आपल्या जुन्या राजकीय हक्कांच्या

सनदा पुढें आणिल्या. इ. स. १५४९ सालीं युवराज या नात्यानें व इ. स. १५५५ सालीं राजा या नात्यानें या सनदांवर आपल्या सह्या करून व त्या शब्दशः पाळण्याविषयीं शपथा वाहून फिलिपनें त्यांस विशेष पुष्टिकरण आणिलें होतें.

ब्राबंट प्रांताच्या "सानंद प्रवेश" नामक सनदेंत कलमें होतीं तीं— 'राजानें सरदार व सामान्य लोक यांच्या अनुमतीवांचून धर्माधिकाऱ्यांस कोणतेही नवे अधिकार देऊं नयेत, राजास नेदर्लंड देशांतील रहिवाशांपैकीं कोणत्याही इसमावर दिवाणी अगर फौजदारी खटला करणें झाल्यास तो कायद्याप्रमाणें योग्य कोर्टांत केला पाहिजे. ब्राबंट प्रांतांत कोणत्याही सरकारी कामावर परदेशस्थ मनुष्य नेमूं नये. यांपैकीं कोणताही नियम राजानें मोडल्यास प्रजेचा राजाशीं कोणत्याही प्रकारचा सेव्यसेवकसंबंध राहणार नाहीं.' याचप्रमाणें हॉलंड व इतर प्रांतांच्या पुरातन सनदा होत्या. अशा या सनदांचा फायदा आपल्या मुलांस मिळावा म्हणून गर्भिणी स्त्रिया ब्राबंट प्रांतांत बाळंतपणाकरितां जाऊन रहात. सारांश, कागद व शाई यांच्या योगानें तरवार आणि अग्नि यांपासून एखाद्या राष्ट्राचें संरक्षण होणें शक्य असल्यास नेदर्लंडदेश या वेळीं अत्यंत सुरक्षित स्थितींत होता असें म्हणण्यास हरकत नाहीं; परंतु इतिहासाचा शोचनीय अनुभव असा आहे कीं, कागद अगर ताम्रपट, राजांच्या शपथांनीं पवित्र झाला असला तरी, राजा अगर धर्मशासक यांच्या जुलुमाच्या ओघापुढें त्याचा टिकाव लागत नाहीं. नवीन धर्माध्यक्षांच्या नेमणुका झाल्यावर या तत्त्वांची प्रतीति लोकांस येऊन जिकडे तिकडे एकच खळबळ माजून राहिली. भरकोर्टांत कायद्याप्रमाणें न्याय मिळण्याचा मानवी प्राण्याचा सर्वांत महत्वाचा हक्क आहे. तो न्याय देण्याचा अधिकार आतां या देशांत विदेशीय व बिनजबाबदार धर्माध्यक्षांच्या हातीं गेला. त्यामुळें लोकांचें जीवित व वित्त अगदीं अशाश्वत स्थितीस जाऊन पोहोंचलें.

या नवीन व्यवस्थेमुळें सर्व वर्गांच्या लोकांत असंतोष उत्पन्न झाला. या व्यवस्थेमुळें प्रांतिक सभेंत अक्षरशून्य, आळशी व सुखाभिलाषी जुन्या धर्माध्यक्षांच्या ऐवजीं नवे धर्माधिकारी व विशेषतः विदेशीय धर्माधि-

कारी आल्यामुळें त्यांच्या पक्षाचें सभेंत विशेष प्राबल्य वाढून आपलें महत्व कमी होईल अशी सरदार लोकांस भीति वाटूं लागली. पूर्वींच्या धर्मोपदेशकांनीं निवडलेल्या अधिकाऱ्यांच्या हातांत जुने मठ होते ते आतां या नवीन नेमलेल्या धर्माध्यक्षांच्या ताब्यांत गेल्यामुळें त्यांजवर देखरेख करण्याचा त्यांचा हक्क सर्वस्वीं नाहींसा झाला; त्यामुळें त्यांच्यांत असंतोष उत्पन्न झाला. सामान्य लोकांस जरी जुन्या मठांसंबंधीं विशेष पूज्यबुद्धि किंवा आस्था नव्हती; तथापि त्या ठिकाणीं पुष्कळ अन्नशांति वगैरे धर्म होत असे, व निदान या मठाधिपतींची महत्वाकांक्षा लोकांवर जुलुमी अंमल गाजविण्याची नव्हती. पण या नवीन व्यवस्थेवरून धर्मच्छलार्थ एक नवी फौज सरकार तयार करीत आहे, अशी त्यांसही भीति उत्पन्न झाली. या दुष्कृत्यांचें सर्व पाप आरासच्या बिशपच्या माथीं लोक लादूं लागले. असे अनर्थ टाळण्याकरितांच आपल्या राज्यकारभारांत विदेशीय लोकांचा शिरकाव न होऊं देण्याविषयीं डच्लोकांचा विशेष कटाक्ष होता. या वेळेपासून त्यांस हा धर्माध्यक्ष दिवसेंदिवस आपला पक्का शत्रू भासूं लागला. वास्तविक नवीन धर्माध्यक्ष नेमण्याच्या कामीं अगर विदेशीय सैन्य देशांत ठेवण्याच्या कामीं राजास मूळ त्याचा सल्ला मुळींच नव्हता. उलट धर्माध्यक्षांच्या जागा वाढल्यामुळें त्या जागांचें उत्पन्न जास्त लोकांत वांटून जाऊन आपल्या प्राप्तीचें बरेंच नुकसान होईल, असें राजास त्यानें वारंवार कळविलें होतें. मात्र बादशहाच्या वेळचा जाहिरनामा प्रसिद्ध करण्याचें सर्व श्रेय त्यासच आहे. परंतु या नवीन नेमणुकांत मेलिनच्या सर-धर्माध्यक्षाची जागा, व जप्त केलेल्या मठांच्या उत्पन्नांपैकीं बराच भाग त्यास मिळाला; शिवाय नवी धर्मव्यवस्था अमलांत आणण्याच्या बाबतींत त्याचें मत राजाच्या बाजूला पडलें. या सर्व कारणांमुळें धर्माध्यक्ष वाढविण्याची कल्पना त्याचीच असली पाहिजे असा लोकांचा ग्रह दृढ झाला.

या नवीन नेमणुकांच्या विरुद्ध खटपट करण्याच्या कामीं राजपुत्र ऑरेंज हा प्रमुख होता. तो यावेळीं स्वतः कॅथोलिकधर्मी होता. तथापि स्पॅनिश धर्मसंशोधनपद्धति नेदर्लंडांत सुरू करून लोकांचा धर्ममतांबद्दल छळ करण्याच्या इरायानें ही धर्मखात्यांतील ढवळाढवळ

चालली होती, हें जाणून त्यांस या गोष्टीनें मोठा त्वेष उत्पन्न झाला; व या विषयासंबंधीं सुभेदारीण, ग्रॅन्व्हिल व राजा या सर्वांस पत्रें पाठवून त्यानें त्यांची कानउघाडणी केली. या त्याच्या प्रयत्नास एग्मॉन, बर्जेन इत्यादि वजनदार सरदारांचें पाठबळ होतें. बर्लेमॉन यास पार्मानें या नवीन व्यवस्थेंत त्याच्या कांहीं आप्तांस जागा देण्याची आशा दाखवून सरकार-पक्षाकडे ओढून घेतलें. या नवीन व्यवस्थेबद्दल सर्व दोष लोक मुख्य वजीरासच देत होते. आरासच्या बिशपनें लोकांच्या मनाची ही स्थिति पाहून व लोकांची नजर शब्दांवर विशेष असते असा विचार करून जाहिरनाम्याच्या भाषेंत थोडे फेरफार केले व धर्मशासक हे शब्द लोकांच्या नजरेआड करण्याचा यत्न केला. परंतु अशा शाब्दिक कोट्यांनीं धर्म-च्छल लोकांस मान्य होणें शक्य नव्हतें. यासंबंधानें भावी भयंकर वादळाचीं चिन्हें यावेळींच दिसूं लागलीं. प्रथम लोकांनीं आपलें लक्ष त्यांच्यावर जुलूम करण्याकरितां कल्पिलेल्या घातक यंत्राच्या मुख्य भागाकडे वळविलें. नवीन प्रसिद्ध केलेला जाहिरनामा व नवीन धर्माध्यक्षांच्या नेमणुका यांचा अंमल बसविण्याच्या कामीं स्पॅनिश सैन्य हें मुख्य साधन होतें; या सैन्याच्या पशुतुल्य आचरणाचा लोकांस अगदीं वीट आला होता. राजानें येथवर वेळोंवेळीं निरनिराळ्या सबबीं-वर हें सैन्य स्वदेशीं परत बोलावण्याची टाळाटाळ चालविली होती. या सैन्याचा तळ यावेळीं वॉल्चरन आणि झिल येथें होता. झीलंड प्रांतां-तील लोक त्यांच्या सहवासास इतके कंटाळले होते कीं, समुद्राचें पाणी जमिनीवर येऊन मनुष्यें व पिकें वाहून न जावीं ह्मणून पूर्वी तयार केलेले धक्के फुटले होते; ते या सैन्याची पाठ फिरल्याशिवाय दुरुस्त करण्याकरितां कोणीही जाऊं नये, असा सर्वांनीं निश्चय केला. आपलीं पिकें वाहून जाऊन उपासमारानें किंवा स्वतःच लाटांत वाहून जाऊन मृत्यु आला तरी बेहेत्तर; परंतु आपले पुरातन हक्क नष्ट करण्याकरितां देशांत ठेविलेलें परदेशी सैन्य देशांतून गेल्याशिवाय पाणी सुद्धां न पिण्याचा या लोकांचा दीर्घ संकेत होता. या गोष्टीचा विचार करण्याकरितां मंत्रीमंडळाची सभा पार्मानें ताबडतोब भरविली. या सैन्याची वाट लवकरच न लागल्यास खर्चाकरितां प्रांतिक

सभांकडून एक पैसा सुद्धां राजास मिळणार नाहीं असा या सभेंत सर्वांचा अभिप्राय पडला. तेंच सैन्य परत पाठविण्याचें ठरलें तर त्याच्या पगाराची बाकी सुद्धां राजाकडे एकदम मंजूर होऊन येण्याचा संभव होता. या प्रश्नांचा चोहोंबाजूंनीं विचार होऊन मंत्रीमंडळांत बहुमतानें असें ठरलें कीं, स्पेनमधून हुकूम येण्याची वाट न पाहतां सैन्याची एकदम रवानगी करावी. इतक्यांत आफ्रिकेंत या सैन्यास एक कामगिरीही येऊन पोहोंचली; त्यामुळें कांहीं काळपर्यंत या सैन्यापासून आपोआपच नेदर्लंड देशाची मुक्तता झाली.

पण एवढ्यानेंच लोकांचें समाधान होईना. फिलिप हा स्पेनमध्यें बसून नव्या धर्मशासनाची बजावणी करण्याकरितां नेदर्लंडसमधील सर्व नवीन पंथी लोकांची माहिती नवीन धर्माध्यक्षांकडून गुप्त रीतीनें मिळवीत होता; व त्यांना कोणत्या उपायांनीं नाहींसे करावे याविषयीं अहोरात्र व्यक्तिशः हुकूम पाठवीत होता. हे हुकूम बजावण्याचें काम ग्रॅन्व्हिल याच्या सल्ल्यानें राणी पार्मा करीत होती. ही अमानुष राजव्यवस्था या दुर्दैवी राष्ट्रांत अमलांत आणल्यापासून ग्रॅन्व्हिलची अप्रियता दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत चालली. तथापि तो राजास वरचेवर असें लिहून पाठवीत असे कीं, आपल्या हातांखालील अधिकारी सरकारचे हुकूम बजावण्याच्या कामीं योग्य सक्ती दाखवीत नाहींत. याच सुमारास पार्मानें पोपकडे रदबदली करून मेलिनचा सर-धर्माध्यक्ष अँटनी पेरेनो यास कार्डिनल ग्रॅन्व्हिल ही पदवी संपादन करून दिली. या पदाचीं वस्त्रें पार्माचें नांव सुद्धां न घेतां केवळ राजाचा अनुग्रह घेऊन ग्रॅन्व्हिलनें धारण केली. ही नवी पदवी प्राप्त होतांच कार्डिनल ग्रॅन्व्हिल यानें मंत्रीमंडळाचे सर्व अधिकार एकट्यानेंच आटोपिले. राजाचा सर्व व्यवहार त्याच्या मार्फत गुप्त रीतीनें चालू लागल्यामुळें इतर मंत्रीलोकांस तो कसपटाप्रमाणें मोजूं लागला. बाह्यतः बोलणें चालणें गोड ठेवून, मन समतोल व वृत्ति शांत राखून तो कृतीनें त्यांच्याशीं फार बेगुमानपणानें व उद्धटपणानें वागूं लागला. वागणुकींत अतिशय नम्रपणा दाखवून सत्ताधीशांसही वेसण घालून ओढण्याची विद्या त्यास साधली असल्यामुळें सरदार लोकांशीं मर्यादेचें वर्तन ठेवण्याची त्यास जरूर भासेना; इतकेंच नव्हे परंतु क्वचित् प्रसंगीं

त्यांच्यावर हुकूम चालविण्याचाही तो यत्न करूं लागला. एग्मॉन आणि ऑरेंजसारख्या जहागिरदारांना, निकोलस पेरेनोसारख्या सामान्य मनुष्याच्या मुलाचें आपणांशीं असें हें उद्धट वर्तन पाहून, त्वेष चढणें अगदीं साहजिक होतें. एग्मॉनच्या उतावळ्या स्वभावास ही गोष्ट अगदीं असह्य झाली. शिवाय एक दोन महत्वाच्या जागा एग्मॉननें आपल्या आप्तांस मिळण्याविषयीं खटपट चालविली असतां ग्रॅन्व्हिलनें त्या भलत्याच इसमांस देवविल्या. एके प्रसंगीं मंत्रीमंडळाच्या सभेंत या उभयतांची फार बोलाचाली होऊन एग्मॉन अगदीं हातघाईवर आला, व त्यानें ग्रॅन्व्हिलवर आपली तरवारही उगारिली. ग्रॅन्व्हिल फार खोल व पाताळयंत्री असल्यामुळें त्यास उथळ मनाच्या व उल्लू स्वभावाच्या एग्मॉनची कींव येत असे. इकडे मंत्रीमंडळांत आपला बोज नाहीं असें राजास भासेल या भीतीनें तो या मंडळीचें काम एकविचारानें चाललें आहे, असें राजास वरचेवर कळवीत असे. ऑरेंजच्या संबंधांत त्याचा पूर्ववयांतील स्नेहभाव नाहींसा होऊन, उभयतांच्या दरम्यान वैर उत्पन्न होण्यास बराच अवधि लागला.

राजपुत्र ऑरेंज कार्डिनलच्या तोडीचा होता; आपल्यासारखाच तीक्ष्ण बुद्धीचा, व्यवहारचतुर, अनुभवी, युक्तिबाज, शांत स्वभावाचा व प्रसंगीं उद्दामवृत्तीचा असा हा सामनेवाला आहे, असें ग्रॅन्व्हिलला कळून चुकलें होतें. ऑरेंजच्या बुद्धीची त्यानें केव्हांही अवहेलना केली नाहीं. त्यानें राजास असें लिहिलें कीं, हा मनुष्य फार विशाल बुद्धीचा, महत्वाकांक्षी, पाताळयंत्री, सूक्ष्म दृष्टीचा व पोक्त विचाराचा आहे. प्रथम या उभयतांमध्यें मित्रत्वाचें नातें होतें. ऑरेंज हा मोठा श्रीमान् व बुद्धिशाली गृहस्थ असून चार्लस बादशहाच्या प्रीतिपात्रांपैकीं असल्यामुळें फिलिपच्या अमदानींत तो फार नामांकित पुरुष होईल असा अंदाज होता. त्यामुळें पेरेनो यानें अव्वलपासून त्याची प्रीति संपादण्याची खटपट चालविली होती. ऑरेंजच्या चुलत्याची जहागीर मृत्युपत्रावरून त्यास मिळवून देण्याच्या कामीं त्यानें थोडी मदत केली होती; ती स्मरून ग्रॅन्व्हिलचा भाऊ जीरोम यास आपला वहिवाटदार नेमून, पुढें वुइल्यमनें लष्करी खात्यांत त्यास

हुयाची नोकरी मिळवून दिली. बुइल्यमचें पहिलें लग्न ठरवून देण्याच्या कामींही ग्रॅनव्हिलनें थोडीबहुत खटपट केली होती. बुइल्यमही त्याच्या आप्तसोयऱ्यांस आश्रय देऊन या गोष्टीबद्दल त्याचा उतराई झाला. या व अशाच कांहीं कारणांमुळें या उभयतांमध्यें बराच दाट स्नेह वाढला होता. अलीकडे या उभयतांच्या मनांत एकमेकांविषयीं किंतू उत्पन्न झाल्यामुळें या स्नेहाचें केवळ बाह्यस्वरूप तेवढें राहिलें होतें. दोघेही आपल्या मनांतील विकार एकाएकीं दुसऱ्यास न समजूं देण्याविषयीं खटपट करीत होते; परंतु दोघांचें उघड वाग्युद्ध होण्याचाही प्रसंग लवकरच येऊन पोहोंचला. ऑरेंज यानें आपल्या अधिकाराखालील मुलुखांत धर्माच्या बाबतींत एक सौम्य माफीचा जाहिरनामा प्रसिद्ध करण्याचें योजिलें. ही गोष्ट ग्रॅन्व्हिलला पसंत पडली नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं अँट्वर्प येथील मॅजिस्ट्रेटांच्या नव्यानें नेमणुका करण्याचा प्रसंग आला. हे अधिकारी नेमण्याचा हक्क ग्रामाध्यक्ष या नात्यानें ऑरेंजच्या घराण्यांत बरेच दिवस चालत आला होता. अँट्वर्प येथें नवीन धर्माध्यक्षाची स्थापना करण्याच्या कामीं बुइल्यमनें विरोध दर्शविल्यामुळें, नवे मॅजिस्ट्रेट नेमण्याचें काम जरा जोखमीचें झालें होतें. सरदारांचें मन लोकमतास अनुकूल होतें. हें नवीन मॅजिस्ट्रेट नेमण्याचें काम ऑरेंज यास न कळवितां व त्याच्या इच्छेविरुद्ध गुप्तपणें राणी पार्मानें उरकून घेतलें. नेमणुका कायम केल्या. नंतर त्या अमलांत आणण्याचें काम ऑरेंजकडे पाठविण्यांत आलें. हा हुकूम घेऊन येणाराबरोबर ऑरेंजनें रीजंटला असा निरोप पाठविला कीं "मी आपला हुजऱ्या नाहीं; आपण आपले निरोप आपल्या नोकर लोकांस दुसऱ्या कोणाकडून कळवावेत." हे शब्द त्यानें मंत्रीमंडळांतही बोलून दाखविल्यावरून, तेथें त्याच्या व ग्रॅन्व्हिलच्या दरम्यान बराच कडाक्याचा वाद जुंपला. ऑरेंजचें ह्मणणें आपल्या पूर्वजांना प्राचीन कालापासून अँट्वर्पचे एकंदर मॅजिस्ट्रेट नवे जुने करण्याचा स्वतंत्र अधिकार असतां तो आपल्या अपरोक्ष रद्द करणें व अशाच दुसऱ्या महत्वाच्या गोष्टींचा निकाल कार्डिनलनें अधिष्ठित गुप्तमंडळीमध्यें करणें अयोग्य काम होतें. ग्रॅनव्हिललाही रागाचें बरेंच भरतें आलें. "असल्या

लब्धप्रतिष्ठित सरदारांचें आपल्यास बिलकुल प्रयोजन नाहीं, आणि आपण करतों त्या गोष्टींत ढवळाढवळ करण्याचा कोणांसही अधिकार नाहीं, " असें त्यानें भर सभेंत बोलून दाखविलें.

हा प्रकार घडल्यानंतर कांहीं आठवड्यांनीं एग्मॉन व ऑरेंज यांनीं राजास एक खाजगी पत्र पाठवून असें कळविलें कीं, " सर्व महत्वाचें राजकारण ग्रॅन्व्हिल आमच्या सल्ल्यावांचून करीत असतो; व केवळ बारीक सारीक राज्यकारभाराच्या गोष्टी मंत्रीमंडळा-पुढें विचाराकरितां येतात. आपली आह्मांस आज्ञा असल्यामुळें ही गोष्ट हुजूरच्या नजरेस आणिली आहे. अशा प्रकारची राज्यकारभाराबद्दल-ची खोटी जबाबदारी आपणावर घेण्यापेक्षां कामाचा राजीनामा देणें हें आह्मांस उचित वाटत आहे. " बराच काळ लोटल्यावर राजानें या उभयतांस उत्तर पाठवुन असें कळविलें कीं " सरदार हॉर्न हा स्पेन-मधून स्वदेशीं जाण्याकरितां लवकरच निघणार आहे; त्याजबरोबर पत्रांतील विषयांसंबंधीं विशेष खुलासा कळविण्यांत येईल. " सरदार हॉर्न व ग्रॅन्व्हिल या उभयतांचें पहिल्यापासूनच वैमनस्य असल्यामुळें ग्रॅन्व्हिलनें हॉर्न हा नवीन धर्मव्यवस्थेस विरुद्ध आहे, असें भासवून राजाचें मत त्याच्याविषयीं कलुषित करून ठेविलें होतें. सरदार हॉर्न राजा-चा निरोप घेण्यास गेला, त्या वेळीं सरकारची तबियत विशेषच गरम झालेली दिसली. त्यानें राजापाशीं नेदर्लंडच्या सरदार लोकांशीं आपली सहानुभूति, व ग्रॅन्व्हिलविषयीं तिरस्कारबुद्धि दर्शवितांच राजानें त्याज-वर अपशब्दांचा वर्षाव केला. व शेवटीं त्यास असें विचारलें कीं, " तुह्मी सर्व लोक कार्डिनलविरुद्ध तक्रारी करितां, परंतु त्यानें अपराध काय केला हें तुह्मांपैकीं एकासही सांगतां येत नाहीं. " कार्डिनलविरुद्ध केलेल्या तक्रारीस राजाचा हा पहिला जबाब होता. या वेळेपासून ग्रॅन्-व्हिल आणि एग्मॉन, हॉर्न व ऑरेंज यांच्या दरम्यानच्या दीर्घ वैरास सुरवात झाली. ग्रॅन्व्हिल राजास वेळोवेळीं असें कळवीत होता कीं, नवीन धर्मव्यवस्था अमलांत आणण्याच्या विरुद्ध या लोकांची खटपट चालली आहे; मंत्रीमंडळाच्या संमतीवांचून हुजुरांनीं ही गोष्ट केली याबद्दल त्यांस वाईट वाटत आहे; व या नवीन धर्मव्यवस्थेमुळें त्यांच्या

तंत्रानें वागणाऱ्या धर्मोपदेशकांच्या जागीं नवीन धर्माध्यक्ष येऊन आपलें महत्व कमी होईल असें या लोकांस वाटत आहे; शिवाय ऑरेंज व ब्रेघेन यांजकडून ही नवीन धर्मव्यवस्था ब्राबंटच्या राजकीय हक्कांस बाधक आहे, अशी तक्रार येण्याचा संभव आहे; करितां त्याचा शास्त्रार्थ आपण पूर्वीच नामांकित विद्यापीठांतून करून ठेविला आहे, असें त्यास उत्तर देण्यांत यावें. राजानें मोठ्या उत्सुकतेनें या सूचनेचा स्वीकार केला. परंतु अशा शाब्दिक कृत्यांस कंटाळून शेवटीं त्यानें ग्रॅन्-व्हिलला असें लिहिलें कीं, "या लोकांस आतां शब्दानें ठकविण्याचा काल राहिला नाहीं. केवळ बडगा व फांस यांचा उपयोग केल्याशिवाय त्यांस आपलें कर्तव्य समजणार नाहीं."

या वेळीं राजाच्या खजिन्याची स्थिति ही नवीन व्यवस्था अमलांत आणण्यास विशेष अनुकूल नव्हती. इ. स. १५६०।६१ च्या जमाखर्चाचें एक कच्चें टिपण राजानें आपल्या हातानें केलेलें अद्याप अस्तित्वांत आहे. त्यावरून राजास या सालीं देणें एक कोटी नऊ लक्ष नव्वद हजार "ड्यूकट" (ड्यूकट = ७॥ रु.) होतें, असें दिसून येतें. व त्याचें निर-निराळ्या बाबींबद्दल येणें अवघें तेरा लक्ष तीस हजार असावें असें दिसतें. सर्व अमेरिका व निम्मे यूरोप एवढ्या विस्तीर्ण प्रदेशावर राज्य करणारा-ची यावेळीं ही अशी सांपत्तिक स्थिति होती. राजा व त्याचीं मुलें यांच्या कारकीर्दीत जें युद्ध सतत चालावयाचें होतें, ज्या युद्धाचा खर्च दरमहा पांच लक्ष "फ्लोरिन" प्रमाणें झाला, व ज्या खर्चांपैकीं शेंकडा सत्तर रुपये पगार वांटणाराच्या खिशांत गेले व ज्या युद्धाच्या व्यवस्थेंत पगार घेणाऱ्या लोकांपैकीं सुमारें चतुर्थांश लोक सुद्धां रणांगणांत हजर झाले नाहींत, अशा भारतीयुद्धाच्या प्रारंभीं राजाची ही सांपत्तिक स्थिति फार शोचनीय होती. ग्रॅनव्हिलनें नेदर्लंड देशांतील जमाबंदीची स्थिति राजास कळविली. त्या लेखांतील मजकूर याच आशयाचा आहे. "कित्येक प्रसंगीं आह्मांस दहा ड्यूकट कोठून पैदा करावेत अशी पंचाईत पडते, व नेदर्लंडमधील लोकसभा सरकारी कामास पैसा मंजूर करण्याच्या कामीं फार चिकटपणा दाखवितात; व मंजुरी देतेवेळीं निरनिराळ्या प्रकारच्या उद्धट शर्ती आह्मांस कबूल करावयास लावतात."

असें दैन्य ग्रॅनूव्हिलच्या पत्रांत आढळून येतें. वरील अडचणीमुळें राजानें या वेळीं रुप्यांत कथलाची भेसळ करून खोटीं नाणीं प्रचारांत आणण्याचा उपक्रम केला.

धर्ममतसंशोधकसभा हें नेदर्लंडमधील बंडाचें मुख्य कारण झालें. वर वर्णन केलेल्या व्यवस्था केवळ धर्मच्छलाचीं उपांगें होतीं. धर्मसंशोधक न्यायसभेचे यावेळीं तीन प्रकार कल्पिले होते. पहिली, स्पेनदेशांत रूढ असलेली धर्मच्छलाची पद्धति; दुसरी, धर्मगुरु पोप यानें निर्माण केलेली नवीन धर्मपंथी लोकांस प्रायश्चित्त देण्याची रीत; व तिसरी, खुद्द नेदर्लंड देशांतील धर्माध्यक्षांनीं आपल्या अधिकारांत सुधारक धर्मीयांस शासन करण्याकरितां तयार केलेली न्यायपद्धति. या पद्धतींचें मुख्य तत्त्व ह्मणजे मनुष्यमात्राच्या धर्ममतांची चौकशी करून त्यांत जुन्या धर्मतत्त्वांपेक्षां कांहीं फरक दिसल्यास त्यांस सजीव जाळणें, हें तिन्ही पद्धतींत सामान्यच होतें.

स्पेनमधील चिकित्सापद्धति मूळ विधर्मी लोकांचा उच्छेद करण्याकरितां कल्पिली होती; परंतु कालांतरानें ख्रिस्तीधर्मापैकीं नवीन पंथी लोकांवर तिचा प्रयोग होऊं लागला. या अपूर्व न्यायपीठांचे अधिकारी गोसावी असत, व त्यांच्या निकालावर कोठेंही अपील चालत नसे. या न्यायाधीशांचे गुमास्ते प्रत्येक कुटुंबांत गुप्तपणें राहून लोकांच्या धर्ममतांची बातमी मिळवीत असत. या न्यायाधीशाचें काम, लोकांस त्यांच्या कृत्याबद्दल नव्हे, परंतु त्यांच्या विचाराबद्दल शासन करण्याचें होतें. निव्वळ संशयावरून माणसांस पकडून, कबूली देईपर्यंत त्यांच्या देहास अघोर यातना करून शेवटीं त्यांस सजीव जाळणें हें साधें व निरुपद्रवी काम या न्यायपीठांत चालत असे. दोन साक्षीदारांनीं अगदीं स्वतंत्र गोष्टीविषयीं दिलेला पुरावा आरोपीस अंधारकोठडींत टाकण्यास बस्स होत असे; तेथें कांहीं काल अन्नाशिवाय एकांतांत राहिल्यामुळें आपण अपराधी आहों असें कबूल करण्याची सुबुद्धि या प्राण्यास झाल्यास त्याजवर एक प्रायश्चित्तसूचक कफनी चढवून त्यास पुन्हां स्वातंत्र्याचा लाभ मिळे; परंतु त्याची मालमत्ता सरकारांत जप्त होत असे. अंधारकोठडीचा परिणाम न झाल्यास दोन साक्षीदारांच्या

पुराव्यावरून त्यास अग्निकुंडाची शिक्षा फर्माविण्यांत येत असे; व साक्षीदार एकच मिळाल्यास त्यास खिळ्यांच्या खोड्याची शिक्षा ठरली होती. या चौकशीचे वेळीं आरोपीचा मुख्य मदतनीस त्याचें धैर्य हाच असे. आरोपीस वकील देण्याची परवानगी असे; परंतु त्याची व आरोपीची गांठ पडावयाची नाहीं. खोड्याचा प्रयोग मध्यरात्रीच्या वेळीं अंधारकोठडींत, अंधुक दिव्याच्या उजेडांत चालत असे; स्त्री असो, पुरुष असो वा कुमारिका असो, तिचें वस्त्रहरण करून तिला लांकडी माचावर निजवून पाणी, घनपदार्थ, अग्नि, आकर्षक यंत्रें, व फिरकीचे खिळे, यांच्या योगानें न तुटतां शिरा जितक्या ताणतील तितक्या ताणणें, हाडें न फुटतां शक्य तितकीं ठेंचणें व शरीर प्राण न जातां शक्य तितकें पंगू करणें, हे प्रकार यावेळीं घडून येत. अशा यातना सतत पंधरा वर्षेपर्यंत चालून शेवटीं कित्येकांचें अग्निकुंडांत हवन झाल्याचीं उदाहरणें त्या वेळच्या इतिहासांत आढळून येतात. या प्रयोगामुळें गर्भगळित होऊन बिचाऱ्या आरोपीनें गुन्हा कबूल केल्यावर त्यास जिवंत जाळण्याची शिक्षा मिळे. ही शिक्षा प्रत्येक इसमास पृथक् पृथक् देण्याच्या ऐवजीं केव्हां केव्हां सहा सहा महिने शिक्षेस पात्र ठरलेले कैदी जमवून ठेवून त्यांची एका सुमुहूर्तावर वरात काढून एकदम मोठ्या लोकसमाजादेखत एका मोठ्या होळींत त्यांची बोळवण करण्याचा स्पेन देशांत सांप्रदाय असे. अशा प्रसंगीं राजा, सरदार, पाद्री लोक व लोकसमाज हा चित्ताकर्षक व धर्मबुद्धिप्रेरक देखावा पाहण्यास मोठ्या उत्सुकतेनें वधस्थानीं धांवून येत असे. कैदी लोकांना कोठडींतून काढून काळ्या पट्ट्यांची पिवळी कफनी घालीत. डोक्यावर एक कोनाची विचित्र टोपी चढवीत. नंतर त्यांची जीभ अशा विलक्षण रीतीनें बांधीत कीं त्याच्या योगानें कैदीस धड आपलें तोंड उघडतां येऊं नये व झांकतांही येऊं नये. हा विधि झाल्यावर पंचपक्वान्नांनीं भरलेलें ताट त्यांच्यापुढें मांडण्यांत येई, व त्याचा यथेच्छ स्वीकार करण्याचा त्यांस आग्रह करीत. हा प्रकार उरकल्यावर सर्व मंडळी जमून सार्वजनिक निधनभूमीवर मोठ्या थाटानें वाजत गाजत जात. तेथें धर्मगुरूची उपासना होत असे व त्याच प्रसंगीं धर्मच्छलाची महति लोकांस व्याख्यानरूपानें सांगण्यांत येई. त्यानंतर

कैदी लोकांस व्यक्तिशः शिक्षा वाचून दाखवून तिच्या बजावणीकरितां कालस्वरूपी चांडाळांच्या स्वाधीन करण्यांत येई. अशा प्रसंगीं कोणी गुन्हा कबूल केल्यास त्याचा प्रथम शिरच्छेद करून नंतर त्यास अग्निकुंडांत टाकून देत. तसें न केल्यास एकदम अग्निकुंडांत जीवन्मुक्ति मिळत असे. असा एक समारंभ फिलिप स्पेनदेशांत परत आला त्यावेळीं त्याच्या सन्मानार्थ करण्यांत आला. या न्यायसभांस व्यक्तिभेद बिलकुल मानवत नव्हते; रूढ धर्मासंबंधी थोडा विकल्प मनांत आला ह्मणजे पुरे, मग तो कोणीही मनुष्य असो, त्याचा दर्जा कांहींही असो, तो या चरकांत सांपडावयाचाच. या स्पेनमधील धर्मसंशोधनपद्धतीचा पहिला शास्ता टॉर्कमाडा, या एकट्याच्या अमलांत एक लक्ष चौदा हजार चारशें एक कुटुंबांची वाताहत झाली.

वर निर्दिष्ट केलेली पद्धति नेदर्लंडांत सुरू होणार नाहीं अशाविषयीं फिलिप व त्याचा मुख्य सचीव ग्रॅन्व्हिल हे लोकांस वारंवार आश्वासनें देत होते. परंतु अशाच प्रकारची एक न्यायपद्धति धर्माध्यक्षांनीं आपल्या अधिकारांत नेदर्लंड देशांत बरेच दिवस सुरू केली होती. या धर्माध्यक्षांची संख्या वाढवून व प्रत्येक धर्माध्यक्षाच्या हाताखालीं दोन धर्मशासक देऊन, तसेंच धर्माच्या बाबतींत नवे जाहिरनामे प्रसिद्ध करून नवीन मताचा प्रतिरोध करण्याची बरीच योजना अमलांत आली होती. याशिवाय धर्मगुरु पोप याच्या आज्ञेनुरूप अस्सल धर्मसभाही चार्लस बादशहानें नेदर्लंडमध्यें सुरू केल्या होत्या. इ. स. १५४५ च्या सुमारास या पोपच्या अधिकाराखालीं नेमलेल्या धर्मशासकांचे अधिकार फारच वाढविण्यांत आले, व ते नेदर्लंडांतील धर्माध्यक्षापासून अगदीं स्वतंत्र झाले. त्यांस आपल्या हाताखालचे अधिकारी निवडण्याचे हक्क प्राप्त झाले, व त्यांस माहितीदाखल नवीन बटहुकूम सोडण्यांत आले. त्यांचा व विशेषतः इ. स. १५५० सालीं चार्लस बादशहानें मुद्दाम फर्माविलेल्या, व फिलिपनें आपल्या कारकीर्दीच्या पहिल्याच महिन्यांत ( इ. स. १५५५ नोव्हेंबर ) पुन्हां सुधारून कायम केलेल्या जाहिरनाम्याचा सारांश पूर्वी एके स्थळीं थोडक्यांत दिलाच आहे. या सर्वांचा मुख्य उद्देश पाखंडमती अगर पाखंडमत-

प्रवण लोक किंवा त्यांचे पुरस्कर्ते धुंडाळून काढून, वर वर्णन केलेल्या लोकोत्तर न्यायासनापुढें त्यांच्या चौकशीचें नाटक करून त्यांस कडक शासन करणें हा होता.

पोपनियुक्त शासक मंडळींत पीटर टिटल्मन याचें नांव फार प्रमुखत्वें-करून या वेळच्या इतिहासांत उल्लेखिलेलें आढळतें. इ. स. १५६१ सालीं या गृहस्थाच्या नोकरीस बरींच वर्षें होऊन गेलीं होतीं; व त्यानें आपल्या अमदानींत धर्मच्छलाचें काम मोठ्या नेकीनें व झटून केल्याबद्दल त्याची शिफारस आहे. त्यावेळीं धर्ममतांस बळी पडलेल्या लोकांपैकीं बहुतेकांस टिटलमनच्या हातूनच मरण आल्याचें दिसून येतें. सहज बोललेल्या शब्दांवरून अगर धर्ममतांबद्दल निव्वळ संशय आल्यावरून हा धर्मशासक लोकांस यमसदनास पाठवीत असे. म्यूलर नामक गृहस्थास धर्मशास्त्र वाचण्याचें व्यसन लागल्याबद्दल, त्यावर पाखंडमताचा आरोप करून अटक करण्याचा हुकूम झाला; व ईश्वर व सत्यधर्म यांबद्दल आपण आपला अभिमान प्राण गेला तरी सोडणार नाहीं, असा त्यानें आग्रह धरतांच त्यास फांशीं देऊन, त्याचा देह अग्नीस अर्पण करण्याची शिक्षा झाली. याच प्रकारची शिक्षा एका छापील धर्मपुस्तकांतील स्तोत्रांचे उतारे लिहून घेण्याबद्दल कॅल्वर नांवाच्या आतलस विणणाऱ्या व्यापाऱ्यास देण्यांत आली. हा इसम जिवंत जाळला गेला. तसेंच दुसऱ्या एका मनुष्यास नवीन धर्मपंथ स्वीकारल्याबद्दल त्याच्या बायकामुलांच्या समक्ष तापविलेल्या तरवारीनें भोंसकून मारण्याची शिक्षा झाली. बिचारी बायको तें अघोर कृत्य पाहूनच गर्भगलित झाली व तिचा प्राण गेला. याच सालीं वॉल्टर कॅपेल नामक श्रीमान् व परोपकारी पुरुषास वधस्तंभास बांधून जिवंत जाळण्यांत आलें. या सुमारास ब्रॅंड नामक एका किनखाबाच्या कारखानदारास आतिशय त्वेष चढून त्यानें एका जुन्या धर्माच्या प्रार्थनामंदिरांत शिरून, तेथील उपासनेचीं उपकरणें जमलेल्या लोकांच्या समक्ष फोडून टाकिलीं; व तो जमलेल्या लोकांस ह्मणाला, "मूर्खानों, सर्व जगाचा प्रतिपालक येशू ख्रिस्त हा अशा क्षुद्र उपायांनीं तुह्मास प्राप्त होईल काय?" ही ह्या मनुष्याची कृति व शब्द ऐकून

जमलेले लोक कांहीं वेळ आश्चर्यानें स्तब्ध झाले; परंतु कांहीं वेळानें त्यास अधिकाऱ्यांनीं पकडून आगीवर उलटें टांगून ठेविलें. पुढील सालीं रॉबर्ट ओजिअर, त्याची बायको व दोन मुलें यांस प्रार्थनामंदिरांत न जातां घरींच भजन केल्याबद्दल अग्निकुंडाची शिक्षा मिळाली. अशा तऱ्हेची गति ह्या वेळीं हजारों लोकांस मिळत होती. पुरुष, बायका, मुलें ह्यांस पोपच्या विरुद्ध कित्येक वर्षांपूर्वीं सहज बोललेल्या कांहीं शब्दांबद्दल, एकांतांत प्रार्थना केल्याबद्दल, किंवा येशू ख्रिस्ताची उच्छिष्ट राहिलेली भाकरी ह्मणून एखादी भाकरी रस्त्यांतून मिरवली जात असतां तिच्या पुढें गुडघे न टेकल्याबद्दल किंवा मनांत असलेल्या धर्मविचाराबद्दल बेधडक घराबाहेर काढीत; व पुरावा बिलकुल नसतांही त्यांस खोड्यांवर चढवीत. या भोंवऱ्यांत एकदां मनुष्य सांपडला कीं तो या जगास मुकला. त्याला न्यायाची सांवली देखील दुरापास्त! फिर्यादी कोण, गुन्हा कोणता व पुरावा काय, हें आरोपीस कधींच समजत नसे. वेदनेस अगर अंधारकोठडीस कंटाळून आरोपी बहुतेक बिनचुक वाटेल ती कबूली देत असे. गुन्हेगारांची गुप्त बातमी देणाराची शिफारस होऊन त्यास बक्षीस मिळत असे; ह्यामुळें आपले खाजगी द्वेष साधून घेण्यास ही अमूल्य संधि प्रत्येक बदफैली मनुष्यास प्राप्त झाली होती. मालमत्तेचा सुरक्षितपणा व प्रेमाचें दळणवळण हीं फार दुर्लभ झालीं. संशयाचें विष सर्व समाजास व्यापून राहिलें. हेराचा संशय येऊन, पाहतां पाहतां लोक भयचकित होत; व बोलतां बोलतां एकदम बंद पडत. भला मनुष्य ठरविण्याची फार पंचाईत पडूं लागली. यामुळें सर्व समाजांत जिकडे तिकडे हाहाकार माजला. अशीं कर्में रात्रंदिवस चाललीं असतां लोकांत तीव्र धर्माभिमान उत्पन्न होऊन धर्मसंरक्षणार्थ त्यांनीं आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याची इमारत उभारण्यास कंबर बांधिली, यांत नवल नाहीं. या वेळच्या इतिहासावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, मोठमोठीं राजपत्रें, लांब लांब सनदा व पवित्र तह हे, अशा प्रसंगीं ज्या कागदांवर लिहिलेले असतात, त्या नुसत्या कागदांच्याही किमतीचे ठरत नाहींत.

असा छल इ. स. १५६१।६२ चे सुमारास चालू असतांही राजा व

ग्रॅन्व्हिल स्पेनदेशांत रूढ असलेली धर्मशासनपद्धति नेदर्लंडमध्यें सुरू न करण्याविषयीं वारंवार आश्वासनें देतच होते. नेदर्लंडमध्यें चालू असलेली शासनपद्धति व धर्माचे बाबतींत प्रसिद्ध झालेले जाहिरनामे यांचे परिणाम चालू असतां, ह्या नवीन पद्धतीचें विशेष प्रयोजन होतें असें दिसून येत नाहीं. वास्तविक ह्या दोन पद्धतीमध्यें भेद एवढाच होता कीं, आपलीं धर्ममतें नाकबूल करणाऱ्या लोकांचा पत्ता लावण्याचे कामीं स्पेनदेशीय पद्धति जास्त उपयुक्त होती. प्रत्येक कुटुंबांत राहून त्यांतील लोकांच्या धर्ममतांचा पत्ता लावण्याकरितां हजारों गुप्त-हेर सर्व देशभर पसरण्याची योजना करणें हें एक ह्या पद्धतीचें मुख्य तत्त्व असे. परंतु नेदर्लंडासारख्या निर्भय व स्पष्टवक्त्या राष्ट्रांत आपलीं धर्ममतें लपवून ठेवण्याची प्रवृत्ति फार थोडी असल्यामुळें त्या विशिष्ट योजनेचा ह्या देशांत विशेष उपयोग नव्हता. ह्या योजनेशिवाय इतर सर्व बाबतींत दोन्ही शासनपद्धतींत सर्वांशीं साम्य असल्यामुळें स्पॅनिश पद्धतीचे सर्व दुष्परिणाम नेदर्लंडांत घडून येत होते. या धर्मच्छलार्थ योजिलेल्या सर्व उपायांचें उगमस्थान ग्रॅन्व्हिल आहे, असा सार्वत्रिक समज असल्यामुळें त्याजविषयीं लोकांत द्वेषबुद्धि मात्र उत्तरोत्तर जास्त वाढत चालली. तसेंच नवीन धर्माचें वारेंही दिवसेंदिवस अधिकाधिक पसरत चाललें. बळी देण्यास काढिलेल्या इसमांशीं आपली सहानुभूति उघडपणें दाखवून त्यांचा जयजयकार करण्यापर्यंत लोकांची मजल येऊन पोहोंचली. वालून प्रांतांत ही सांथ विशेषच पसरत चालली. फ्लेव्ही व मॅलर्ट नामक उपदेशक उघडपणें बायबल वाचून त्याचा अर्थ समजावून देऊं लागले. त्यांस पकडून ठरीव शिक्षा करण्याबद्दल हुकूम सुटले. सहा महिने अटकेंत ठेविल्यानंतर त्यांस निधन-भूमीवर कडेकोट पहाऱ्यांत जाळण्याकरितां आणिल्या वेळीं लोकांचीं मनें अत्यंत क्षुब्ध होऊन त्यांनीं त्यांस जबरदस्तीनें सोडविलें. सुटकेनंतर या उभयतांनीं पूर्ववत् उपदेश करण्याचा क्रम चालविला असतां, त्यांस पुन्हां पकडून सजीव जाळण्याची शिक्षा झाली. ह्या प्रसंगांत या उपदेशकांस मदत करणारे ह्मणून हजारों लोक पकडले गेले; व त्यांसही तीच शिक्षा भोगावी लागली.

देशांतील साहित्यमंडळ्यांनीं जुन्या धर्माची व त्याचा मुख्य पुरस्कर्ता ग्रॅन्व्हिल याची थट्टा अनेक हास्यास्पद काव्यें व प्रयोग करून चालविली होती. नवीन नेमलेल्या धर्माधिकाऱ्यांविरुद्ध असंख्य थट्टास्पद काव्यें, निंदास्पद लेख व त्याचीं वेडीविद्रीं चित्रें सर्व देशभर प्रसिद्ध होत होतीं. एके दिवशीं एका अर्जदारानें ग्रॅन्व्हिलच्या हातांत एक कागद आणून टाकला व तो नाहींसा झाला. अर्जांत ग्रॅन्व्हिलविरुद्ध अश्लील पदें व त्याचें एक चित्र, असे लेख होते. याशिवाय त्या वेळीं ग्रॅन्व्हिल-वर एक मर्मभेदक काव्य प्रसिद्ध झालें; त्यामुळें त्याचें पित्त फारच खवळून गेलें.

सामान्य लोकांप्रमाणेंच सरदार लोकांतही ग्रॅन्व्हिलचें वितुष्ट वाढत चाललें होतें. ऑरेंज, एग्मॉन, हॉर्न वगैरे बड्या सरदारांनीं त्याजविषयीं द्वेषभाव उघडपणें व्यक्त केला होता; व त्याचीं कारणेंही राजास या-पूर्वींच कळविलीं होतीं. मॅन्स्फील्ड व त्याचा मुलगा हेही या वेळीं विरुद्ध पक्षासच मिळाले होते. आर्शो व अरेंबर हे तटस्थवृत्ति धारण करून होत. बर्लेमॉन हा सुद्धां या सरदारांच्या चुचकारण्यास भुलून ग्रॅन्व्हिलच्या पक्षांतून फुटला होता. मोरिलन, बव्हे, बोर्डे, वगैरे आशाबद्ध सामान्य सरदार ग्रॅन्व्हिलच्या गोटांत अद्याप राहिले होते. व्हिग्लियसच्या मनांत यावेळीं अजीबात काम सोडून एकांतवासांत सुखानें रहावें अशी इच्छा उत्पन्न झाली. आपल्या देशबांधवांचा स्वभाव तो पूर्णपणें ओळखून असल्याकारणानें फिलिपनें सुरू केलेल्या नवीन राज्यपद्धतीमुळें देशांत दिवसेंदिवस वाढत चाललेली खळबळ पाहून त्याच्या मनांत जबरदस्त भीति उत्पन्न झाली होती. परंतु त्याच्यानें राजाच्या इच्छे-विरुद्ध जाववेना. याशिवाय हत्तीच्या पायासारखा पगार, पानस्थळ, बागाईत जमीनी व राजा नेदर्लंडांत आल्यावर अधिक बढतीचीं अभि-वचनें यांचा योग्य विचार करून या सदस्यानें आपल्या अधिकारावर कायम राहून परस्परविरोधी तत्त्वें व परस्परविरुद्ध लोक यांचा मेळ घालण्याचा निश्चय केला. अशा स्थितींत कार्डिनलनें यां-पैकीं कोणासही न जुमानतां जबरदस्तीनें या गुप्तत्रयीस खाकेंत घेऊन राज्यकारभार चालविला होता.

या सुमारास अशी एक अफवा पसरली कीं नेदर्लंडपैकीं पांच चार बड्या सरदारांचा शिरच्छेद केल्याशिवाय लोकांतील चळवळ कमी होणार नाहीं असें ग्रॅनव्हिलनें राजास सुचाविलें आहे. बहुतेक सर्व सरदार लोकांत त्याजविषयीं द्वेष व मत्सरभाव उत्पन्न झाला होता; व त्यांपैकीं ब्रेडरोड व ल्यूमेसारखे कांहीं निर्भीड व उच्छृंखलवृत्तीचे सरदार त्याची उघडपणें ग्राम्य थट्टा करून साहित्यप्रयोगी मंडळ्यांची बरोबरी करूं पाहत होते. ते आपण स्वतः आपल्या नोकरचाकरांसह धर्मोपदेशकांचा पोषाक घालून नेहमीं समाजांत फिरूं लागले; व टोप्यास तुरे लावण्याऐवजीं कोल्ह्याच्या शेपटीचे केंस लावून हिंडण्याचा परिपाठ त्यांनीं सुरू केला. शिवाय यांच्याकडून ग्रॅनव्हिलास सावध राहण्याविषयीं निरोपही वारंवार जाऊन पोहोंचत होते. परंतु ग्रॅनव्हिलचें धैर्य अढळ होतें. तो गांवाबाहेर "लोहाराची भट्टी" या नांवानें लोकांत प्रसिद्ध झालेल्या आपल्या बंगल्यांत राहून राजास खलितें व खाजगी पत्रें, व देशभर अधिकाऱ्यांस हुकूम लिहिण्यांत आपला बहुतेक सर्व वेळ घालवी; विश्रांतीच्या वेळीं आसपासच्या सामान्य लोकांस जेवणाखाणास बोलावून, त्यांच्याशीं लोकव्यवहाराच्या गोष्टी बोलून तो आपली करमणूक करीत असे; त्याच्या बंगल्याच्या मुख्य दरवाजावर केलेल्या चिन्हांचा असा अर्थ होता कीं, सर्व सरदारांची सत्ता नष्ट झाल्यानंतर आपला अधिकार पुष्कळ कालपर्यंत अबाध चालणार.

यावेळीं फ्रान्सदेशांत राजा व त्याची नूतन धर्मी प्रजा यांच्यामध्यें युद्धप्रसंग उत्पन्न झाल्यामुळें, फिलिपनें फ्रान्सच्या राजास नेदर्लंडांतून कांहीं सैन्याची कुमक पाठविण्याविषयीं राणी पार्माला हुकूम पाठविला. या प्रश्नाचा मंत्रीमंडळांत विचार चालला असतां मोठा कडाक्याचा वाद जुंपला. सरदार लोक ह्या मागणीस बिलकुल भीक घालीनात. सरतेशेवटीं या मोहिमेस नेदर्लंडनें थोडी पैशाची मदत करावी असें ठरलें.

राष्ट्रसभा राजाच्या आज्ञेवरून बरेच दिवस भरली नव्हती; परंतु राणी पार्माला ग्रॅनव्हिलचें जूं सुद्धां जड भासूं लागलें होतें. व या वेळच्या भयप्रद लोकस्थितीचा विचार करण्याकरितां कांहीं जास्त

लोकांचा सल्ला घेणें जरुर भासल्यामुळें तिनें जमातीच्या सभासदांस इ. स. १५६२ च्या मे महिन्यांत ब्रुसेल्स शहरीं पाचारण केलें. या सभेंत व्हिग्लियसचें बरेंच वाक्पांडित्य झाल्यावर दुसऱ्या बैठकींत असें ठरलें कीं प्रथम राजाच्या वतीनें पैशाची मागणी निरनिराळ्या प्रांतिकसभांस करावी; व त्याबरोबरच नेदर्लंडाच्या लोकांचीं गाऱ्हाणीं कोणी तरी मुखत्यार पाठवून त्याच्या मुखानें राजास कळविण्याची तजवीज करावी. मध्यंतरीं ऑरेंजनें तत्कालिन लोकस्थितीचा विचार करण्याकरितां आपल्या वाड्यांत सरदार लोकांची एक खाजगी सभा बोलाविली. या सभेस प्रेसिडेंट व्हिग्लियस व ग्रॅन्व्हिल यांस निमंत्रण नव्हतें. "कांहीं उच्च अधिकाऱ्यांच्या वर्तनामुळें राजकीय विषयांची उघडपणें वाटाघाट होत नाहीं, याबद्दल काय तजवीज करावी?" असा एक प्रश्न प्रसंगानें या सभेपुढें आला. या वेळीं या उच्च अधिकाऱ्यांचा स्वभाव व वर्तन याबद्दल दोन्ही पक्षांत बराच कडाक्याचा वाद जुंपला. ह्याचा परिणाम उभयपक्षांतील भेदभाव विशेष विकोपास जाण्यापलीकडे कांहीं एक झाला नाहीं. राजे लोकांच्या जमातींत ठरलेली पैशांची मागणी प्रांतिकसभा कबूल करीनात. त्यामुळें राजाच्या खर्चाकरितां पैसा मंजूर करण्याचा लोकांच्या प्रतिनिधींचा अधिकार ग्रॅन्व्हिल यास असह्य झाला. स्पेनमध्यें पाठविण्याकरितां सरदारांनीं हॉर्नचा भाऊ स. मॉंटिनी हा वकील पसंत केला. तो भावापेक्षां ज्यास्त बुद्धिमान असून स्वभावानें फार मनमिळाऊ होता.

नेदर्लंड देशांत राजाचा बादशाही अंमल बऱ्याच अंशानें अगदीं अर्वाचीन होता. तेथील प्रांतोप्रांतींच्या जुन्या संस्थानिकांच्या जागीं राजा शिरला असल्यामुळें त्यास केवळ राष्ट्रांतील प्राचीन राजकीय संस्था व लोकांचे हक्क कायम राखून राज्य करण्याचा हक्क होता; परंतु ग्रॅन्व्हिलनें राजाच्या विचारानें राष्ट्रांतील सरदार, सामान्य लोक, राजकीय संस्था, यांचे पुरातन व नैसर्गिक हक्क नष्ट करून सर्व राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं होतीं; व लोकांवर जुलूम करण्याचा उद्योग चालविला होता. या ग्रॅन्व्हिल व फिलिप यांच्या स्वैर राजनीतीस विरोध करणें हें न्याय्य, सयुक्तिक व कायदेशीर होतें. वरील उद्देश मनांत धरून ग्रॅन्व्हिल

राजास वारंवार असें कळवीत असे कीं "राजाची सत्ता नाहींशी करून स्वतःच्या इच्छेशिवाय काडीही हालूं द्यावयाची नाहीं असा सरदार लोकांचा संकल्प आहे; करितां ते आपल्या नांवाचा दुर्लौकिक वाढवीत आहेत. तसेंच सरदारलोकांसंबंधीं मी वाईट अभिप्राय आपणास कळवितों, अशा संशयावरून मजवर सरदारांचा रोष आहे." एग्मॉनविषयीं राजास त्यानें फार संशयानें भारलेलीं पत्रें पाठविलीं होतीं. याच सुमारास त्यानें मुख्य मुख्य सरदार व मॅक्सिमीलियन यांच्या दरम्यान पत्रव्यवहार चालला असून, सैन्य जमा करून मॅक्सिमीलियन यास राज्यपद देण्याचा त्यांचा गुप्त बेत घाटत आहे अशी बातमी स्पेनमध्यें लिहून कळविली. "याचा मूळ कल्पक कोण, हें समजत नाहीं, तथापि आकारावरून जर अनुमान करावयाचें असेल तर एग्मॉनचा यांत संबंध नसावा असें दिसतें." असें या पत्रांत त्यानें खुबीनें सुचविलें होतें; व राजास त्याची वारंवार अशी सूचना होती कीं नवे धर्माध्यक्ष नेमण्याच्या कामीं आपली खटपट विशेष होती व पांच चार प्रमुख सरदारांचीं डोकीं उडविण्याचा आपला विचार आहे असा लोकांचा झालेला समज राणी पार्माकडून सरकारांनीं दूर करवावा. शिवाय सरदारांत फूट पाडण्याकरितां कांहीं सरदारांचे पगार भरपूर देऊन बाकीच्यांस उपाशी ठेवण्याची ग्रॅन्व्हिलची सूचनाही या वेळीं अमलांत आली.

इ. स. १५६२ च्या हिंवाळ्यांत मॉंटिनी स्पेनमध्यें गेला. त्याच्या स्वागतासंबंधीं व त्यास मिळावयाच्या उत्तरासंबंधीं फिलिपला पूर्वींच उपदेश मिळाला होता. राजानें मोठ्या प्रेमानें मॉंटिनीचें स्वागत करून त्यास कळविलें कीं ग्रॅन्व्हिलनें सरदारलोकांविरुद्ध आपलें मन कलुषित करण्याचा बिलकुल प्रयत्न केला नाहीं; व कदाचित् पुढें मागें त्यानें तसा प्रयत्न केल्यास त्यापासून कांहीं उपयोग होणार नाहीं; शिवाय स्पॅनिश धर्मसंशोधनपद्धति नेदर्लंडांत सुरू करण्याचा आपला बिलकुल विचार नाहीं; व नवीन धर्माध्यक्षांच्या नेमणुका होईपर्यंत ग्रॅन्व्हिलला त्या गोष्टीची वार्ता सुद्धां नव्हती. हा ग्रॅन्व्हिलनें पढविलेला पाढा वाचून दाखविण्यापलीकडे राजा एक शब्द सुद्धां बोलेना; व मॉंटिनी यास स्वदेशीं जाऊन आपल्या देशबांधवांस एवढेंच समाधान

सांगावयाचें उरलें कीं, " ग्रॅन्व्हिल हा भला मनुष्य आहे, धर्माध्यक्षांच्या नेमणुकांत त्याचा संबंध नाहीं, व नेदर्लंडांतील लोकांचा छल व प्राणहानि एका विशिष्ट पद्धतीनें होणार नाहीं. " राजानें नेदर्लंडांत दिसून येणाऱ्या अस्वस्थतेचीं कारणें विचारल्यावरून मॉंटिनीनें मोकळेपणानें असें सांगितलें कीं, " या सर्व अनर्थांचीं कारणें दुर्बुद्धि व स्वैरगामी ग्रॅन्व्हिल, धर्मसंशोधन व नव्या धर्माध्यक्षांच्या नेमणुका हीं होत. " या स्पष्टवक्तेपणाबद्दल लौकरच मॉंटिनीस प्रायश्चित्त भोगावें लागलें. मॉंटिनी या सालच्या डिसेंबर महिन्यांत स्वदेशीं परत आला. त्यानें सांगितलेली हकीकत ऐकून सरदारलोकांची बरीच निराशा झाली. ऑरेंज यास वरचेवर स्पेनमधून गुप्त बातमी मिळत असल्यामुळें त्यानें एकंदर वस्तुस्थितीचें स्वरूप एकदम ओळखिलें; व ग्रॅन्व्हिल तरी पडद्याआड नाहींसा झाला पाहिजे, नाहीं तर आपण तरी मंत्रीमंडळांतून आपलें अंग काढून घेतलें पाहिजे, असा त्याच्या मनाचा पक्का निश्चय झाला.

तारीख ११ मार्च १५६३ रोजीं ऑरेंज, एग्मॉन व हॉर्न यांनीं राजास एक महत्वाची यादी पाठविली. या यादींतील आशय असा होता कीं, " ग्रॅन्व्हिलच्या हातांत सर्व राजसत्ता मिळाल्यामुळें त्याचें वर्तन फार बेताल होऊन लोकांत अत्यंत अस्वस्थता उत्पन्न झाली आहे; लोकांचीं मनें स्वस्थ होण्यास त्या अधिकाऱ्यास कामावरून दूर करण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं; व तशी व्यवस्था ताबडतोब न झाल्यास देशांत काय अनर्थ गुदरतील याचा नेम नाहीं; व तसे अनर्थ गुदरल्यास आमच्यावर दोष न यावा म्हणून ही जरूरीची यादी आम्ही पाठवीत आहों. आतांपर्यंत राष्ट्रांतील संस्थानिक व सरदार यांच्या यत्नामुळेंच देशांत शांतता राहिली आहे. " हा मजकूर सत्यास धरून व न्याय्य होता; व तो आर्शो, अरेंबर व बर्लेमॉनशिवाय इतर सरदारांस मान्य होता. तथापि कार्डिनलचें प्राबल्य विशेष असल्यामुळें त्यावर कोणास सही करण्याची छाती होईना. एग्मॉन व हॉर्न हे अविचारी व धाडसी असल्यामुळें त्यांनीं आपल्या कृत्याच्या बऱ्यावाईट परिणामाचा यत्किंचितही विचार न करितां यादीवर सह्या

ठोकल्या. ऑरेंज यानें मात्र ग्रॅन्व्हिलचें सामर्थ्य पूर्णपणें ओळखून व त्याच्याशीं उघडपणें विरोध करण्याचा पक्का निश्चय करून फांसा टाकला होता. एग्मॉननें स्वातंत्र्य व राष्ट्रहित यांच्याप्रीत्यर्थ एकोपा करण्याच्या वल्गना सुरू केल्या होत्या. बर्लेमॉन यानें दोन्ही डगरी संभाळण्याचा यत्न चालविला होता. या यादीचा जबाब पूर्वीच ग्रॅन्व्हिलकडून स्पेनमध्यें तयार होऊन गेला होता. तो ता. ६ जून रोजीं राजाकडून येऊन पोहोंचला. त्यांत यादी पाठविणारांचें राजकार्यदक्षतेबद्दल अभिनंदन करून त्यांस असें कळविलें होतें कीं, कांहीं विशेष कारण असल्याशिवाय ग्रॅन्व्हिलच्या दर्जाच्या माणसास कमी करणें गैरशिस्त होईल; व अशीं कांहीं कारणें असल्यास तीं राजास समजाविण्यास सरदारांपैकीं कोणी समक्ष येऊन भेटावें. त्याच वेळीं पार्मा व एग्मॉन यांस राजाचीं निराळीं पत्रें आलीं, त्यांतही एग्मॉन व दुसऱ्या एखाद्या सरदारास समक्ष येऊन भेटण्याबद्दल निमंत्रण केलें होतें.

मार्च महिन्यांत पाठविलेल्या यादीशीं ज्यांचा संबंध होता त्यांस राजाचें उत्तर वाचून अतिशय राग व खेद उत्पन्न झाला. विरुद्ध पक्षांतील सरदारांनीं, राजानें वकील पाठविण्यासंबंधीं केलेल्या सूचनेचा विचार करून असें ठरविलें कीं, ग्रॅन्व्हिल याजवर दोषारोप करण्याकरितां इतक्या लांबचा व त्रासदायक प्रवास करणें सरदारांपैकीं कोणाच्याही दर्जास शोभणार नाहीं; यावांचून इतर कांहीं महत्वाची कामगिरी असती तर स्पेनमध्यें जाण्यास आपणांस हरकत नव्हती. हा ठराव राणी पार्माच्या मार्फत राजास कळविण्यांत आला. यानंतर ऑरेंज, एग्मॉन व हॉर्न यांनीं राजास पत्रानें असें कळविलें कीं, "सध्यांच्या देशस्थितींत आह्मांपैकीं एकासही देशाच्या बाहेर जाणें श्रेयस्कर होणार नाहीं, विशेषतः ग्रॅन्व्हिलच्या संबंधांत स्पेनला जाणें योग्य नाहीं. आमची कल्पना अशी होती कीं, आह्मी मोकळ्या मनानें, साध्या भाषेंत कळविलेल्या हकीकतीवर सरकारचा विश्वास बसेल; विशेष पुराव्याची जरूर लागणार नाहीं. असो, हल्लीं मंत्रीमंडळांत चाललेल्या कामांत आमचें बिलकुल अंग नसल्यामुळें, त्याजबद्दल जबाबदारी शिरावर घेणें आह्मांस धोक्याचें

वाटत आहे; सबब सद्रहू अधिकाराचा हा आमचा राजीनामा आहे." या पत्राबरोबर सरदार हॉर्न यानें राजास एक स्वतंत्र खाजगी पत्र पाठविलें; त्यांत ग्रॅन्व्हिलपासून राजास कांहीं उपयोग होणार नाहीं असें कळवून, कॅथोलिक धर्माच्या बाबतींत सरकारास सर्व सरदारलोक एकदिलानें मदत करतील, असें आश्वासन दिलें होतें. राणी पार्मानें आपला मुख्य चिटणीस आर्मेंटेरो यास या समयीं राजाकडे पाठविलें. त्यासही ग्रॅन्व्हिलसंबंधाचें लोकमत, खजिन्याची शोचनीय स्थिति व लोकांत होत असलेली पाखंडमताची प्रवृत्ति, वगैरे गोष्टींचें वर्तमान राजास कळविण्याविषयीं सुभेदारीणसाहेबांची आज्ञा होती. शिवाय राणी पार्मा व बिरुद्ध पक्षाचे सरदार यांजमध्यें वेळोवेळीं मंत्रीसभेंत झालेल्या वादाची हकीकत राजास कळविण्याविषयीं आर्मेंटेरोला सूचना होती. राजास पत्र पाठविल्यानंतर लागलीच रीजंट पार्माकडे या तीन सरदारांनीं एक खुलासेवार याद पाठविली. त्यांत देशस्थितीचें, राज्यव्यवस्थेचें व जमाबंदीचें उद्वेगजनक चित्र काढून पुढें राष्ट्रसभा न बोलावण्याविषयीं राजाचा दुराग्रह हा केवळ लोकांविषयीं अविश्वासदर्शक आहे, असें स्पष्ट लिहिलें होतें; व शेवटीं मंत्रीसभेंत यापुढें आपली काम करण्याची इच्छा नाहीं, असें या सरदारत्रयीनें कळविलें होतें. आर्मेंटेरो स्पेनमध्यें येऊन पोहोंचल्यावर त्यानें आपल्याबरोबर आणिलेले कागदपत्र राजापुढें मांडले. त्यानें ते सर्व कागदपत्र तूर्त ड्यूक ऑल्व्हा याजकडे अभिप्रायाकरितां पाठविले. आल्व्हानें ते पाहून केवळ व्याघ्रस्वरूपच धारण केलें. आपले या प्रकरणासंबंधाचे सर्व विकार एकदम प्रगट केल्यास लोक आपलें डोकें बिघडलें आहे अशी कल्पना करतील, ह्मणून तूर्त त्यानें असें सुचविलें कीं, ह्या यादी पाठविणाऱ्या लोकांचा पुढें मागें शिरच्छेद केल्याशिवाय हा कार्यभाग उरकणार नाहीं; त्या कामास योग्य काल येईपर्यंत त्यांचे अर्ज विचाराकरितां लांबणीवर टाकले पाहिजेत व त्यांच्यांत फूट उत्पन्न केली पाहिजे. ग्रॅन्व्हिलसंबंधी सरदारांची मागणी बिलकुल कबूल करितां येत नाहीं, असें त्यानें साफ आपलें मत दिलें. ग्रॅन्व्हिलचा या वेळीं राजाशीं जारीनें पत्रव्यवहार चालला होता. त्यांत आपल्या

पदरीं दैन्य घेऊन इतर लोकांविषयीं निःपक्षपातानें लिहिण्याचा तो आव घालीत असे. परंतु ऐकिव बातम्या, जेवणाच्या व इतर समारंभाच्या वेळीं निःशंक अंतःकरणानें सरदारांच्या तोंडून सहज निघालेलीं वाक्यें वगैरे घेऊन त्यांच्यावर रचलेले राजद्रोहात्मक बेत, त्यांच्या साधनाकरितां योजिलेले गुप्त उपाय व अघोर संकेत यांच्या हकीकतींनीं हीं पत्रें भरलेलीं असत; त्यांत प्रसंगविशेषीं निरनिराळ्या सरदारांचा नामनिर्देशही असे. प्रथम त्यानें राजास असें कळविलें कीं, "सरदारांनीं राजाच्या विरुद्ध एक मोठा कट करून त्यांत लोकांस येऊन मिळण्याकरितां फिसालती व धाकदपटशा देण्याचा क्रम चालविला आहे. धर्माच्या बाबतींत नेदर्लंडमधील स्थिति समाधानकारक नाहीं. सरदार लोक आपल्या अधिकाराच्या प्रदेशांत सरकारच्या हुकुमाप्रमाणें संशययुक्त आचरणाच्या लोकांस देहांत शासन देण्यास हयगय करतात; व त्यांचें स्वतःचेंच वर्तन धर्मतत्त्वांस सोडून असतें. सरदार लोकांच्या ब्रुसेल्सजवळ व बीर्ट येथें गुप्त सभा होत असतात; त्यांत कोणत्या गोष्टींची वाटाघाट होते हें समजण्यास मार्ग नाहीं. शिवाय ह्या सरदारांचा राष्ट्रसभेशिवाय इतर सर्व सभा नाहींशा करण्याचा विचार आहे. राजपुत्र ऑरेंज हा जर्मनींत आपलें फार वजन आहे अशी वारंवार फुषारकी मारीत असतो; व जर्मनीच्या बाजूला सरहद्दीवर पुष्कळ सैन्य जमा होत आहे. सरदार हॉर्ननें मला मारण्याकरितां एक जिनोइज मारेकरी तयार केला आहे, अशी बातमी समजते. हे सरदार लोक फार कर्जबाजारी झाले असून, त्यांतून मुक्त होण्याकरितां लोकांत असंतोष उत्पन्न करून त्यांच्या हातून बंड करविण्याच्या बेतांत आहेत; कारण तसें केल्यावांचून त्यांस अन्य तरणोपायच उरला नाहीं. या उपायांनीं राजाची सत्ता नाहींशी करून आपली सत्ता स्थापन करण्याचा त्यांचा विचार आहे." तात्पर्य, या कार्डिनलनें राजास असें भासविण्याचा यत्न केला कीं, कांहीं महत्वाकांक्षी व विपन्नदशेस प्राप्त झालेल्या सरदार लोकांनीं गुप्त मसलती करून लोकांत बेदिली उत्पन्न केली आहे. त्यांचें निवारण करण्यास राजानें स्वतः नेदर्लंड देशांत येणें जरूर आहे. हा शेवटचा उपाय मात्र ऑरेंज व एग्मॉन यांनींही

राजास सुचविला होता. वरील हकीकतीवरून नेदर्लंडांत निकराची वेळ समीप येत चालली होती, असें दिसून येईल. हा वेळपर्यंत ग्रॅन्व्हिलचें वर्चस्व कायमच होतें. ऑरेंज वगैरे सरदार लोकांनीं मंत्रीमंडळांतून आपलें अंग काढून घेतलें होतें; फिलिपला लोकमतापुढें मान वांकविण्याचें धैर्य होईना; आलव्हा नेदर्लंडमधील सरदार व सामान्य लोक यांविषयीं धमकीच्या गोष्टी बोलत होता. राणी पार्मालासुद्धां ग्रॅन्व्हिलचा कंटाळा आला होता; व खुद्द त्या प्रधानासही आपण या क्षुब्ध वातावरणांतून निघून जावें असें हळू हळू वाटूं लागलें.

सन १५६३ च्या डिसेंबर महिन्यांत मुख्य खजाननीस कॅस्पर शेझ याच्या घरीं सर्व लहानमोठ्या सरदारांस वडी मेजवानी झाली. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें कार्डिनलसंबंधीं बोलणें ओघानेंच सुरू झालें. त्याचा डामडौल, लोभ व त्याचें औद्धत्य यांविषयीं पुष्कळ चिकित्सा झाली. मद्याचे पेल्यावर पेले चाललेच होते. अशा स्थितींत विनोद व थट्टामस्करी चालली असतां अशी एक सूचना जमलेल्या मंडळीपुढें आली कीं, ग्रॅन्व्हिलची टर उडविण्याकरितां एक नवी पोषाकाची तऱ्हा काढून ती सर्व सरदारांनीं आपापल्या आश्रित मंडळींत चालू करावी. कांहीं दिवसांनीं एग्मॉनचे नोकर लोक खाकीच्या कापडाचा एक लहान कोट व विजार घालून गांवांत फिरूं लागले. या वस्त्रांवर धर्मोपदेशकाच्या टोपीसारखें एक वेडगळ चित्र काढिलेलें होतें; हा नमुना पाहतांच इतर सर्व लोकांनीं त्याचें अनुकरण करण्यास सुरवात केली. गांवांत खाकीचा कपडा दुर्मिळ झाला. जिकडे तिकडे टोपीच्या चिन्हांनीं अंकित छोटे कोट व तुमानी दिसूं लागल्या. कोटांच्या बुदामांवर बाणाच्या आकृती काढल्या असत. या गोष्टीवर विशेष जोर देऊन ग्रॅन्व्हिल राजास असें भासवूं लागला कीं, हीं भावी बंडाचीं सांकेतिक चिन्हें होत. या नवीन पोषाकांनीं लोकांचीं मनें कांहीं दिवस वेधून जाऊन ग्रॅन्व्हिलविषयीं त्यांचा राग वृद्धिंगत झाला. सरदार लोकांच्या दुसऱ्या यादीस बरेच दिवस उत्तर न आल्यामुळें त्यांच्यांतही बरीच चळवळ सुरू झाली होती.

फिलिप हा ग्रॅन्व्हिलच्या पत्राचें मनन करीत होता. सरदार ऑरेंजचे गुप्त बातमीदार राजापाशीं असल्यामुळें त्यास तेथील गुप्त कागदपत्रांच्या

नकलासुद्धां तावडतोब मिळत असत; त्यांच्याकडून त्यास अशी बातमी समजली कीं, आल्व्हाबरोबर राजाची मसलत चालू आहेः त्यांत प्रमुख सरदारांचा खरपूस समाचार घेण्याची संधि मिळेपर्यंत एग्मॉन यास स्पेनला बोलवावें व ग्रँन्व्हिलला कांहीं घरगुती कामाच्या मिषानें एकदम निघून जाण्याविषयीं सूचना पाठवावी असें घाटत आहे. पुष्कळ विचारा-अंतीं राजाचा कायमचा बेत ठरला. खाजगी पत्रांतून ग्रँन्व्हिल यास तारीख १९ जानेवारी १५६४ रोजीं राजाचा असा हुकूम आला कीं, " ज्या अर्थी तुमच्यावर मोरेकरी घालण्यापर्यंत सरदार लोकांची मजल येऊन पोहोंचल्याचें आपण कळवितां, त्या अर्थी मातोश्रीस भेटण्याच्या मिषानें आपण कांहीं दिवस नेदर्लंड सोडून जावें; ही गोष्ट आपण रीजंटची परवानगी घेऊन करावी; व योग्य संधि येईल त्या वेळीं आपणास परत येण्याचा हुकूम मिळेल. " पार्माच्या खाजगी पत्रांत दोन चिठ्या एग्मॉनच्या नांवच्या होत्या. पैकीं एकींत पूर्वी आह्मीं सुचविल्याप्रमाणें स्पेनला यावें अशी त्यास आज्ञा केली होती, व दुसऱ्या चिठींत तुह्मी सध्यां येण्याची तसदी घेऊं नये असें लिहिलें होतें; व राणी पार्माला प्रसंग पाहून योग्य दिसेल ती चिठी एग्मॉनकडे पाठविण्याची सूचना केली होती. याशिवाय नवीन पंथी लोकांचा योग्य समाचार घेण्याविषयीं व राष्ट्रसभा न भरविण्याविषयीं पार्माला आर्मेंटेरोबरोबर तोंडीं निरोप आले; इतर मागण्यांचा विचार अद्याप चाललाच होता. त्याच बैठकींत सरदारांस लिहिलेलें एक आज्ञापत्र पुढें तीन आठवड्यांनीं त्यांच्या हातांत पडलें. त्यांत त्यांनीं मंत्रीमंडळांतील कामाचा राजीनामा दिल्याबद्दल त्यांचा निषेध करून, ग्रँन्व्हिलबद्दल तक्रारी नीट खुलासेवार न समजल्यामुळें त्या प्रश्नांचा जास्त विचार करणें अवश्य आहे, असें लिहिलें होतें.

राजाचा हुकूम हातीं आल्यावर कांहीं वेळ आस्वलाप्रमाणें आपल्या-शींच कार्डिनल गुरगुरला, व एकटाच आपल्या दिवाणखान्यांत बराच वेळ स्तब्ध बसलाः कांहीं वेळानें तो जाण्याच्या तयारीस लागला. तथापि निघण्यास त्याचें मन तयार होईना; परंतु आतां त्याच्या मागें पार्माचा दपटशा लागला. तारीख १३ मार्च रोजीं स्वारीनें प्रस्थान ठेविलें. जाते-वेळीं त्यानें लोकांस मुद्दाम आपण होऊन कळविलें कीं, दोन महिन्यांत

आपण परत येणार. या बोलण्यावर कोणाही मनुष्याचा विश्वास बसेना. ऑरेंज वगैरे मंडळींची अशी पक्की खात्री झाली कीं, या स्वारीची कायमची उचलबांगडी झाली. ग्रॅन्व्हिल जातांच त्याच्या वाड्यावर एका चावट तरुण गृहस्थानें "बिक्रीस तयार. ग्राहकांनीं जलदी करावी." अशी पाटी लाविली. कार्डिनलनें निघते वेळीं बरोबर बराच मोठा लवाजमा घेतला होता. ब्रेडरोड व हूस्ट्रॉटन खिडकींतून हा स्वारीचा समारंभ पाहत होते. वेशींतून लवाजमा बाहेर पडतांच दोघेही रस्त्यांत आले; व एका घोड्यावर उभयतां बसून शाळेंतील पोरांप्रमाणें टवाळी करीत ते त्याच्या मागून चालले. त्यांनीं पहिल्या मुक्कामाच्या ठिकाणीं ग्रॅन्व्हिलच्या प्रयाणासंबंधीं खात्रीलायख बातमी मिळविण्याकरितां एक बातमीदार पुढें पाठविला होता. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. खुद्द ग्रॅन्व्हिलचा भाऊ प्रवासास बरोबर निघाला होता त्यालासुद्धां खरी हकीकत समजली नव्हती; खरी वस्तुस्थिति लपवून ठेवण्याचा यत्न पत्रद्वारा व इतर रीतींनें ग्रॅन्व्हिल व पार्मा यांनीं सारखा चालविला होता. एकांतवासांत जाऊन पडल्यावर ग्रॅन्व्हिलच्या तात्विक वृत्तीस बरीच तरतरी आली. खायेपेयादिकांची नेहमीं रेलचेल ठेवून मनुष्यमात्रांच्या आशांचें वैफल्य व मनुष्यस्थितींची भंगुरता यांच्या विवेचनांत तो आपला काल घालवूं लागला. तथापि राज्यकारभाराच्या कामांत पुनः पडण्याची त्याच्या मनाची तळमळ कांहीं केल्या जाईना. त्याच्या पश्चात् पार्मालाआपल्या अधिकारांत खरी स्वतंत्रता वाटूं लागली. ऑरेंज, एग्मॉन वगैरे सरदारांशीं तिचें जास्त दळणवळण सुरू होऊन त्यांच्या वर्तनाबद्दल तिचीं मतें कांहीं अंशीं बदलत चाललीं. सरुद्दर्शनीं एक ग्रॅन्व्हिलबद्दल निंदात्मक पत्र तिनें राजास पाठविलें; व त्याबरोबरच ग्रॅन्व्हिल यासही एक गौरवाचें पत्र पाठविलें.

इ. स. १५६५ सालीं ग्रॅन्व्हिल रोमशहरीं जाऊन राहिला. इ. स. १५७० सालीं टर्कीविरुद्ध स्पेन, रोम आणि व्हेनिस यांचा संयोग जुळविण्याचें कामीं फिलिपनें त्याची योजना केली. पुढें तो नेपल्सचा सुभेदार झाला. स. १५७५ सालीं राज्यव्यवस्थेच्या कामांत मदत करण्याकरितां राजानें त्यास माद्रिद येथें पाचारण केलें. व तेथें तो आपल्या वयाच्या ७० व्या वर्षी, इ. स. १५८६ सालीं मरण पावला.

इ. स. १५६४ च्या अखेर अखेर नेदर्लंड देशांत बेबंदशाही, गोंधळ व अनीति अतोनात माजली. प्रथमतः लोकांस ग्रॅन्व्हिलच्या जाण्यानें एक प्रकारचें समाधान वाटलें. फिलिपनें त्यानंतर ऑरेंजप्रभृति सरदारांस स्नेहसूचक पत्र पाठविलें. सरदारांनीं मंत्रीमंडळाचें काम पूर्ववत् करण्याचा व राजाची आज्ञा पाळण्याचा आपला निश्चय राजास कळविला व मंत्रीमंडळांत परत येऊन राज्यकारभाराचें काम मोठ्या मेहनतीनें करण्यास त्यांनीं सुरवात केली. मात्र डचेस पार्मीला त्यांनीं असें निक्षून कळविलें होतें कीं, ग्रॅन्व्हिल परत आल्यास आपण एकदम काम सोडून निघून जाऊं. ऑरेंजच्या मनांत, तीन महत्वाच्या गोष्टी घडवून आणल्यास, राष्ट्राचा बचाव होऊन समीप आलेला भयप्रद प्रसंग टळेल असें वाटत होतें. या गोष्टी ह्मणजे राष्ट्रसभेची बैठक भरविणें, धर्मसंबंधी हुकुमांचा कडकपणा कमी करणें अगर ते अगदीं रद्द करविणें, व फडणिशी-मंडळ आणि खाजगी-मंडळ हीं अजीबात नाहींशीं करणें ह्या होत्या. पहिल्या दोन गोष्टी त्याच्या इच्छेप्रमाणें घडून आल्या असत्या तर फिलिप आणि ग्रॅन्व्हिल यांनीं सुरू केलेला स्वेच्छाचार सर्वस्वीं नाहींसा झाला असता. मंत्रीमंडळाचे अधिकार कार्डिनलच्या कारकीर्दींत फार संकुचित झाले. न्याय व जमाबंदी या खात्यांवरील प्रधानमंडळींचें आचरण फार नीतिभ्रष्ट झालें होतें. मुलकी, न्याय वगैरे खात्यांत लाचलुचपतीवांचून कामें होईनाशीं झालीं. सर्व सरकारी कामगार खिरापतीवांचून गोष्ट बोलेनात. न्यायाचा व सरकारी नोकऱ्यांचा उघड लिलाव चालला होता. पाहिजे त्या गुन्ह्यास माफी विकत मिळूं लागली. या व्यापारांत मुख्य अडत पार्माचा चिटणीस आर्मेंटेरो याची होती. पार्माही आर्मेंटेरोच्या वर्तनाकडे केवळ कानाडोळा करून राहिली नाहीं तिनें त्याच्या व्यापारांत पाती ठेविली होती. आर्मेंटेरोचें पार्माशीं रहस्य फार वाढलें. हे दोघे सभेच्या दिवाणखान्यांत प्रहर प्रहर एकांत करूं लागले. ऑरेंज-सारख्या संस्थानिकांसही त्यांचा एकांत संपेपर्यंत देवडीवर वाट पहात बसावें लागे. ही अव्यवस्था पाहून ऑरेंज यास दिवसेंदिवस जास्तच चिंता उत्पन्न झाली. देशांत लोकांवर होत असलेला जुलूम, चोहोंकडे माजलेली बेबंदशाही, चाललेलीं अनन्वित कृत्यें व राज्यव्यवस्थेंत

टिटल्मन यास सूचना पाठविली. पार्माला तर स्वतःलाच या यमपुरुषाची भीति वाटत होती.

धर्मच्छलाचे कामीं राजाच्या वृत्तींत यत्किंचित्‌ही फरक झाला नाहीं. त्यानें आगष्ट महिन्यांत ट्रेंटच्या धर्मसभेंत ठरलेले नियम प्रसिद्ध करून ते सक्तीनें अमलांत आणण्याविषयीं राणीला हुकूम पाठविला. या नियमांत खरीं धर्ममतें, धर्मोपदेशकांचें आचरण व लोकशिक्षण या बाबतींत कांहीं सिद्धांत ठरविले होते. जुन्या धर्मानें चालणारांशिवाय इतरांस खाणावळींत जेवण मिळूं नये, शाळेंत शिक्षण मिळूं नये, स्मशानभूमींत देह ठेवण्यास जागा मिळूं नये, असें या नियमांचें धोरण होतें. त्यांत जन्म, मृत्यु, लग्नादिक क्रिया पुराणधर्माच्या छायेवांचून होऊं नयेत असें ठरविलें होतें; त्यावरून कोणीही धर्मगुरूच्या दाखल्यावांचून जन्मला किंवा मेला असें ठरत नसे. हे नियम नेदर्लंडच्या पूर्वापार रूढीलाच केवळ विरोधी होते असें नाहीं; राजाच्याही कांहीं अधिकाराशीं त्यांचा विरोध येत होता. त्यामुळें ते अमलांत आणण्याची पार्माला मोठी अडचण वाटूं लागली. परंतु राजा तर आपला दुराग्रह सोडीना. अशा स्थितींत नियमांत कांहीं अपवाद व अल्पस्वल्प फेरफार करून त्यांचा अंमल करावा किंवा नाहीं, याची वाटाघाट करण्याकरितां, सन १५६४ च्या अखेर एग्मॉनला प्रत्यक्ष स्पेनला पाठविण्याचा पार्मानें विचार केला. त्यास स्मरणार्थ समजुतीचें एक संदिग्ध टिपण व्हिग्लियसनें तयार करून दिलें; या टिपणाचा निश्चितार्थ कांहींच होईना. तें मंत्रीसभेंत मंजुरीकरितां आल्यावेळीं त्यासंबंधीं मतें घेतांना कोणी चकारशब्द बोलेना. स. ऑरेंजची पाळी येतांच त्यानें कोणाची भीडभाड न धरतां बोलण्यास सुरवात केली. तो ह्मणाला: "एग्मॉनच्या दर्जाचा मनुष्य स्पेनला पाठविण्याचा मुख्य हेतु राजास खरी हकीकत कळविणें हा आहे. ती त्याला आतां समजली पाहिजे. राजाला आपण स्पष्टपणें कळविलें पाहिजे कीं, जाहिरनामे, सूळ, नवे धर्माध्यक्ष जुने फांसावरील मांग, वटहुकूम, धर्मशासक व हेर या परिवारास आतां फांटा दिला पाहिजे. त्यांचा काल आतां राहिला नाहीं. नेदर्लंड हा स्वातंत्र्यभाक् देश आहे व त्याचे सभोंवतीं स्वतंत्र राष्ट्रें आहेत. आमचे

पुरातन हक्क स्थापन करण्यास आह्मी सिद्ध आहों. त्याचप्रमाणें न्याय व मुलकी खात्यांत भयंकर अनीति वाढली आहे तिचा बंदोबस्त होणें जरूर आहे; फडणिशी व खाजगी प्रधानमंडळ कमी करून सर्वांचा समावेश मंत्री (दरबारी) मंडळांत करावा. जर्मनीच्या कॅथोलिक राजांनीं सुद्धां अमान्य केलेले ट्रेंट येथील धर्मसभेचे नियम या देशांत सुरू करूं नयेत. मी स्वतः कॅथोलिक आहें व त्याच धर्माप्रमाणें चालण्याची माझी पूर्ण इच्छा आहे; परंतु राजेलोकांनीं लोकांच्या आत्म्यावर आपला अधिकार चालवूं नये व धर्ममतांबद्दल लोकांस यमयातना करूं नयेत; इत्यादि." हें भाषण संपण्यास रात्रौ सात वाजले, ह्मणून सभेचें काम त्या दिवशीं तहकूब राहिलें. व्हिग्लियसची चित्तवृत्ति त्या दिवशीं भीतीनें व निराशेनें इतकी अस्वस्थ झाली कीं, रात्रभर त्यास झोंप आली नाहीं; व या भाषणास समर्पक उत्तर काय द्यावें या विचारांत तो अंथरुणावर तळमळत पडला होता. सकाळीं उठून पोषाख चढविण्याच्या अगोदर त्यास अर्धांगाचा झटका येऊन तो अंथरुणास खिळून पडला. त्याच्या गैरहजिरींत त्याचा स्नेही हॉपर याची प्रेसिडेंटच्या जागीं योजना झाली. हा मनुष्य बराच विद्वान् होता. परंतु तो "जी हुकूम" वाल्यांपैकीं असल्यामुळें धोपटमार्गी काम करण्यापलीकडे त्याचा उपयोग तिळमात्र नव्हता. ऑरेंजच्या भाषणावरून एग्मॉनला नवें टिपण मिळालें. त्यांत या भाषणाचें धोरण लक्षांत घेऊन कांहीं अंलपस्वल्प फेरफार करण्यांत आले होते.

इ० स० १५६४ च्या आगष्ट महिन्यांत लिप्झिक येथें सॅक्सनीची राजकुमारी ॲना इजबरोबर राजपुत्र ऑरेंजचें लग्न झालें. ही राजकन्या ल्यूथरधर्मी होती व ऑरेंजचा धर्म कॅथोलिक होता. त्यामुळें मुलीच्या नातेवाइकांनीं त्याजकडून असें आश्वासन घेतलें कीं, "जरी माझ्या बायकोस बाह्यात्कारी कॅथोलिक धर्माप्रमाणें आचरण ठेविलें पाहिजे, तरी एकांत स्थळीं अगर नेदर्लंडच्या बाहेर असतांना स्वधर्माच्या तत्त्वांस अनुसरून आचरण करण्यास आपण तिला हरकत करणार नाहीं; शिवाय या संबंधापासून होणाऱ्या प्रजेस ॲना इनें आपल्या धर्माचीं तत्त्वें समजून देण्यास हरकत नाहीं." लग्नाचा समारंभ जर्मनींत मोठ्या थाटानें झाला.

---

# भाग ४ था.

---

## इ. स. १५६५–६६.

एग्मॉनची वकिली—ट्रेंटसभेच्या नियमांचें उज्जीवन व सक्तीचे हुकूम-अस्वस्थता—ज्यूनिअस प्रकरण—गुप्तकट—संमेलनलेख—देशस्थिति—विज्ञप्ति-अर्जे—भिक्षेकरी अथवा भणंग—"नेमस्तपणा"—मॉंटिनी व बर्घेन यांची शिष्टाई—मैदानांतील भजनी मेळे—ट्रौड येथील जमाव—देवळांचा विध्वंस—नवे करार—स्पेनमधील वाटाघाट—ऑरेंज, एग्मॉन व हॉर्न यांची कामगिरी—फामींचें कृष्णकारस्थान.

इ० स० १५६५च्या जानेवारी महिन्यांत एग्मॉन मोठ्या थाटानें स्पेनमध्यें जाण्यास निघाला. कँब्रेपर्यंत त्याला पोहोंचविण्याकरितां हूस्ट्रॉटन, ब्रेडरोड, मॅन्स्फील्ड वगैरे सरदार लोक गेले होते. तेथें मंडळी परतण्यापूर्वी एग्मॉनच्या सन्मानार्थ ग्रामस्थ लोकांनीं एक बडी मेजवानी दिली. त्यासमयीं यथेच्छ मद्यप्राशन झाल्यावर नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें ग्रॅन्व्हिलसंबंधानें संभाषण निघालें. त्यांत तेथील धर्माध्यक्षानें त्या स्थानभ्रष्ट प्रधानाची तरफदारी केल्यावरून मंडळींनीं त्याची बरीच निर्भर्त्सना चालविली; हूस्ट्रॉटननें तर मद्याच्या धुंदींत रुप्याचें एक भांडें घेऊन त्याच्या तोंडावर फेंकलें. अशी स्थिति झाल्यावर धर्माध्यक्ष-मजकूर तेथून तडख निघून चालते झाले. दुसरे दिवशीं उभय पक्षांची समजी झाली. ह्या गोष्टीचा अर्थातच गांवांत बराच गवगवा झाला. हा धर्माध्यक्ष धर्माच्या बाबतात ग्रॅन्व्हिलपक्षीय असल्यामुळें सरदार लोकांस फार अप्रिय होता; व त्याचा स्वभाव घातकी व दुष्ट असल्यामुळें लोकांत त्याच्यासंबंधानें अत्यंत तिरस्कारबुद्धि होती. माद्रिद येथें जाऊन पोहोंचल्यावर राजानें एग्मॉनचें मोठ्या थाटानें व प्रेमानें स्वागत केलें. त्याचें जेवणखाण नेहमीं राजाबरोबर होऊं लागलें. शहरांत नवीन बांधलेला राजवाडा व शिकारीचें अरण्य वगैरे स्थलें राजानें त्यास स्वतः नेऊन दाखविलीं. या भेटीचे वेळीं राजानें त्याची एकसारखी खुशामतच सुरू केली. एग्मॉनच्या इनाममिळकतीवरील नजराणा आपण होऊन

वळेनें राजानें माफ केला व त्याला मोठमोठ्या देणग्याही वेळोवेळीं दिल्या. या आदरातिथ्यांत गुंग झाल्यामुळें, माद्रिद येथें ज्या सार्वजनिक कामाकरितां एग्मॉनची स्वारी आली होती त्याची गोष्टसुद्धां राजापाशीं काढण्याची त्याला छाती होईना. जाहिरनाम्यासंबंधानें गोष्ट निघाली असतां राजानें त्यास कांहींच निश्चयात्मक उत्तर दिलें नाहीं. मात्र यावेळीं मोठा धार्मिकपणाचा आव घालून त्यानें त्याजवर सर्वस्वी भुरळ पाडली. मंत्रीमंडळाच्या सुधारणेंसंबंधानेंही त्यानें अशींच उडवाउडवीचीं व दुटप्पीं उत्तरें दिलीं. या दोन्ही प्रश्नांसंबंधानें राजाच्या संदिग्ध बोलण्याचा भाव एग्मॉनला बरोबर समजला नसावा, असें त्याच्या पुढील वर्तनावरून दिसून येतें. वास्तविक राजा आणि नेदर्लंडचा वकील यांच्यामध्यें या वेळीं सार्वजनिक प्रश्नांसंबंधानें विशेष ऊहापोह कांहींच झाला नाहीं. मात्र राजानें या भेटींत एग्मॉनशीं फार स्नेहाचें व घरोप्याचें वर्तन ठेविल्यामुळें त्याच्या मनांत राजाविषयीं प्रेमाचें भरतें आलें; व प्रेमाच्या भरांत त्यानें राजसेवेंत आपला देह खर्ची घालण्याचें राजास अभिवचन दिलें; ती वेळ साधून राजानें त्यास सहज जातां जातां खाकीच्या प्रकरणाची आठवण करून दिली. एवढी कामगिरी करून एग्मॉन स्वदेशीं परत येण्यास निघाला त्या वेळीं डचेसला पोहोंचविण्याकरितां राजानें त्याजपाशीं एक पत्र दिलें. त्यांत नवीन मताकडे लोकांचा कल जास्त वाढल्याबद्दल दिलगिरी दाखवून असें सुचविलें होतें कीं, प्रधानमंडळाची सभा बोलवावी; त्यांत धर्माध्यक्ष, धर्मशास्त्री व जुने कानू जाणणारे लोक बोलावून ट्रेंटच्या धर्मसभेंत ठरलेल्या प्रश्नांचा कायमचा निकाल करावा; व पाखंडी लोकांस मरणाचा अभिमान न वाटेल असा कांहीं शिक्षेचा प्रकार शोधून काढावा; दरबारी मंडळासंबंधानें लिहितांना तिच्या रचनेंत कांहीं फेरफार करणें जरूर दिसत नाहीं, असें या पत्रांत निक्षून लिहिलें होतें. एग्मॉन स्वदेशीं परत येतांच राजाशीं झालेलीं भाषणें, राजाचीं मतें व बेत यांचा सारांश त्यानें दरबारीमंडळापुढें राजानें तयार करून लिहिलेल्या खर्ड्यावरूनच सांगितला. एग्मॉन येण्यापूर्वींच राजाचे जासूद या हकीकतीचीं पत्रें घेऊन आल्यामुळें हा सर्व वृत्तांत पूर्वींच नेदर्लंडांत समजला होता. मात्र एग्मॉनच्या भाषणांत राजाची स्तुति व राजाविषयीं पूज्यबुद्धि यासंबंधानें

असंख्य वेळ उल्लेख येऊं लागले. स्पेनमधून आल्यावर त्याचें वैभव बरेंच वाढलें. अर्जदार, दरबारी लोक व अधिकारी लोक यांची त्याच्या घरीं सारखी रहदारी सुरु झाली. एग्मॉनच्या वकीलीचा असा क्षुद्र परिणाम झालेला पाहून ऑरेंज व त्याचे अनुयायी यांच्या मनांतील त्याजविषयींची विश्वास-बुद्धि बरीच कमी झाली. त्याच्या मागोमाग राजाचीं दुसरीं पत्रें आलीं. त्यांत धर्माच्या कायद्यांचा कडक अंमल चालविण्याविषयीं सक्त हुकूम होते. हीं पत्रें वाचून सरदारलोकांचा राग अधिकच वाढला. एग्मॉन यासही या गोष्टीचा बराच खेद वाटला. राजाच्या सहवासास व त्याच्या देणग्यांस भुलून तो आपल्या कर्तव्यास विसरला होता. स्पेनमध्यें असतांना तुह्मी आपल्या सोबत्यांचे विचार व देशाचें हित विसरून आपलें खाजगी हित मात्र साधून घेतलें अशी ऑरेंजनें त्याची तोंडावर निर्भर्त्सना केली. ते शब्द ऐकून एग्मॉन हा अगदीं खजिल झाला व त्यानें बरेच दिवस मंडळींत जाणें येणें सोडून दिलें.

राजाच्या आज्ञेवरून ट्रेंटचीं धर्मशासनें प्रसिद्ध करण्यांत आलीं. कँब्रेशिवाय मेलिन, यूट्रेक्ट वगैरे ठिकाणीं लोकांनीं या नियमांच्या अंमल-बजावणीस मोठ्या नेटानें अडथळा केला. या व इतर महत्वाच्या गोष्टींचा विचार करण्याकरितां पार्माच्या हुकमावरून धर्माध्यक्ष व न्यायपंडित दरबारीमंडळाच्या सभेंत दाखल झाले. या बैठकींत धर्मोपदेशकांची नीति सुधारण्यासंबंधाचे ट्रेंटच्या सभेचे ठराव एकविचारानें पसंत ठरले. पुढें कॅथोलिकधर्माचें उल्लंघन करणारांस देहांतप्रायश्चित्त देण्याच्या बाबतींत धर्मोपदेशक आणि न्यायपंडित यांच्या दरम्यान मतभेद पडला. सरदार, पंडित आणि निरनिराळ्या प्रांतिक सभांचे प्रतिनिधी यांच्या मतें ही शिक्षा सरसकट देणें गैर होतें. व्हिग्लियस व जमलेले धर्माध्यक्ष आणि धर्मशास्त्री यांचें उलट मत पडलें. दुसरे दिवशीं डचेसनें सभेच्या सांप्रदायाप्रमाणें हा प्रश्न स्वतंत्रपणें सभेपुढें मांडला. यावेळीं ऑरेंज वगैरे सरदारांनीं पार्माला असें कळविलें कीं, मंत्रीमंडळांत इतर लोकांच्या सल्ल्यानें काम चालण्या-ची वहिवाट नाहीं, करितां जमलेल्या जत्रेंत त्या प्रश्नांचा कायदेशीर रीतीनें विचार होऊं नये. शिवाय नवीन धर्मी लोकांस शिक्षा ठरविण्याच्या कामीं निरनिराळ्या कारणांवरून अपवाद करण्याबद्दल या सभेपुढें बऱ्याच

सूचना आल्या; परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पाखंडमतास *किंबहुना पाखंडमताच्या सावलीस कोणतीही सवलत मिळूं नये असा* या सभेंत सिद्धांत ठरला. राजाची तशी इच्छा होती व धर्मशास्त्र्यांचा सल्लाही तसाच पडला. तरवार, चिता आणि खोडा यांच्या मदतीवांचून कॅथोलिक धर्म जिवंत राहणार नाहीं अशी ह्या लोकांची दृढ कल्पना झाली होती.

लोकांची अस्वस्थता, भीति आणि त्वेष यांचा कळस होण्याची वेळ आली. जाहिरनामे आणि धर्मच्छल यांशिवाय नेहमींच्या बोलण्यांत दुसरा विषयच निघेना. लोकांच्या मनांत सर्वकाळ हेच विचार घोळत होते. रस्त्यावर, दुकानांत, गुत्त्यांतून, शेतांत, बाजारांत, देवळांत, लग्नांत, उत्तरकार्यांत, जहागिरदारांच्या किल्ल्यांत, गरीबांच्या झोंपडींत, शिल्पकारांच्या विन्हाडांत, व्यापारी लोकांच्या पेढ्यांतून सारखी अंगावर शहारे आणणाऱ्या या विषयाची वाटाघाट व विवंचना रात्रंदिवस चालत असे. लोक एकमेकांस असें बोलूं लागले कीं, निरंतर गुलामगिरींत राहण्यापेक्षां एकदम मृत्यु आलेला बरा; यमयातना सोसून धर्मशासकांच्या सुरीखालीं मरण्यापेक्षां हातांत शस्त्र घेऊन समरांगणांत पडणें बरें. स्थानिक अधिकाऱ्यांचीं धर्मच्छलास मदत होत असल्याबद्दल त्यांचीही लोकांत निंदा चालत असे; अशी लोकस्थिति असतां उलट धर्मशासकांची नेहमीं अशी तक्रार असे कीं मुलकी अधिकारी फार नालायख आहेत; ते धर्मसंशोधनाच्या कामांत आपणास मनःपूर्वक मदत करीत नाहींत, त्यामुळें पाखंडमताचा जास्त प्रसार होत चालला आहे. त्यांनीं खुद्द राजास ही गोष्ट कळवून आपणास जास्त मदत मिळण्याविषयीं त्याजपाशीं प्रार्थना केली. त्यामुळें राणी पार्मीला धर्मशासनाच्या कामीं जास्त खबरदारीनें वागणें भाग पडलें. या सालच्या उन्हाळ्यांत राजाचे असे नवे हुकूम आले कीं पाखंडी लोकांस मध्यरात्रीं अंधारकोठड्यांत पाण्यांत बुडवून मारावें; त्यांस प्रसिद्धपणें जाळण्याचा रिवाज बंद करावा. रीजंटनें उलट राजाला असें कळविलें कीं, लोकांचा क्षोभ फार अनावर होत चालला आहे. एग्मॉन व सरदार लोक यांसही राजाच्या धरसोडीच्या वर्तनानें अतिशय त्वेष आला होता.

इ. स. १५६५ च्या नोव्हेंबर महिन्यांत नेदर्लंडमधील अधिकाऱ्यांस फिलिपचीं व्यक्तिशः पत्रें आलीं; त्यांत त्याचे पूर्वीचेच हुकूम शब्दशः कायम केले होते. धर्मशासकांसही या वेळीं त्याचीं स्वदस्तुरचीं पत्रें आलीं. त्यांत त्यांनीं येथवर केलेल्या कामाचें मनःपूर्वक अभिनंदन करून, तें काम पुढें तसेंच नेटानें, मनांत कोणताही विकल्प न आणितां चालविण्यासाठीं अविश्रांत श्रम करावे, अशी त्यांस शिफारस केली होती; व कॅथोलिकधर्म रक्षण करण्याच्या बाबतींत लागेल ती मदत आपणाकडून मोठ्या खुषीनें कोणत्याही वेळीं मिळेल असें त्यानें आश्वासन दिलें होतें. रीजंट पार्माला राजानें आतां स्पष्ट असें कळविलें कीं, "धर्मसंशोधन हल्लींच्या काळीं फार अवश्य आहे; तें पूर्वीप्रमाणें चालू ठेवावें. तें काम बंद पडल्यास देशांत अनर्थ माजतील! स. एग्मॉन यास जातेवेळीं आपण हेंच कळविलें होतें; परंतु त्याचा त्यासंबंधानें गैरसमज झाला असावा असें दिसतें. दिवाणी अदालतींच्या न्यायाधिशांस या कामांत धर्मशासकांस पूर्णपणें मदत करण्याविषयीं हुकूम करावे; धर्माच्या कामीं आडपडदा अगर भीति बिलकुल कामाची नाहीं." या विषयासंबंधानें एग्मॉनला एक निराळें पत्र आलें; त्यांत शास्त्रीपंडितांच्या सभेंत झालेल्या निर्णयाबद्दल पसंती दर्शवून, अखेरचे ठरलेले नियम अमलांत आणण्याच्या कामीं सरकारास मदत करण्याविषयीं त्यांस आज्ञा केली होती. हे निकराचे हुकूम दरबारी मंडळापुढें येतांच तेथें एकच गोंधळ उडाला; त्यांच्यासंबंधानें लांबलचक कडाक्याचा वाद सुरू झाला. ऑरेंज, एग्मॉन व हॉर्न यांनीं या राजव्यवस्थेच्या धोरणाचा निर्भिडपणें निषेध केला. ही चळवळ लोकांत पसरली. सरकाराविरुद्ध उत्तेजक हस्तपत्रकें प्रत्यहीं खंडोगणती वांटण्यांत येऊं लागलीं. ऑरेंज, एग्मॉन व हॉर्न यांनीं लोकसमाज व धर्मस्वातंत्र्य यांची बाजू उघडपणें उचलावी असे जाहिरनामे प्रतिरात्रीं गांवांत प्रसिद्ध होऊं लागले. जिकडे तिकडे सरदार लोकांच्या घरीं मेजवान्या सुरू झाल्या. त्या वेळीं तरुण मंडळी रागाच्या व मदिरेच्या भरांत फिलिपवर उघडपणें खरमरीत टीका करूं लागली; व आपापसांत एकमेकांचें, व जुलुमाखालीं चुरडलेल्या आपल्या देशाचें, संरक्षण

करण्याविषयीं शपथा वाहूं लागले. इकडे राणीनें स्पेनमधून आलेले खलिते अभिप्रायाकरितां खास-मंडळाकडे पाठविले. त्यांचा ठरीव रिपोर्ट दरबारी-मंडळापुढें आला; ऑरेंजनें त्याच्यावर प्रखर टीका करून शेवटीं असा उपसंहार केला कीं, ज्या अर्थीं राजाचे हुकूम स्पष्ट, सक्तीचे व अखेरचे आहेत, त्या अर्थीं त्यांच्यावर वादविवाद करण्याची जरूरच राहिली नाहीं; ते निमुटपणें मान्य करावे किंवा त्यांच्याविरुद्ध बंड करावें एवढाच मार्ग उरला आहे. बंड हे शब्द ऐकतांच प्रेसिडेंट व्हिग्लियस हा अगदीं भयाभीत व निस्तेज होऊन ह्मणाला, "असें असेल तर ह्या गोष्टीचा उपक्रम करण्यापूर्वीं आणखी पुरता विचार करावा." हे राजेश्री हा वेळपर्यंत डोळे झांकून राजाच्या मागून चालले होते! अशा निःसीम राजभक्ताच्या सूचनेप्रमाणें वागण्यासही रीजंटला आतां अवसान पोंहोंचेना. ट्रेंट सभेचे नियम व राजाचे पूर्वींचे हुकूम ह्यांबद्दल गांवोगांवीं जाहिरनामे प्रसिद्ध झाले. नंतर कांहीं दिवसांनीं ऑरेंजनें मंत्रीसभेंत आपल्या शेजारीं बसलेल्या एका सरदारापाशीं असें बोलून दाखविलें कीं, "अभूतपूर्व असें शोकपर्यवसायी नाटक आतां आपणास पहावयास मिळणार आहे." हें भविष्य लवकरच प्रत्ययास आलें. धर्मच्छल आणि तत्संबंधीं हुकूम हे आतां राजाज्ञेवरून पक्के कायदेशीर ठरले; सरकाराच्या हेतूविषयीं संशय उरला नाहीं; व जाहिरनाम्यांच्या द्वारें ही गोष्ट लोकांस गांवोगांव माहीत झाली. जाहिरनामे प्रसिद्ध होतांच प्रत्येक घरीं लोक राजास शिव्याशाप देऊं लागले; त्यांचे आक्रोश स्वर्गापर्यंत जाऊन पोंहोंचले. लोकांच्या क्रोधाग्नीच्या विवर्ण, मंद आणि भयप्रद ज्वाला प्रत्येक शहर व खेडेगांव यांजवर दिसूं लागल्या. आगामी संग्रामाचीं दुश्चिन्हें सर्वत्र भासूं लागलीं. मोठमोठ्या शहरांतून सर्व कामधंदा बंद पडला. बाहेर देशचे व्यापारी देश सोडून पळून जाऊं लागले. बडे लोक उघडपणें व त्वेषानें सरकारच्या जुलुमाविषयीं ओरड करूं लागले; व सरकारचे हुकूम मोडण्याबद्दल लोकांस उपदेश करूं लागले. स. बर्गेन, मॉंटिनी व धाकटा मॅन्स्फील्ड यांनीं राजाच्या हुकुमांची बजावणी आपल्या अधिकाराच्या मुलुखांत करण्याचें साफ नाकारिलें. ब्राबंटच्या चार मुख्य शहरांच्या

लोकांनीं राजास एक अर्ज तयार केला; त्यांत धर्मसभा ह्या आपल्या "सानंदप्रवेश" नामक सनदेस विरोधी आहेत हें पूर्ण विवेचन करून सिद्ध केलें होतें. या अर्जास सयुक्तिक उत्तर सरकारास देतां येईना; त्यामुळं तेवढा ब्राबंटप्रांत धर्मसभेच्या वेसणापासून मुक्त झाला. हस्त-पत्रकें, हस्तपुस्तकें व इतर लेख यांचा देशभर ऊत आला होता. या लेखांत देशभक्तांस राष्ट्रीय हक्कांच्या संरक्षणार्थ निर्भिडपणें भांडण्यास व शस्त्र घेण्यास आव्हान केलें असे. एका लेखांत लोकांनीं राजास कळविलें कीं, "आह्मी धर्मशास्त्राप्रमाणें चालण्यास तयार आहों. परंतु धर्मशास्त्राची अशी आज्ञा आहे कीं ऐहिक व्यवहारांत राजाची आज्ञा पाळावी, व 'पारमार्थिक गोष्टींत' परमेश्वराची आज्ञा पाळावी." नवीन पंथी लोक मध्यम व कनिष्ठ स्थितींतील असून, फार उद्योगी, ईश्वरपरायण व नीतिमान् होते याबद्दल बिलकुल मतभेद नाहीं.

इ. स. १५६५ चे शेवटचे महिने स. माँटिनी व अलेक्झँडर पार्मा ह्यांच्या लग्नसमारंभांत गेले. अलेक्झँडर पार्मा हा एग्मॉनबरोबर हॉलंडांत आला होता. तो स्वभावानें फार गर्विष्ठ व एकलकोंडा होता; त्यामुळें जहागिरदार लोकांशीं त्याचा संबंध विशेष येत नसे. ह्या लग्नाच्या समा-रंभामुळें कांहीं दिवस राष्ट्रांत झालेल्या खळबळीवर पांघरुण पडलें; परंतु ह्या लग्नसंबंधांत सरदार लोकांस एकमेकांस भेटण्याचे प्रसंग वारंवार येऊन धर्म व राज्यव्यवस्था या बाबतींत चाललेल्या जुलुमासंबंधानें त्यांचा एकविचार होऊं लागला. अलेक्झँडर पार्माच्या लग्नसमारंभाच्या दिवशींच अँट्वर्प येथील फ्रॅन्सिस ज्यूनिअस नामक एका विमतवादी (dissenting) धर्मोपदेशकास स. क्युलेंबरच्या वाड्यांत सुमारें वीस लोकांच्या एका छोट्याशा समाजांत धर्मावर व्याख्यान देण्याकरितां ब्रुसेल्स शहरीं बोलाविलें होतें. ज्यूनिअस हा जन्मतः मोठा घरंदाज असून यावेळीं अँट्वर्प येथील फ्रेंचजातीय गुप्त धर्मसमाजाचा उपदेशक होता. तो वयाच्या विसाव्या वर्षीं जिनीवा येथें शिक्षण पुरें होतांच ह्या कामावर आला होता. विद्वत्ता, वक्तृत्व व धाडस या गुणां-बद्दल त्यानें लौकरच मोठा लौकिक संपादन केला. इ. स. १५६५ अखेर त्याला लुई नॅसा (हुइल्यम ऑरेंजचा भाऊ) कडून धर्मसभा व धर्म-

शासनें यांच्याविरुद्ध सरकारास एक अर्ज तयार करण्याविषयीं सूचना झाली. उलट पक्षाकडून त्याला पकडण्याविषयीं हुकूमही लौकरच सुटले. ब्रुसेल्समधील एका चित्रकारानें नवीन धर्म स्वीकारण्याचा बहाणा करून या धर्मोपदेशकाच्या बऱ्याच व्याख्यानांच्या गुप्त ठिकाणीं प्रवेश मिळविला; व या प्रसंगीं या उपदेशकाची चेहेरेपट्टी एका चित्रांत रेखाटून त्याच्या राहण्याच्या ठिकाणासंबंधीं व दिनचर्येसंबंधीं पूर्ण माहिती संपादन केली; व ती त्यानें अधिकाऱ्यांस दिली. इतकी तयारी झाल्यावर सुद्धां त्यास अटक करण्यास संधि मिळेना. त्याच्या धैर्याची इतकी मजल पोंहोचली होती कीं, वधस्थानावर लोकांची पाखंडमताबद्दल होळी चालली असतां, शेजारच्या वाड्यांत नवीन धर्मतत्त्वांबद्दल त्याचें व्याख्यान चालत असे. क्युलेंबरच्या वाड्यांत व्याख्यान झाल्यावर जमलेल्या श्रोत्यांचा धर्मच्छला-चा प्रतिरोध करण्याकरितां एक मंडळी स्थापन करण्याचा विचार ठरला.

स. १५६६ च्या पूर्वभागांतील महत्वाचा ऐतिहासिक प्रसंग ह्मटला ह्मणजे संमेलन करार व तत्संबंधी झालेला बडा कट हा होय. या कटा-च्या उत्पत्तीविषयीं पूर्ण माहिती उपलब्ध नाहीं; परंतु त्याचें बीजारोपण स. १५६५ च्या अखेर झालें असावें. धर्मसंशोधनास जुटीनें विरोध करून धर्मच्छलापासून एकमेकांचें रक्षण करण्यासाठीं ठरलेल्या या इतिहासप्रसिद्ध संमेलनलेखाची कल्पना महापुरुष आल्डेगोंडची असावी असें दिसतें. क्युलेंबरच्या वाड्यांत धर्मरक्षणार्थ मंडळी स्थापन झाली त्याच सुमारास स्पा येथें लुई नॅसा, हॅमिस वगैरे मंडळींची गुप्त सभा भरून त्यांत हा संमेलन (compromise) लेख तयार करण्याचा निश्चय ठरला. पुढें आल्डेगोंडनें त्याचा मसुदा तयार केला. या अस्सल दस्तावर प्रथम ब्रेडरोड, चार्लस मन्स्फील्ड, लुई-नॅसा यांच्या सह्या झाल्या. नंतर त्याची दुसरी प्रत करून ती आणखी सह्या मिळविण्याकरितां लोकांत फिरविण्यांत आली. या प्रतीवर एका महिन्यांत सुमार वीस हजार सह्या झाल्या. सह्या करणारांत पुष्कळ व्यापारी व इतर धंद्यांचे लोक होते. आल्डेगोंड हा उत्तम कवी असून मोठा विख्यात गद्यलेखकही होता. त्याच्या मुत्सद्दीगिरीचा पुढें राजपुत्र ऑरेंज यास चांगलाच उपयोग झाला. तो जबर वक्ता, महाशूर योद्धा,

जाडा धर्मशास्त्री आणि मोठा विद्यासंपन्न असून, धर्मच्छलाचा व रूढ धर्मांतील वेडगळ चालींचा पक्का द्वेष्टा व राष्ट्रस्वातंत्र्याचा कट्टा भक्त होता. वर उल्लेखिलेल्या नवीन मंडळीपैकीं दुसरा सभासद, स. लुई हा जुन्या पद्धतीचा व अस्सल सरदारी पेशाचा गृहस्थ होता. तो नेहमींच्या वागणुकींत सौम्य, उदार आणि धार्मिक, रणभूमीवर पौराणिक वीराप्रमाणें महापराक्रमी, संकटांत समतोल व समाधान वृत्तीचा, मंडळींत मोठा विनोदी व आनंदी स्वभावाचा असा होता. आपल्या जन्मभूमीच्या विमोचनार्थ मुकर्हीडच्या लढाईंत लुईनें आपला देह विसर्जन करीतोंपर्यंत ऑरेंजची सर्व मदार या त्याच्या तेजस्वी भावावर होती. वयाच्या १९ व्या वर्षीं तो क्रेंटिनच्या लढाईंत हजर होता. स्वातंत्र्यार्थ महारणयज्ञ सुरू झाल्यावर त्याच्या शस्त्रांस कधींच विसावा मिळाला नाहीं. अमानुष शौर्य, अविश्रांत उद्योग आणि निष्कलंक नीतिमत्ता यांजबद्दल त्याची कीर्ति अजरामर आहे. त्याचा बांधा लहान, पण शरीर चांगलें कसलेलें होतें; चेहरा चित्तवेधक होता. सह्या गोळा करण्याच्या कामांत विशेष खटपट हॅमिसची होती. हा गृहस्थ स्पॅनिश सत्तेचा पक्का शत्रू असून फार उतावळ्या स्वभावाचा होता; तो नवीन धर्मी लोकांस उघडपणें फिसालत देत असे; साधनें तयार होण्यापूर्वींच स्पॅनिश सत्तेवर घाव घालण्याविषयीं त्याची विशेष उचल होती. जगांतील अति प्रचंड जुलुमाशीं झगडण्यास क्रोधाबरोबरच माणसाची व पैशाचीही अवश्यकता असते ही गोष्ट त्याच्या लक्षांत येत नसे. तो वारंवार त्वेषानें ह्मणे, "हे हापापलेले लांडगे आह्मांस जाळून व तोडून आमची राखरांगोळी करीत असतां आह्मीं सौम्य शब्दांनीं त्यांची मनधरणी करावी असें कित्येकांचें ह्मणणें आहे. अस्तु. आपण लेखण्या घेऊं या; त्यांना तरवारी घेऊं देत. ते क्रिया करतील, आपण शब्दपांडित्य करूं. त्यांना हसूं या; आपण रडत बसूं." संमेलनलेखांत कॅथोलिक व प्रॉटेस्टंट या दोन्ही वर्गांस संतुष्ट ठेवण्याविषयीं योग्य खबरदारी घेतली होती. धर्मसंशोधन व नवे बटहुकूम यांच्या योगानें देशांत सुरू झालेला धर्मच्छल कायदे व रूढी यांस विरुद्ध व राष्ट्रविघातक आहे असें दाखविण्याचा या लेखाचा मुख्य उद्देश होता; व राजनिष्ठा कायम ठेवून कटापैकीं कोणत्याही व्यक्तीस धर्माच्या बाबतींत

उपसर्ग लागल्यास इतरांनीं त्याचें संरक्षण करावें असें यांत ठरविलें होतें. ह्या कट रचण्यांत ऑरेंजचा विचार घेतला नव्हता. त्याचीं मतें अर्थातच कटवाल्यांस अनुकूल होतीं; परंतु या नवीन संस्थेची कार्यपद्धति त्यास पसंत पडण्यासारखी नव्हती. त्यानें आणखी एक पत्र पार्माला पाठविलें; त्यांत देशाची दुष्काळामुळें झालेली दुःस्थिति, व्यापार व कारखाने यांची धर्मच्छलनामुळें झालेली दुर्दशा वगैरे गोष्टींचा उल्लेख करून पुनः एकवार असें सुचविलें होतें कीं, चोहोंबाजूंनीं नवीन धर्मतत्त्वांचें पाऊल पुढें असतां व लोकांच्या मनोवृत्ति अगदीं क्षुब्ध झाल्या असतां धर्माच्या बाबतींत सक्तीचे नियम अमलांत आणणें राजास परिणामीं श्रेयस्कर होणार नाहीं. याच संधीस नवीन पंथाच्या धर्मतत्त्वांबद्दल त्याच्या मनांत विचार उत्पन्न होऊं लागले होते. नवीन स्थापन झालेल्या गुप्तमंडळींत त्याचें अंग नव्हतें, तथापि तिच्या कार्यक्रमावर नजर ठेवण्याचा त्यानें निश्चय केला. या कटांत दुय्यमप्रतीच्या सरदार लोकांचा विशेष भरणा होता. कांहीं व्यापारी व सुखवस्तु लोकही या मंडळींत शिरले होते. सरदारांपैकीं कांहीं जुन्या पंथाचे असूनही धर्मसंशोधनास प्रतिकूल होते; कांहीं कॅलव्हिन, ल्यूथर वगैरे नवीन पंथांच्या कळपांत शिरलेले होते; कांहीं साहसी, विपन्नास्थितीस पोंहोचलेले व दुर्व्यसनी होते. बहुतेक मंडळी तरुण, अविचारी व कोत्या बुद्धीची होती. या गुप्तमंडळीचा बहुतेक काल मेजवान्या व मजालसी यांत जात असे. अशा प्रसंगीं मद्यप्राशनाचा अतिरेक झाल्यावर, मंडळींच्या जिभेच्या गांठी सुटून त्या स्वैरगामी होत; त्या वेळचें त्यांचें भाषण ऐकून त्याची बातमी फिलिपला देण्याकरितां अशा प्रत्येक प्रसंगीं एखादा बकस्वरूपी आणि मिताहारी स्पॅनिशहेर हजर राहून त्या सर्व गोष्टी मुकाट्यानें अवलोकन करीत असतो, अशी बातमी ऑरेंज यास समजली होती. या बारभाई, अविचारी व स्वैरगामी मंडळींशीं ऑरेंजसारख्या विचारी, खोल, खऱ्या कळवळ्याच्या व बाणेदार पुरुषाचा एकविचार होणें अशक्य होतें. या चैनबाज, इंद्रियाधीन, विचारशून्य व नालायख देशभक्तांनीं विणलेली वाळूची दोरी तटातट तुटून शेवटीं त्यापासून कोणाचाही काडीइतका फायदा झाला नाहीं; व ऑरेंजचा त्यांच्याविषयींचा अंदाज शेवटीं खरा ठरला. इकडे धर्मसंशोधन,

बटहुकूम वगैरे सक्तीनें अमलांत आणण्याचा राजाचा पक्का निश्चय होऊन, त्या कामाकरितां स्पेनमधून सैन्य पाठविण्याची तयारी चालू असल्याची बातमी येऊन पोंहोचली; त्यामुळें फिलिपच्या दरबारची गुप्त बातमी हेरां- कडून आणवून राजाचे बेत हाणून पाडण्याच्या विवंचनेंत राजपुत्र ऑरेंज रात्रंदिवस निमग्न झाला होता. राजानें रात्रौ पत्रें लिहून मेजाच्या खणांत कुलूप लावून ठेविलीं असतांही एकाद्या अदृश्य पुरुषाच्या हातून त्यांच्या नकला होऊन दिवस उजाडण्यापूर्वीं ऑरेंजकडे रवाना होऊं लागल्या. रात्रीं त्यानें आपल्या खिशांत ठेवलेल्या टिपणांच्या शब्दशः नकला राजा सकाळीं उठण्यापूर्वीं नेदर्लंडच्या रक्षणकर्त्या महापुरुषाकडे रवाना होत. हें कारस्थान ऑरेंजच्या शुभ्र नीतिमत्तेस कलंक आणणारें होतें असा आक्षेप येईल; परंतु त्याचा उपयोग तो आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य व धर्म यांच्या रक्षणार्थ करीत होता, हें लक्षांत घेतलें असतां त्याचें आचरण फार पोक्त व भूषणावह होतें असेंच ह्मणणें भाग आहे. या कुटिल नीती- चें त्यानें अवलंबन केलें नसतें तर त्याच्या हातून कांहीं देशकार्य न होतां त्याच्या कांहीं मित्रमंडळीप्रमाणेंच त्याचाही शोचनीय अंत झाला असता. दुसऱ्या बहुतेक बड्या सरदारांनीं या वेळीं तटस्थवृत्ति धारण केली होती. लोकांच्या मनाची स्थिति फार भयावह झाली होती. राष्ट्राचे डोळे या वेळीं एग्मॉनकडे लागले होते. तो लोकप्रिय व नामांकित योद्धा असल्या- मुळें आपला पुढारीपणा घेईल असा लोकांस भरंवसा होता. परंतु राजा- च्या विरुद्ध हत्यार उचलावयाचें नाहीं, असा स्पेनमधून आल्यानंतर त्यानें निश्चय केला होता. फिलिपनें नेदर्लंडकडे पाठविण्याकरितां सैन्याची जमवाजमव चालविली होती.

लोकस्थिति फार शोचनीय झाली होती; देशांत जिकडे तिकडे मोठा दुष्काळ पडला होता; विदेशीय व्यापारी व देशी कारागीर धर्मच्छलनास कंटाळून नेदर्लंड सोडून थारा मिळेल तिकडे पळून जाऊं लागले. या लोकांपासून शिल्पकला शिकण्याच्या हेतूनें इंग्लंडांतील लोकांनीं त्यांचें स्वागत केलें. या वेळीं तीन हजार डच्च शिल्पकार इंग्लंडमध्यें येऊन राहिले. त्यांस इंग्लिशसरकारनें असे हुकूम फर्माविले होते कीं, प्रत्येक शिल्पकारानें आपल्या दुकानांत एक दोन तरी इंग्लिश उमेदवार ठेवावे.

या उपायानें व आयातमालावर कर बसबून, इंग्लंड देशानें हॉलंडचा व्यापार नाहींसा केला व इंग्लंडचा व्यापार व कारखाने उदयास आणिले असें एका वाल्लून इतिहासकाराचें ह्मणणें आहे. “ फ्रेंच लोक आमच्या किल्ल्यांवर व शहरांवर हल्ला करितात; परंतु इंग्लिश लोक आमच्या संपत्तीवर व तिजोरीवर हल्ला करितात, ” असें या इतिहासकाराचे उद्गार आहेत. कारण कांहीं असो, एवढी गोष्ट खरी कीं यापुढें व्यापाराचा ओघ नेदर्लंडकडून इंग्लंडाकडे फिरला.

मार्च महिन्यांत विज्ञप्ति नांवाचा एक अर्ज या गुप्त कटांतील मंडळीं- नीं स्वतः पार्माकडे नेऊन देण्याकरितां तयार केला. याही अर्धवट विचाराच्या कृत्यांशीं आपला संबंध ठेवणें ऑरेंजला पसंत वाटलें नाहीं; तथापि जमल्यास या अर्जाची भाषा सौम्य करावी या हेतूनें त्यानें स्ट्राटन येथें एग्मॉन, हॉर्न, मॉंटिनी, बर्धेन वगैरे सरदार लोकांस व कटांपैकीं ब्रेडरोड, श्रुलूस वगैरे मंडळीस मेजवानीच्या मिषानें एकत्र जमविलें. हा समाज गोळा करण्याचा दुसरा हेतु असा होता कीं, ठिकठिकाण- च्या माजिस्ट्रेटांची संमति मिळवून राष्ट्रसभा भरविण्याचा घाट घालावा; व अशा कायदेशीर व राजनिष्ठ प्रवृत्तींत लोकांचीं मनें वळवून भावी अनर्थ टाळण्याचा यत्न करावा. परंतु हा ऑरेंजचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. जमलेल्या सरदारांपैकीं मेघेमप्रभृति राजनिष्ठ सरदारांना कटवाल्यांचे धाडसी बेत ऐकून अत्यंत राग आला, व त्यांची निर्भर्त्सना करून ते या समाजांतून निघून गेले. ऑरेंजच्या सूचनेवरून कटवाल्यांच्या विज्ञप्ति- अर्जांत बरेच फेरफार करण्यांत आले. या वेळेपासून मेघेमचा ऑरेंजशीं संबंध अगदीं तुटला. तो यापुढें कायमचा सरकारपक्षास जाऊन मिळाला.

यानंतर थोड्याच दिवसांनीं दरबारी-मंडळाच्या बैठकींत मेघेमनें येऊन पार्माला असें कळविलें कीं, नेदर्लंडच्या आंतील व बाहेरील पाखंडी लोकांचा एक मोठा गुप्त कट झाला असोन त्यांनीं सुमारें पसतीस हजार सैन्य गोळा केल्याची नक्की बातमी आहे. या कटवाल्यांचा धर्मस्वातंत्र्य तावडतोब न मिळाल्यास देशावर स्वारी करून लुटालूट करण्याचा विचार आहे; व त्यांपैकीं सुमारें पंधराशें हत्यारबंद लोक आठचार दिवसांत खुद्द रीजंटसाहेबांपुढें मूर्तिमंत हजर होणार आहेत. या बातमींत एग्मॉननें

अशी भर घातली कीं, राजास पदच्युत करून दुसरा राजा गादीवर बसविण्याचा त्यांचा बेत आहे. ऑरेंजनें या गोष्टीबद्दल खरी हकीकत पत्रद्वारा राणीस पूर्वी कळविलीच होती; तीच त्यानें या वेळीं तोंडानें पुनः कळविली. त्यावर कांहीं भवति न भवति होऊन पार्मानें फिलिपला एकाएकीं असें कळविलें कीं, लोकांच्या मागण्या कबूल करणें अगर त्यांच्यावर हत्यार उचलणें याशिवाय आतां तिसरा मार्ग उरला नाहीं. यापुढें आगामी विज्ञप्ति-अर्जासंबंधानें मंत्रीसभेंत दररोज वाद होऊं लागला. अरेंबर, मेघेम, बर्लेमॉन वगैरे राजपक्षीय सरदार असें सुचवीत होते कीं, अर्जदार लोकांस सभेंत येण्यास परवानगी देऊं नये व जरूर पडल्यास त्यांस सक्तीनें प्रतिबंध करावा; अगर त्यांस सभेंत कोंडून त्यांची कत्तल उडवावी. ऑरेंजनें अर्थातच या वेडगळ सूचनांचा निषेध केला. एग्मॉन या वेळीं मेघेम वगैरे मंडळींचा कांसोटा धरून चालत होता. कटवाले लौकरच जमावानें अर्ज घेऊन येणार अशी खात्री वाटल्यावरून पार्मानें मंत्रीमंडळ, सरदार लोक व संस्थानिक यांची सभा भरवून तिजपुढें "अर्ज घेऊन येणाऱ्या कटवाल्यांची काय वासलात लावावी ?" असा प्रश्न मांडला; व सरहद्दी-वरील मॉन्स या तटबंदी शहरांत जाऊन राहण्याचा आपला विचार तिनें त्यांस कळविला. अर्जदार लोकांस मज्जाव करणें व राणीनें स्थलांतर करणें या दोन्ही गोष्टींपासून सरकारचा दुर्लौकिक होईल असा सर्वांचा अभिप्राय पडला. शेवटीं अर्जदारांनीं बिनहत्यारीं यावें असें या सभेंत ठरलें.

सुमारें तीनशें लोकांच्या जमावासह ब्रेडरोडनें जाऊन रीजंटच्या हातांत अर्ज द्यावा असा कटवाल्यांचा संकेत ठरला होता. ब्रेडरोड हा हॉलंडच्या जुन्या राजघराण्यांपैकीं असल्यामुळें, त्याच्या कृत्यासंबंधानें विलक्षण तर्क लोकांत सुरू झाले. अविचारी, गडबड्या, विषयलंपट, परंतु शूर, दयार्द्र व विशाळ अंतःकरणाचा असा हा पुरुष अकराव्या शतकांतील आपल्या लढाऊ, मद्यपी व लुटारू पूर्वजांचें नांव कायम राखण्यास सर्वस्वी लायख होता. परंतु सोळाव्या शतकांत लोकपक्षाच्या पुढाऱ्यांस लागणारी मुत्सद्दी-गिरी त्याच्यांत बिलकुल नव्हती. आपल्या घराण्याचें जुनें वैभव पुन्हां उज्जीवित करण्याचा त्याचा विचार होता. स्पॅनिश लोकांप्रमाणेंच

साध्या पाण्याचा तो द्वेष्टा होता; मद्याशिवाय दुसऱ्या पेयाचा उपयोग कधींही करूं नये असा त्याचा स्नेहीमंडळीस आग्रहपूर्वक उपदेश असे; व मद्याच्या साहाय्यानेंच देशाचा उद्धार करण्याचा त्याचा निश्चय होता. तारीख ५ एप्रिल १५६६ रोजीं दोनप्रहरचे सुमारास क्युलेंबरच्या वाड्यांत सर्व कटवाले लोक जमून दोन दोन असे रांगेनें एकामागून एक पायानें डचेसच्या वाड्याकडे निघाले. या जमावांत नेदर्लंडांतील पुष्कळ उच्च घराण्यांचे वंशज होते. या एकंदर लोकांनीं उमदे दरबारी पोषाक घातले होते. सरतेशेवटची जोडी ब्रेडरोड व लुई नॅसा यांची होती. राजवाड्यापुढील चौकांत या देशोद्धारक मानलेल्या गृहस्थांचा सन्मान करण्याकरितां लोकांची बरीच गर्दी जमली होती; त्यांनीं ही मालिका येतांच त्यांचा वारंवार जयजयकार केला. मंडळी एकदम दिवाणखान्यांत शिरतांच राणीचें मन थोडें भयकंपित व विकारवश झालें. सभास्थानीं सर्व लोक आल्यावर ब्रेडरोड पुढें झाला, व रीजंटला अदबीनें मुजरा करून त्यानें प्रस्तावनेदाखल थोडें भाषण केलें. त्याचा सारांश असा होताः "आह्मी एक विज्ञप्ति-अर्ज सरकारच्या चरणीं अर्पण करण्याकरितां आलों आहों; दंगाधोपा, राजद्रोह, बाहेरील लोकांच्या साहाय्यानें गुप्तकट व राज्यक्रांति वगैरे करण्याचा आमचा इरादा असल्याची भलतीच बातमी ऐकिवांत आहे; पण ती निराधार असून, कोणी तरी आमच्या हितशत्रूनें आमची नालस्ती करण्याच्या हेतूनें पसरली असावी. ही बातमी पिकविणारांचीं नांवें आम्हांस समजावीं, व त्यांची चौकशी होऊन त्यांस योग्य शासन मिळावें." नंतर हा विज्ञप्ति-अर्ज वाचण्यांत आला; तो राजनिष्ठ व नेमस्त भाषेंत लिहिला होता. अर्जदारांचें त्यांत असें मागणें होतें कीं, 'धर्मशासनें व धर्मसभा यांच्या योगानें देशांत बंड होण्याचीं चिन्हें दिसत आहेत; व तसें झाल्यास आपल्या मालमत्तेचें फार नुकसान होईल; शिवाय धर्म-संशोधनामुळें कोणावर कोणत्या वेळीं काय प्रसंग येईल याचा नेम लागत नाहीं. करितां राजाकडे पुन्हां वकील पाठवून त्याच्याकडून राष्ट्रसभा भरवावी; त्या सभेच्या विचारानें नवीं धर्मशासनें ठरेपर्यंत सध्यांच्या हुकुमांचा अंमल बंद ठेवावा, व कोणासही देहांत प्रायश्चित्त

तूर्त देण्यांत येऊं नये." अर्जाचें वाचन चाललें असतां राणीच्या मनाची बरीच चलबिचल झाली; व वाचन संपल्यावर ती कांहीं वेळ स्तब्ध राहिली; तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. मंडळीस बाहेरच्या दिवाणखान्यांत बसण्याची सूचना होऊन मंत्रीमंडळांत अर्जाचा विचार सुरू झाला. ऑरेंजनें "ही आलेली मंडळी सभ्य, कुलीन व राजनिष्ठ असून अधिकाऱ्यांस मदत करण्याची त्यांची इच्छा दिसते." वगैरे गोष्टी सांगून पार्मास धीर दिला. एग्मॉननें या समयीं प्रकृति नादुरुस्त असल्याचें मिष करून हवा पालटण्यासाठीं ब्रुसेल्समधून पाय काढला. बर्लेमॉन या प्रसंगीं ह्मणाला, "राणीसाहेब, या भिक्षेकऱ्यांची किंमत काय? त्यांना आपल्या जहागिरी व वतनें संभाळण्याची अक्कल नाहीं; असें असून ते राजास व आपणास राज्य करण्यास शिकवीत आहेत. माझ्या मतें त्यांस धक्के मारून घालवून द्यावें." मंत्रीमंडळ कांहीं वेळ बरखास्त होऊन पुन्हां दोनप्रहरीं भरण्याचें ठरलें. मधल्या अवधींत कटवाले रस्त्यांमधून वल्गना करीत फिरूं लागले. यावेळीं ही मंडळी रस्त्यानें चालली असतां आपल्या माडीवरील खिडकींतून बर्लेमॉन अरेंबरला म्हणाला, "ते पहा प्रतिष्ठित भिक्षेकरी चालले आहेत!"

दुसरे दिवशीं विज्ञप्ति-अर्जास जबाब मिळाला. पार्मानें राजाकडे वकील पाठविण्याचें कबूल केलें; व मंत्रीमंडळाच्या, प्रांतिक सुभेदारांच्या व इतर प्रतिष्ठित लोकांच्या विचारानें राजशासनें सौम्य करण्याचा यत्न चालू असल्याचें अर्जदारांस कळविलें. तूर्त राजाच्या आज्ञेशिवाय धर्मसभा आणि पूर्वींचे जाहिरनामे यांचा अंमल तहकूब ठेवण्याचा आपणास स्वतंत्र अधिकार नाहीं; राजास त्या विषयासंबंधानें मुद्दाम विनंतिपत्र जाणार आहे; तेवढ्यावरच लोकांनीं सध्यां तृप्त राहिलें पाहिजे; दरम्यान धर्मशासकांस बेतानें व विचारानें वागण्याबद्दल हुकूम पाठविण्यांत येतील, असें अभिवचन राणीकडून या वेळीं मिळालें. पुढें दोन दिवसांनीं कटवाल्यांनीं रीजंटपुढें दुसरा एक अर्ज मांडला. त्यांत, जुन्या धर्माच्या बळकटीकरितां राष्ट्रसभेनें नवीं शासनें ठरवावीं; तीं मान्य करण्याची आपली तत्परता असून आपल्या वर्तनाबद्दल बिलकुल शंका घेण्याचें

कारण नाहीं; आपला अर्ज सरकारमार्फत छापून प्रसिद्ध व्हावा; व शेवटीं आपलें कर्तव्यकर्म करण्यापलीकडे कटवाल्यांनीं कांहीं अत्याचार केला नाहीं असें जाहिर करावें; वगैरे विधानें केलीं होतीं. शेवटच्या गोष्टी-विषयीं राणीनें असें बोलून दाखविलें कीं, " अर्जदारांची खरी योग्यता त्यांच्या पुढील वर्तनावर अवलंबून राहील. " इतकी वडी कामगिरी बजावल्यावर कटवाले श्रमभोजनाच्या तयारीस लागले. कांहीं गृहस्थांनीं चांगले पोषाक करून सरकारांत अर्ज पटविल्यानें व त्यानंतर बड्या मेजवान्या झोडल्यानें एखाद्या राष्ट्रास राजकीय व धार्मिक स्वातंत्र्य मिळणें शक्य असतें तर तेवढें काम केल्याचें श्रेय ब्रेडरोडप्रभृति कटवाल्यांस पूर्ण-पणें मिळालें होतें. पण दुर्दैवानें ही जवळ दिसणारी स्वातंत्र्यभूमि व नेदर्लंड राष्ट्र यांच्या दरम्यान, एक रक्ताचा समुद्र व घनघोर युद्धप्रसंगाचीं बरींच वर्षें पडलीं होतीं.

अर्ज पटल्यानंतर क्युलेंबरच्या वाड्यांत, तारीख ८ एप्रिल रोजीं, बडा खाना झाला; रुप्याचीं व सोन्याचीं भांडीं खान्याच्या मेजावर जिकडे तिकडे चमकत होतीं; व मद्याचे पेले फार शीघ्रगतीनें मंडळींत फिरत होते. अशा ऐनरंगाच्या वेळीं आपल्या कटास ' ऐक्यवर्धक मंडळी, ' ' स्वातंत्र्य-संस्थापक मंडळी ' वगैरेंपैकीं कोणतें नांव ठेवावें याबद्दल विचार सुरू झाला. शत्रूंनीं आपणास दूषणास्पद म्हणून ठेविलेलें नांव भूषणास्पद करून, लोकप्रियता संपादन करण्याची व उलट पक्षाचा मानभंग करण्या-ची कला ब्रेडरोड यास चांगली साधली असल्यामुळें मंडळींत एकदम उठून तो म्हणाला, " बर्लेमॉन वगैरे मंडळींनीं काल आम्हांस भिक्षेकरी म्हटलें आहे; आपण तेंच नांव धारण करूं, आणि भिक्षेकऱ्याची झोळी खांद्यावर येईपर्यंत राजनिष्ठ राहून धर्मच्छलाशीं झगडण्याचा निश्चय करूं. " हें भाषण संपवून त्यानें खूण करितांच नोकरानें एक भिक्षेकऱ्याची झोळी व लांकडाचा कमंडलु ब्रेडरोडपुढें आणून ठेविला. ब्रेडरोडनें झोळी गळ्यांत अडकवून कमंडलु मद्यानें भरला, व ' भिक्षेकरी चिरायु असोत, ' असा मंत्रोच्चार करून तो सबंध घशांत ओतला. हें कृत्य झाल्यावर त्यानें झोळी आपल्या शेजारीं बसलेल्या गृहस्थाच्या गळ्यांत टाकून कमंडलु त्याच्या पुढें ठेविला. त्यानेंही ब्रेडरोडप्रमाणेंच कृति केली. तेथपासून तो

किता इतरांनीं उचलिला. भिक्षेकरी या शब्दाचा महिमा या राष्ट्राच्या इतिहासांत पुढें इतका वाढला कीं त्याची गर्जना समुद्र, भूमि, पेटलेलीं शहरें, रक्तानें भरलेलीं जहाजें व समरांगणें यांत वारंवार ऐकूं येत असे. वर सांगितल्याप्रमाणें सर्वांचा विधि आटोपल्यावर एका खांबावर ती झोळी व कमंडलु टांगून ठेवण्यांत आले; व या कमंडलूंत जमलेल्या प्रत्येक पाहुण्यानें मीठ टाकलें. नंतर झोळी, कमंडलु आणि नीमक यांना साक्षी ठेवून सर्वांनीं शपथ वाहिली कीं, कोणताही प्रसंग आला तरी भिक्षेकऱ्यांचा निश्चय बदलणार नाहीं. पुढें मंडळींची दंगल सारखी चाललीच होती. याच वेळीं ऑरेंज, हॉर्न व एग्मॉन हे तिघे रीजंटकडे जातांना हूस्ट्रॉटनला शोधण्याकरितां वाटेंत क्युलेंबरच्या वाड्यांत शिरले. तेथील स्थिति पाहून त्यांस अतर्क्य आश्चर्य वाटलें. तितक्यांत उभ्याउभ्याच मंडळीस हा समारंभ आटोपता घेण्याची विनंति करून ते पुढें चालते झाले.

या भिक्षेकऱ्यांनीं आपल्या नांवास शोभेलसा एक करड्या रंगाचा पोषाक तयार करवून तो घालण्याचा प्रघात सुरू केला. शिवाय गळ्यांत अगर टोपीच्या बुदामावर ते एक बिल्ला घालूं लागले; त्याच्या एका बाजूस फिलिपचा मुखवटा व दुसऱ्या बाजूस "भिक्षेकऱ्याची झोळी अंगावर येईपर्यंत राजाचा आज्ञाधारक," अशीं अक्षरें खोदलीं होतीं. हे सर्व प्रकार झाल्यावर कटवाले लोक आपापल्या गांवीं चालते झाले. ब्रेडरोडनें जातांना अँट्वर्प शहरांत मुक्काम केला. तेथें त्याच्या वसतिगृहाजवळ हजारों लोकांचे थवे जमले. त्यांच्यापुढें कमंडलु व झोळी यांसह येऊन धर्मशासनें व धर्मसभा यांपासून लोकांचें संरक्षण करण्याच्या कामीं आपण आपला प्राण खर्ची घालण्यास तयार आहों, असें त्यानें त्यांस आश्वासन दिलें. त्यावर लोकांनीं त्याचा जयजयकार केला. या सर्व गोष्टी राजाकडे लिहून गेल्या. लोकांत अशी बातमी उठली कीं, कटवाल्यांचा विज्ञप्ति-अर्ज फलप्रद होऊन धर्मशासनें बरींच सौम्य होणार, धर्मसंशोधन बंद होणार, धर्मस्वातंत्र्याचा झेंडा अखेर एकदांचा फडकणार. ही वार्ता ऐकून विदेशीं जाऊन राहिलेले व देशांत छपून बसलेले नवीन पंथाचे लोक डोकीं वर काढूं लागले व शिंगें हालवूं लागले. इकडे धर्म-

शासकांस नेमस्तपणानें वागण्याचा हुकूम करून पार्मानें दोन इसमांस हातपाय तोडून मंदाग्नीवर जिवंत जाळण्याची शिक्षा स्वतः दिली.

खास ( न्याय )-मंडळ व तेरा ख्रीसजमातीचे संस्थानिक मिळून वसून त्यांनीं त्रेपन्न कलमांचें " नेमस्तपणा " नामक एक शासन तयार केलें. या कलमांचा मथितार्थ एवढाच कीं शिक्षेच्या सदरांत अग्नीच्या ठिकाणीं फांसाची योजना केली होती. कॅथोलिक धर्माशिवाय इतर धर्म यांत स्पष्टपणें अग्राह्य ठरविले होते; प्रार्थनेकरितां सार्वजनिक अगर खाजगी मेळे भरविण्याची पूर्वीप्रमाणेंच सक्त मनाई केली होती; नवीन पंथांसंबंधीं लेख अगर धर्मशास्त्राबद्दल चिकित्सा यांचाही यांत निषेध केला होता. हे नियम मोडणारांचे दोन वर्ग केले होते; कुमार्ग-प्रवर्तक व कुमार्गप्रवृत्त; पाहिजेल त्या मनुष्यास पहिल्या वर्गांत घालण्याची सवड या शासनावरून ठेविली होती. धर्मोपदेशक, शिक्षक, व्याख्याते, नवीन पंथांचे पुरस्कर्ते यांस फांसाची शिक्षा ठरविली असून त्यांची मालमत्ता सरकारांत जप्त करण्याचा हुकूम होता. दुसरे पाखंडी ह्मणजे धर्मविषयांची वाटाघाट करणारे, विद्यापीठांत शास्त्राचें अध्ययन न करितां धर्मशास्त्राचें अवलोकन व निरूपण करणारे, नवीन धर्माप्रमाणें एखादा कार्यप्रसंग ज्याच्या घरीं झाला असेल असे घरवाले, व नवीन पंथांच्या धर्मोपदेशकांस अगर अध्यापकांस थारा देणारे; या सर्वांस देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा ठरविली होती. या शिक्षेंतून कोणीच सुटला नव्हता; मात्र प्रथमच घडलेल्या गुन्ह्याबद्दल अनुताप दर्शविणारांस माफी मिळावी अशी तजवीज नवीन शासनांत केली होती.

या नवीन शासनास लोकांनीं 'यमदंड' असें टोपण नांव ठेविलें. हें प्रसिद्ध होतांच आर्ट्वा, हेनो, फ्लँडर्झ येथील प्रांतिक सभांनीं बर्धेन व मॉंटिनी यांस माद्रिदला जाण्याकरितां वकील नेमून त्यांच्या माहिती-करितां एक लांबलचक समजुतीचें टिपण तयार करविलें. हे वकील अस्सल कॅथोलिकधर्मी असून खरे राजनिष्ठ होते; परंतु ते नेदर्लंडच्या राष्ट्रीय हक्कांचे कैवारी व धर्मच्छलाचे द्वेष्टे असल्यामुळें त्यांच्याविषयीं अगोदरच पुष्कळ कागाळ्या राजाकडे जाऊन पोंहोचल्या होत्या. धर्म-शासकांच्या शिक्षांची बजावणी न केल्याबद्दल त्यांस लौकरच राज-

द्रोहाची शिक्षा मिळाली. मॉंटिनी मे महिन्याच्या अखेर स्पेनला निघाला. वाटेंत पारिसमध्यें असतांना, " फिलिपच्या मनांत तुमच्याविषयीं फार दीर्घ द्वेष असून कांहीं दुष्ट विचारही घोळत आहेत, करितां कांहीं मिष करून तुह्मी स्पेनला जाण्याचें टाळा, " असें एका दोघा बड्या लोकांनीं त्यास सुचविलें. परंतु ही सूचना न जुमानतां जूनच्या १७ व्या तारखेस तो माद्रिद् येथें जाऊन पोंहोचला. बर्धेनच्या पायाला कांहीं दुखापत झाल्यामुळें तो पंधरा दिवस मागून माद्रिदला गेला. पार्मा व कॅंटोनामक राजाचा गुप्त बातमीदार यांनीं यावेळीं नेदर्लंडमध्यें चाललेल्या गडबडीचे खरे उत्पादक माद्रिद येथें आलेले वकीलच होत, असें राजास लिहिलें. ह्या माहितींत ग्रॅन्व्हिलनेंही आपल्याकडून बरीच भर घातली. मॉंटिनी स्पेनमध्यें येऊन पोंहोचतांच त्यास पहिली भेट देऊन राजानें त्याचें स्वागत मोठ्या प्रेमानें केलें; आणि त्यास असें पूर्ण आश्वासन दिलें कीं, बाहेर कितीही खोट्या बातम्या असल्या तरी नेदर्लंडच्या जहागिरदारांविषयीं आपल्या मनांत बिलकुल किल्मिष नाहीं; मात्र या व पुढील भेटीपासून फलनिष्पत्ति फारच थोडी झाली. हे वकील स्पेनमध्यें असल्या वेळींच राजानें आपल्या दरबारांतील पोपचा वकील सोरेंटो यास कांहीं राजकारणाच्या मिषानें ब्रुसेल्स येथें पाठविलें. त्याच्या जाण्याचा खरा उद्देश धर्मशासनांस जोर आणून नवीन धर्ममतांचा उच्छेद करणें हा होता. चितेच्या ठिकाणीं फांसाची योजना करणारें नवीन शासन अर्थातच पोकळ होतें.

या बंडाच्या नाटकांतील पुढील मोठा भाग करून दाखविण्यास सामान्य लोकांनीं स्वतःच कंबर बांधली; आणि राजा व राष्ट्राचें स्वातंत्र्य-रक्षक ह्मणविणाऱ्या पोषाकी व मध्यप्रिय सरदार यांस माना खालीं घालण्यास लाविलें. इ. स. १५६६ च्या उन्हाळ्यांत हजारों व्यापारी, शेतकरी, शहरवासी, प्रतिष्ठित व सुखवस्तु लोक गांवोगांव छोट्या बंदुका, भाले व कट्यारी घेऊन शेतांतून मोठमोठे जमाव करून फिरतांना दृष्टीस पडूं लागले. त्यांचा उद्देश उघड्या मैदानांत धर्मशास्त्राचें निरूपण ऐकून ईश्वर-भजन करावें एवढाच असे. कारण हीं कृत्यें देवळांत करणें यावेळीं कायद्यानें महत्पाप ठरविलें होतें. धर्मशासनांचा अंमल सारखा चालू

होताच; रीजंटनें धर्मासंबंधीं सर्व भयंकर कायदे पूर्णपणें अमलांत आहेत असें मुद्दाम जाहीर केलें होतें; व जिवंत किंवा मृत धर्मोपदेशकांस पकडून आणण्याबद्दल मोठालीं बक्षिसें लागलीं होतीं. तथापि नवीन मतांप्रमाणें धर्माचरण करण्याची लोकांची इच्छा अंधारांत राहून तृप्त होईना. धर्मच्छलांस कांहीं वेळ थोडी मंदी आल्यामुळें धैर्य येऊन, व विज्ञप्ति-अर्ज व त्यानंतर घडून आलेल्या गोष्टीमुळें अंगीं हुरूप भरून नवीन पंथांचे लोक आपल्या दब्याच्या जागेंतून बाहेर आले; व प्रसिद्ध-पणें उघड्या मैदानांत आपला धर्मस्वभाव प्रगट करूं लागले. आपल्या नैसर्गिक आणि रूढ हक्कांसंबंधीं लोकांच्या मनांत जागृति झाल्यामुळें, ह्या जमावांची संख्या दिवसेंदिवस वाढत जाऊन त्यांस जास्त जोर येत चालला. हा उघड्या मैदानांत प्रार्थना करण्याचा प्रकार सर्व देशभर पसरला. प्रथम फ्लँडर्समधील धर्मांतर केलेल्या कांहीं उपदेशकांनीं ठिकठिकाणीं उघड्या मैदानांत प्रार्थनेकरितां जमाव जमविण्याचा क्रम सुरू केला. तो कित्ता कांहीं टोप्या विणणारे शिंपी, कातडीं व कापड रंगविणारे रंगारी व कांहीं सरदार वगैरे लोक यांनीं एकदम उचलला. घेंटजवळ मॉर्डेट नामक उपदेशकाचें व्याख्यान ऐकण्याकरितां एका प्रसंगीं सहा सात हजार लोकांचा जमाव जमला. टुर्नेजवळ अँब्रोज, विली, लाग्रेंज या लोकप्रिय उपदेशकांचीं व्याख्यानें ऐकण्याकरितां सहा हजारांपासून वीस हजारांपर्यंत लोक जमत असत. अशा प्रसंगीं निम्मा समाज सभेस हत्यारबंद येत असे. या सभा बंद करण्याविषयीं अधिकाऱ्यांचे एकामागून एक हुकूम सुटूं लागले. विली यास पकडून देण्याकरितां सरकारानें मोठें बक्षीस लाविलें. एके प्रसंगीं शंभर हत्यारबंद घोडेस्वारांनीं त्यास प्रार्थनेच्या ठिकाणीं सुरक्षितपणें आणून पोंहोचविलें. त्या प्रसंगीं तो श्रोत्यांस ह्मणाला, "नुसत्या धाकदपटशानें अगर राजभयानें सद्धर्म सोडूं नका. ईश्वराच्या आज्ञेवरून आम्ही उपदेशाचें काम करीत आहों; आम्हांस मृत्यूचें भय बिलकुल वाटत नाहीं, आणि आमच्या देहावर कांहीं संकट आल्यास खऱ्या धर्माचें काम पुढें चालविण्यास शेकडों लायख लोक पुढें सरसावतील !" बहुतेक सुखवस्तू लोक, श्रीमान् व्यापारी, बडे लोक, लहान लहान कारखानदार व मजूर सुद्धां हीं व्याख्यानें ऐकण्यास

जात असत. राणीचे सक्तीचे हुकूम सुटत होते; परंतु त्यांची बजावणी होणें मनुष्यांच्या व हत्यारांच्या अभावामुळें शक्य नव्हतें. फ्लँडर्समध्यें लोक प्रार्थनेस पूर्ण हत्यारबंद येत. प्रार्थनेच्या जागेसभोंवतीं झाडांच्या फांद्या, फळ्या व उलटून ठेविलेले गाडे यांचा तट बनवून, आंत येण्याच्या रस्त्यांवर बंदोबस्ताचे पहारे बसवून, व लांबवर टेहळणी करणारे लोक ठेवून, आंत या समाजांचें प्रार्थनेचें काम चालत असे. या ठिकाणीं कायद्यानें मनाई केली असतांही छापील धर्मपुस्तकें विकण्याचा व्यापार धडाक्यानें चालत असे. हॉलंडमध्यें गेब्रियलचें पहिलें व्याख्यान हार्लेमजवळ झालें. हें व्याख्यान ऐकण्याकरितां हजारों लोक आसपासच्या प्रदेशांतून जमले. लोकांनीं हॉर्लेममध्यें येऊं नये ह्मणून वेशीचे दरवाजे बंद ठेवण्याचा हुकूम झाला होता; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नेहमींच्या परिपाठाप्रमाणें मैदानांत तटबंदी, पहारे वगैरे तयारी कडेकोट झाली. समाज मोठा जमला होता तरी सभा फार व्यवस्थित रीतीनें बसविली होती. उपदेशकाच्या पीठाजवळ स्त्रियांस जागा केली होती. सर्व जमलेल्या मंडळींनीं, एक ईश्वराचें स्तुतिपर पद उच्च स्वरानें ह्मटल्यानंतर निरूपणास सुरवात झाली. निरूपणाच्या वेळीं श्रोत्यांची वृत्ति इतकी तल्लीन झाली कीं त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. या सुमारास उघडया मैदानांत जमाव भरविण्याचा प्रघात सर्वत्र पडला; व या जमावांची संख्या क्वचित् प्रसंगीं तीस हजारांपर्यंत जात असे. या संघशक्तीपुढें धर्मशासनें लुळीं पडलीं. सैन्याच्या मदतीवांचून हे जमाव बंद करणें शक्य नव्हतें. सुधारक वर्गांत कॅलव्हिनपंथी लोकांचा विशेष भरणा होता. ऑरेंज हा कॅल्व्हिन व पुनःसंस्कारवादी ( Anabaptist ) वर्गांच्या प्रथम अगदीं विरुद्ध होता; तथापि ल्यूथरमताकडे त्याची हळू हळू प्रवृत्ति होऊं लागली. ल्यूथरमताचा अंगिकार करण्यांत कदाचित् प्रसंग पडल्यास जर्मनींतील ल्यूथरधर्मी संस्थानिकांची नेदर्लंडास मदत मिळावी हा त्याचा अंतस्थ हेतू असावा.

एग्मॉन हा नवीन पंथाचें पुढारीपण घेईल अशी पुष्कळांची समजूत होती. परंतु ती व्यर्थ झाली. राजाच्या बाजूनें हत्यार घेण्याचेंही त्यास धैर्य होईना. त्याच्या अंमलाखालील फ्लँडर्स प्रांतांत

या प्रार्थनेच्या मेळ्यांचा सुळसुळाट झाल्यामुळें कॅथोलिक लोकांस बरीच दहशत उत्पन्न झाली. आपल्या सुभेदारानें प्रांतांत येऊन रहावें असा त्यांचा आग्रह पडला. अँट्वर्पच्या लोकांनीं शहरांत स्थिरस्थावर करण्याकरितां ऑरेंजची मागणी केली. तो या शहरचा वतनदार ग्रामाध्यक्ष ( Burgomaster ) होता. ही व्यवस्था पार्मालाही अवश्य वाटली. मेघेम, अरेंबर वगैरे सरकार पक्षाचे लोक या संधीस शहरांत आल्यामुळें शिबंदी पलटणें व दारू गोळा आणून शहरचा बंदोबस्त होणार अशी आवई पसरली. ब्रेडरोड अद्याप तेथेंच होता. तो गांवांतील उनाड सरदारमंडळी रात्रंदिवस आपल्या वसतिगृहांत जमवून मेजवान्या व दंगल करण्यांत गुंतला होता. ब्रेडरोडचा कंपू वेळीं अवेळीं मोठे जमाव करून शहरांतून फिरत असे. या सर्व कारणांमुळें शहरच्या अधिकाऱ्यांस मोठी चिंता उत्पन्न झाली. प्रस्तुत गोष्टींचा बराच खल करून त्यांनीं रीजंटकडे असा निरोप पाठविला कीं, ‘शहरांत सरकारचीं पलटणें घालूं नयेत; शहरांत शांतता राखण्याबद्दल जबाबदारी आह्मी आपले शिरावर घेतों; मात्र मेघेम, अरेंबर, ब्रेडरोड वगैरे मंडळींस एकदम शहर सोडून जाण्याचा हुकूम व्हावा. लोकांची व रीजंटची विनंति मान्य करून ता. १३ जुलै रोजीं राजपुत्र अँट्वर्प शहरांत आला. त्याचें स्वागत करण्याकरितां या समयीं सर्व शहर गजबजून गेलें. अधिकारी व शहरचे प्रमुख लोक त्यास सामोरे आले. या समाजांत ब्रेडरोड व तत्पक्षीय लोक हजर होते. रस्त्यानें ऑरेंजच्या नांवाचा जयघोष चालला होता. मधून “भिक्षेकऱ्यांचा विजय असो” असे ध्वनि निघूं लागले. ते ऐकतांच ऑरेंजनें त्यांचा निषेध केला. खुद्द स्वतःचा जयजयकार करण्यास सुद्धां त्यानें नापसंती दर्शविल्यावरून समारंभ आटोपता घेऊन लोक आपापल्या घरीं गेले. फक्त ग्रामसभेचे सदस्य त्यास नेमलेल्या भोजनगृहांत घेऊन गेले. तेथें पोंहोचतांच त्यानें कामास सुरवात केली. शहरांत स्थिरस्थावर करण्याच्या कामीं योग्य उपाय ठरविण्याचा त्यानें विचार सुरू केला. शिवाय ग्रामसभा, प्राचीनसभा, पेठांचे मुखत्यार, व्यापाऱ्यांचे प्रतिनिधि व इतर संस्था यांच्यांशीं दळणवळण सुरू करून त्यांचे

त्यानें अभिप्राय घेतले. सर्वानुमतें असें ठरलें कीं, नवीन पंथी लोकांस शहरच्या प्रार्थनामंदिरांत येऊं देऊं नये; परंतु आसपासच्या प्रदेशांत मर्जीनुरूप प्रार्थना करण्यास त्यांस मोकळीक असावी. ऑरेंजच्या मताप्रमाणें शहरच्या रखवालीस स्वतंत्र पलटणें ठेवून त्यांचा खर्च सोसण्यास शहरवासी लोक तयार होईनात. याप्रमाणें रीजंटची महत्वाची कामगिरी ऑरेंज मोठ्या मेहनतीनें व कळकळीनें करीत होता. त्याच्या बुद्धिमत्तेबद्दल व कर्तबगारीबद्दल कोणासच संशय उरला नव्हता. खुद्द राजानें व पार्मानें पत्रद्वारा "मनोभावानें" त्याचे आभार मानिले; व त्यावर आपला पूर्ण विश्वास असल्याचें शब्दांनीं प्रगट केलें. इकडे पार्मानें खाजगी रीतीनें राजास असें कळविलें कीं, ऑरेंजचा नवीन पंथास सवलती देण्यांत, दंगाधोपा माजवून हॉलंड प्रांत काबीज करावा व आपल्या मित्रमंडळींची सत्ता वाढवावी असा अंतस्थ बेत आहे. ही बातमी निःसंशय मनःकल्पित होती. राजपुत्राला पार्मा व फिलिप यांच्या लेखांची योग्यता पूर्ण समजली होती. त्याचें वर्तन सरळ व राजनिष्ठ होतें. धर्मशासनें रद्द करून व राष्ट्रसभा भरवून तिच्या विचारानें धर्ममतांचा नैसर्गिक ओघ यथाक्रम वाहूं देणें राजाचें कर्तव्य होतें; त्याला निश्चयानें व चातुर्यानें हा मार्ग दाखवून देणें ऑरेंजचें कर्तव्य होतें. राजपुत्रानें आपलें कर्तव्य बजावलें नसतें तर नेदर्लंडांत लोकसत्ताक राज्य निर्माण झालें नसतें. अँट्वर्पच्या कामगिरींत त्याचें हेंच धोरण होतें. शिवाय सैन्याच्या मदतीवांचून प्रार्थनेचे जमाव बंद झाले नसते. बंडाचें पाऊल बरेंच पुढें असल्यामुळें त्याचा बीमोड एकदम होणें शक्य नव्हतें. इकडे सरकारच्या हुकुमावरून ब्राबंटचा शेरीफ (महाजन) सुधारकांचें पारिपत्य करण्याकरितां सैन्य जमवीत आहे, असा लोकांत पुकारा झाल्यामुळें, ऑरेंजनें घडवून आणिलेलें काम पुन्हां बिघडण्याचा रंग दिसूं लागला.

या व्यवस्थेंत ऑरेंज गुंतला असतां त्याच्या स्वतःच्या मुलखांत— हॉलंड व झीलंड प्रांतांतही उघड्या मैदानांत प्रार्थनेकरितां हत्यारबंद मेळे जमूं लागले होते. तथापि त्यास आपल्या मुलुखांत जाण्यास रीजंटची

परवानगी मिळेना. या गडबडीच्या जुलै महिन्याच्या तेराव्या तारखेस, सत्यप्रवर्तक कटवाल्यांनीं ट्रॉंड येथें मोठा समाज गोळा केला. हा सुमार पंधराशें शिलेदार व त्यांचे नोकरचाकर यांचा फार मोठा जमाव ब्रेडरोड व स. लुई यांच्या पुढारपणाखालीं जमला होता. शहरांतील भोजनगृहांतून व आसपासच्या शेतांतील कोपींतून या लोकांनीं आगष्टच्या पहिल्या आठवड्यापर्यंत तळ दिला होता. यांचा बहुतेक काल ख्यालीखुशालींत व दंगलींत जात असे. कटवाल्यांनीं सध्यां दोन विक्षिप्त प्रश्न हातीं घेतले होते; पहिला, जर पहिल्या अर्जांतील मागण्या सरकारानें मंजूर केल्या, तर पुढें जास्त मागण्या कराव्या किंवा नाहीं? दुसरा, कटांतील लोकांस सरकारानें शासन करूं नये अशाबद्दल सरकाराकडून वचन घेणें जरूर आहे किंवा नाहीं? या दोन्ही प्रश्नांसंबंधानें बराच वाद होऊन मंडळींत बराच मतभेद पडला. शिवाय कटवाल्यांनीं दोन ठराव सर्वानुमतें पसंत केले ते असेः-एक, लोकांस धर्माच्या बाबतींत यत्किंचित् ही त्रास न पोंहोचण्याबद्दल आपणावर जबाबदारी घ्यावी; दुसरा, चार हजार पगारी जर्मन घोडेस्वार, प्रसंगविशेषीं बचावाकरितां म्हणून, नोकरीस ठेवावे. यावरून ही मंडळी बरीच पुढें धांव घेऊं लागली होती, असें दिसून येईल. यावेळीं राणीच्या सूचनेवरून राजपुत्र ऑरेंज हा लोकांच्या मुखत्यारांस भेटला; व त्यानें त्यांस असें निक्षून सांगितलें कीं, 'तुमच्या विज्ञप्ति अर्जांतील मागण्यांचा योग्य विचार व्हावा या हेतूनें राणीनें स्पेन देशीं मुद्दाम वकील पाठविले आहेत; ते राजाचा निरोप घेऊन परत येईपर्यंत तुम्ही देशांत शांतता राखण्याचें आपलें वचन पुरें केलें पाहिजे.' या प्रसंगीं कटवाल्यांनीं हत्यारबंद लोकांचे मेळे बंद करण्याच्या कामीं सरकारास मदत केल्यास विज्ञप्तिअर्जाचा लोकांस फायदेशीर असा निकाल होईल असा राजाकडूनही निरोप आला. कटवाल्यांनीं राजास उलट असें कळविलें कीं, "पूर्वीचीं वचनें वायफळ झालीं आहेत. रीजंटनें आमच्याशीं बेइमानपणाचें वर्तन चालविलें आहे; जुलुम पूर्वीसारखाच अव्याहत चालू आहे; सौम्यपणा केवळ शब्दांत दिसत आहे; धर्मशासकांस नेमस्तपणानें व विचारानें वागण्याविषयीं झालेला हुकूम पंगू व पोकळ आहे; रानटी जनावरांप्रमाणें

धर्मोपदेशकांस पकडून आणणारांस बक्षिसें लाविलीं आहेत; स्पेनमधून सैन्य येऊन त्याचा पेंच बसण्याची भीति आहे; राष्ट्रसभा बोलावण्याचा अद्याप कांहींच विचार दिसत नाहीं; निराशेनें लोक अगदीं बेफाम झाले आहेत; सर्व अनर्थांस सरकारची कुटिल राजनीति कारणीभूत झाली आहे; लोक राजास भय उत्पन्न करण्याकरितां जमत नाहींत, प्रार्थनेकरितां जमतात; इ. इ." सरदार लोकांत या संधीस प्रकृत विषयांची थोडी भवति न भवति होऊन एक लेख तयार करण्यांत आला; तो लुईनें रीजंटपुढें भर कौन्सिलांत मांडला. त्यांत, आपण आपल्या देशबांधवांवर हत्यार धरणार नाहीं; आपल्या सुरक्षितपणाबद्दल सरकारनें खात्री न दिल्यास शांतताभंग झाल्याबद्दल आपणावर कोणतीही जोखीम नाहीं; ऑरेंज, वगैरे सरदारांच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याचें व राष्ट्रसभा भरविण्याचें आश्वासन रीजंटकडून मिळाल्यास, लोकांचीं मनें स्वस्थ करून देशांत शांतता स्थापन करण्याच्या कामीं आपण मदत करूं. या अविचारी लोकांनीं इतकेंही स्पष्ट सांगितलें कीं, आपल्यावर कांहीं तोहमत आल्यास आपला बचाव करण्याकरितां जर्मनीनें मदत देण्याचें अभिवचन दिलें आहे. हें धोरण समजतांच या लोकांचें मागणें एकदम नाकबूल करणेंच श्रेयस्कर आहे असें मंत्रीमंडळांत ठरलें. ट्रॉंड येथील समाज बराच आविर्भाव करून लौकरच आपापल्या ठिकाणीं निघून गेला.

नेदर्लंडदेशांत, शहरोशहरीं व गांवोगांवीं असंख्य देवालयें व जुने मठ होते. मध्ययुगीन कालांतील दीर्घ निद्रेंतून जागृत झालेल्या गॉथिक लोकांच्या बुद्धीनें पदार्थविज्ञानशास्त्र व शिल्पज्ञान वगैरेंनीं प्रेरित होऊन जे अलौकिक शिल्पविषयक चमत्कार निर्माण केले त्यांची साक्ष या भव्य जुन्या इमारतींतून पटत असे. या ठिकाणीं जगविख्यात डच् चित्रकारांच्या कृति टांगून ठेवल्या असत; सर्व देवळांतून व मठांतून नामांकित शिल्पकारांच्या हातच्या दगडाच्या मूर्ति भिंतींमधून बसविल्या होत्या व देवळांत जागोजाग लहान लहान प्रार्थनेच्या ओवऱ्या फार शोभिवंत व मूल्यवान् पदार्थांनीं बांधल्या असत. या संस्थांची वस्तुसंपत्ति अमर्याद होती. भाविक लोकांच्या व नवस करणाऱ्या वगैरे लोकांच्या देणग्यांनीं हीं [illegible] राजमंदिरापेक्षांही जास्त संपत्तिमान् झालीं होतीं. या सुंदर

बांधकामांची सन १५६६ च्या आगष्ट महिन्याच्या दुसऱ्या पंधरवड्यांत पांचसहा दिवसांच्या अवधींत धूळधाण झाली.

अँट्वर्प येथें कुमारी मेरीचें **नॉटर्डेम** नांवाचें विशाल, भव्य व अप्रतिम देवालय होतें. त्यांतून ता. १८ आगष्ट रोजीं दरसालच्या शिरस्त्या-प्रमाणें देवी मेरीच्या प्रतिमेची नगरप्रदक्षिणेकरितां मिरवणूक निघाली. पालखीबरोबर कांहीं नवीन पंथीलोकांचा जमाव दुष्ट हेतूनें निघाला. त्यांनीं मधून मधून शिव्या, अश्लील थट्टा व अभिनय यांची सलामी सुरु केली. "बाले मेरी, तुझा काल समीप आला आहे, ही तुझी शेवटची मिरवणूक आहे. शहरवासी लोकांस तुझा कंटाळा आला आहे." वगैरे उद्गार वारंवार ऐकूं येऊं लागले. त्या दिवशीं पालखी सुरक्षितपणें परत आली; दंगाधोपा कांहीं झाला नाहीं. उत्सवमूर्ति दर्शनाकरितां सांप्रदाया-प्रमाणें पुढें न ठेवितां लोखंडी गजांच्या खोलींत पुजाऱ्यांनीं नेऊन ठेविली. सकाळीं बिथरलेले लोक पुन्हां जमून त्यांनीं गजांबाहेरूनच मूर्तीचा उपहास चालविला. जमलेल्या मंडळींपैकीं एक नवीन मताचा शिल्पकार व्यास-पीठावर चढला, व तेथील एक धर्मपुस्तक घेऊन त्यानें कॅथोलिक धर्माच्या पुराणिकाप्रमाणें पुराण सांगण्याचें नाटक आरंभिलें; जमलेली मंडळी पुराणिकबोवांच्या प्रयोगांत मिळून जास्त टिवल्याबावल्या करूं लागली. इतक्यांत जुन्या धर्माचा कट्टा भक्त, एक खलाशी, तेथें उभा होता त्यास तें सहन न होऊन त्यानें पुराणिकाच्या मागें जाऊन त्यास पाय धरून खालीं ओढलें. त्या शिल्पकारानें पडतांना आपल्या शत्रूच्या अंगावर भार टाकून त्यास गच्च मिठी मारली; व दोघेही कोलांट्या खात पीठाच्या खालीं येऊन पोंहोचले. उभय पक्षांची बरीच झटापट झाली. या दंग्यांत स्वधर्माभिमानी खलाशास दंडावर पिस्तुलाच्या गोळ्याही लागल्या. देवस्थानच्या पहारेकऱ्यांनीं लोक बाहेर घालवून देवळाचीं दारें बंद करून ठेविलीं. सायंकाळीं ग्रामसभेस ही बातमी समजल्यावरून शहरच्या बंदोबस्ताची तजवीज काय करावी याबद्दल सभेंत पुष्कळ बाटाघाट झाली; कांहीं निश्चय ठरेना, सबब त्या दिवशीं सभा तशीच बरखास्त झाली. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं नवीन पंथी लोक पुन्हां देवळा-पाशीं जमाव करून आले. कांहीं क्षुल्लक कारणावरून उभय पक्षांत

मोठी माराहाण जुंपली. सभेची बैठक चालली होती तेथें बातमी समजतांच शहरचा मुख्य मॅजिस्ट्रेट व इतर सभासद दंग्याच्या ठिकाणीं गेले. कांहीं वेळानें मॅजिस्ट्रेटांचें सामोपचाराचें बोलणें ऐकून लोकांनीं दंगा बंद केला. सायंकाळची वेळ येतांच मॅजिस्ट्रेट वगैरे अधिकारी लोकांस आपापल्या घरीं जाण्यास सांगून व महाद्वाराखेरीज देवळाचीं बाकीचीं सर्व दारें बंद करून निघून गेले. त्यांची पाठ फिरतांच लोकांनीं पुनः देवळांत शिरून माराहाण व दंगा सुरू केला. देवस्थानच्या वहिवाटदारांच्या निरोपावरून कांहीं शिपाई घेऊन अधिकारी लोक पुनः दंग्याच्या जागीं आले. तेथील स्थिति अनावर आहेसें पाहून त्यांनीं शहरच्या मुख्य अदालतीच्या संरक्षणाची तजवीज करण्यासाठीं तिकडे मोर्चा वळविला. इकडे संध्याकाळच्या धुपारतीच्या वेळीं सुधारकांचीं प्रार्थनेचीं पदें देवळांत ऐकूं येऊं लागलीं. कांहीं धाडसी लोकांनीं मेरीची मूर्ति खालीं काढून त्यावरील वस्त्रालंकारांसह तिचे हजारों तुकडे केले. मागोमाग इतर मूर्तिभेदक पुढें येऊन त्यांनीं कुऱ्हाडी, घण, शिड्या चाकें, दोरखंड वगैरेंच्या साहाय्यानें सर्व देवळांतील मूर्ति, तसबिरी, तावदानें आणि भिंती व खांब यांवर खोदलेल्या आकृति यांचा विध्वंस करून टाकला. तीच स्थिति पूजेच्या उपकरणांचीही झाली. त्यांनीं सत्तर ओवऱ्या पाडल्या; सर्व जवाहिराच्या पेट्या फोडल्या; नैवेद्याची पवित्र भाकर त्रिवडली, नैवेद्याची मदिरा भिक्षेकऱ्यांच्या नांवाचा जयजयकार करीत सर्व पिऊन टाकिली; सर्व जुन्या पोथ्या पुस्तकें जाळून टाकिलीं, आणि नंदादीपांच्या तेलानें जोडे भिजविले. हें कृत्य स्वतः करणारे सुमार शंभर लोक होते; प्रेक्षकसमुदाय बराच असावा. नॉटर्डेम देवळांतील कामगिरी उरकल्यावर हातांत मशाली घेऊन मूर्तिभेदक लोक गांवांतून फिरूं लागले; व जेथें जेथें ईश्वराची अगर साधूची प्रतिमा दिसेल, अगर क्रूस अगर कॅथोलिक धर्माचें दुसरें एखादें चिन्ह सांपडेल त्याच्यावर आपल्या सर्व घातक सामर्थ्याचा प्रयोग करूं लागले. त्या रात्रींत त्यांनीं शहरांतील तीस देवळें उध्वस्त केलीं. मठांत शिरून तेथील पुस्तकसंग्रह, होमकुंडें, पुतळे, तसबिरी, पूजेचीं उपकरणें वगैरेंवर हल्ला करून त्यांचा त्यांनीं सर्वस्वीं नाश केला. नंतर मठांतील जोगिणी-

च्या राहण्याच्या भागाकडे त्यांनीं मोर्चा वळविला. तेव्हां मठांतील स्त्रीपुरुष भयार्त होऊन रस्त्यानें सैरावैरा पळूं लागले. परंतु त्यांची भीति निराधार होती; कारण, मठांतील एकाही स्त्रीस अगर पुरुषास बंडवाल्यांनीं ईषन्मात्र इजा केली नाहीं; किंवा तेथें नाश करून टाकलेल्या मालमत्तेपैकीं एक कवडीकिंमतीचाही माल दंगेखोरांनीं स्वतःच्या उपयोगाकरितां उचलून नेला नाहीं; तथापि या दंग्याच्या बाबतींत 'लूट मिळवून त्यावर निर्वाह करण्याच्या इरायानें सुधारक लोकांनीं हा दंगा उपस्थित केला,' आणि 'कॅथोलिक धर्मी लोकांनीं नवीन पंथी लोकांचें बदनाम करण्याकरितां स्वतःच पैशाची लालूच दाखवून, कांहीं हलकट लोकांकडून हा दंगा करविला,' असें उभय पक्षांचे एकमेकांवर आक्षेप आहेत. पण त्यांत विशेष कांहीं तथ्य दिसत नाहीं. अँट्वर्प व त्याच्या आसपासचे प्रदेश यांत हे प्रकार अहोरात्र दोन दिवस चालले होते.

आगष्ट महिन्यांत थोडक्या वेळांत या गोष्टी एकाचकालीं अनेक ठिकाणीं घडून आल्या. सर्वत्र दंग्याचें स्वरूप हेंच होतें. एका फ्लँडर्स प्रांतांत चारशें देवालयें या वादळांत सांपडलीं. लिंबूर, लुक्सेंबूर, नेमूर या प्रांतांत बंडवाल्यांनीं मूर्तींस हात लाविला नाहीं. मेलिनमध्यें ७०।८० लोकांनीं सर्व काम पुरें केलें; त्यांच्यापुढें ग्रामस्थ वड्या सभेचें अगर मॅजिस्ट्रेटलोकांचें कांहीं चाललें नाहीं. अँट्वर्प, घेंट वगैरे ठिकाणची बातमी टुर्नेशहरांत ता० २२ आगष्ट रोजीं पोंहोचतांच रात्रौ तेथें गडबड सुरू झाली. रात्र संपेपर्यंत कोतवालाच्या विनवणीवरून लोक स्वस्थ राहिले. प्रातःकाळ होतांच लोकांनीं सर्व देवळांची हजीरी घेतली व त्यांस पूर्णपणें नागविलें. या वादळांत तसबिरा, पुतळे, वाद्यें, डागडागिने, सोन्यारुप्याचे पेले व भांडीं, पादुका वगैरे चिन्हें ठेवलेल्या पेट्या, उपाध्यायांचीं वस्त्रें, क्रूसें, हंड्या, झुंबरें, धुपारत्या वगैरे मूल्यवान धातूंनीं केलेले व मोत्यापोंवळ्यांनीं मढविलेले पदार्थ चूर्ण करून त्यांचा ढिगारा देवळांत टाकलेला होता. कांहीं थडगीं उकरून आंतील प्रेतांवरसुद्धां बंडवाल्यांनीं आपली प्रतिकारतृष्णा तृप्त करून घेण्यास सोडलें नाहीं. एग्मॉन घराण्यापैकीं शेवटच्या पुरुषाचें प्रेत बाहेर काढून त्याचा बंडवाल्यांनीं बराच उपहास केला. शहरांतील कामगिरी आटोपल्यावर हा

राक्षसी मेळा सर्व प्रांतांवर मोहिम करण्याकरितां निघाला. व आसपासच्या इतर ठिकाणींही त्यांनीं असेच प्रकार केले.

ज्या कॅथोलिक धर्माच्या पुरस्कर्त्यांनीं नवीन धर्मी लोकांचा इतके दिवस सारखा छळ चालविला होता, तद्धर्मद्योतक चिन्हांवर सूड घेण्याकरितां लोकांच्या क्षुब्ध झालेल्या मनाची ही उंचबळ होती. नव्या धर्ममतांच्या लोकांच्या मनावर होत चाललेला दीर्घ परिणामही या दंग्यावरून व्यक्त झाला. ज्या विकाराच्या प्रेरणेनें वसंतकालांत लोक हत्यारबंद होऊन मोठमोठ्या जमावानें प्रार्थनेस जमूं लागले होते, त्याचेंच हें विकृत स्वरूप होतें; या दोन्ही प्रकारांत भेद एवढाच कीं, दंगे करणारे लोक प्रार्थनेस जमणारांच्या मानानें फार थोडे होते. नव्या धर्मोपदेशकांस हे प्रकार बिलकुल पसंत नव्हते; व त्यांतील पुढाऱ्यांनीं मूर्तिविच्छेदासंबंधीं आपल्या अनुयायांचा पूर्णपणें निषेध केला. या दंग्यासंबंधानें दुसरी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट झटली ह्मणजे कोणाही मनुष्यास इजा अगर मालाची अफरातफर या समयीं झाली नाहीं ही होय. यावरून दंगेखोरांचा हेतु स्वार्थसाधूपणाचा नव्हता व तसा आपणावर काडीइतका संशय आल्यास ज्या महत्त्वासाठीं आपण भांडत आहों त्यास कालिमा लागेल असें त्यांस पूर्णपणें कळून चुकलें होतें, असें दिसतें. अस्तु. ज्या देशांत सजीव स्त्रीपुरुषांचा अहोरात्र वध चालला होता तेथें निर्जीव वस्तूंचा नाश केल्याबद्दल विशेष कडक शब्दांनीं लिहिणें रास्त होणार नाहीं. या दंग्यामुळें एग्मॉनसारखे कोंबट सुधारक थंड झाले, व दंगेखोरांस शासन करण्याकरितां ते पुढें सरसावले. रीजंटची तबेत फार गरम झाली. फिलिपला ही बातमी समजल्याबर तो ह्मणाला, "त्यांना ही गोष्ट जड जाईल."

या दंग्यांचा तात्कालिक परिणाम नवीन धर्मीयांस बराच सुखावह झाला. पार्मानें ऑरेंज, एग्मॉन, हॉर्न वगैरे बड्या सरदारांस ता. २२ रोजीं पहाटेस तीन वाजतां बोलावणें पाठविलें. ही मंडळी आली त्यावेळीं अरेंबर, बर्लेमॉन, व्हार्कीमीज वगैरे गृहस्थ तेथें बसले होते. पार्माची पळून जाण्याची सर्व तयारी झाली होती. या मंडळींचें पाऊल दिवाणखान्यांत पडतांच, 'ब्रुसेल्स येथें सर्व कॅथोलिक लोकांची आज

रात्री कत्तल होण्याची बातमी आहे, सबब आपल्या बचावाकरितां शहर सोडणें मला उचित दिसतें ' असें तिनें त्यांस कळविलें; मॉन्स येथें जाण्याकरितां तिनें थोडें सैन्यही बोलाविलें होतें. सरदार लोकांनीं हा विचार अगदीं अयोग्य आहे असें सांगून रीजंटला ब्रुसेल्स न सोडण्याबद्दल फार आग्रह केला. इतक्यांत ह्यातारा व्हिग्लियस डोळ्यांतून टपटप आसवें गाळीत तेथें आला; आपले प्राण वांचत नाहींत असा त्याचा पक्का ग्रह झाला होता. हॉर्न यानें पार्मास कांहीं इजा न होण्याबद्दल खात्री दिल्यावरून तिचा शहर सोडण्याचा बेत रहित झाला. मॅन्स्फील्ड यास शहरचा मुख्य बक्षी नेमल्याची त्याच दिवशीं द्वाही फिरली; त्यामुळें लोकांस उत्साह येऊन राणीच्या नांवाचा जिकडे तिकडे जयघोष होऊं लागला. राणीच्या वृत्तींत दोन तीन दिवस अशीच चलबिचल झाली होती. ता. २५ रोजीं राणी पार्मा, व लुई नॅसा व त्याचे पंधरा साथीदार यांच्या दरम्यान कांहीं नवीन करार ठरलेः त्यांत रीजंटनें, धर्मसंशोधन बंद करून सर्व शहरांतून व गांवांतून लोकांनीं आपापल्या मताप्रमाणें उपासना करावी अशी परवानगी देण्याचें आश्वासन दिलें; कटवाल्यांच्या मागील वर्तनाबद्दल त्यांस माफी केली, व सरकारच्या नोकरींत त्यांस पुन्हां घेण्याचें कबूल केलें; उलटपक्षीं कटवाल्यांनीं, रीजंटनें आपलीं वचनें पाळल्यास आपला कट मोडून लोकांत शांतता उत्पन्न करण्याचे कामीं व सरकारची सत्ता अबाध चालविण्याच्या कामीं अधिकाऱ्यांस आपण मनोभावानें मदत करूं, असा करार केला. कराराप्रमाणें सर्वत्र जाहिरनामे प्रसिद्ध करण्याविषयीं व त्यांची योग्य बजावणी करण्याविषयीं प्रांतोप्रांतीं गांवकामगारांस हुकूम ताबडतोब सुटले. एवंच कांहीं कालपर्यंत रामराज्य पुन्हां सुरू होऊन सर्व यमयातना निरंतरच्या बंद झाल्या असें लोकांस वाटूं लागलें.

फ्लँडर्स प्रांतांत एग्मॉन, अँट्वर्प येथें ऑरेंज, टुर्नेशहरीं हॉर्न, व मेलिन येथें हूस्ट्राटन हे दंगेधोपे मोडून शांतता स्थापन करण्याच्या कामास लागले. इकडे माद्रीद येथें नेदर्लंडचे मुखत्यार माँटिनी व बर्घेन यांच्या राजाकडे वारंवार भेटी चालल्याच होत्या. त्यांनीं राजास उघडपणें कळविलें कीं, धर्मचिकित्सा व वटहुकूम यामुळें सर्व अनर्थ उत्पन्न

झाले आहेत; नेदर्लंडदेशांत तद्देशीय लोकांस व सरदारांस बाजूस ठेवून स्वतः सर्व राज्यकारभार आटोपण्याचा स्पॅनिश लोकांचा यत्न इतर देशांप्रमाणें बिलकुल सफल होणार नाहीं. आपलें कर्तव्य बजावण्याचे कामीं हे अस्सल धर्मभक्त व राजभक्त, वरून संथ व अक्षुब्ध परंतु आंत खोल व भोंवऱ्याच्या प्रवाहांतून वाहत चालले होते, ह्याची त्यांस कल्पना सुद्धां नव्हती. मैदानांतील भजनी मेळ्यांची बातमी स्पेनमध्यें पोंहोचतांच प्रत्यहीं राजाच्या सल्लागार मंडळींशीं गुप्त बैठकी होऊं लागल्या. या मंडळींत टिस्नॅक व हॉपर हे नेदर्लंडचे प्रतिनिधी असत. या प्रसंगीं नेदर्लंडांतील वकीलांच्या तीन मागण्या होत्याः—धर्मसंशोधन सर्वस्वी बंद करावें, वटहुकुमांस सौम्य स्वरूप यावें व झालेल्या गोष्टीबद्दल नेदर्लंड-च्या पुढाऱ्यांस सरसकट माफी देऊन सरकारचाकरीस ठेवावें. या सर्व मागण्यासंबंधानें बराच वादविवाद झाला. फिलिप स्वतः एक अक्षरसुद्धां बोलत नसे. परंतु कागद घेऊन टिपणें करण्याचा उद्योग त्याचा सारखा चालला होता. नेदर्लंडच्या मागण्यांसंबंधानें सर्वांचा अभिप्राय असा पडला कीं, राजद्रोहाची ही चवथी पायरी होय. ग्रॅन्व्हिलला घालवून देण्याचा कट ही पहिली, एग्मॉनची शिष्टाई ही दुसरी, विज्ञप्ति-अर्ज व त्यासंबंधाचे जमाव ही तिसरी; व हल्लींच्या वकीलांमार्फत उद्धट मागण्या ही शेवटची योजना होय. या प्रश्नांचा बराच खल होऊन विचारा-अंतीं असें ठरलें कीं, पोपच्या अधिकाराखालीं चाललेली धर्मसभा तूर्त बंद ठेवावी; कारण नेदर्लंडमधील धर्मखात्यांत बऱ्याच नवीन अम्मल-दारांचा भरणा झाला असल्यामुळें त्यांजकडून धर्मशासनाचें काम नेटानें चालवितां येईल; वटहुकुमांसंबंधाचा विचार, सवलतींचा नवीन मसुदा पार्माकडून तयार होऊन येण्यावर तहकूब ठेवावा; व सरसकट माफी देण्यापूर्वीं त्यांत बरेच अपवाद व शर्ती घालणें जरूर आहे. मध्यं-तरीं पार्माकडून वारंवार असें लिहून जात असे कीं, सवलतीचा मसुदा हुजुरास मान्य न झाल्यास मोठें बंड उद्भवण्याचीं चिन्हें आहेत; करितां त्याचा प्रतिकार करण्यास सैन्याची व पैशाची कुमक तावडतोब व्हावी. तथापि, प्रधानमंडळांत वरील जबाब ठरल्यानंतर सुद्धां बराच वेळ जाऊं देऊन, एप्रिलच्या अगोदरच्या मागण्यांस जुलै अखेर राजानें वर

लिहिल्याप्रमाणें जबाब लिहून पाठविला. जुलै महिन्यांत झालेल्या अत्याचारांचा विचार व्हावयास आणखी बऱ्याच महिन्यांची अवधि व बरींच टिपणें करणें जरूर होतें.

ह्या निकाल ऐकून नेदर्लंडमधील राष्ट्रभक्तांची पुन्हां निराशा झाली. परंतु फिलिपला आपण प्रजेस फार सवलती दिल्या अशी शंका येऊन त्यानें नोटरी (रजिष्टर) बोलावून आणून त्याच्या समोर अशी प्रतिज्ञा केली कीं, वस्तुस्थितीच्या दडपणामुळें आपण नेदर्लंडमधील दंग्यांत सामील असलेल्या लोकांस माफी देण्याचा अधिकार मार्गरेट पार्मास दिला; परंतु तो हुकूम आपखुषीनें अगर स्वतंत्र बुद्धीनें केला नसल्यामुळें तो आपणास बंधक नाहीं. लागलीच त्यानें पोपकडे एक थैली पाठविली; त्यांत त्यानें आपलें समाधानसर्वस्व गुरूंस कळविलें कीं, "आपल्या विचारावांचून नेदर्लंड-प्रकरणाचा आह्मीं निकाल लावला याबद्दल सर्वस्वीं अपराधी आहों; परंतु या धर्मविषयक प्रश्नांचा निकाल आपल्या संगतीवांचून केला असल्यामुळें आपणास आमचे ठराव अमान्य करतां येतील. धर्म-संबंधी जाहीरहुकुमांच्या तडाख्यांतून कोणी पाखंडी सुटेल अगर त्याची शिक्षा सौम्य होईल असा त्यांत फेरबदल बिलकुल होणार नाहीं; व धर्माचरणांत चुकलेल्या लोकांस माफीचा फायदाही मिळणार नाहीं." याच लेखांत असेंही लिहिलें होतें कीं, नेदर्लंडच्या लोकांस सौम्य उपाय मानवले नाहींत, तर आपण स्वतः तिकडे जाऊन त्यांचा खरपूस समाचार घेऊं. या वेळेपासून नेदर्लंडला स्वतः जाण्याचा बूट ज्या त्या प्रसंगीं पुढें आणून कामें दिरंगाईवर टाकण्याचा त्यानें क्रम चालविला. व्हिग्लियस राजाच्या आगमनाची फार सोत्कंठ वाट पाहत होता; त्यानें राजास असें लिहून कळविलें कीं, आपणास येण्यास सवड न झाल्यास राष्ट्रसभा बोलावून चारचौघांच्या विचारानें देशांतील अस्वस्थता मोडण्याचा कांहीं उपाय योजणें जरूर आहे. सरदार व सामान्य लोक यांचीही तीच ओरड सारखी चालली होती. फिलिपला नेदर्लंडची राष्ट्रसभा व स्पेनचा जुलूम या कल्पना पक्क्या विसंगत भासत होत्या. त्यानें पार्मास गुप्तपणें असें कळविलें कीं 'राष्ट्रसभा भरविण्याची परवानगी लौकरच येऊन पोंहोंचेल; तूर्त ती भरविण्याबद्दल आमची सक्त मनाई आहे'. जुलै व आगष्ट

महिन्यांत झालेले प्रकार समजण्यापूर्वी राजाच्या मनाची ही अशी स्थिति होती.

प्रार्थनेकरितां जाणाऱ्या हत्यारबंद जमावांची व मूर्तिच्छेदाची हकीकत पार्मानें राजास कळविली. तीं पत्रें फार करुणरसप्रचुर होतीं. आपण पुष्कळ कालपर्यंत टिकाव धरला; आंथरुणांत पुष्कळ रात्री जागून काढल्या; तापानें व दुःखानें आपलें शरीर अगदीं क्षीण झालें आहे; वगैरे शोक व निराशा दाखविणाऱ्या गोष्टींची प्रस्तावना करून तिनें राजास असें कळविलें कीं, " आपणास चोहोंकडून प्रतिबंध व कोंडमारा झाल्यामुळें आपण कटवाल्यांस माफी फर्माविली आहे; व नवीन पंथी लोकांस पूर्वी मोकळीक होती त्या ठिकाणीं आपल्या मतांप्रमाणें प्रार्थना करण्याची सवलत दिली आहे; या गोष्टींस महाराजांची मंजुरी नसल्यामुळें त्या आपणास बंधनकारक नाहींत; व सरकारांनीं स्वतः इकडे येऊन मूर्तिभंग वगैरे नीच कामें करणारांचा योग्य समाचार घेतला पाहिजे; शिवाय रीजंटचा अधिकार न चालू देण्याविषयीं कांहीं वड्या गृहस्थांनीं खटपट केली आहे, त्याचाही बंदोबस्त हुजुरस्वारी आल्यावांचून होणार नाहीं. " हे वडे गृहस्थ कोण याबद्दल अनुमान सहज करतां येण्यासारखें होतें. याशिवाय राजास गुप्त खाजगी पत्रें पाठवून त्यांत ऑरेंज, एग्मॉन, हॉर्न, हूस्ट्राटन यांच्या वर्तनासंबंधीं, न्वार्कार्मीज व मॅन्स्फील्ड यांच्या सांगण्यावरून, कांहीं चमत्कारिक व असंभवनीय बातम्या पार्मानें लिहून पाठविल्या; त्या अशाः-ऑरेंजप्रभृति मंडळींनीं राजा व ईश्वर यांचें भय सोडून दिलें आहे; लोकांच्या मागण्या मान्य न झाल्यास सर्व पाद्री व मठवासी मारून टाकण्याचा हॉर्नचा बेत झाला आहे; एग्मॉन भिक्षेकऱ्यांच्या कटांत शिरला असून त्यानें जर्मनींत सैन्याची जमवाजमव चालविली आहे; सैन्याच्या मदतीनें सर्व देश काबीज करून तो जहागिरदारमंडळींत वांटून देण्याचा ऑरेंजचा विचार आहे; या सर्व सरदारांचा असा बेत ठरला आहे कीं राष्ट्रसभा भरवावी, रीजंटला पकडून या सभेपुढें आणावी, व तिच्याकडून आपल्या मागण्या कबूल करून घ्याव्या. अशा प्रकारचे निंद्य व निराधार आरोप करून या दुष्ट स्त्रीनें आपणास खऱ्या भावानें मदत करणाऱ्या इसमांचा नाश करण्याची

तयारी चालविली होती. मूर्तिभंगाविषयीं बातमी आली त्यावेळीं राजास ताप येत होता; ती वार्ता ऐकून त्यास संतापवायु झाला. परंतु पहिला झटका निघून गेल्यावर, मनांत नेदर्लंडमधील लोकांचा पूर्ण सूड घेण्याच्या भयंकर कल्पना चालू असतांही, वरकांतीं सौम्यपणानें, न्यायानें व दयार्द्रबुद्धीनें प्रजेस वागविण्याचा आपला विचार ढळला नाहीं, असा त्यानें निरोप पाठविला.

ता. २५ आगष्ट रोजीं ठरलेल्या करारान्वयें निरनिराळ्या प्रांतांत स्वस्थता करण्याची ऑरेंज, हॉर्न, एग्मॉन, व हूस्ट्रॉटन यांस पुन्हां सूचना झाली.

एग्मॉन याची वृत्ति या सालांत फार चंचल झाली होती. ऑरेंजच्या विचारांचा व सहवासाचा त्यावर परिणाम झाला होता, व त्याच्या स्वतःच्याही कांहीं मनोवृत्ति उदात्त होत्या. त्याच्या स्वभावांत पोकळ गर्वाचा अंश विशेष होता; त्यामुळें नेदर्लंडावर विदेशीयांचा अंमल असणें त्यास सहन होत नसे; व तेथील जुन्या घराणदारांचा त्या देशांत राज्य करण्याचा हक्क आहे अशी त्याची समजूत होती. इकडे न्वार्कामींज, बर्लेमॉन वगैरेंच्या संगतींत राहून त्याला नवीनपंथी लोकांसंबंधानें विशेष तिरस्कार उत्पन्न झाला होता. त्यांच्यावर हत्यार चालविलें नाहीं तर ते फार प्रबल होतील असें त्यास वाटूं लागलें. फ्लँडर्स प्रांतांत पाय ठेवतांना एग्मॉन बंडवाल्यांचा पुढारी अगर त्रयस्थ वृत्तीनें शांतता स्थापक या नात्यानें गेला नाहीं; त्यानें राजपक्षाचा पूर्ण अभिमान धरून संशय आला कीं तांत्रिक चौकशी करून शिक्षा ठोकण्याचा क्रम चालविला. त्याच्या या सपाट्यांत असंख्य मूर्तिभंजक व पाखंडी बळी पडले; त्याचा चिटणीस बॅकर्झील यानेंही मालकाची इमानानें नोकरी चालविली होती. फ्लँडर्स व आर्ट्वा हे प्रांत अगदीं वैराण होण्याची भीति वाटूं लागली.

ऑरेंज अँट्वर्पशहरास ता० २६ आगष्टला परत आला. ता० २५च्या करारान्वयें त्या ठिकाणीं स्वस्थता उत्पन्न करण्याचा त्याचा हेतु होता. इतरत्र चाललेल्या करड्या अंमलामुळें हें काम फार सुलभ झालें होतें. मूर्ति फोडणाऱ्या तीन इसमांस फांशीं देणें त्यास कायद्यानें भाग पडलें.

जास्त प्राणहानि होऊं नये म्हणून ऑरेंजनें मार्गरेटच्या करारास धरून प्रार्थनेचे नवीन नियम तयार केले त्यांत तीन देवळें नवीन धर्मी लोकांस प्रार्थनेकरितां तोडून दिलीं; व उभयपक्षांनीं एकमेकांच्या प्रार्थनेस कोणता ही अडथळा करूं नये, किंवा प्रार्थनेच्या वेळीं अगर रस्त्यांत एक-मेकांस अनुलक्षून उपरोधिक अगर निंदास्पद शब्द अगर वाक्यें बोलूं नये, असें ठरविलें होतें. याच तत्त्वांवर यूट्रेक्ट, ऑम्स्टर्डम वगैरे शहरांत कांहीं वेळ लोकांत स्वस्थता झाली. परंतु खुद्द ऑरेंजला अगर शहरांतील परदेशी व्यापारी लोकांस ही शांतता फार दिवस टिकेल असें वाटेना. ऑरेंजची खात्री होती कीं नवीन धर्मास मिळालेल्या सवलती फार थोडा वेळ चालतील; व मूर्ति फोडण्याबद्दल राजाकडून लोकांस कडक शासन मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

हॉर्न हाही शांतता कायम करण्याचा स्तुत्य हेतु मनांत धरून टुर्ने-शहरीं गेला. हॉर्नची बुद्धि फार विशाल नव्हती व लोकांवर अधिकार चालविण्याची शक्तिही त्याच्या अंगीं नव्हती. ता. २५ चा ठराव अमलांत आणण्याचा त्याचा विचार होता; त्याच्या मनाचा कल विशेष सरकारच्या बाजूचा होता; परंतु नवीन पंथीलोकांस समाधान वाटण्या-करितां तो एका कॅल्व्हिनपंथी व्यापाऱ्याच्या घरीं जाऊन उतरला. त्यामुळें गावांत प्रार्थना करण्याची परवानगी मिळेल अशी आशा त्या लोकांस साहजिक उत्पन्न झाली. थोड्याच दिवसांनीं कॅथोलिक मुख्य मंदिरा-च्या गाभाऱ्यांत कांहीं भूमिगत द्रव्याचा बोभाटा आल्यामुळें तें द्रव्य काढून देवस्थानच्या अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्याकरितां हॉर्ननें भुयार उकरण्याचें काम सुरू केलें; त्यामुळें लोकांत त्याच्याविषयीं बराच गैरसमज उत्पन्न होऊन उभय पक्षांत मारामाऱ्या जुंपल्या. भुयारांत कांहीं अर्थलाभ झाला नाहीं. ता. २५ आगष्टचा करार प्रसिद्ध करून त्याचा अंमल करण्याचा आपला हेतु हॉर्ननें लोकांस कळविला. टुर्ने शहरांत सुधा-रकांची संख्या पांचषष्ठांश असल्यामुळें प्रार्थनेचे मोठे जमाव भरण्याचा परिपाठ कांहीं केल्या बंद होईना. सरतेशेवटीं हॉर्ननें गांवाबाहेर तीन जागा नवीन पंथाच्या प्रार्थनेकरितां नेमून दिल्या व त्या ठिकाणीं त्यांनीं मंदिरें आपल्या खर्चानें बांधावीं असें ठरविलें. तेथें नवीन इमारती

बांधण्याचें काम झपाट्यानें सुरू झालें. त्या इमारतीस मोडलेल्या देवळांचें सामान व पवित्र वस्तू सुधारक घालूं लागल्यामुळें जुन्या धर्माच्या लोकांस बरेंच वैषम्य वाटलें; बरसातीच्या आंत काम कांहीं केल्या पुरें होईना; व पावसांत मैदानांत प्रार्थनेस जमणें अशक्य झालें. त्यामुळें गांवांत प्रार्थनेस परवानगी मिळविण्याविषयीं नवीनपंथी लोकांची खटपट चालू झाली. हें मागणें **डचेस् पार्मा** बिलकुल कबूल करीना; कारण तिला पैशाची कुमक व सैन्य पाठविण्याचा हुकूम येऊन पोहोंचले होते. नंतर आक्टोबर महिन्यांत **डचेसनें हॉर्नला टुर्नेहून** परत येण्याविषयीं सूचना पाठविली. शहर सोडण्यापूर्वी त्यानें शहरांतील कापडवाल्या व्यापाऱ्याची वखार, नवीन पंथाचीं देवळें तयार होईपर्यंत प्रार्थनेकरितां त्या लोकांस मोकळी करून देवविली. ही जागा अर्ध्या तासांत हजारों लोकांनीं मोठ्या उत्साहानें मेहनत करून प्रार्थनेकरितां तयार केली. ही जागा नवीन पंथवाल्यांस दिल्याबद्दल **हॉर्नवर** पुढें मोठी तोहमत आली. सन १५६६ च्या शेवटीं **टुर्ने** शहर पूर्णपणें सरकारच्या हुकुमांत आलें व त्यांत नवीन पंथांचीं सर्व गडबड मोडली. ता. २ जानेवारी १५६७ रोजीं **न्वार्कार्मीज** हा पायदळाच्या नऊ तुकड्या घेऊन शहरच्या वेशीपाशीं आला. शहरच्या मॅजिस्ट्रेटांनीं त्याच्या सर्व अटी मान्य केल्या. ताबडतोब शहरांतील लोकांचीं हत्यारें काढून घेण्यांत आलीं व शहरांत शिबंदी सैन्याची स्थापना होऊन लष्करी अंमल सुरू झाला.

इकडे अशी व्यवस्था चालू असतां **पार्मानें** राजास या सरदारांसंबंधीं भलभलतीं खोटीनाटीं पत्रें पाठविण्याचा क्रम चालविला होता. निरुपायामुळें आपणास या लोकांकडून कामें घ्यावीं लागत आहेत; या लोकांचा कटवाल्यांस मिळून व सैन्य जमवून आपली स्वतंत्र सत्ता स्थापन करण्याचा, व सत्तेच्या जोरावर ल्युथरधर्म स्थापन करण्याचा संकेत आहे; आपापसांत नेदर्लंडदेश वांटून घेण्याविषयीं सर्व बेत परिपक्व झाले आहेत; सर्व कॅथोलिक लोकांची एकदम कत्तल होणार आहे; वगैरे गोष्टी ती वारंवार **राजास** लिहून पाठवीत होती. शिवाय तिनें **फिलिपला** अशी बातमी कळविली कीं **स्पेनमधील** खडानखडा बातमी लक्षावधी रुपये खर्चून

गुप्तहेरांच्या द्वारें हे लोक आणवीत असतात; खुद्द आपलीं व राजाचीं खाजगीं पत्रेंसुद्धां त्यांस वाचावयास मिळतात; करितां या गोष्टीची विशेष खबरदारी घेण्यांत यावी. आंतून असा पत्रव्यवहार चालू असतां ऑरेंज वगैरे सरदारांच्या तोंडावर अमूप साखर पेरण्याचा तिनें सतत परिपाठ ठेवला होता. परंतु ऑरेंजसारखा पाताळयंत्री मुत्सद्दी तिचें सर्व कारस्थान पूर्ण ओळखून होता.

---

# भाग ५ वा.

## इ. स. १५६६–६७.

बंडाचे विचार—डेंडमांड येथील मसलत-व्हॅलेन्सिनीज येथील धामधूम-ब्रेडरोडची चळवळ-ऑस्ट्रवेल येथील शिकार—अँट्वर्पची भयंकर लोकस्थिति—व्हॅलेन्सिनीजचें शासन—ऑरेंजचें जर्मनीस प्रयाण—ब्रेडरोड व कटवाले यांचा शेवट—पार्माचा नवा दम—देशस्थिति—आल्व्हाची स्वारी.

माद्रीदमध्यें बर्गेन व मॉंटिनी यांची शिष्टाई व अँट्वर्प वगैरे शहरीं ऑरेंजप्रभृति सरदारांचे लोकांस स्थिरस्थावर करण्याचें काम चाललें असतां, स. १५६६ च्या शेवटच्या महिन्यांत इतर ठिकाणीं दुसऱ्या कांहीं महत्वाच्या गोष्टी चालल्या होत्या, त्यांचें येथें दिग्दर्शन करणें जरूर आहे. ऑरेंजनें इमानानें, अनेक अडचणी सोसून, लोकांनीं उठविलेल्या अनेक खोट्या व निंद्य आरोपांची, किंबहुना जिवाचीही परवा न बाळगतां व रीजंटनें घालून दिलेल्या शर्तींचें काडीमात्र उल्लंघन न करितां अँट्वर्प शहरांत माजलेला गोंधळ मोडून, लोकांचीं मनें स्वस्थ करून शहरांत शांतता उत्पन्न केली होती. त्यामुळें वाढत्या प्रमाणावर असलेलें वादळ कांहीं कालपर्यंत थोडें थबकून राहिलें. या प्रसंगीं न्यायदेवतेला योग्य मान देऊन कांहीं लोकांस शासन करण्यांत राजपुत्राच्या मनाची

समता व धैर्य हीं दिसून आलीं. शहरच्या मॅजिस्ट्रेटांनीं, 'आपण निघून गेल्यास येथें कॅथोलिक लोकांचा मागमूस राहणार नाहीं' असें त्यास वेळोवेळीं कळविल्यावरून तो तेथें बराच कालपर्यंत राहिला; परंतु खुद्द त्याच्याच सुभेदारीच्या प्रांतांत (हॉलंडांत) अशीच बंडाळी माजल्यामुळें व तेथील लोकांची त्याच्या आगमनाविषयीं सारखी ओरड सुरू झाल्यामुळें त्यास तिकडे जाणें अवश्य झालें. फिलिप व पार्मा यांच्या शर्करायुक्त भाषणांची व लेखांची खरी किंमत तो पूर्णपणें ओळखून होता. त्यांच्या हृत्पटलावर 'दगा व सूड' हे शब्द ढोबळ अक्षरांनीं लिहिलेले त्यास ठळक दिसत होते. हॉलंड प्रांतांत ऑरेंजच्या पश्चात् ग्रूडा, बूर्डन वगैरे ठिकाणें रक्षण करण्याकरितां ड्यूक ब्रन्स्विकला पाठविल्याची खबर समजतांच तो अपमान त्यास असह्य झाला. आपल्यासंबंधानें पार्माची स्पेनला कोणत्या धोरणाचीं पत्रें जातात हें त्यास समजलें होतें. सैन्याच्या जोरावर नेदर्लंडांत लष्करी अंमल चालविण्याचा राजाचा संकेत झाला असावा, व आपल्या व इतर कांहीं सरदारांच्या जिवास कांहीं धोका आहे असा त्यास यावेळीं पक्का संशय आला. स्वतःच्या व राष्ट्राच्या बचावासाठीं उपाय योजण्याची वेळ आतां खास येऊन पोंहोंचली होती. अशा समयीं जुलुमाचें आज्ञाधारक शस्त्र, राजद्रोह व बंडखोरपणा, अगर आमरणान्त विदेशवासित्व यांपैकीं कोणती तरी एक भूमिका पतकरण्याचा त्यास प्रसंग प्राप्त झाला होता. या सुमारास ऑरेंजच्या डोक्यांत–आपल्या राष्ट्राचे प्राचीन सनदी हक विदेशी जुलुमाच्या तडाक्यांतून सोडविण्याचा यत्न करणें हा राजद्रोह असेल तर–राजद्रोहाच्या कल्पना प्रथम येऊं लागल्या.

त्यानें प्रथम एक खासगी मुखत्यार एग्मॉनकडे पाठविला. एग्मॉनला त्यानें असा निरोप कळविला कीं, "हॉलंडमध्यें सैन्य देऊन ड्यूक ब्रन्स्विकला पाठविण्यांत रीजंटचा कांहीं दुष्ट हेतू दिसतो; फिलिपची तयारी होतांच नेदर्लंडावर सैन्य पाठवून कॅथोलिक व प्राटेस्टंट या उभयतांस जर्जर करून देशांत बादशाही अंमल चालविण्याचा घाट स्पेनमध्यें चालू असावा असें दिसतें; तसा प्रसंग आल्यास लोकांची दुर्दशा निमुटपणें हात जोडून पहात बसणें, अगर भावी अनर्थास बोट सुद्धां न उचलत

बळी पडणें, आपणास योग्य नाहीं; राष्ट्रावर येणाऱ्या अरिष्टाचा प्रतिकार करण्याकरितां कांहीं उपाय योजणें जरूर आहे. जर एग्मॉन, हॉर्न या सरदारांची मदत आपणास मिळेल तर राष्ट्रसभा भरवून तिच्या सल्ल्यानें स्पॅनिश लोकांच्या सशस्त्र मोहिमेपासून आपल्या जन्मभूमीचें रक्षण करण्यास आपण सिद्ध आहों. राजास धर्माचें वेड पूर्ण बाधलें आहे; प्रजेंत नव्या धर्माचें वारें अतोनात भरलें आहे; राष्ट्राच्या जुन्या सनदांची व राजकीय हक्कांची पायमल्ली होत आहे; पायाखालीं विस्तव जास्त पेट घेत आहे; स्वस्थ बसण्याची वेळ आतां राहिली नाहीं." एग्मॉनचे विचार व प्रारब्ध हें पूर्वींच कायम ठरलें असल्यामुळें या निरोपापासून कांहींच फलनिष्पत्ति झाली नाहीं. ऑरेंज हा आपल्या उत्तरेकडील जहागिरीच्या मुलुखाकडे जाण्यापूर्वी ऑरेंज, एग्मॉन, हॉर्न, हूस्ट्रॅटन व लुई यांची भेट डेंडर्मांड येथें झाली. मंडळींत वरील विषयासंबंधानें सुमारें दोन तास खल झाला. हॉर्नला स्पेनमधून मॉंटिनीचें पत्र आलें होतें; त्यांत सरदार लोकांना प्रार्थनेचे जमाव व मूर्तिभंग वगैरे बंद करतां आले नाहींत, हें ऐकून राजास झालेला संताप व त्याच्या मनाची भयंकर स्थिति वर्णन केली होती. हें पत्र वाचून मंडळींत त्याबद्दल बराच वाद झाला. नंतर टुर्ने येथें हॉर्ननें केलेली कामगिरी पार्मास पसंत पडली नाहीं त्याबद्दलही कांहीं संभाषण निघालें. शेवटीं फ्रान्सच्या दरबारचा स्पेनचा वकील आल्व्हा याजकडून पार्मास आलेलें असें एक विलक्षण पत्र वाचण्यांत आलें. त्यांत राजाचा ऑरेंज वगैरे सरदारांविषयीं चिरकालीन दीर्घद्वेष पत्र लिहिणारा व वाचणारा या उभयतांसही माहींत आहेच असें दिसत होतें; व पार्मास बाह्यात्कारी या लोकांशीं सलोखा राखण्याविषयीं सुचविलें होतें. "या लोकांच्या गुप्त सल्ल्यावांचून नेदर्लंडांत दंगेधोपे व बंडाळ्या झाल्या नाहींत, हें महाराजांना माहीत आहे; त्यांच्याकडून कामें घेऊन संधि साधून त्यांचा नाश करण्याचा राजाचा बेत आहे. स्पेनमध्यें बर्गेन व मॉंटिनी यांच्या तोंडावर अमूप साखर पेरण्यांत येत आहे, परंतु त्यांना जीव घेऊन सुरक्षितपणें स्पेनमधून परत जाण्याची बिलकुल आशा नाहीं; तसाच त्या तीन संस्थानिकांचा शेवट होईल असें धोरण

ठेवावें. " शेवटीं या पत्रांत फ्रान्स व स्पेन यांच्या दरम्यान नवीन धर्माचा उच्छेद करण्याकरितां ठरलेल्या तहाचा उल्लेख होता; त्यांत फ्रान्सची राजमाता कॅथेराईन मेडिसी इला पूर्ण धर्माभिमान नाहीं, व ती फिलिपच्या मनाचा अंत पहात आहे, वगैरे गोष्टी लिहिल्या होत्या. या पत्राच्या खरेपणाबद्दल बराच वाद आहे. डेंडर्मांड येथें जमलेल्या सरदारमंडळींत स्पॅनिश सैन्य देशांत उतरल्यावर त्याच्याशीं सामना करणें कितपत योग्य अगर शक्य होईल याबद्दल वाटाघाट झाली. काउंट लुईचा अभिप्राय पडला कीं, या कामाकरितां जर्मनींत सैन्याची तरतूद करून ठेवावी. राष्ट्रसभेचे ठराव हाणून पाडण्याचा राजाचा यत्न झाल्यास सभेची बाजू उचलून धरण्यास सैन्याची अवश्यकता आहे असा ऑरेंजचाही यावेळीं अभिप्राय पडला असावा. एग्मॉनच्या मतें तसें करणें अगदीं अशुद्ध व फिलिपसारख्या धार्मिक, दयाळू व न्यायी राजाशीं द्रोहकारक होतें; कोणास कांहीं भीति अगर शंका वाटत असल्यास त्यानें देशत्याग करावा अशी त्याची सूचना होती. ही गुप्त मसलत संपल्यावर पांचही सरदार आपापल्या वाटेनें निरनिराळ्या ठिकाणीं निघून गेले.

या वेळेपासून या सरदारांच्या वाटा कायमच्या फुटल्या. ऑरेंज हा आपल्या विवंचनेंत एकटाच राहिला. एग्मॉन हा स्वभावतः आशेखोर, अल्लड, धुंद व धर्मनिष्ठ कॅथोलिक असल्यामुळें पुष्कळ दिवसांच्या संवयी व विचार यांच्या ओघानें पक्का राजभक्तच बनत चालला. मध्यंतरीं सहवासानें त्याच्या वृत्तींत आलेले अल्पकालीन विकार तात्काल मावळले. राजनिष्ठारूप ध्रुवाकडे नजर ठेवून त्यानें आपलें तारूं हाकारलें व त्या सफरींतच तो सर्वस्वी बुडाला. हॉर्न हा सामान्य बुद्धीचा, केवळ निरपेक्ष नाहीं, तरी प्रामाणिक, शूर व उदार स्वभावाचा पुरुष होता. त्यानें चार्लस बादशहाची व त्याच्यामागून फिलिपची पुष्कळ दिवस इमानानें नोकरी बजावली होती; त्याबद्दल त्याला एक कपर्दीक मिळाली नव्हती. असें असून लोकांत व दरबारांत आपली निंदा होत असल्याचें ऐकून त्याची फार निराशा झाली व व्यवहाराचा अगदीं वीट येऊन त्यानें आपलें अवशिष्ट आयुष्य आपल्या जहागिरीच्या गांवीं वीर्ट येथें

घालविण्याचा निश्चय केला. याप्रमाणें ऑरेंजच्या दोन्ही मुख्य मदत-निसांची वाट लागली. कटवाल्या लोकांचीही फाटाफूट झाली होती. अश्लील मजलसी व राजद्रोहात्मक जमाव यांनीं हातीं घेतलेल्या पवित्र कामास निंद्य स्वरूप देऊन, ही मंडळी सध्याच्या आणीबाणीच्या प्रसंगीं थंड झाली होती. बॅकर्झीलनें आतां नवीन पंथी लोकांस मनसोक्त फांसावर चढवून रीजंटकडे वशीला लावून तोफखान्यावर सनदी अंमलदाराची नोकरी पटकाविली होती. क्युलेंबरनें आपल्या जहागिरीच्या मुलुखांत देवळें भ्रष्ट करून व तेथील नैवेद्य आपल्या पोपटांस चारून शेवटीं धर्मस्वातंत्र्याची व देशभक्तीची लोकांत थट्टा चालविली होती. अर्थातच पार्माचे नीतिभ्रष्ट सल्लागार आर्मेंटेरो, पेरेझ हेच उलट कटवाल्यांचा उपहास करूं लागले. मात्र कटवाल्यांपैकीं लुई, आल्डेगोंड, बर्नार्ड वगैरे लोकांनीं यापुढें आपल्या देशाची सेवा इतक्या उत्कृष्ट रीतीनें केली कीं त्यांचीं नांवें इतिहासांत अक्षय्य सोन्याच्या अक्षरांनीं लिहून ठेविलीं जातील. परंतु त्यांच्यापाशींसुद्धां ऑरेंजचें यावेळीं विशेष वजन नव्हतें. अशा स्थितींत आपले विचार दुसऱ्यास नीट समजावून देण्यास सुद्धां राजपुत्राला कोणी विश्वासूक मित्र दिसेना. सन १५६६ साल-अखेर सरकारचा पुढील कार्यक्रमासंबंधीं बेत पक्का ठरला होता; व राजपुत्र ऑरेंजनेंही आपली भूमिका ठरवून ठेविली होती. मात्र राजा व पार्मा यांच्यासारखाच त्यानें वरपांगीं सलोखा व स्नेह यांचा आविर्भाव चालविला होता. मुख्यत्वेंकरून त्याला जागरूकता विशेष ठेवावी लागत असे. माद्रीद येथें राजा आपल्या अंतस्थ कोठडींत असतांही त्याच्यावर सदैव जागृत असणाऱ्या राजकुमार ऑरेंजचा डोळा असे. फिलिपनें आपल्या बहिणीस, आपला पत्रव्यवहार गुप्त राहण्यासंबंधीं निर्भय असावयास सांगितलें होतें. तो आपले खाजगी कागदपत्र कुलुपांत ठेवून किल्ली बरोबर वागवीत असे; तथापि कुलूप उघडून पत्रें वाचलीं जात. ऑरेंजचा नेहमीं असें ह्मणण्याचा परिपाठ असे कीं, "तत्त्ववेत्ते सृष्टीचे गुप्त चमत्कार पाहण्याच्या कामांत गुंतलेले असतात; परंतु माझा व्यवसाय राजांच्या हृदयांतील गुप्त चमत्कार जाणण्याचा आहे." ज्या स्त्रीपुरुषांशीं त्याचा संबंध होता, त्यांस तो पूर्ण ओळखून होता. मायावी राजभक्ती-

च्या जाळ्यांत सांपडून आपल्या सोबत्याप्रमाणें तो देहास मुकला असता तर सर्व नेदर्लंड राष्ट्र गुलामगिरींत निरंतर राहून नाश पावलें असतें. त्याच्या मनांतून राष्ट्रसभा भरवावी असें फार होतें. राणी पार्माचेंही मत प्रथम या गोष्टीस अनुकूल होतें; परंतु राजसत्तेस सैन्याचें पाठबळ मिळण्याची तयारी होतांच तिचा विचार बदलला. याप्रमाणें सर्व बाजूनें हताश झाल्यावर ब्रेडरोडनें-अविचारानें कां होईना-चालविलेल्या खटपटी-कडे ऑरेंजनें अनुकूल दृष्टीनें पहावें यांत नवल नाहीं. स. १५६६ सालच्या शेवटीं त्यानें एक हस्तपत्रक प्रसिद्ध केलें; त्याची भाषा व विचार फार सौम्य असून, त्यांत आपला मतलब लेखकानें मोठ्या खुबीनें दर्शविला होता. लिहिण्याचा मुख्य मुद्दा असा होता कीं, उत्क्रान्तीच्या नियमास अनुसरून राजानें प्रजेस थोड्या अंशानें तरी धर्मस्वातंत्र्य देणें अगदीं जरूर आहे.

व्हॅलेन्सिनीज शहरांत यावेळीं एका मोठ्या वादळास सुरवात झाली. व्हॅलेन्सिनीज हें शहर फ्रान्सच्या सरहद्दीवर हेनो प्रांतांत शेल्डनदीच्या कांठीं आहे. यावेळीं या शहरास मजबूत कोट असून त्याच्या भोंवतीं खोल खंदक होता. प्राचीनकाळीं हें शहर दिवाळखोर, कर्जबाजारी, दरवडे-खोर, खुनी वगैरे लोकांचे आसऱ्याचें ठिकाण होतें; सांप्रतकाळीं नवीनधर्मी लोकांचा यांत विशेष भरणा होता. टुर्ने शहराबरोबरच या शहरासही शिबंदी कोटांत घेण्याविषयीं न्वार्कार्मीजनें हुकूम पाठविला. हा शहरच्या पुढाऱ्यांनीं बिलकुल मान्य केला नाहीं. डिसेंबरच्या मधल्या आठवड्यांत न्वार्कार्मीजनें शहरच्या मॅजिस्ट्रेटांचे मुखत्यार कॉंडी येथें भेटीकरितां बोलाविले. त्यांनीं न्वार्कार्मीजच्या सर्व अटी कबूल केल्या; परंतु या शहरांत खरी सत्ता यावेळीं नवीनपंथांच्या धर्मोपदेशकमंडळींच्या हातांत होती. सभासद ऊटर्मन यानें कॅल्व्हिनपंथी प्रबल धर्मोपदेशक लाग्रेंज याची बहुत प्रकारें विनवणी केली; परंतु तो न्वार्कार्मीजचें ह्मणणें मान्य करीना; व तसा उपदेश आपल्या सांप्रदायांतील लोकांस प्राण गेला तरी आपण करणार नाहीं असें त्यानें निक्षून सांगितलें. कांहीं तडजोड होण्याचा रंग दिसेना. न्वार्कार्मीजच्या सैन्यानें शहरास वेढा दिला. ता. १७ डिसेंबर रोजीं या शहरांत पार्माच्या सहीचा एक जाहिरनामा प्रसिद्ध झाला; त्यांत नवीनधर्मतत्त्वांप्रमाणें दोन तीन देवळांत प्रार्थना करणें, कॅल्व्हिनमताप्रमाणें तीर्थप्रसाद घेणें, कॅथोलिकधर्म

उघडपणें टाकणें व रखवाली पलटणी शहरांत येऊं न देणें वगैरे गुन्ह्यांबद्दल शहरवासी लोक बंडवाले ठरविले होते; व त्यांस वेढा असल्यामुळें त्यांच्याशीं कोणी कोणत्याही प्रकारचा व्यवहार केल्यास अगर त्यांस सामानसुमान पोंहोंचविल्यास त्यास फांशीची शिक्षा मिळेल असें फर्माविलें होतें. कटवाल्या लोकांनीं वेढ्यांत सांपडलेल्या लोकांस कुमक देण्याचें आश्वासन दिलें; आपल्या योग्य हक्कांबद्दल भांडण्याच्या कामीं ऑरेंजचीही त्यांना सहानुभूति होती. आरंभीं शहरांतील लोक निर्भयमनानें वेढा फोडून बाहेर येत; उभयपक्षाच्या लहानसान चकमकी होत; आसपासच्या मठांवर घाले घालून वेढ्यांतील लोक लूटही मिळवून नेत. बंडवाल्यांनीं शेल्डनदीच्या एका प्रवाहावर कॅथोलिक मंदिरांच्या भग्न मूर्ती घालून एक पूल तयार केला. न्वार्कार्मीजच्या सैन्यास " सात झोंपीं गेलेले राक्षस " अशी त्यांनीं थट्टास्पद संज्ञा ठेविली; व एक प्रचंड दुर्बीण आरासच्या पोपभक्तांचा येऊं घातलेला तोफखाना पाहण्याकरितां म्हणून उपहास करण्याच्या इरायानें तटावर उभी केली. ऊटर्मन पुन्हां न्वार्कार्मीजचा निरोप घेऊन आला; त्याची बंडवाल्यांनीं अगदींच टर उडविली. नवीन धर्माचीं पदें म्हणण्याचा जिकडे तिकडे धूमधडाका चालला होता. आसपासच्या प्रदेशांत चलबिचल दिसूं लागली होती, त्यावरून बंडाच्या ज्वाला सर्वत्र पसरतील असा अंदाज वाटूं लागला. लॅनॉय येथें कॉर्नेली नामक पूर्वाश्रमीचा एक लोहार कॅल्व्हिनपंथाचा धर्मोपदेशक बनून त्यानें आपल्या पुढारपणाखालीं एक टोळी जमविली. त्यांत सुऱ्या घेऊन आलेले गांवढे, जुन्या गंजलेल्या बंदुका, भाले व कट्यारी घेऊन युद्धास जमलेले तरुण विद्यार्थी व पेन्शनींत निघालेले म्हातारे शिपाई यांचाच बहुतेक भरणा होता. बॉटरलॉट येथें अशाच हजार बाराशें लोकांची दुसरी एक टोळी जमत होती. सैन्यसंख्या सुमारें तीस हजारांपर्यंत झाल्यावर दोन्ही टोळ्यांचा मिलाफ करून व्हॅलेन्सिनीजला सोडविण्यासाठीं जाण्याचा या सैन्याचा संकेत होता. यावेळीं आपण पूर्ण जागे आहों असें न्वार्कार्मीजच्या सैन्यानें प्रत्ययास आणून दिलें. न्वार्कार्मीजच्या तुकडीनें लॅनॉय येथें जमलेल्या बंडवाल्यांवर सन १५६७ च्या जानेवारीच्या प्रारंभीं एकदम छापा घालून त्यांची अगदीं दाणादाण

उडविली; एका तासांत सुमार सव्वीसशें लोक रणभुमीवर पडले; बाकीच्यांस पळतां भुई थोडी झाली; त्यांनीं पळण्यास अडचण होऊं नये ह्मणून हत्यारें-पात्यारें जागच्या जागीं टाकून दिलीं. बॉटलॉटर येथील बंडवाल्यांची तीच गति झाली; पांचसहाशें लोक पहिल्या सपाट्यांत मृत्युमुखीं पडले; बाकी राहिलेले सुमार सहाशें लोक श्मशानभूमींत लपून राहिले; त्यांचा सरकारच्या सैन्यानें पाठलाग केला; तेथेंही निभाव लागेनासें पाहून हा जमाव देवळांत शिरला; तेथें चारशें लोकांस शत्रूंनीं कापून काढिलें; बाकीच्यांचा प्राण अर्धवट राहिला होता, त्यांस धुणी पेटवून त्याजवर भाजून काढिलें. सरकारपक्षाचे लोक या जयानें अगदीं फुगून गेले. व्हॅलेन्सिनीज येथील बंडवाले ही वार्ता ऐकून अगदीं गर्भगळित झाले. न्वार्कार्मीजनें वेढा जास्त गटून चालविला. आसपासची खेडीं सरकारच्या सैन्यानें लुटली; शेतें जाळून फस्त केलीं; शहरांत जातांयेतांना शेंकडों स्त्रीपुरुषांस पकडून अतिनिर्दयरीतीनें ठार मारण्याचा सपाटा चालला होता; पोरांचे कपडे भर हिंवाळ्याच्या दिवसांत छिनून घेऊन त्यांस उघडीं करून सोडून देत; हजारों सभ्य स्त्रियांचा लिलांव चवाठ्यावर चालला होता; व्याधि व जरा यांनीं पीडित लोकांस शिपाई लोक रिकामपणच्या वेळीं बिस्तवावर भाजून आपली करमणूक करून घेत. शहरांतील लोकांनीं निश्चयानें लढण्याचा विचार करून सर्व वर्गांच्या व धंयांच्या लोकांच्या निरनिराळ्या पलटणी बनविल्या; श्रीमंत व गरीब या सर्वांनीं आपल्या बायकामुलांचें रक्षण करण्याकरितां कंबरा बांधल्या. गांवांतील भिक्षेकऱ्यांची सुद्धां लहान दळें केलीं होतीं. या वेळची विशेष आश्चर्यकारक गोष्ट ही कीं, शहरांतील कॅथोलिक लोकांच्या केंसासही धक्का लागला नाहीं. बंडवाल्यांनीं कटांतील प्रमुख लोकांस व संस्थानिकांच्या जमातीस, स्वधर्म व स्वदेश यांच्याप्रीत्यर्थ विदेशी लांडग्यांच्या तावडींत सांपडलेल्या अनाथ लोकांचें वेळींच रक्षण करण्याविषयीं एक हृदयद्रावक व आवेशयुक्त विनंतिपत्र पाठविलें. या जमातीचा फिलिप अध्यक्ष व व्हिग्लियस, एग्मॉन वगैरे मंडळी सभासद असल्यामुळें तें अर्थांतच निष्फळ झालें.

इकडे ब्रेडरोड हिंवाळाभर ठिकठिकाणीं जाऊन लोकांत खळबळ

उत्पन्न करण्याचा यत्न करीत होता. त्याच्या यत्नास यश आलें असतें तर अधिकाऱ्यांचा चित्तविक्षेप होऊन त्यांची अगदीं तारंबळ उडाली असती. जानेवारी महिन्यांत त्यानें व्हिएन शहरीं ठाणें दिलें होतें. तेथें देवळांतील मूर्ति वगैरे त्यानें संथपणानें व यथाशास्त्र काढवून, सैन्याची जमवाजमवही चालविली होती; शिवाय तेथें त्यानें एक छापखाना स्थापन करून त्यांतून स्तोत्रांचीं पुस्तकें, निंदात्मक हस्तपत्रकें व इतर कुत्सित लेख प्रसिद्ध करण्याचाही क्रम चालू ठेविला होता. त्याच्या बिऱ्हाडीं सर्व प्रकारचे लोक जमून रात्रंदिवस खानपान व मजालस यांची रेलचेल चालत असे; त्यांत कांहीं संशय येण्याजोगीं माणसेंही असत. ब्रेडरोडचीं कांहीं गूढ कारस्थानें व युद्धविषयक बेत चालू आहेत असा सार्वत्रिक समज होता. पार्माला त्याची भीति वाटून तिनें ऑरेंजला त्याचें मन वळविण्यासाठीं विनंति केली; ऑरेंजनें ती मुळींच मनावर घेतली नाहीं. भय उत्पन्न झाल्यावेळीं व नौका समुद्रांत बुडूं लागली असतां आपली मदत घेऊन, काम संपतांच केलेल्या कामाची खोटीच निंदा करून आपल्या पूर्वसंकेताप्रमाणें वागणाऱ्या क्षणिक बुद्धी-च्या पार्मावरील त्याचा सर्व भरंवसा आतां उडाला होता. त्यानें अँट्वर्पची कामगिरी संपल्यावर हॉलंड, झीलंड, व युट्रेक्ट प्रांतांतील आमस्टर्डम वगैरे शहरांत जाऊन व ता. २४ आगष्ट रोजीं ठरलेल्या तत्त्वांवर नवीन पंथी लोकांस उन्हाळ्यांत बाहेर मैदानांत व पावसाळ्यांत वखारींत व बंदरावरील गोदींत आपल्या समजुतीप्रमाणें प्रार्थना करण्यास परवानगी देऊन, त्यांनीं कॅथोलिक लोकांस अगर त्यांच्या मालमत्तेस उपसर्ग लावूं नये असें त्यांच्याकडून वचन घेतलें. ही व्यवस्था उभय पक्षांस पसंत पडून सर्व लोकांनीं त्याचा गौरव केला. रीजंटनेंही ती प्रथम मान्य केली; परंतु न्वार्कार्मीजच्या सैन्याची सरशी होतांच तिनें पूर्वींचे सर्व हुकूम एकदम रद्द केले. ऑरेंजचा सरकारशीं आतां विरोध बनून गेला होता. त्याला अशी खात्रीलायख बातमी लागली होती कीं आपला व आणखी कांहीं बड्या सरदारांचा शिरच्छेद करण्याचा बेत ठरला आहे. अशा स्थितींत बेशिस्तपणानें व अविचारानें कां होईना, जिवावर उदार होऊन जुलुमाशीं झगडण्यास तयार झालेल्या ब्रेडरोड वगैरे लोकांच्या

आड येण्यास त्याची मनोदेवता वाहीना. ब्रेडरोडनें या सुमारास आणखी एक अर्ज रीजंटकडे पाठविला. धर्माच्या बाबतींत नेदर्लंडच्या लोकांस पूर्वीपासून सवलती असल्यामुळें या अर्जांत त्यांची मागणी हक्कानें केली होती. शिवाय राणीस आगष्टच्या कराराची आठवण देऊन नवीन तयार होत असलेल्या सैन्यास फांटा मिळण्याविषयींही या अर्जांत सूचना केली होती. रीजंटनें या मागण्यांस खरमरीत जबाब पाठविला; धर्मचिकित्सा बंद करा असें प्रथमचें मागणें असतां आतां धर्मस्वातंत्र्य हा हक्क पुरातन ठरला, हें पाहून ब्रेडरोडच्या कटांतील लोकांचें तिला फार आश्चर्य वाटूं लागलें. आगष्टचा कररनामा तिनें रद्द केला व ब्रेडरोडला आपल्या जिवाची पर्वा असेल, तर त्यानें सार्वजनिक कामांत न पडतां स्वस्थ घरीं जाऊन बसावें असा तिनें हुकूम केला. या तंबीनें यत्किंचितही न डगमगतां ब्रेडरोडनें अँट्वर्पमध्यें राहून सैन्य जमा करण्याचा क्रम सुरू ठेवला. त्याचा या वेळीं वाल्चरन बेटावर कांहीं हत्यारबंद लोक पाठवून, फ्लशिंग, मिडलबर्ग वगैरे शहरें अनुकूल करून घेण्याचा बेत दिसत होता. तसें केल्यानें स्पेनमधून लवकरच येऊं घातलेल्या सैन्याचा हल्ला खात्रीनें मागें हटवितां आला असता. ऑरेंजनें या शहरांतील लोकांस आपल्या परवानगीवांचून सरकारची शिबंदी पलटण शहरांत न घेण्याविषयीं गुप्त सूचना पाठविल्या होत्या. ब्रेडरोडनें चालविलेल्या सैन्याच्या भरतीकडे ऑरेंजनें विशेष लक्ष पुरविलें नाहीं. मात्र असें करण्यास कायद्याची हरकत असल्याचें त्यानें शहरांत प्रसिद्ध केलें. त्यानें कांहीं महिन्यांपूर्वीं ब्रेडरोडला तीन बंदुका नजर केल्या होत्या, ती गोष्टही या वेळीं टीकेस कारण झाली. शिवाय या सुमारास असा एक बूट निघाला कीं, सर्व सरकारी नोकरांनीं राजाज्ञा मान्य असल्याबद्दल नवीन शपथा घ्याव्या. ऑरेंजनें पूर्वी अशा शपथा आपण घेतल्या असून सतत पाळल्या आहेत, त्या पुनः घेतल्यापासून विशेष कांहीं फायदा नाहीं; या सबबीवर नवीन आज्ञांकितपणाच्या शपथा घेण्याचें नाकारिलें, तो फेब्रुवारी महिन्यांत अँट्वर्प येथें परत आला. तेथें आल्यानंतर हूस्ट्रॅटनच्या सहाय्यानें त्यानें शहरचा कारभार पहावा असा हुकूम त्यास मिळाला.

K. K. P.

इकडे ब्रुसेल्समध्यें अधिकारीवर्गास बरेंच भय उत्पन्न झालें. एग्मॉननें आपली राजभक्ति दाखविण्याची ही संधि फुकट दवडली नाहीं. सात आठशें बाळून लोक तयार करून बंडवाल्यांस तंबी देण्याकरितां वाल्चरन बेटांत जाण्याची आपली तत्परता त्यानें रीजंटला कळविली. बंडवाल्यांस फ्लशिंग वगैरे ठिकाणच्या लोकांनीं भीक घातली नाहीं; सबब एग्मॉनची मागणी पार्मास मोठ्या दिलगिरीनें नाकबूल करावी लागली. बंडवाल्यांनीं वाल्चरन बेटांत प्रवेश होत नाहींसें पाहून शेल्ड नदीच्या मुखांतून नावा हांकारून अँट्वर्पनजीक ऑस्ट्रवेल येथें आपला तळ दिला. या नवीन मोहिमेचा अधिपति मार्निशि थुलूज नामक तरुण सरदार होता; हा गृहस्थ बुद्धि, चातुर्य व शौर्य यांनीं संपन्न असून नवीन धर्मांत शिरला होता. विद्यापीठांतून बाहेर पडतांच त्यानें ही स्वदेशाची व स्वधर्माची सेवा पतकरली होती. नैसर्गिक धैर्याशिवाय त्याला सैन्याचें नायकत्व करण्यास दुसरें कोणत्याही प्रकारचें शिक्षण नव्हतें; त्याचे सैनिक युद्धकलेंत केवळ नवशिके, उनाड व कायद्यानें बहिष्कृत लोक होते. थुलूजनें लढाईस सोईची जागा योग्य विचारानें ठरवून तेथें आपल्या सैन्याचा तळ दिला; पृष्ठभागीं शेल्ड नदी व दोन्ही बाजूंस ऑस्ट्रवेल खेडें व नदीच्या पाण्याचे धक्के अशी मूळची योजना असून बंडवाल्यांनीं आपल्या अग्रभागीं एक उंचवटा करून त्याच्या पलीकडे खंदक खणला होता. या मातीच्या तटावर बंडाचें निशाण फडकत होतें. या ठिकाणीं थोड्या अवकाशांत सुमार तीन हजार विथरलेल्या लोकांचा जमाव जमला. ब्रेडरोड हॉलंडमधून सहा हजार हत्यारबंद लोक घेऊन या सैन्यास मिळणार; व नंतर दोन्ही तुकड्या मिळून व्हॅलेन्सिनीजची व सर्व राष्ट्राची सुटका करणार अशी आवई जिकडे तिकडे पसरली. इकडे ब्रुसेल्समध्यें डी बोव्हा नामक सेनापति सुमार आठशें निवडक लोक बरोबर घेऊन या बंडाचें उन्मूलन करण्याचा निश्चय करून ता. १२ मार्च रोजीं निघाला. सैन्य ब्रुसेल्समधून निघाल्याचा बोभाटा होऊं नये म्हणून मंडळी लहान लहान टोळ्यांनीं पुढें जाऊन बर्नार्डच्या मठांत जमली; येथें त्यांचीं हत्यारेंपात्यारें व पोषाक आगाऊ पाठवून दिले होते. ऑस्ट्रवेलला येऊन पोंहोचेपर्यंत डी

बोव्हानें रणवाद्यें वगैरे बंद ठेविलीं होतीं; सैन्याचीं निशाणें सुद्धां मोकळीं केलीं नव्हतीं. बंडवाल्यांनीं प्रथम या सैन्यांतील ढोलग्यांचा व तुताऱ्यांचा आवाज ऐकिला, तेव्हां त्यांस ही ब्रेडरोडची तुकडी आहेसें वाटलें. थोड्याच वेळांत संशयाचें निरसन झालें. थुलूजनें आपल्या सैनिकांस उत्तेजन देऊन धैर्यानें लढण्यास इषारा दिला; परंतु थुलूजचें धैर्य त्यांच्या अंगीं संचारणें शक्य नव्हतें. डी बोव्हाच्या कसलेल्या शिपायांनीं नेमानें बंडवाल्यांवर मारा केला; थुलूजच्या सैनिकांनीं भयचकीत होऊन भराभर पाहिजेल तसे व पाहिजेल त्या दिशेनें बार काढण्याचा सपाटा चालविला. पुढील उंचवट्यावर डोकीं काढतांच बंडवाले पटापट मरून पडत होते; डी बोव्हानें निकराचा हल्ला करतांच थुलूजचा कोट हस्तगत झाला. त्याच्या सैन्याची दाणादाण झाली. पळतांना निम्मे लोक नदींत पडून मेले व तिसरा हिस्सा लोक मारले गेले. थुलूजच्या देहाचे तुकडे तुकडे झाले. कांहींनीं एका वाडग्यांत आसरा घेतला; डी बोव्हाच्या सैन्यानें या वाडग्यास आग लावतांच त्यांचाही शेवट झाला. याप्रमाणें ही शिकार संपली डी बोव्हानें ही कामगिरी फार थोड्या वेळांत व शिस्तवार रीतीनें पार पाडिली. बंडवाल्यांचा मागमूसही राहिला नाहीं.

हें घोर नाटक अँट्वर्पपासून नजरेच्या टप्प्यांत चाललें होतें. ही झटापट सुमारें सकाळपासून संध्याकाळपर्यंत चालली होती; ती पाहण्याकरितां हजारों लोक शहरच्या तटावर, देवळांच्या शिखरांवर व घरांच्या गच्चांवर जमले होते; रणवाद्यांचा गजर, शस्त्रांचा खणखणाट, विजयी सैन्याचा जयघोष व पराभुत लोकांचा आक्रोश शहरांत ऐकूं येत होता. शहरांत नवीन धर्मपंथांचे लोक सुमार चाळीस हजार होते; पैकीं मोठा भरणा कॅल्व्हिनपंथाचा होता. या पंथाच्या लोकांस आपल्या धर्मबंधूंच्या यातना पाहून सहजच कळवळा उत्पन्न झाला. शिवाय थुलूजची पत्नी शहरच्या रस्त्यांतून आपल्या बांधवांस कुमक करण्याविषयीं या लोकांस उत्तेजन देत फिरत होती. दुसरे दिवशीं सकाळीं दहा वाजण्याच्या सुमारास सुमार दहा हजार भिन्न पंथी लोक तांबड्या वेशीपाशीं जमले; ऑस्ट्रवेल वेशीपुढील खंदकावर पाडण्याचा पूल आदल्या दिवशीं ऑरेंजच्या हुकुमावरून काढून ठेविला होता, त्यामुळें या लोकांचा त्या बाजूनें उपाय चालेना.

जमलेल्या लोकांनीं भाले, बंदुका, घण, कुऱ्हाडी, तरवारी वगैरे हत्यारें बरोबर घेतलीं होतीं. या प्रसंगीं आपणावर लक्षावधि स्त्रीपुरुषांचें जीवित व अँट्वर्पसारख्या प्रचंड व्यापारी शहराची संपत्ति रक्षण करण्याची जबाबदारी आहे हें ओळखून ऑरेंजनें अश्वारोहण केलें. तो आतां राजाचा सेवक नव्हता. त्याच्या धैर्याची व कर्तव्यबुद्धीची या वेळीं खरी परीक्षा होती. बरोबर कोणीही रक्षक अगर मदतनीस न घेतां त्यानें या खवळलेल्या समुद्रांत घोडा घातला. त्याला पाहतांच " पोपचा बंदा, " " दानवांचा सचीव " वगैरे नांवांनीं शिव्याश्रापांचा त्याच्यावर वर्षाव सुरू झाला. या वेळीं त्याचा जीव फार धोक्यांत होता. एका कापडवाल्यानें त्याच्यावर बंदूक रोखली; परंतु ती दुसऱ्या एका इसमानें हिसकावून घेतली. त्याचा निश्चयाचा व गंभीर चेहेरा पाहून मंडळी थोडी थंड झाली. ऑरेंजनें जमलेल्या लोकांस असें सांगितलें कीं, लढाई आतां संपली आहे, सुधारकांचा सर्वस्वीं नाश झाला आहे, शत्रू निघून गेले आहेत, व तुमच्यासारख्या अननुभवी व अशिक्षित जमावाच्या हातून त्यांचें पारिपत्य होणार नाहीं. हा उपदेश पुष्कळांस मानवला, परंतु सुमार पांचशें आततायी लोकांनीं शहराबाहेर जाण्याचा आग्रह धरला; त्यांस पुढील भविष्य सांगून अधिकाऱ्यांनीं बाहेर सोडलें. बाकीच्या लोकांनीं शहरांतच कॅथोलिक लोकांचा सूड घेण्याचा विचार करून शहरच्या मीरनामक चौकांत गर्दी केली. इकडे डी बोव्हास शहरांत कांहीं गडबड आहे असा संशय आल्यावरून त्यानें शहराकडे मोर्चा वळविला, व खंदकापुढें धुलूजचें निशाण उभें करून त्यानें बंडवाल्यांस धमकीचा निरोप पाठविला. तटाबाहेर पडलेल्या वीरांनीं या सैन्याचें विक्राळ स्वरूप पाहतांच मागें पाय काढला. शहरांत गर्दी वाढत चालली. सुमार बारा पंधरा हजार कॅल्व्हिनपंथी लोक मीर चौकांत जमले. हा चौक फार भव्य असून त्याच्या आसपास मोठमोठ्या इमारती होत्या; यांत पुष्कळ रस्त्यांचा मिलाफ झाला होता. जमलेल्या लोकांनीं ह्या सर्व रस्त्यांचीं तोंडें कांहीं घन पदार्थ रचून बंद केलीं होतीं; तोफखाना फोडून बंडवाल्यांनीं कांहीं तोफा ओढून आणिल्या होत्या, त्याही प्रत्येक रस्त्याच्या तोंडावर त्यांनीं रोखून ठेविल्या; त्यांनीं सर्व तुरुंग खुले केले; त्याच्या

येगानें त्यांची संख्या बरीच फुगली. जाळण्याची व लुटण्याची भाषा जिकडे तिकडे ऐकूं येऊं लागली. गांवांत लोक विशेषेंकरून बायकामुलें भीतीनें अगदीं गांगरून गेलीं. पुढें काय होणार याचा कोणास थांग लागेना. सरदार ऑरेंज हा सर्वकाळ दक्ष होता. त्यानें रखवालीकरितां आठ दळें सप्टेंबर महिन्यांत तयार केलीं होतीं, तीं आतां सज्ज केलीं; शहरांतील निरनिराळ्या राजकीय संस्थांचे प्रतिनिधी गोळा करून त्यांच्याशीं लोकस्थितीचा विचार चालविला. मीर चौकांत जाऊन बंडवाल्यांस आपले आठ मुखत्यार आपणाकडे मसलतीकरितां पाठविण्याविषयीं त्यानें सक्तीचा हुकूम केला. शहरच्या किल्ल्या स्वतःपाशीं व हूस्ट्रॉटनपाशीं रहाव्या, नागरिक जन व शिपाई यांनीं शहरांत बंदोबस्त राखावा, सरकारची शिबंदी पलटण शहरांत येऊं नये व शहरच्या सनदा शहरवाशी लोकांनीं आपल्या ताब्यांत ठेवाव्या अशी सूचना ऑरेंजनें या मुखत्यारांस केली. कॅल्व्हिनपंथी लोक शहरच्या किल्ल्या मागूं लागले व आपण सर्व बंदोबस्त करणार असें ह्मणूं लागले. त्या दिवशीं रात्र झाल्यामुळें शहरांत सर्व धर्मांच्या लोकांचा ठिकठिकाणीं पहारा बसवून वाटाघाटीचें काम तहकूब ठेवावें लागलें. रात्रौ दंगाधोपा झाला नाहीं. दुसरे दिवशीं सायंकाळपर्यंत वाटाघाट होऊन पंधरा कलमांचा एक करार तयार करण्यांत आला. त्याचा इत्यर्थ असाः–शहरांत सरकारची शिबंदी घ्यावयाची नाहीं; ऑरेंज व हूस्ट्रॉटन यांशीं शहरच्या किल्ल्या रहाव्या; शहरचा बंदोबस्त सर्व धर्मांचे रहिवासी व शिपाई यांनीं मिळून करावा; व चारशें स्वार व एक लहान नौकासमुदाय शहरच्या खर्चानें शहरच्या रक्षणार्थ तैनातीस ठेवावा. नवीन पंथांस सप्टेंबरमध्यें ठरल्याप्रमाणें विवक्षित स्थलीं प्रार्थनेस परवानगी असावी. निरनिराळ्या धर्मांनीं एकमेकांचा अपमान करूं नये. कॅल्व्हिनपंथाचा त्वेष सायंकाळीं फारच वाढला; ठरलेल्या अटी त्यांस पसंत होतील असें वाटेना; सायंकाळ होतांच सभेचें पुढील काम पुन्हां तहकूब ठेवण्यांत आलें. रात्रींही ऑरेंजनें आपला वेळ फुकट घालविला नाहीं. कॅल्व्हिनपंथी लोक, ल्यूथरपंथी लोकांस, आपणास मिळून पोपच्या कळपास निःशेष शहरांतून बाहेर घालविण्याकरितां बोलावणें करीत होते. ऑरेंजनें स्वतः ल्यूथरपंथ स्वीकारला होता. ल्यूथरधर्मी लोकांस

कॅल्व्हिनपंथाविषयीं पूर्ण तिरस्कार होता; ऑरेंजचाही कल यावेळीं त्या लोकांच्या विरुद्ध होता. त्यानें रात्रौ ल्यूथरपंथाच्या उपदेशकांस व प्रमुख लोकांस भेटून त्यांस कॅथेलिकलोकांस मिळून या बेफाम कॅल्व्हिनलोकांच्या अत्याचारापासून शहरचा बचाव करण्याविषयीं आपल्या अनुयायांस उपदेश करण्यास सांगितलें. सूर्योदयापूर्वीं तीन चार हजार ल्यूथरपंथी लोक नदीतीरावर जमाव करून बसले. ऑरेंजनें शहरांतील विदेशी व्यापाऱ्यांस बोलावून तेही आपणास अनुकूल करून घेतले. ता० १५ मार्च रोजीं सकाळीं अँट्वर्प शहरचा देखावा मोठा भयप्रद होता. सुमार पंधरा हजार कॅल्व्हिनपंथी लोक मीर चौकांत तळ देऊन होते; तसाच हत्यारबंद ल्यूथरपंथी लोकांचा एक मोठा जमाव सेंट मिकेलच्या देवळांत रक्ताच्या आशेनें जीभ चाटीत बसला होता; व बड्या चौकांत कॅथोलिक धर्मी व शहरचें कदिम सैन्य सज्ज होऊन उभें होतें. कॅल्व्हिनपंथी लोक कॅथोलिक लोकांची बीभत्स शब्दांनीं निन्दा करीत, त्यांच्या नरड्यांचा घोट घेण्यास टपले होते; ल्यूथरपंथी लोक त्यांना दरवडेखोर व खुनी समजत होते, व त्यांच्यावर तुटून पडण्यास टपले होते. ऑरेंज त्या दिवशीं या शहरांत नसता तर भयंकर रक्तस्राव झाला असता. ता. १४ रोजीं ठरलेला करार बड्या चौकांत मोठ्यानें वाचण्यांत आला. तेथील लोकांनीं जय शब्दांनीं तो मान्य केला. नंतर ऑरेंज, हूस्ट्रॉटन हे स्थानिक अधिकारी व शंभर स्वार बरोबर घेऊन मीर चौकांत आले तेथेंही नवीन ठराव वाचण्यांत आले. कॅल्व्हिनपंथी लोक ते मान्य करीनात. त्यावर ऑरेंजनें त्यांस सौम्य रीतीनें असें कळविलें कीं, नवीन ठरावांवरून कॅल्व्हिनपंथी लोकांस धर्मस्वातंत्र्य मिळालें आहे; तेवढ्यानें त्यांचें समाधान होत नसल्यास त्यांनीं खुशाल युद्ध करावें; मात्र कॅथोलिक व ल्यूथर पंथांचें ऐक्य असल्यामुळें त्या उभयतांपुढें त्यांचा निभाव लागणार नाहीं; करितां त्यांनीं पूर्ण विचार करून पुढें पाऊल टाकावें. ऑरेंजचें बोलणें संपतांच राजाचा जयजयकार करून या पंथवाल्यांनीं नवीन ठराव मान्य केले, भयंकर रक्तपात टळला, अँट्वर्प शहरचा बचाव झाला, सर्व भिन्न पंथी लोकांनीं हत्यारें खालीं ठेविलीं व त्यांचे एकमेकांत मित्रभावाचे व्यवहार सुरू झाले.

इकडे न्वार्कर्मीजिनें वेढा व्हॅलेन्सीनीज शहरच्या अगदीं सीमेवर आणून भिडाविला. थुलूजच्या पराभवानंतर या शहरच्या लोकांस पार्मानें एग्मॉन व आर्शो यांजबरोबर असा निरोप पाठविला कीं, 'शहरवासी लोकांनीं शिबंदी आंत घेऊन कॅथोलिक धर्माशिवाय इतर धर्मांचें नांव सुद्धां काढूं नये ह्मणजे मागील गुन्ह्याबद्दल माफी केली जाईल. ज्यांस शहर सोडून जाणें असेल त्यांनीं आपापलें सामानसुमान घेऊन पंधरा दिवसांत बिनहरकत निघून जावें.' शहरच्या मुखत्यारांनीं उलट असें मागणें केलें कीं, 'नवीन शिबंदीचा खर्च लोकांवर बसवूं नये; जप्त केलेल्या मिळकती ज्यांच्या त्यांस परत मिळाव्या व सर्व शहरचे लोक बंडवाले आहेत असा पूर्वी प्रसिद्ध झालेला जाहिरनामा रद्द केल्याबद्दल संस्थानिकांच्या सहीचें आपणास आश्वासन मिळावें.' वेढ्यांत कोंडलेल्या या लोकांनीं अशा उद्धट मागण्या केल्याचें ऐकून आर्शोला हसें कोसळलें. एग्मॉनला या लोकांचा अत्यंत संताप आला. त्यानें हें सर्व शहर जाळून फस्त करीन व तेथील लोक सरसकट तरवारीनें कापून काढीन अशी शपथ घेतली. शहरच्या प्रतिनिधींस एग्मॉनचा असा हा निरोप घेऊन शहरांत परत जाण्याची छाती होईना. शहरावर तोफांचा भडिमार करण्याची लागलीच तयारी सुरू झाली. तोफा रोखण्यांस मार्‍याची जागा एग्मॉननें स्वतः ठरविली, व पुढील काम न्वार्कार्मीजवर सोंपवून तो शहरची हवाल कळविण्यासाठीं रीजंटकडे गेला. न्वार्कार्मीज व पार्मा यांनीं राजनिष्ठेबद्दल त्याची फार वाहवा केली. एग्मॉननें राजास ताबडतोब पत्र पाठवून ही सर्व हकीकत कळविली. "तोफा रोखण्याची जागा मीं स्वतः पसंत केली आहे; माझीं आठ दळें या वेळीं मला मिळालीं असतीं तर शहरावर हल्ला करून बंडवाल्यांस कापून काढण्याचा माझा इरादा होता. मी राजसेवेंत व सुधारकवर्गास शासन करण्याच्या कामांत अगदीं तत्पर आहे; लोकांत माझ्यासंबंधी गैरसमज झाले आहेत." रविवार ता. २३ मार्च रोजीं प्रातःकाळीं पांढऱ्या बुरुजाच्या बाजूनें शहरावर तोफांचे गोळे येऊं लागले. शहरांत प्रथम सुधारक मॅरटचीं पदें ह्मणत बायकामुलें रस्त्यांतून निर्भयपणें हिंडत होतीं; प्रार्थनामंदिरांत दीन स्वरानें प्रार्थना चालल्या होत्या; पण तोफांचा

भडिमार सुरू होतांच निराशा व भीति यांनीं लोक अगदीं गळून गेले; धर्मावरील दीर्घ विश्वासाचें सामर्थ्य अगदीं कोतें पडलें; जिकडे तिकडे हाहाकार उडाला. बाहेरून मदत येण्याची आतां बिलकुल आशा न उरल्यामुळें शहरवासी लोक पहिल्याच दिवशीं शरण गेले; लोकांचे जीव रक्षण करावे व शहरांत लुटालूट करूं नये अशी लोकांनीं शत्रूची प्रार्थना केली ती प्रथम मान्य करून, शहरांत शिरतांच फौजेच्या लोकांनीं लोकांच्या घरांत ठाणीं देऊन अनेक अनन्वित प्रकार केले. कित्येक श्रीमान् लोक पकडून फांशी देण्यांत आले. त्यांची संपत्ति न्वार्कार्मीजच्या सैन्यांत वांटून गेली. डीब्रे व लाग्रेंज हे प्रसिद्ध उपदेशक निसटून जात असतां हेरांच्या बातमीवरून त्यांस जवळच्या एका मठांतून पकडून आणिलें; व कांहीं महिने अंधारकोठडींत ठेवून शेवटीं त्यांचा शिरच्छेद करण्यांत आला. उभयतांनीं मरतांना लोकांस आपल्या धर्मावर पूर्ण श्रद्धा ठेवण्याविषयीं उपदेश केला; व राजकीय बाबतींत राजाज्ञा पालन करा, परंतु धर्माच्या बाबतींत मॅजिस्ट्रेटांचा हुकूम जुमानूं नका, असें स्पष्ट सांगितलें. लाग्रेंज कुऱ्हाडीचा घाव पडण्यापूर्वीं ओरडून ह्मणाला, 'या ख्रिस्तीदेशांत येशूख्रिस्ताचे खरे हेतू समजून सांगण्याबद्दल मला आज ही गति मिळत आहे.' याचप्रमाणें शेंकडों लोक यावेळीं बळी पडले. सतत दोन वर्षेंपर्यंत दर आठवड्यास थोडेबहुत लोक सुळावर चढत होते. सदाचारसंपन्न व सभ्य लोकांस या प्रकारापासून इतकी दहशत उत्पन्न झाली कीं, पुष्कळ लोक आपली चीजवस्त घेऊन दुसऱ्या देशांत जाऊन राहिले. व्हॅलेन्सीनीजला असें अघोर शासन मिळतांच दुसरीं सर्व शहरें गळ्यांत फांस आडकवून न्वार्कार्मीजला सामोरीं जाऊं लागलीं; सर्व शहरांनीं सरकारची शिबंदी फौज मुकाट्यानें शहरांत घेतली. ता. २६ एप्रिल रोजीं सरदार मॅन्स्फील्डनें पायदळ पलटणीचीं सहा दळें घेऊन खुद्द अँट्वर्प शहरांत प्रवेश केला.

नेदर्लंडचे पुरातन हक्क, नवीन धर्ममतांचें प्राबल्य व आपला राजाशीं सेव्यसेवक भाव यांचा होतां होईल तितका मेळ घालून अँट्वर्प शहरांत वुइल्यमनें बंदोबस्त राखिला होता. नवीन आज्ञांकितपणाची शपथ इतर कांहीं सरदारांप्रमाणें घेऊन राजाचा सर्वस्वीं गुलाम बनणें अगर

ती न घेतल्यामुळें बंडवाल्यांच्या मालिकेंत बसणें यापैकीं दुसरा मार्ग त्यानें आतां पसंत केला होता. त्यामुळें आपल्या मनोदेवतेच्या, राजाच्या खऱ्या हिताच्या किंवा राष्ट्राच्या प्राचीन हक्कांच्या विरुद्ध वागण्याचा प्रसंग येईल अशी त्यास भीति वाटूं लागली; ह्मणून सर्व अधिकारांचा राजिनामा देऊन देशत्याग करण्याचा आपला इराद्ा त्यानें रीजंटला कळविला. मार्गरेटनें आपणास भेटण्याकरितां त्याला ब्रुसेल्स येथें बोलावणें केलें; शिवाय संस्थानिकांच्या जमातीनेंही भेटीकरितां त्यास मेलीन येथें पाचारण केलें; परंतु या भेटींत आपणास कांहीं दगा होईल असा संशय येऊन त्यानें हीं बोलावणीं मान्य केलीं नाहींत. यानंतर मंत्रीमंडळाच्या सल्ल्यानें रीजंटनें आपला चिटणीस राजपुत्राची समजूत करण्याकरितां त्याजकडे पाठविला. त्यालाही त्यानें निक्षून सांगितलें कीं, 'पूर्वी घेतलेल्या शपथांवरून राष्ट्राचे कायदे पाळण्यास मी बांधला गेलों आहें; करितां त्यांच्या उलट बिन-अटीच्या शपथा मला घेतां येत नाहींत; नवीन धर्मा-विरुद्ध हत्यार उचलण्यास आपली मनोदेवता वाहत नाहीं व राजा नेमील त्या मुभेदाराचे हुकूम मान्य करण्याची आपली इच्छा नाहीं.' कांहीं दिवसांनीं ऑरेंज, मॅन्स्फील्ड व एग्मॉन यांची भेट रीजंटनें घडवून आणिली. त्यावेळीं ऑरेंजनें आपला जर्मनींत जाऊन राहण्याचा बेत उभयतांस सांगितला. एग्मॉनचा राजाची सेवा एकनिष्ठपणें करण्याचा संकेत पूर्वीच ठरला होता त्याच्याविषयीं ऑरेंजच्या मनांत पुष्कळ दिवसांपासून खरें प्रेम बिंबलें होतें. तो ज्या भयंकर कड्यावर उभा होता त्यावरून त्यास अलीकडे ओढून बांचवावा असा ऑरेंजचा पूर्ण हेतु होता. राजानें गुप्तपणें उभयतांवर भयंकर दोषारोप केल्याची बातमी त्यास समजली होती. म्हणून 'अंधविश्वासानें राजाच्या जाळ्यांत सांपडून मरण्यापेक्षां विदेशांत राहून आपल्या मरणासन्न पितृभूमीच्या सेवेंत देह कष्टविणें श्रेयस्कर आहे; राजाचें अंतःकरण दयाभूत आहे अशी तुमची कल्पना चुकीची आहे; ती तुमचा सर्वस्वी घात करील; तुमच्या सहाय्यानें या देशावर स्वारी करून नंतर तुमचा निकाल लावण्याचा स्पॅनिश लोकांचा हेतु आहे;' वगैरे गोष्टी मोठ्या सद्गदित अंतःकरणानें त्यांस सांगून राजपुत्रानें आपल्या जिवलग मित्राची पुष्कळ विनवणी केली. परंतु

त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ही भेट होऊन मंडळी आपापल्या ठिकाणीं जाण्यास निघाल्यावेळीं उभयतांच्या डोळ्यांस अश्रु आले. ही त्यांची शेवटची भेट होती. यानंतर थोड्याच दिवसांनीं ऑरेंजनें राजाकडे सर्व कामांचा राजिनामा पाठवून त्यास आपला जर्मनीस जाण्याचा बेत कळविला; त्यांत राजाच्या खऱ्या हितार्थ कायावाचामनें- करून झटण्याचा आपला संकल्पही सुचविला होता. त्यानें ता० १३ रोजीं एग्मॉन व हॉर्न यांना शेवटचीं पत्रें पाठविलीं. त्यांत त्यांनीं स्वीकारलेल्या मार्गाबद्दल उभयतांस शेवटचा उपदेश करून, आपला पूर्ण विचारांअंतीं व पुष्कळ दिवसांपासून जर्मनींत जाऊन राहण्याचा बेत ठरला आहे; नवी शपथ घेणें आपणास उचित वाटत नाहीं; स्वदेश व स्वधर्म यांची सेवा आपल्या हातून घडत नाहीं; आपण एकट्यानेंच सरकाराशीं विरोध केल्यास सर्वांच्या डोळ्यांवर येणार, करितां आपणच लोकांच्या नजरेआड होणें बरें; वगैरे मजकूर या पत्रांत लिहिला होता. ता० २२ एप्रिल १५६७ रोजीं ऑरेंजनें जर्मनींतील आपल्या घराण्याचें जहागिरीचें ठिकाण डिलेन्बर्ग येथें प्रयाण केलें. जर्मनींत जाऊन पोहोंचतांच राजाचा खाजगी चिटणीस, परंतु ऑरेंजचा गुप्त बातमीदार व्हँडेनेझ यानें त्यास असें कळविलें कीं, 'राजाचा स्पेनमधून निघालेला सेनापति आल्व्हा यास तुह्माला होतां होईल तितकें लवकर पकडून व चोवीस तासांच्या आंत चवकशी करून तुमचा निकाल लावण्याचा हुकूम मिळाला आहे.'

ब्रेडरोडचा कायमचा तळ व्हीएन येथें होता; मधून मधून तो आम्स्टर्डमलाही जात येत असे. त्याच्या वाड्यांत नेहमीं दंगल चालत असे व त्यानें चळवळही बरीच चालविली होती. त्याच्या वर्तनामुळें त्याच्यापासुन कांहीं लोकोपयोग होईल असा कोणत्याच पंथास भरंवसा येईना. त्याला आम्स्टर्डम सोडून जाण्याविषयीं पार्मानें सक्त हुकूम केला. प्रथम त्यानें हा हुकूम जुमानला नाहीं, परंतु ऑस्ट्रवेल वगैरे ठिकाणची बातमी समजतांच त्यानें सुरक्षितपणें जाण्याची परवानगी राजाकडे मागितली व दरम्यान तो एम्डेनला पळून गेला. तेथें त्याचा लौकरच एकाएकीं अंत झाला. ब्रेडरोडचे प्रयत्न आपणास आपल्या

पूर्वजांप्रमाणें हॉलंडचें स्वामित्व मिळण्यापुरतें होतें; त्याच्या हातून देश-कार्य स्वल्पही झालें नाहीं; त्याच्या मरणानें कोणास वाईटही वाटलें नाहीं. मात्र त्याच्या मरणानें कटवाल्यांची वाताहत झाली. त्याच्या अनुयायांपैकीं शिपाईपेशाचे लोक आपापल्या घरीं पळून गेले; कांहीं सरदार लोक जहाजांतून जर्मनीस पळून जात असतां त्यांस दारू पाजून झोंपेच्या गुंगींत जहाजाच्या नाखव्यानें भलत्याच बंदरांत नेऊन मेघेमच्या स्वाधीन केलें. पुढें कांहीं दिवसांनीं आल्व्हाच्या सत्रांत त्यांचा शिरच्छेद झाला. या रीतीनें बंडाच्या पहिल्या कटाचा शेवट लागला.

राजपुत्र ऑरेंजची पाठ फिरतांच नेदर्लंड देशांत ग्रहण पडल्यासारखा मोठा अंधःकार भासूं लागला. सर्व देश निराशेनें अगदीं दीन झाला. लोकांचीं मनें भीतीनें अगदीं थंड पडलीं. उद्योगी व प्रतिष्ठित लोक, गेल्या दंग्याधोप्यांत ज्यांचा संबंध असल्याचा संशय होता ते व नवीन मतांचे लोक यांनीं देशांतून पळ काढला. नवीन पंथी लोकांचे जमाव हत्यारबंद शिपायांनीं मोडून टाकिले; त्यांचे उपदेशक व पुरस्कर्ते सुळावर बळी पडले; त्यांच्या अनुयायांस फटके, तुरुंगवास वगैरे भोगावे लागले. नवीन प्रार्थनेचीं मंदीरें जमीनदोस्त झालीं. गांवोगांव वधस्तंभ उभारलेले दिसूं लागले. जीविताशा व धनाशा यांनीं गुरफटलेले लोक एकदम पूर्ण कॅथोलिकमताचे बनले; व खऱ्या कॅथोलिक लोकांपेक्षांही नियमानें त्या धर्माचीं व्रतें पालन करण्याचा विडा त्यांनीं उचलला. ता. २४ मे रोजीं रीजंटनें पूर्वीच्या जाहिरनाम्यांची आठवण ताजी करण्याकरितां एक नवीन जाहिरनामा प्रसिद्ध केला; त्याचा सारांश : “ सर्व नवीन पंथ धर्मोपदेशक, शिक्षक यांस सुळी द्यावें; ज्यांच्या घरीं नवीन धर्माप्रमाणें प्रार्थना झाली असेल, किंवा ज्यांनीं आपले नोकर अगर मुलें अशा प्रार्थनेच्या ठिकाणीं पाठविलीं असतील; किंवा ज्यांनीं उत्तर कार्यांत नवीन धर्माचे मंत्र म्हटले असतील, किंवा ज्यांच्या मुलांचे नाम-करणादि संस्कार नवीन मताप्रमाणें झाले असतील, किंवा ज्यांनीं धर्म-पुस्तकें छापून विकलीं असतील, त्या सर्वांस देहान्तप्रायश्चित्ताची शिक्षा द्यावी; मुलें व नोकर यांस फटके मारावेत; भणंग, फिरस्ते, गोसावी व धर्माचरणांत चुकलेले लोक यांस हद्दपार करावें : वगैरे. ” हा जाहिरनामा

प्रसिद्ध होतांच लोकांच्या झुंडी देश सोडून जाण्यास निघाल्या. त्यांस अटकाव करण्यासाठीं नवीन हुकूम प्रसिद्ध झाला. या हुकुमावरून सर्व जहाजांच्या मालकांस, गाडीवाल्या वगैरे वाहक लोकांस कोणाही इसमास सरहद्दीच्या बाहेर न पोंहोंचविण्याविषयीं ताकीद मिळाली. एवढ्यानें फिलिपची तृप्ति झाली नाहीं. ता० २४ च्या जाहिरनाम्यांत जिवंत जाळण्याची शिक्षा नमूद न केल्याबद्दल त्यानें रीजंटला ठपका दिला.

नेदर्लंडमध्यें चाललेल्या दंग्याधोप्यांसंबंधी फिलिपनें आपले मुख्य सचीव रायगोमेथ व ड्यूक आल्व्हा यांच्याशीं पुष्कळ दिवस खल चालविला होता. रायगोमेथची राजास अशी आग्रहपूर्वक विनंति होती कीं, महाराजांनीं स्वतः एकवार नेदर्लंड देशांत जाऊन, तेथील लोकस्थिति प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून, चारचौघांचे विचार जागच्या जागीं घेऊन, व लोकांचें ह्मणणें स्वतः ऐकून योग्य दिसेल ती व्यवस्था करावीः आल्व्हाचा, एकदम सैन्य पाठवून लोकांस जबर तंबी द्यावी व बंडाचा मोड करावा, असा अभिप्राय होता. राजा मार्गरेटला वारंवार नेदर्लंडला आपण येणार अशीं निश्चयात्मक पत्रें पाठवीत होता; परंतु बंडाच्या ठिकाणीं स्वतः जाण्याचा त्याचा बिलकुल उद्देश नव्हता. रायगोमेथचा सल्ला अर्थातच राजास पसंत पडला नाहीं. सैन्य पाठविणें झाल्यास त्यावर आपली योजना व्हावी अशाबद्दलही रायगोमेथनें बरीच खटपट केली, परंतु आल्व्हासारखा अनुभवी व पराक्रमी योद्धा सोडून, शांतताप्रिय व बुद्धिबळांतील युद्धाशिवाय इतर युद्ध ज्यास स्वप्नींही माहीत नाहीं अशा पुरुषाच्या स्वाधीन ही कामगिरी करणें शक्य नव्हतें. सरतेशेवटीं ड्यूक आल्व्हानें स्पॅनिश सैन्य घेऊन नेदर्लंड देशावर स्वारी करावी व नवीन पंथांचा उच्छेद करावा, असा सिद्धांत ठरला. या मोहिमेंत धर्मभ्रष्टांचा नाश करून, पेरु व मेक्सिकोच्या खाणींतून स्पेनच्या राजास प्राप्त झालेल्या सोन्यापेक्षां अधिक सोन्याचा प्रवाह नेदर्लंडमधून सुरू करण्याचें आल्व्हानें आश्वासन दिलें. अखेरीस सिसिलीज, नेपल्स्, सार्डीनिया, व लॉंबर्डी या चार ठिकाणचीं पलटणें देशीं आणवून व सुमार दहा हजार निवडक सैनिक बरोबर घेऊन ता० १५ एप्रिल रोजीं आल्व्हा

नेदर्लंडच्या मोहिमेस निघाला. अगोदरच ताब्यांत असलेला हा देश आतां पूर्णपणें जमीनदोस्त करून त्यांतील प्राचीन स्वातंत्र्याचा अंकुर समूळ नाहींसा करण्याचा हा प्रयत्न होता. स्थानिक स्वराज्य, विद्या, कला, सारस्वत व व्यापार यांनीं प्रसन्न दिसणारें हें राष्ट्र आतां जुलमाच्या चरकांत घालून पिळून काढण्याचा फिलिपचा इरादा होता. आपण मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगीं राजाची आजपर्यंत फार महत्वाची कामगिरी बजाविली असतां-ही आपल्या डोक्यावर हा नवीन अधिकारी नेमलेला पाहून, रीजंटला आपल्या श्रमाची चीज झाली नाहीं, असें वाटूं लागलें. तिनें रागाचीं व निराशेचीं पत्रें राजास पाठविलीं व आपला निरोप कळविण्याकरितां मुद्दाम एक वकील स्पेनला पाठविला. त्यावर अद्बी सोडून वागल्याबद्दल फक्त एक जरबेचें उत्तर राजाकडून आलें. इकडे वर्तमान व भारी संकटां-नीं नेदर्लंड देश अगदीं विव्हल झाला असतां आल्व्हाच्या सैन्याच्या तुताऱ्या आल्प्स पर्वतावरून ऐकूं येऊं लागल्या.

---

# भाग ६ वा.

## इ. स. १५६७–६८.

### फर्डिनेंडो आल्व्हारेज डी टोलेडो ऊर्फ ड्यूक ऑफ आल्व्हा.

आल्व्हाचें आगमन—धराधरी—एग्मॉनच्या नांवचें बनावट पत्र—बर्धेनचा अंत व मॉंटिनीस पक्की कैद—" यमासन "—ऑरेंज व यमासन—सर्व नेदर्लंडा-वर पोपचें दोषारोपण—एग्मॉन व हॉर्न यांची चौकशी—बंडाची व्यवस्थित तयारी—लुईची मोहीम व होलीलायन येथील जय—एग्मॉन व हॉर्न यांचा वध—फ्रीज्लंडमधील बंडाचा मोड—धर्माला आहुती.

फर्डिनेंडो आल्व्हारेज याचा जन्म इ. स. १५०८ त एका उच्च कुलांत झाला होता. तो चार वर्षांचा असतांच त्याचा बाप मूरलोकांशीं लढत असतां मरण पावला. त्यामुळें त्याचें संगोपन व शिक्षण त्याच्या आजा-च्या नजरेखालीं झालें. लहानपणापासूनच त्याला शस्त्रविद्येचें बाळकडू होतें; विधर्मी लोकांविषयीं तिरस्कार व द्वेष, व आपल्या बापाच्या मरणा-

बद्दल सूड घेण्याची उत्कट इच्छा हे त्याचे लहानपणचे अंकूर होते. तरुणपणीं थोड्याच कालांत शौर्याबद्दल त्याची ख्याति पसरत चालली. वयाच्या सोळाव्या वर्षी त्यानें आपली तरवार फाँटेरेबियाच्या संग्रामांत प्रथम रक्तांत भिजविली. या लढाईत संकटाच्या प्रसंगीं मनाची स्थिरता, अवर्णनीय धैर्य व लष्करी शिक्षानुसार वृत्ति हे आल्व्हाच्या आंगचे गुण स्पॅनिशलोकांच्या जयास बऱ्याच अंशीं कारणीभूत झाले. सन १५३० सालीं चार्लस बादशहाबरोबर तुर्क लोकांवरील मोहिमेंत तो हजर होता. या प्रसंगीं बादशहानें प्रथमच त्याचे अलौकिक लष्करी गुण ओळखिले; व यापुढें तो बादशहाच्या श्रमाचा व यशाचा कायमचा वांटेकरी झाला. सन १५३५ सालीं ट्युनिसच्या स्वारीत तो होता. सन १५४६।४७सालीं स्मॅल्काल्डियन राजमंडळाविरुद्ध झालेल्या मोहिमेंत तो बादशहाच्या सैन्याचा मुख्य सेनापति होता. या प्रसंगीं त्यानें मॅक्सिमिलियनच्या सैन्याची चार घटकेंत उडवलेली बाताहत ऐकून त्याच्या पराक्रमाची सर्व यूरोपभर अतोनात तारीफ झाली. मेट्झ येथील वेढ्यांत सैन्याची बरीच खराबी होतीसें पाहून वेढा उठविण्याचा सल्ला याचाच होता. बादशहाची कारकीर्द संपल्यावर, सन १५५५ सालीं फिलिपनें त्याला इताली देशाचा सुभेदार नेमिलें; तेथें आपल्याच धर्मगुरू पोपविरुद्ध लहानसहान लढाया करण्याचा त्याला तिटकारा येऊन त्यानें स्पेनमध्यें आपली बदली करून घेतली. इतालीमध्यें असतांना एग्मॉननें सेंट क्वेंटिन, ग्रेव्हेलिन वगैरे ठिकाणीं विजयश्री संपादन केल्याचें ऐकून त्याच्या मनांत एग्मॉनविषयीं फार दुष्ट विचार उत्पन्न झाले होते. एकंदरींत, त्या कालचा हा सर्व यूरोपामधील फार यशस्वी, अनुभवी व नामांकित सेनानी होता. लष्करी अंमल पूर्णपणें चालविण्यांत त्याच्या बरोबरीचा यावेळीं दुसरा कोणताही योद्धा नव्हता. वेळ कमी अधिक लागली तथापि थोडके लोक खर्ची घालून मोठा जय मिळविण्याबद्दल त्याची फार ख्याति होती. युद्धकलेचें शिक्षण अगर अनुभव त्याच्याइतकें त्या वेळीं कोणासही नव्हतें. त्याच्या इतके वेढे व लढाया कोणीच पाहिल्या नव्हत्या. परंतु मुत्सद्दीपणाचा अनुभव किंवा त्या कलेस लागणारे गुण त्याच्या आंगीं बिलकुल नव्हते. तो स्त्रीलंपट अगर मद्यपी नव्हता; तथापि

द्रव्याचा लोभ त्याला मनस्वी होता. मायावीपणा, क्रौर्य, खुनशीपणा व हिंस्रबुद्धी त्याच्या इतकी एखाद्या वन्यपशूंत सुद्धां आढळणें शक्य नाहीं. त्याचें स्वरूप फार उग्र व स्वभाव फार उद्धट होता. आपल्यापेक्षां खालच्या दर्जाच्या लोकांस "अरे तुरे" शिवाय तो बोलत नसे व त्यांच्या बोलण्यास कधींच किंमत देत नसे. त्याचें उत्पन्न फार बेताचें होतें, त्याचा बांधा ताठ व सडपातळ, डोकें लहान, चेहेरा उभट, गाल पिवळे, डोळे काळेभोर चकाकणारे, वर्ण पिंगट, केस काळे, व दाढी करड्या रंगाची, दुभागलेली व छातीवर लोंबणारी—अशा प्रकारचें त्याचें बाह्यस्वरूप होतें. या चालक शक्तीनें चालावयाचें यंत्रही अनुरूप होतें. आल्व्हाचें सैन्य अगदीं निवडक व कसलेलें होतें. सिसिलीज, सार्डिनिया, नेपल्स, लॉम्बर्डी येथून आणविलेल्या चार पायदळ पलटणींत यूरोपांत चांगलें नांव मिळविलेले सुमार नऊ हजार पदाती होते. या चार पलटणींवर अनुक्रमें जुलियन् रोमेरो, डॉन गॉंझॅलो, डॉन सॅन्चो व अल्फोंझो युलोआ असे विख्यात व अनुभवी बक्षी होते. शिवाय आल्व्हाच्या राखेचा मुलगा डॉन फर्डिनंड याच्या अधिपत्याखालीं सुमार बाराशें निवडक स्वारांचें घोडदळ या सैन्याबरोबर होतें. सैनिकांचा पोषाख सरदारी थाटाचा असून बंदुका वगैरे सामान नेण्याकरितां प्रत्येक शिपायाबरोबर हुजरे असत. वाटेनें येतांना ड्यूक सार्व्हॉयनें आल्व्हास पॅचिको नामक विख्यात इंजिनियर (शिल्पकार) मदतीस दिला. हें सैन्य कार्थेजीना, जिनोआच्या मार्गानें केनिसचा घाट चढून नंतर बर्गंडी, लोरेन या प्रदेशांतील भयंकर जंगलें व दऱ्या ओलांडून आगष्टच्या १५ व्या तारखेच्या सुमारास नेदर्लंडच्या सरहद्दीवर थियन्व्हील गांवीं येऊन पोंहोंचलें. राणी पार्माला आल्व्हाच्या नेमणुकीबद्दल बरेंच वाईट वाटत होतें. तिनें आपण देशांत स्वस्थता कायम केल्यावर आल्व्हाची नेमणूक झाल्यामुळें आपल्या श्रमाचें फळ दुसऱ्यास मिळणार आहे, व कदाचित् आपण केलेलें काम आल्व्हा सैन्य घेऊन आल्यानें विपरीत होण्याचा संभव आहे वगैरे मजकुराचीं पत्रें राजास पाठविलीं होतीं; व परस्पर आल्व्हाला वेळोवेळीं विनवणीचीं, हुकुमाचीं व धमकीचीं पत्रें लिहिलीं. त्या सर्वांचा कांहींएक परिणाम झाला नाहीं. थियन्व्हील येथें रीजंटच्या वतीनें बर्लेमॉन

व न्वार्कार्मिज हे आल्व्हास सामोरे आले; या ठिकाणीं सर्व लहान मोठ्या शहरचे प्रतिनिधी उदास व भयशंकित अंतःकरणानें त्याचें स्वागत करण्यास आले; व त्याची त्यांनीं करुणा भाकिली. त्यांस त्यानें संदिग्ध व मोजक्या शब्दांनीं उत्तरें दिलीं. ता. २२ आगष्ट रोजीं टर्लेमॉन येथें एग्मॉन कांहीं सरदारांसह या राजसचिवास सामोरा आला. त्यानें या वेळीं कांहीं नामांकित घोडे त्यास नजर केले. आल्व्हानें प्रथम त्याचें स्वागत करण्यांत बरीच चमत्कारिक वृत्ति दाखविली; " हा पहा बडा पाखंडी " असे शब्द त्याला लांबून पाहतांच मोठ्यानें त्याच्या तोंडांतून निघून गेले. पहिली सलामी झाल्यावर सुद्धां कांहीं अर्धवट थट्टेचे व मर्मभेदक शब्द त्याच्या बोलण्यांत निघूं लागले. पुढें पुढें त्यानें आपली वृत्ति सावरली व प्रेमाचा पूर्ण आविर्भाव करण्यास सुरवात केली. ब्रुसेल्स-पर्यंत दोघे बरोबरच घोड्यावरून बोलत चालत आले. शहरांत आल्यावर आल्व्हास बिन्हार्डी पोंहोंचवून एग्मॉन आपल्या वाड्याकडे गेला.

बिन्हार्डी पोंहोंचतांच घोड्यावरून सुद्धां न उतरतां कांहीं स्वार बरोबर घेऊन आल्व्हा तडख रीजंटच्या भेटीस निघाला. प्रथम त्याला भेट द्यावयाची नाहीं असा पार्माचा विचार चालला होता; परंतु मध्यंतरीं त्याजकडून नम्रता व सेवकभाव सूचक पत्रें आल्यामुळें तिचा विचार बदलला. उभयतांची भेट खाजगी दिवाणखान्यांत झाली. बर्लेमॉन, आर्शो व एग्मॉन त्या वेळीं हजर होते. सुमार अर्धा तास सांप्रदायिक व नीरस भाषण उभयतांचेंच झालें. दोघांचेंही वर्तन तुसड, उद्धट व रागाचें होतें. भाषण संपतांच " आपणास कोणते अधिकार मिळाले आहेत ? " असें राणीनें विचारलें. आल्व्हा ह्मणाला, "कागदपत्र पाहून कळवीन. " दुसरे दिवशीं त्यानें राजाचा हुकूम रीजंटला आणून दाखविला. या लेखावर ता. ३१ जानेवारी १५६७ होती त्यांत पार्माला त्याच्या सल्ल्यानें वागून त्याचा हुकूम चालविण्याविषयीं व तो सांगेल त्याप्रमाणें शिबंदी फौज शहरोशहरीं ठेवण्याविषयीं आज्ञा केली होती. यावेळींच निरनिराळ्या मुख्य शहरीं स्पॅनिश सैन्य वांटून देण्यासंबंधानें व्यवस्था ठरली; त्याप्रमाणें अंमल करण्याचें काम आल्व्हानें आपल्या अंगावर घेऊन रीजंटला त्या त्रासांतून मोकळी केली. राजानें आल्व्हा-

बरोबर, आपण येईपर्यंत आल्हाचा हुकूम मान्य करून शिबंदी फौज शहरांत ठेवण्याविषयीं शहरोशहरच्या अधिकाऱ्यांच्या नांवचीं ता. २८ फेब्रुवारीचीं पृथक् पृथक् पत्रें पाठविलीं होतीं; तीं आतां जिकडचीं तिकडे रवाना झालीं; त्याबरोबर राणीनेंही आपले सन्मान्य मदतनीस बक्षीसाहेब यांचा हुकूम शिरसा वंद्य मानण्याविषयीं सर्व स्थानिक अधिकाऱ्यांस हुकूम सोडले. बाह्यात्कारीं शिष्टसांप्रदायाप्रमाणें वर्तन चाललें होतें, तथापि आंतून ती फार खजिल व निराश झाली होती. आपलें शरीर किंबहुना आपलें सर्व आयुष्य खर्ची घालून एकनिष्ठपणानें भावाची नोकरी करून त्याचा असा मोबदला मिळाल्यामुळें तिची वृत्ति अगदीं पालटून गेली; तिनें निर्भयपणें राजास आपल्याशीं कृतघ्नपणानें वागल्याबद्दल व आपली मानहानि केल्याबद्दल खाजगी पत्रें पाठविलीं. ड्यूक आल्हा फौजेसह येतांच नेदर्लंडच्या लोकांतही फार अस्वस्थता व भीति उत्पन्न झाली; ज्यास सोय मिळाली ते नेदर्लंमधून निघून जाण्याचा यत्न करूं लागले. इकडे आल्हानें ब्रुसेल्स, घेंट, अँट्वर्प वगैरे मुख्य मुख्य शहरीं आपलें सैन्य वांटून दिलें; व तेथील स्थानिक सभांकडून शहरांच्या वेशींच्या किल्ल्या मागून घेतल्या.

राजाचा नेदर्लंडला येण्याचा बूट अद्याप कायम होताच. राजा आल्यावर दयेचा वर्षाव होण्याची आशाही लोकांपुढें पसरून ठेविली होती. वास्तविक माद्रीद् येथें आपल्या गुप्त व्यवहाराच्या खोलींत बसून आपल्या द्वेषाच्या जाळ्यांत सांपडलेलीं सावजें आल्हासारख्या शिकारी कुत्र्याच्या हातून मारविण्याचा फिलिपचा निश्चय ठरला होता. धर्मसभेस विरोध करणाऱ्या ठळक ठळक व्यक्ति व सरकारच्या विरुद्ध वर्तन अगर टीका करणारे लोक, या सर्वांस एकदम नाहींसें करून नेदर्लंडमध्यें आपली अनियन्त्रित सत्ता स्थापन करावी असा त्याचा मुख्य हेतु होता. या हेतूस अनुसरून ग्रॅन्व्हिल, आल्हा वगैरे मंडळींच्या विचारें त्यानें असा बेत ठरविला कीं, ज्या ज्या बड्या सरदारांविरुद्ध रीजंटनें वेळोवेळीं प्रतिकूल अभिप्राय लिहिले असतील त्यांस व विशेषतः ऑरेंज, एग्मॉन, हॉर्न व हूस्ट्राटन यांस तावडतोब पकडून त्यांचें शासन करावें; बर्गेन व मॉंटिनी स्पेनमध्येंच असल्यामुळें त्यांचा तेथेंच निकाल करितां येईल;

व ब्रेडरोडच्या कटांपैकीं सांपडतील तितके सर्व लोक पकडून त्यांच्यावर राजद्रोहाचे खटले करावे. नेदर्लंडमध्यें या गुप्त बेताचा संशय येऊन आपलीं सावजें हातांतून निसटून जातील या भीतीनें राजानें आल्व्हा निघाल्यानंतर स्वदस्तुरचीं स्नेहांकित व आश्वासनपर पत्रें सर्व लहान-मोठ्या सरदारांस पाठविलीं होतीं. ऑरेंज मात्र या मांसखंडानें फसला नाहीं. मात्र त्याच्या शहाणपणाचा दुसऱ्या कोणास उपयोग झाला नाहीं. एग्मॉनला चोहोंबाजूंनीं भयाच्या सूचना येत होत्या. डी बिली नामक पोर्तुगीज गृहस्थ पार्माच्या वतीनें नुकताच स्पेनमध्यें जाऊन परत आला होता; त्यानें 'स्पेनमध्यें तुमच्याविषयीं फार वाईट गोष्टी लोक बोलतात, करितां तुह्मी होतां होईल तितका लवकर पळ काढा' असें त्यास आग्रहपूर्वक सांगितलें. खुद्द एग्मॉनच्या मनालाही बरीच अस्वस्थता व काळजी उत्पन्न झाली. तो चार सहा महिन्यांत अगदीं ह्यातारा दिसूं लागला. मंडळींत आला ह्मणजे तो आनंदी वृत्ति धारण करीत असे, तथापि त्याला रात्रंदिवस चैन पडेनासें झालें होतें. अलीकडे आल्व्हा-चे त्याच्याशीं वर्तन फार प्रेमाचें दिसून येत होतें. डॉन फर्डिनंडचा तर वास्तविक त्याच्याशीं स्नेह जडत चालला होता. स्वतः या अंधविश्वासाच्या जाळ्यांत सांपडून हॉर्नलाही त्याच पाशांत गुंतविण्यास एग्मॉन कारणी-भूत झाला. डी बिलीनें एग्मॉनला दग्याची सूचना दिली; परंतु हॉर्न-च्या गळ्यांत फांस अडकविण्याचे कामीं त्याचीच मुख्य मदत होती. माद्रीदहून येतांच त्यानें हॉर्नला मुद्दाम पत्र पाठवून कळविलें कीं, आपण टुर्ने येथें बजावलेल्या कामगिरीबद्दल आपलें राजानें अभिनंदन करून, आपले बंधु मॉन्टिनी यांस बरोबर घेऊन आह्मी लौकरच नेद-र्लंडास येणार आहों असा निरोप आपणास कळविला आहे. आल्व्हा व त्याचा मुलगा डॉन फर्डिनंड यांनींही स्नेहसूचक व विश्वासाचीं पत्रें त्यास जुलै महिन्याच्या अखेर पाठविलीं होतीं. आल्व्हाचा सन्मान करण्या-करितां हॉर्ननें आपला दिवाण पाठविला होता; त्याजपाशीं आल्व्हा-च्या चिटणीसानें हॉर्नविषयीं आपल्या धन्याचा अभिप्राय फार चांगला आहे, व त्यास पैशाची मदत व्हावी ह्मणून नेपल्स अगर मिलनच्या सुभेदारीची जागा देण्याचा विचार घाटत आहे, वगैरे गोष्टी बोलून

दाखविल्यावरून हॉर्न, आल्व्हाच्या भेटीकरितां स्वतः ब्रुसेल्स येथें येऊन पोंहोंचला. ता. ८ सप्टेंबर रोजीं एक स्पॅनिश अंमलदार गुप्तपणें एग्मॉनकडे आला. त्यानें दुसरे दिवशीं सूर्योदयापूर्वी ब्रुसेल्स-मधून निसटून जाण्याविषयीं त्याला फार आग्रहाची सूचना केली. हा गृहस्थ ज्यूलियन् रोमेरो असावा असा अंदाज आहे.

दुसरे दिवशीं, ता. ९ सप्टेंबर रोजीं डॉन फर्डिनंडनें आपल्या वाड्यांत बडा खाना दिला. त्या प्रसंगीं एग्मॉन, हॉर्न, न्वार्कार्मीज वगैरे बड्या गृहस्थांस निमंत्रण होतें. तीन वाजण्याच्या सुमारास आल्व्हाचा असा निरोप आला कीं, जमलेल्या पाहुण्यांनीं जासीच्या महालांत अँट्वर्पच्या नवीन बुरुजाचें काम कोणत्या नमुन्यावर करावयाचें तें ठरविण्या-करितां आपणास भेटण्याची तसदी घ्यावी. हा निरोप येतांच डॉन फर्डिनंडनें एग्मॉनच्या कानांत शब्द उच्चारिले ते, 'येथून तडख घरीं चालते व्हा व आपल्या तबेल्यांतील अगदीं वेगवान् घोडा घेऊन एक पळभर वाट न पहातां या मुलुखांतून निघून जा.' एग्माननें न्वार्कार्मीजला ही हकीकत कळविली; या दुष्ट फ्लेमिश सरदारानें त्याची उलट थट्टा करून त्यास असें सांगितलें कीं, 'पळून जाण्याचा यत्न केल्यापासून तुमच्यावर संशय दृढ होऊन तुमचा नाश होईल.' या प्रसंगीं विजातीय शत्रूचा उपदेश सोडून स्वजातीय मित्राच्या शब्दावर भरंवसा ठेवल्याच परिणाम त्यास लौकरच समजून आला. एग्मॉन, हॉर्न व इतर मंडळी अँट्वर्पच्या बुरुजाच्या रचनेची वाटाघाट करण्याकरितां चार वाजण्याचे सुमारास जासी महालांत दाखल झाली. तेथें जातांच शिल्पकार अर्बीनो व पॅचिको यांनीं नवीन बांधकामाचा नकाशा टेबलावर मांडिला; व त्या-विषयीं मंडळींत वाटाघाट सुरू झाली. मध्यंतरीं कांहीं कामाची सबब सांगून आल्व्हा बाहेर निघून गेला. इकडे सात वाजेपर्यंत बुरुजासंबंधी वादविवाद चालला होता. मंडळी उठण्याच्या वेळीं डॉन सँचोनें एग्मॉनला कांहीं एकान्त करण्याकरितां मागें राहण्यास सांगितलें. दोघे एकटेच राहिल्यावर त्यानें एग्मॉनला आपली तरवार खालीं ठेवण्या-स हुकूम केला. एग्मॉन गोंधळून गेला; काय बोलावें हें त्यास सुचेना. सँचोनें "तुह्मास अटक करण्याचा मला हुकूम झाला आहे, करितां

तुह्मी तरवार काढून ठेवा" असें त्यास सांगितलें. लागलीच शेजारच्या खोलींतून हत्यारबंद लोक आंत येऊन त्यांनीं एग्मॉनला गराडा घातला. निरुपाय होऊन त्यानें तरवार खालीं ठेविली; व "या तरवारीनें पूर्वी राजाची कांहीं तरी नोकरी बजाविली आहे" असे त्याचे उद्गार निघाले. या महालाच्या वरच्या मजल्यापैकीं एका मजबूत खोलींत काळे पडदे लावून त्यास राहण्याची सोय केली होती; येथें ता. ९ पासून ता. २३ पर्यंत त्यास ठेविलें होतें. बाहेरच्या जगाशीं त्याचा सर्व व्यवहार अगदीं तोडून टाकण्याची पूर्ण खबरदारी घेतली होती. स्पॅनिश शिपायांचा त्याच्यावर पहारा होता व त्यांच्याकडूनच त्यास अन्न पोंहोंचत असे. त्याच दिवशीं खालीं चौक वलांडून जात असतांना हॉर्न यास पकडण्यांत आलें. व त्याच वाड्यांत कांहीं दिवस त्यास एग्मॉनप्रमाणेंच ठेवण्याची योजना केली होती. त्याच दिवशीं एग्मॉन व हार्न यांचे दिवाण अनुक्रमें बॅकर्झील व अँलोंझो, व अँट्वर्पचा ग्रामाध्यक्ष स्ट्रालन् यांसही अशाच खुबीदार रीतीनें अटक करण्यांत आली. हें पकडापकडीचें काम करण्याकरितां निव्वळ स्पॅनिश लोकांचीच योजना केली होती; फिलिप बादशहाच्या सैन्यांतील मोठमोठ्या अंमलदारांकडे गुप्त पोलिसांची कामगिरी होती; व सुभेदारिणीपासून तों तहत सामान्य शिपायापर्यंत सर्व दर्जांच्या लोकांची हें विश्वासघातकी काम साधण्यांत मदत होती. हें धराधरीचें काम उरकतांच आल्व्हानें आपला चिटणीस अल्बोर्नो यास पाठवून हॉर्न व बॅकर्झील यांच्या घराची झडती घेतली; सर्व कागदपत्र जप्त करून त्यांची तारिखवार याद केली; व कागदपत्र आपल्या ताब्यांत घेतले. त्याच दिवशीं आल्व्हानें राजास पत्र पाठवून हीं सर्व कामें उरकण्यास ता. २१ आगष्ट पासून ता. ९ सप्टेंबरपर्यंत अवधि लागल्याबद्दल त्याची माफी मागितली. या कृत्यांची बातमी नेदर्लंडमध्यें पसरतांच चोहोंकडे एकच हाहाकार उडाला. एग्मॉनसारख्या राजभक्ताची व कॅथोलिकधर्माभिमान्याची ही अवस्था झाल्यानंतर कोणाही इसमास आपल्या जीवाचा भरंवसा वाटेनासा झाला. स्पॅनिश लोकांसंबंधी द्वेषभाव मनस्वी वाढत चालला. डचेस पार्मानेंही रागाचा आविर्भाव केला; परंतु तिच्या रागाचें कारण

आल्वाचें उद्धट व बेपर्वाईचें वर्तन, व धराधरीच्या कामांत तिची सर्वस्वी हेळसांड हें होतें. तिच्या अस्वस्थतेचें मुख्य कारण, आपण लावलेल्या झाडाचीं फळें आल्वास मिळणार, हें होतें. बिचाऱ्या सामान्य जनास मात्र आपल्या दुःखाबद्दल ती तळमळत आहे असा भास होऊं लागला. तिच्या अनुयायीवर्गांत स्पॅनिश लोकांवर उघडपणें टिका होऊं लागली. हूस्ट्राटनला घोड्यावरून पडून कांहीं इजा झाली असल्यामुळें तो या प्रसंगांत सांपडला नाहीं. आपल्या स्नेह्यांची वार्ता समजतांच आपल्या बचावाचा मार्ग त्यानें सुधारला. मॅन्स्फील्ड हा प्रथमपासूनच राजपक्षीय असल्यामुळें त्याचा संशय घेण्यास जागाच नव्हती. त्याचा मुलगा चार्लस यानें ब्रेडरोडच्या पहिल्या विज्ञप्ती-अर्जावर सही केल्याबद्दल त्याला बिड्या पडल्या. ही एकंदर बातमी समजल्यावर राजाला अर्थातच फार आनंद झाला. ऑरेंज या जाळ्यांत सांपडला नाहीं हें ऐकून ग्रॅन्व्हिलला फार विषाद वाटला. "ऑरेंज मिळाला नसेल तर कोणीच सांपडला नाहीं," असे त्याचे उद्गार निघाले. शहाणा वुइल्यम सांपडला नाहीं असें ऐकून पीटर टिटल्मन ह्मणाला, "आपला आनंद फार वेळ टिकणार नाहीं; जर्मनींतून आपणावर क्षोभ येईल; त्या सपाट्यांत आपला पूर्ण नाश होईल !"

ऑरेंजनें हूस्ट्राटनच्या मुलाच्या नामकरणाच्या दिवशीं एग्मॉनला लिहिलेल्या एका पत्रासंबंधी राजानें ग्रॅन्व्हिलला एकदां माहिती विचारली होती. ग्रॅन्व्हिलनें हें पत्र एग्मॉननें ऑरेंजला लिहिलें होतें अशी दुरुस्ती करून त्याबद्दल आपल्या ता. १७ आगस्टच्या पत्रांत बरीच चिकित्सा केली. ग्रॅन्व्हिलच्याच लिहिण्यावरून या गुप्त पत्रासंबंधी प्रत्यक्ष पुरावा एवढाच होता कीं, रीजंट पार्माच्या उपाध्यायानें तें पत्र पाहिल्याचें एका गृहस्थास सांगितलें असें त्या गृहस्थाचें ग्रॅन्व्हिलपाशीं ह्मणणें होतें. या गुप्त पत्रांत ग्रॅन्व्हिलच्याच लिहिण्यावरून असा मजकूर होता कीं, "आपला गुप्त बेत फुटला आहे, राजा सैन्याची तयारी करीत आहे, त्याच्या पुढें आपला निभाव लागणार नाहीं, करितां कालानुरूप बाह्यात्कारी वर्तन ठेवून योग्य संधि येईपर्यंत सध्यां स्वस्थ राहिलें पाहिजे." या पत्रासंबंधी अगर त्यांतील मजकुरासंबंधी या वृद्ध शकुनीच्या निसटत्या

उल्लेखापलीकडे कांहींच विश्वसनीय पुरावा नसतां व त्याच्या पत्रांतून तो मानभावीपणानें का होईना एग्मॉनसंबंधी शिफारसीचा मजकूर लिहीत असतां या गुप्त बेताबद्दल राजद्रोहाचें घोर शासन एग्मॉनला मिळावें यापेक्षां जुलुमाचें स्वरूप तें कोणतें ? एग्मॉनला क्षमेच्या सावलींत घ्यावें अशीही याच पत्रांतून ग्रॅन्व्हिलची राजास सूचना जात असे.

नेदर्लंडच्या वतीनें स्पेनमध्यें गेलेले वकील मॉंटिनी व बर्धेन हे वास्तविक नजर कैदेंतच होते. या सिंहाच्या गुहेंतून ते पुन्हां बाहेर पडले नाहींत. आल्व्हाचें तोंड नेदर्लंडकडे वळतांच बर्धेनचा अंत झाला. घरीं परत जाण्यास परवानगी न मिळाल्यामुळें व स्पेनमध्यें सतत गुप्त हेरांच्या नजरेखालीं रहावें लागल्यामुळें दहशतीनें, चिन्तेनें व दुखण्यानें त्याचा शेवट झाला, अगर प्राणोत्क्रमणास कांहीं विशेष भौतिक वस्तु कारणीभूत झाली हें त्यानें पुन्हां आपलें पूर्व रूप धारण करुन व या लोकीं परत येऊन सांगितल्यावांचून ठरविण्यास अन्य साधन नाहीं. रायगोमेथ ऊर्फ काउंट एबोली हा प्रधान आपला भरंवशाचा स्नेही आहे असें समजून बर्धेननें त्यास दुखण्यांत निराश होऊन असें कळविलें कीं, " राजाचा मजवर व्यर्थ संशय आहे; त्या संशयाच्या अति उष्ण व शोषक वातावरणांत निरंतर राहून माझ्या शरीरांत बिलकुल अवसान राहिलें नाहीं; मी मेल्यावर माझ्या खरेपणाविषयीं राजाची खात्री होईल व माझ्यासंबंधी खोट्या बातम्या सांगणारांचीं कारस्थानें कळून येतील. " मरणसमयीं बर्धेनला धीर देण्याकरितां काउंट एबोली त्याच्या बिछान्याजवळ बसून त्याच्या तोंडावरुन हात फिरवीत होता. मात्र त्या ठिकाणीं येण्यापूर्वीं बर्धेनच्या अंत्यव्यवस्थेसंबंधानें राजाकडून नुकतेंच मिळालेलें टिपण वाचून, त्याचें मनन करुन स्वारी तेथें आली होती. यांत, "बर्धेन कांहीं झालें तरी जगत नाहीं अशी खात्री वाटल्यास नेदर्लंडला जाण्याची आपणास परवानगी मिळाली आहे असें त्यास कळवावें; त्याची जगण्याची कांहीं आशा उरली असल्यास परवानगी मिळण्याचा संभव आहे असें सुचवावें. तो मयत होतांच त्याच्या उत्तरक्रियेची तयारी करुन त्याच्या मरणाबद्दल दुःख व नेदर्लंडच्या सरदारलोकांविषयीं राजाचा प्रेमभाव प्रसिद्धपणें व्यक्त करावा. मॉंटिनी हा निसटून न जाईल असा योग्य बंदोबस्त ठेवावा.

बर्वेन मेल्याबरोबर त्याची जहागिर जप्त करण्याबद्दल रीजंट पार्माकडे थैली पाठवावी," अशा सूचना होत्या. बर्वेनचे प्रेतसंस्कार होण्यापूर्वींच नेदर्लंडला त्याची जहागिर जप्त करण्याविषयीं व त्याच्या वारसांस तुरुंगांत ठेवण्याविषयीं हुकूम जाऊन पोंहोचले. मॉंटिनीच्या शिरा केवळ भीतीनें लुल्यो पडण्यासारख्या कमजोर नव्हत्या; परंतु आतां त्याला सेगोव्हाच्या विहारस्थानांत पक्की कैद झाली. दुःखाची गोष्ट ही कीं, मॉंटिनी व त्याचा भाऊ हॉर्न ह्या बंधुद्वयापैकीं प्रत्येकास आपला भाऊ अन्य देशांत असल्यामुळें सुरक्षित राहिला आहे असें समाधान वाटत होतें.

ता. ९ च्या पत्रांत आल्व्हानें मागील गडबडीच्या प्रसंगांत घडलेल्या गुन्ह्यांची चौकशी करण्याकरितां एक स्वतंत्र न्यायासन स्थापण्याचा आपला संकेत राजास कळविला होता. या न्यायपीठाची स्थापना आतां ताबडतोब करण्यांत आली. "दंग्यांचें न्यायासन" असें त्याचें प्रथम नामकरण केलें होतें, परंतु थोडक्या वेळांत "यमासन" हें इतिहासप्रसिद्ध नांव त्यास प्राप्त झालें. मागील दंग्याधोप्यांत घडलेल्या गुन्ह्यासंबंधीं चौकशी करण्याचे सर्व अधिकार चालू न्यायसभांकडून काढून स्वतंत्रपणें या पीठास देण्यांत आले. राष्ट्राची मुख्य न्यायसभा अस्ताला गेली; आपण वाटेल ते ठराव करून ते लिहून काढण्याकरितां आल्व्हानें त्यांस वाटेल त्या वेळीं खाजगी रीतीनें बोलवावें अशी त्या सभेच्या न्यायाधीशांची स्थिति झाली. या यमासनापासून लोकच काय परंतु शहरांच्या व प्रांतांच्या राजकीय सभांस दांतीं तृण धरून गयावया करीत उभें राहण्याचा प्रसंग येऊं लागला. राष्ट्राच्या व शहरांच्या पुरातन सनदा व प्राचीन हक्क यांची बोळवण हें न्यायपीठ स्थापन होतांच आपोआपच झाली. या नवीन न्यायासनाचें मुख्य काम राजद्रोहाची व्याख्या करणें व त्याबद्दल शासन करणें हें होतें. राजद्रोहाची व्यापक परंतु साधी व्याख्या थोड्या शब्दांनीं अठरा कलमांत न्यायाधीशांनीं ठरविली; त्यांचा सारांशः—नवे धर्माध्यक्ष, धर्मसंशोधक सभा अगर जाहिरनामे यांच्या विरुद्ध झालेल्या अर्जावर सही करणें राजद्रोहात्मक होतें; उघडपणें जमून प्रार्थना करणें हा राजद्रोह होता; मूर्तिभंग, मैदानांत प्रार्थना, विज्ञप्तिअर्ज, यांच्या विरुद्ध खटपट न करणें

हा राजद्रोह होता; राजाला किंवा यमासनाला कायद्याचा किंवा सनदांचा निर्बंध आहे व त्यांस कोणाचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याचा अधिकार नाहीं असें प्रतिपादणें हा राजद्रोहच होता. ह्या अपराधाला देहान्तप्रायश्चित्ताची एकच साधी शिक्षा ठरविली होती. ह्या नवीन व भयंकर चरकाचा प्रयोग इतका सुयन्त्र चालू झाला कीं, तीन महिन्यांत सरदार, श्रीमान, सावकार, शास्त्री, धर्मोपदेशक वगैरे नामांकित व निवडक अशीं अठराशें माणसें प्राणास मुकलीं; व इतकें होऊनही त्याचें काम अव्याहत चाललें-च होतें. आश्चर्याची गोष्ट ही कीं, राष्ट्रांतील सर्व जुन्या न्यायसभांच्या राखेंतून निर्माण झालेल्या ह्या यमासनास अधिकार मिळाल्याबद्दल राजा-कडून किंवा ड्यूक आल्व्हाकडूनसुद्धां कोणत्याही प्रकारची सनद अगर आज्ञापत्र नव्हतें. हा न्यायमूर्तींचा स्वयंभूच कळप निर्माण झाला होता; व त्याचा आल्व्हा हा कायमचा अध्यक्ष व इतर सभासद त्याचे आज्ञा-धारक सेवक होते. ह्या सदस्यांपैकीं दोघांनाच मतें देण्याचा हक्क होता, परंतु तीं मतें गुंडाळून ठेवण्याचा अधिकार आल्व्हास पूर्णपणें होता. एवंच हें न्यायासन ह्मणजे मसलतगार लोकांचा एक लहान कंपू असून सर्व जबाबदारी व सत्ता आल्व्हाच्याच शिरावर होती. या नवीन अन्याया-सनाची सत्ता सर्वस्वी नियमित करण्यांत आल्व्हाचे दोन हेतु होते: पहिला, सभासदांसंबंधीं आपणास नीट माहिती नसल्यामुळें त्यांनीं आपणास फसवूं नये; दुसरा, खऱ्या न्यायसभांप्रमाणें कायदा व पुरावा यांजकडे विशेष लक्ष न देतां या सभेस राज्यव्यवहाराच्या धोरणानें चालतां यावें. या उद्देशांस अनुसरून व्हिग्लियसच्या सल्ल्यानें या नूतन सभेंत सभासदही अनुरूप नेमिले होते. व्हिग्लियसची या वेळची वृत्ति फारच गर्हणीय होती. स्वतः रक्तानें हात भरविण्याचें त्यास धैर्य होईना. टिस्नॅक स्पेनमधून येऊन पोंहोचल्यामुळें प्रेसिडेंटच्या कामाच्या त्रासांतूनही तो मोकळा झाला होता. तथापि पैशाची व मोठेपणाची त्याची हौस अद्याप पुरी झाली नव्हती. राष्ट्राची भरभराट होण्याविषयीं रात्रंदिवस ईश्वरापाशीं प्रार्थना करून आल्व्हाच्या राजद्रोहाच्या व्याख्येसही तो मान डोलवीत असे; मात्र ती लोकांस कितपत मान्य होईल याबद्दल त्याच्या मनांत थोडा संशय येऊन गेला होता. आल्व्हाला तो नेहमीं

'परम धार्मिक व दयाळू' अशीं विशेषणें लावीत असे. 'व्हिग्लियस हा फार उपयोगी पडणारा व राजकार्यतत्पर मनुष्य आहे, त्याला सरकारच्या हातचा भाकरीचा तुकडा मिळावा,' अशी आल्व्हाची शिफारस होती. मोघम व संदिग्ध शब्दांनीं या गोष्टीस मान्यता दर्शवून, फिलिपनें 'तो नवीन धर्मास अनुकूल, फसव्या व लांचखाऊ' असल्याबद्दल पार्माचा अभिप्राय आल्व्हास कळवून ठेवला. या गृहस्थाच्या मदतीनें निरनिराळ्या प्रांतिक न्यायसभांतून मासले वाईक लोक पसंत करून त्यांची या नवीन न्यायासनावर योजना झाली. बॅलॅमॉन, न्वार्कार्मीजि वगैरे ज्या ज्या लोकांस या कामाकरितां आव्हान झालें त्यांनीं मोठ्या उत्सुकतेनें ही कामगिरी पतकरली. नेदर्लंडदेशस्थ न्यायाधीशांस या सभेंत बिलकुल महत्व नव्हतें. डेल् रिओ व ज्युएन व्हार्गस या स्पॅनिश सभासदांस मतें देण्याचा अधिकार असल्यामुळें त्यांचें सभेंत विशेष प्राबल्य होतें. डेल रिओ हा बुद्धिहीन व विचारहीन मनुष्य असल्यामुळें आपल्या वरिष्ठांच्या तंत्रानें वागत असे; व्हार्गस हा लहानपणापासून जबरी संभोग, खून वगैरे कर्मांत निरढलेला असल्यामुळें, रक्तपात करणें हा त्याला आयुष्यांतील अत्यंत मनोरंजक व महत्वाचा व्यवसाय वाटत असे. त्यानें आल्व्हाच्या या सत्रांत अविश्रान्त मेहनतीनें व उल्हासानें काम केलें. त्याच्या हातून झालेली प्राणिहिंसा व त्याच्या प्रासादिक वाणींतून नेहमीं होणारी व्याकरणहिंसा या दोन्हीबद्दल जुन्या लेखांतून असंख्य उल्लेख आढळून येतात. शून्य स्वरूपी इतर सभासदांपैकीं हेसेल नामक एका फ्लेमिश गृहस्थाची अशी आख्यायिका होती कीं तो या धर्मासनाचें काम चाललें असतां सदैव निद्रिस्त असे; परंतु अभिप्राय देण्याची वेळ आली कीं डोळे उघडून "वधस्तंभावर चढवा", "वधस्तंभावर चढवा" एवढीं अक्षरें बोलून तो पुन्हां झोंपीं जात असे.

या धर्मासनाची पहिली बैठक आल्व्हाच्या घरीं ता. २० सप्टेंबर रोजीं भरली. या सभेंत चालावयाच्या गोष्टींचा परिस्फोट बाहेर न करण्याबद्दल प्रथम सर्व सभासदांच्या शपथा झाल्या. खुद्द आल्व्हा या सभेचें काम दररोज सात तासप्रमाणें करीत असे. इतर सभासदांची

याहीपेक्षां जास्त वेळ मेहेनत चालत असेल यांत नवल नाहीं. कामाची पद्धति फार साधी व संक्षिप्त होती. मागील दंग्याधोप्यांत सामील असणारांची माहिती मिळविण्याकरितां कांहीं बातमीदार प्रांतोप्रातीं नेमण्यांत आले. सर्वांत मोठा गुन्हा द्रव्य जवळ असणें हा होता. आल्व्हानें लोकांच्या मिळकती जप्त करून त्यांतून पांच लक्ष ड्यूकट राजास दरसाल पाठविण्याचा पण केला होता. करितां स्पेनच्या बुभुक्षित भूमीवर सोन्याचा पूर वाहविण्याकरितां नेदर्लंडांत रक्ताचे पाट सुरू करणें जरूर होतें! श्रीमंत असो गरीब असो, पोपधर्मी असो अगर नूतन धर्मी असो, प्रत्येक इसमास आपली मान अस्थिर वाटूं लागली. परंतु श्रीमान मनुष्यास पळ काढल्याशिवाय गत्यन्तरच राहिलें नाहीं; परंतु तसें करणें गाडीवाले, जहाजांचे तांडेल वगैरे वाहक वर्गास सुटलेल्या हुकुमामुळें दुरापास्त झालें होतें. कांहीं बातमीदारांना ऑरेंज, एग्मॉन, हॉर्न, लुई, ब्रेडरोड, क्युलेंबर, व्हांडेन्बर्ग, बर्घेन व मॉंटिनी यांच्या राजद्रोहात्मक कृत्यांसंबंधीं माहिती गोळा करण्याची स्वतंत्र कामगिरी नेमून दिली होती. इतर असंख्य लोकांच्या खटल्यांचा निकाल फार संक्षेपानें होत असे. दररोज भाराभर बातमी दूतांकडून आली कीं ती तशीच इतर सभासदांकडे विचाराकरितां आल्व्हा पाठवीत असे. कागदपत्र सुद्धां न वाचतां हे सभासद शेंपन्नास लोकांसंबंधानें एकदम अभिप्राय व्हार्गसकडे लिहून पाठवीत. हा अभिप्राय हातीं पडतांच व्हार्गस अठेचाळीस तासांत त्यांस सुळावर चढवून प्रकरण निकालांत काढीत असे. अभिप्रायांत कांहीं मळमळ दिसल्यास आल्व्हाकडून सभासदांस भक्कम कोरडे येत असत. तीस, चाळीस, पन्नास, शंभर अशा टोळ्यांची सारखी कत्तल अहोरात्र चालू झाली; प्रत्येक शहर, गांव, खेडें यांच्या खानेसुमारीच्या तक्त्यांत बायका, पुरुष व अर्भकें यांचा या रीतीनें संहार झाल्याचे दाखले अद्याप आढळतात. श्रोव्हटाईडच्या सणाच्या रात्रीं पुष्कळ लोक मद्यपान करून मजलसींत गुंतले असतां त्यांस पकडून त्यांची सरसकट कत्तल उडविण्याचा यमामसनानें गुप्त बेत केला होता, त्याची बातमी फुटल्यामुळें पुष्कळ लोक सावध राहिले; व दुःखाची गोष्ट ही कीं, या महोत्सवाच्या प्रसंगांत केवळ पांचशें लोकच यमलोकीं

पाठवितां आले. असे किती लोक या सत्रांत बळी पडले याची बरोबर मोजदाद कधींच झाली नाहीं. या यमासनांत चौकशी एकतर्फी होत असे व फांशीच्या शिक्षेचा हुकूम बिनचूक व्हावयाचाच. कित्येक वेळां चौकशीस सुरवात झाल्यावर तो इसम पूर्वीच आपण मेलों असें समजून येई; मग बहुतकरून कागदपत्रांवरून तो इसम निर्दोषी ठरत असे "कांहीं हरकत नाहीं," व्हार्गस अशा प्रसंगीं ह्मणे, "निर्दोषी मेला असला तर यमलोकांत त्याला विशेष अडचण पडणार नाहीं." राजद्रोहाच्या व्याख्येवरून कोणी निर्दोषी राहणें शक्यच नव्हतें. उदाहरणार्थ, डी बेट नामक मनुष्यानें एका बंडवाल्यास मॅजिस्ट्रेटवर गोळी घालूं नको असें सांगितलें होतें; त्यावरून तो बंडवाल्यांचा पुढारी आहे असें ठरून त्याला देहान्तप्रायाश्चित्त मिळालें. मरणानंतरही राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागत असे. एक इसम तुरुंगांत असतांना उदरानें मयत झाला, त्याबद्दल वैयास तंबी देऊन शहरच्या कोतवालानें मुडदा खुर्चीवर बसवून त्याचा शिरच्छेद केला व नंतर त्यास मूठमाती देवविली. याप्रमाणें सर्व देश ह्मणजे केवळ कसाई-खाना बनला. यमाची घंटा प्रत्येक गांवीं रात्रंदिवस वाजत होती; प्रत्येक कुटुंबांत मृत्यूबद्दल हाहाकार चालला होता; जिवंत सुटलेले लोक आपल्या घरादारांचा नाश झाल्यामुळें भ्रमिष्टासारखे गांवोगांव हिंडतांना दृष्टी पडूं लागले. देशांतील सर्व लहानमोठ्या कुटुंबांची अशी स्थिति झाल्यामुळें राष्ट्राच्या पाठीचा कणा सर्वस्वी मोडला. राष्ट्राचे पुढारी, मार्गदर्शक व पुरस्कर्ते मृत्युमुखीं अगर कारागृहांत पडले होते, किंवा परदेशांत लपून राहिले होते. शरण जाण्याचा कांहीं उपयोग होत नसे; पळून जाणेंही आतां अशक्य झालें होतें; सूड घेण्याची इच्छा घरोघर दबून बसली होती. सूळ, फांस व चिता पुरतां पुरेनात. प्रत्येक रस्त्यावरील खांब, घराच्या देवडीचे खांब, शेतांच्या भोंवतालचीं कुंपणें व बगीचांतील झाडें यांच्यावर चेंचलेलीं, जळकीं, शिरोहीन प्रेतें ठिकठिकाणीं दृष्टीस पडत. बाहेर पळून जाणाऱ्या लोकांस प्रतिबंध झाला नसता तर थोडक्याच वेळांत सर्व देश उजाड पडला असता. सध्याच्या स्थितींत सुद्धां मोठ-

मोठ्या व्यापाराच्या शहरांत भर दोन प्रहरीं मध्याह्नरात्रीप्रमाणें सामसूम भासूं लागलें व रस्त्यांमधून गवत उगवलेलें दिसत होतें.

राणी पार्मानें पुष्कळ त्रासून सरतेशेवटीं राजाकडे आपला राजिनामा पाठविला. राजानें तो मंजूर केला व त्याच टपालानें आल्व्हास सुभेदारीचे कामावर नेमल्याचा हुकूम पाठविला. पार्माच्या कामाची तारीफ करून राजानें तिच्या हयातीपर्यंत तिला १४००० ड्यूकटची वार्षिक नेमणूक करून दिली. ता. ७ दिसेंबर १५५७ रोजीं निरनिराळ्या प्रांतिकसभांस शेवटचीं सलामीचीं पत्रें पाठवून पार्मा ही मोठ्या लव्याजम्यासह समारंभानें नेदर्लंडमधून स्वदेशीं गेली. पुढील कारकीर्दीच्या घनतिमिरांत तिच्या अमदानीचा इतिहास किंचित्तेजोमय भासणें साहजिक आहे; परंतु स्वतंत्र रीतीनें विचार केला असतां त्यांत खरोखर प्रशंसनीय असा भाग फार थोडा सांपडेल. पार्माच्या अंगीं स्त्रीस्वभावास अनुरूप असे कांहीं धर्म होते; अधिकाराचीं सूत्रें खालीं ठेवते वेळीं तिनें नेदर्लंडच्या प्रजाजनांस क्षमा करून सदय अंतःकरणानें वागविण्याविषयीं राजास उपदेश केला; परंतु या समयीं ज्या नेदर्लंडच्या सरदारांनीं संकटाच्या प्रसंगीं तिची आज्ञा मान्य करून तिची अब्रू व सत्ता कायम राखिली, व जे हल्लीं अंधारकोठडींत झुरत पडले होते त्यांच्याविषयीं तिनें एक चकार शब्दसुद्धां काढला नाहीं.

याच सुमारास फ्रान्समध्यें नवीन धर्मी लोकांचें बंड उद्भवलें. त्याचा मोड करण्याकरितां फ्रान्सच्या मदतीसाठीं आल्व्हानें कांहीं सैन्य देऊन नेदर्लंडचे कांहीं कॅथोलिक धर्मी सरदार पाठवून दिले. इकडे ज्या कामाच्या मिषानें एग्मॉन व हॉर्न यांस अटक झाली होती, त्याचा प्रस्ताव आल्व्हानें पुढें चालू केला. मोठमोठ्या शहरांच्या तटबंदीचें काम झपाट्यानें सुरू झालें होतें. पाचिकोनें स्वतःच्या देखरेखीखालीं अँट्वर्प शहरानजीक पंचकोनी भक्कम नवा किल्ला बांधून त्याच्यावर पांच मोठे बुरुज तयार केले; किल्ल्याभोंवतीं मोठे दगडी तट बांधून त्याच्या पलीकडे मोठे खंदक खणले, यांपैकीं चार बुरुजांस आल्व्हानें आपलीं नांवें दिलीं व पांचव्या बुरुजास हतभागी पाचिकोचें नांव दिलें. या किल्ल्यांत तोफा, बंदुका वगैरे हत्यारें व दारूगोळा, धान्य वगैरे सामुग्री ठेवण्यास व संकटाच्या

वेळीं शिपाई लोकांस लपून राहण्यास मोठमोठीं भुयारें केलीं होतीं. अँट्वर्पच्या लोकांस जरबेंत राखण्याकरितां ही मयसृष्टि निर्माण केली होती. या नवीन किल्ल्याचा प्रवेशसमारंभ आक्टोबरअखेर झाला; पुढें दोन महिने आल्व्हा बाहेरच हिंडत होता. इकडे ऑरेंज वगैरे पळून गेलेल्या सरदारांविरुद्ध पुरावा गोळा करण्याचें काम त्याच्या हुकुमावरून चाललें होतें.

ता. १८ जानेवारी १५५८ रोजीं ऑरेंज, लुई, त्यांचा मेहुणा व्हांडेन्बर्ग, हूस्ट्राटन, बर्गुलेंबर व मॉंटिनी यांस यमासनापुढें हजर होण्याबद्दल जाहिरनामा प्रसिद्ध झाला. त्यांत जाहिरनाम्याप्रमाणें बेचाळीस दिवसांत हजर न झाल्यास त्यांच्या दरोबस्त मिळकती जप्त करून त्यांस निरंतर हद्दपार राहण्याची शिक्षा फर्माविली होती. अर्थातच या हुकुमास सदर गृहस्थांनीं भीक घातली नाहीं. ऑरेंजविरुद्ध ठरविलेल्या आरोपांचा परिष्कार दहा कलमांत केला होता; त्याचा सारांशः—" ऑरेंज हा बंडाचा मुख्य पुरस्कर्ता होता व आहे, राजानें नेदर्लंडांतून पाठ फिरवितांच त्यानें देश आपल्या स्वाधीन करून घेण्याची व राजास देशांत पुन्हां न येऊं देण्याची खटपट केली; त्यानें स्पॅनिश धर्मसंशोधनपद्धति सुरू करण्याचा राजाचा बेत आहे अशी खोटीच बातमी पसरली; ब्रेडरोड व त्याचे कटवाले यांस ऑरेंजचीच फूस होती; अँट्वर्प शहरांत बंडाचा बीमोड करण्याच्या मिषानें जाऊन तेथें त्यानें पाखंडमतास उत्तेजन दिलें व लोकांस धर्मस्वातंत्र्य देऊं केलें. "

इतर सरदारांवर अशाच प्रकारच्या तोहमती होत्या. या तोहमतींच्या तक्त्यांवरून आल्व्हाच्या यमासनाचा मायावीपणा सहज लक्षांत येण्यासारखा आहे. या निमंत्रणास ऑरेंजनें थट्टेच्या परंतु तिरस्कारयुक्त भाषेंत कोर्टाच्या अधिकाराच्या मुद्यावर जबाब लिहून पाठविला. त्याचा सारांश,–" संस्थानिकांच्या जमातीचा सभासद, जर्मनबादशाहीचा मांडलिक राजा, फ्रान्सदेशांतील स्वतंत्र संस्थानिक, व नेदर्लंड देशांपैकीं वतनदार अधिकारी या विविधपदापन्नत्वामुळें आल्व्हाच्या स्वयंसिद्ध न्यायसभेस आपणास बोलावण्यास कोणताही अधिकार पोंहोचत नाहीं. संस्थानिकांच्या जमातीनें–राजा व इतर मांडलिक राजे यांनीं–पाचारण

केल्यास त्यांच्यापुढें आपलें शुद्ध वर्तन स्थापन करण्यास आपण तयार आहों; व त्यांच्यापुढें जाब देणें झाल्यास आपणास सामान्य तुरुंगांत न ठेवितां संस्थानिकांपैकीं एखाद्याच्या घरीं नजर कैदेंत ठेविलें पाहिजे." या जबाबावरून यावेळीं राजाशीं सामना करण्याची व नवीन धर्माची उघडपणें तरफदारी करण्याची त्याच्या मनाची तयारी झाली नव्हती असें दिसतें. परंतु त्याच्या वर्तनासंबंधीं राज कडून आतां उघडपणें टीका होऊं लागली व त्याच्या मिळकतीवरही गदा आली होती. शिवाय त्याचा मुलगा काऊंट ब्लूरेन हा लूव्हॅनच्या विद्यापीठांत शिकत असतां त्यास फसवून नेऊन स्पेनदेशांत बापाच्या वर्तणुकीबद्दल ओलीस ठेवण्यांत आलें. हा अवघा तेरा वर्षांचा मुलगा मागें नेदर्लंडांत ठेवून ऑरेंज जर्मनींत कसा गेला याचेंच आश्चर्य वाटतें. स्पेनमध्यें तो वीस वर्षें स्पॅनिश पद्धतीनें व स्पॅनिश शिक्षणाखालीं राहून अगदीं बदलून गेला. कर्मधर्मसंयोगानें त्याच्या प्राणास कांहीं अपाय झाला नाहीं.

इकडे यमासनाकडे दररोज अर्जाचे पूर लोटत होते. त्यांत भीतीनें गर्भगळित झालेल्या स्थानिकराज्यसंस्थांकडून आपल्या मागील वर्तनाबद्दल पश्चात्तापदर्शक यादी, कारागृहांत असलेल्या किंवा फांशीं देण्याकरितां काढलेल्या बांधवांकरितां अगर स्नेह्यांकरितां पदर पसरून दया भाकलेलीं विनंतिपत्रें, वगैरे दीनलेख सहस्रशः असत. ता. १६ फेब्रुवारी रोजीं पोप महाराजांनीं नेदर्लंडमधील सर्व लोक पाखंडी आहेत असें ठरवून त्यांस देहांतप्रायश्चित्ताची शिक्षा फर्माविली. त्यांतून कांहीं लोकांचा नामनिर्देश करून त्यांस सोडविलें होतें. हा हुकूम राजानें पसंत करून आपल्या सहीनें प्रसिद्ध केला. सारांश, बायका, पुरुष व मुलें मिळून तीस लक्ष प्रजा--तीन ओळींत--धर्मद्रोही ठरून फांशीच्या शिक्षेस पात्र झाली. सर्व लोकांना फांसावर चढविण्याचा सरकारचा उद्देश नसेल, परंतु सर्वच शिक्षेस पात्र ठरल्यामुळें कोणासही वाटेल त्या वेळीं सुळावर चढविण्यास कायद्याची अगर दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची यापुढें हरकत राहिली नाहीं. तथापि यमासनाच्या बातमीदारांस व सभासदांस प्रत्येक इसमाच्या संपत्तीचें प्रमाण ठरविण्याचें महत्वाचें काम अद्याप करावें लागत होतेंच. या नवीन हुकुमावरून, हजारों लोकांचे बळी

प्रत्यहीं पडत होते. नाताळच्या सणाच्या आठवड्यांत आठशें लोक यम-सदनास पाठविले अशी फुषारकी आल्व्हानें राजाकडे लिहून पाठविली. श्रीमान लोकांस तर मृत्यूवांचून सुटकाच नव्हती; परंतु गरिबीमुळेंही मनुष्याचा बचाव होईल असा बिलकुल भरंवसा नसे. वधस्तंभाकडे जातांना आरोपी रस्त्यांतून लोकांना उद्देशून त्वेषाचीं व विनवणीचीं भाषणें करीत, तीं बंद करण्याकरितां आरोपींची जीभ तीक्ष्ण धारेच्या आंगठींत गच्च बसवून तिचें टोंक लोखंडाच्या तापलेल्या पहारेनें भाजून टाकण्याचा अपूर्व प्रकार सुरू झाला. लोकांचीं मनें अद्याप व्यवस्थित रीतीनें जुलुमाचा प्रतिकार करण्यास तयार झालीं नव्हतीं, तथापि मानवी प्राण्याचे स्वाभाविक विकार सर्वस्वीं दडून राहणें शक्य नव्हतें. प्रथम भटकणाऱ्या व रस्तेलूट करणाऱ्या लोकांच्या टोळ्या "जंगली भिक्षेकरी" या नांवानें सर्व देशभर उत्पन्न होऊन त्यांनीं चोहोंकडे दरवडे, लुटालूट व खून वगैरे करून लोकांस अगदीं त्राही त्राही करून सोडिलें. यांचा बंदोबस्त करण्यास स्पॅनिश सैन्याची योजना करावी लागली.

इकडे एग्मॉन व हॉर्न हे वारंटाशिवाय दोन महिने घेंट शहरीं तुरुंगांत रखडत पडले होते. नोव्हेंबर १५६७ महिन्यांत त्यांच्यावर काम चाल-विण्याकरितां नेमलेले कामगार व्हार्गस, डेलरिओ, व त्यांचा चिटणीस प्रँट्स हे आरोपींस तुरुंगांत जाऊन भेटले; व त्यांजपासून लेखी जबाब मागण्याकरितां लांबलचक, घोटाळ्याच्या व अप्रस्तुत अशा प्रश्नांच्या यादी त्यांनीं त्यांच्या स्वाधीन केल्या. आरोपींनीं तुरुंगांतल्या तुरुंगांत वकीलाच्या मदतीवांचून त्यांचीं लेखीं उत्तरें न दिल्यास त्यांस कोर्टाचा अपमान केल्याबद्दल शिक्षा होईल अशी त्यांस यावेळींच ताकीदही मिळाली. नंतर त्यांचे पुराव्याचे कागदपत्र सर्व त्यांजपासून काढून घेण्यांत आले. एग्मॉन व हॉर्न यांच्या चिटणिसास खोड्यांत वगैरे बसून कबुली देण्यासाठीं बऱ्याच यातना भोगाव्या लागल्या. परंतु राजद्रोहाचा त्यांस वासच नसल्यामुळें अर्थातच त्यांच्याकडून कांहीं माहिती मिळाली नाहीं. पुढें दोन महिन्यांनीं, ह्मणजे ता. १० जानेवारी १५६८ रोजीं, हॉर्न व एग्मॉन यांजवरील तोहमतींचे अनुक्रमें त्रेसष्ट व नव्वद कलमांचे तक्के त्यांचे हातीं आले; व या तोहमतींबद्दल लेखी जबाब पांच

दिवसांत वकिलांच्या सल्ल्यावांचून देण्याचा त्यांस हुकूम झाला. हॉर्नवरील तोहमतींचा सारांशः--" ओरोपीनें ऑरेंज, एग्मॉन वगैरे सरदारांच्या मदतीनें राजाची सत्ता नाहींशी करून नेदर्लंडदेश आपापसांत वांटून घेण्याचा गुप्त बेत केला. सरदार लोकांनीं ग्रॅन्व्हिल-विरुद्ध राजास पाठविलेलें पत्र, त्याची उघडपणें केलेली थट्टा व त्यास घालवून देण्याबद्दल केलेली खटपट, या राजद्रोही कृत्यांत आरोपी सामील होता. फडणीस-मंडळ व खाजगी-मंडळ यांचा मन्त्रीमंडळांत समावेश करावा असें त्यानें प्रतिपादन केलें. ब्रेडा, हूस्ट्राटन वगैरे ठिकाणीं ऑरेंज, एग्मॉन वगैरे सरदारांशीं मसलत करण्याकरितां आरोपी गेला होता व त्या ठिकाणीं कटाचा व विज्ञप्ति-अर्जाचा प्रस्ताव झाला. विज्ञप्ति-अर्जाविरुद्ध त्यानें कांहीं खटपट केली नाहीं. क्युलेंबरच्या मेजवानींत व स्ट्रालनच्या घरीं भिक्षेकऱ्यांच्या नांवानें त्यानें मद्यप्राशन केलें. पार्मानें कटवाल्यांशीं केलेला तह त्यानें पसंत केला. डेंडर्मांड येथें ऑरेंज वगैरेस भेटून सैन्य गोळा करण्याच्या विचारांत तो सामील होता. धर्म-संशोधन व धर्मविषयक वटहुकूम रद्द केले पाहिजेत असें त्यानें आपल्या चिटणिसास वारंवार लिहिलें. टुर्नेमध्यें त्याचें स्वागत करण्याच्या प्रसंगीं " भिक्षेकऱ्यांचा जय असो " असा लोकांनीं गजर केला. त्यानें टुर्ने-मध्यें नवीन धर्मास उत्तेजन दिलें. राजा नेदर्लंडांत आल्यास १५००० फौज जमा करून त्यास आपण प्रतिबंध करूं; व आपला भाऊ मॉंटिनी यास कांहीं अपाय झाल्यास ५०००० फौज घेऊन आपण स्पेनवर हल्ला करूं असें त्यानें ह्मटलें; व्हॅलेंसिनीज येथें लोकांस बंड करण्यास त्यानें फूस दिली; हीं व अशींच दुसरीं कृत्यें करून आरोपीनें राजद्रोह, राजद्रो-ह्यास मदत, बंड, गुप्त कट, विश्वासघात हे गुन्हे केले आहेत." या तक्त्यांत शेवटीं असें लिहिलें होतें कीं, वरील गोष्टीबद्दल सरकारास पक्की माहिती मिळाली आहे; करितां आरोपीची चौकशी फार न वाढ-वितां संक्षेपानें व्हावी व त्यानें राजद्रोहादि गुन्हे केले आहेत असें ठरवून त्यास जहागिरदारीच्या दर्जांतून कमी करावें, देहांत प्रायश्चित्ताची शिक्षा द्यावी व त्याची मिळकत सरकारांत जप्त करावी.

मागील इतिहासावरून असें दिसून येईल, कीं वरील यादीपैकीं

कांहीं कृत्यें हॉर्ननें कधींच केलीं नव्हतीं व कांहीं कामें त्यानें केवळ पार्माच्या हुकुमानें व सांगण्यावरून केलीं होतीं; कांहीं कृत्यांबद्दल त्याच्यावर जबाबदारी घालणें केवळ हास्यास्पद होतें व या कृत्यांवरून काढलेलीं अनुमानें तर्कशास्त्रालाही अगम्य होतीं. अशा या तोहमतीच्या तक्याला कारागृहांतून, वकीलाच्या अगर कागदपत्रांच्या सहाय्यावांचून, बेअदबीची गदा डोक्यावर धरून बसलेल्या कोर्टापुढें जबाब देणें फार जोखमीचें काम होतें. परंतु विशुद्ध अंतःकरणाला डगमगच नाहीं. हॉर्ननें सरळपणानें खरी हकीगत लिहून दिलीः—" राजाला घालवून देण्याच्या वगैरे कटाची मला वार्ता सुद्धां नाहीं; कटवाल्यांशीं माझा बिलकुल संबंध नव्हता; ग्रॅन्व्हिलबद्दल मला तिरस्कार वाटत होता व तो गेला असतां राजाचें हित होईल या हेतूनें मीं त्याच्या विरुद्ध खटपट केली. ऑरेंज वगैरेस ब्रेडा वगैरे ठिकाणीं मी मित्रत्वाच्या नात्यानें भेटलों, त्यांत राजकीय हेतु बिलकुल नव्हता. क्युलेंबरच्या मेजवानींत मी नव्हतों, इतर ठिकाणीं भिक्षेकऱ्यांचा जयजयकार झाला, त्यास मी कारणीभूत झालों नाहीं. धर्मसंशोधनाविरुद्ध माझें खरें मत मीं लिहिलें; टुर्ने येथें पार्माच्या हुकुमांप्रमाणें शब्दशः मी वागलों; तेथील कृत्यांबद्दल कोणतीही जबाबदारी माझ्यावर नाहीं; सैन्य जमा करण्याचा वगैरे माझा कधींच हेतू नव्हता; ब्रुसेलसमध्यें हजार फ्लोरिन सुद्धां कर्ज मला मिळेना; दोनप्रहरची भ्रान्ति वाटूं लागली, म्हणून मीं ब्रुसेल्स शहर सोडलें; वगैरे." शेवटीं, अगदीं साध्या भाषेंत त्यानें आपल्या न्यायाधीशांना अशी विनंति केली कीं, " माझे खरे हेतू समजून घेऊन व माझी राजनिष्ठा व इमानाची राजसेवा लक्षांत घेऊन, माझ्या हातून कांहीं क्षुल्लक अपराध घडले असल्यास त्याबद्दल मला माफी मिळावी; व एकंदरींत मला दोषमुक्त करून जीवदान द्यावें. "

एग्मॉनच्याविरुद्ध अशाच प्रकारचे आरोप होते व त्याचा जबाबही याच धोरणाचा होता. राजाला घालवून देण्याचा बेत, ग्रॅन्व्हिलला अयोग्य ठरवून घालविण्याची खटपट, मस्करीच्या पोषाकाचा प्रसार, मंत्रीमंडळांत इतर मंडळें सामील करण्याचा यत्न, राष्ट्रसभा बोलावल्यावांचून राजास द्रव्याची मदत मिळणार नाहीं अशी धमकी देणें, धर्म-

संशोधनें वगैरेविरुद्ध खटपट, कटास व विज्ञति-अर्जास मदत, सरदारांशीं मसलत, राणी पार्मास संकटाच्या वेळीं मदत न करणें, नवीन धर्मी लोकांस सवलती देणें, बंडवाल्यांस माफी मिळण्याविषयीं प्रयत्न, ब्रुसेल्समध्यें पार्मास अटकावून ठेवण्याची खटपट, फौज जमा करण्याविषयीं सरदारलोकांशीं मसलत, धर्मच्छल झाल्यास राजाविरुद्ध शस्त्र उचलण्याची प्रतिज्ञा, क्युलेंबरच्या मेजवानींत भिक्षेकऱ्यांचा जयजयकार, वगैरे सर्व कृत्यांचा उद्धार एग्मॉनविरुद्धही केला होता. एग्मॉननें कांहीं गोष्टी कबूल केल्या व कांहीं साफ नाकबूल केल्या; व त्यांपैकीं कोणत्याही कृत्यांपासून राजद्रोहात्मक अनुमान निघत नाहीं असें त्यानें त्वेषयुक्त भाषेनें लिहून दिलें. वरील यादीपैकीं बहुतेक आरोपांस त्याचीं उत्तर हॉर्नप्रमाणेंच शब्दशः होतीं. भिक्षेकऱ्यांचा पोषाक प्रचारांत आणण्यांत, ऐषआराम व कर्ज यांनीं बुडालेल्या सरदारांस काटकसरीचा कित्ता दाखविण्याचा आपला हेतु होता; मंत्रीमंडळांत फडणीस व खाजगी-मंडळ यांचा समावेश करावा, राष्ट्रसभा बोलवावी व धर्मखात्याचा अंमल कमी कडक करावा असें प्रतिपादन करण्यांत आपला चांगला हेतु होता; व त्यापासून राजाचें व राष्ट्राचें हित होईल अशी आपली समजूत होती; कटापासून अलिप्त राहण्याबद्दल आपण आपल्या स्नेह्यांस निक्षून सांगितलें होतें; हॉर्न, ऑरेंज वगैरेस ब्रेडा वगैरे ठिकाणीं भेटण्यांत आपला कांहीं राजकीय हेतू नव्हता; नवीन धर्मी लोकांनीं केलेल्या अत्याचारांस आपण कडक शासन केलें; शिवाय पार्माच्या हुकुमाप्रमाणें आपण नेहमीं वर्तन ठेविलें होतें; ब्रुसेल्स सोडल्यापासून रीजंटला कमीपणा येऊन बंडवाल्यांस जोर येइल या भीतीनें तिला ब्रुसेल्स न सोडण्याबद्दल आपण आग्रह केला; सैन्य वगैरे जमविण्याचा आपल्या मनांत कधींही विचार आला नाहीं; भिक्षेकऱ्यांच्या जयजयकाराचा आपण नेहमीं निषेध करून त्याबद्दल लोकांस कडक प्रायश्चित्त देत आलों; वगैरे खऱ्या गोष्टी या लेखी जबाबांत स्पष्टपणें कथन केल्या होत्या. दोन्ही आरोपींची मुख्य तक्रार अशी होती कीं, संस्थानिकांच्या जमातीचे सभासद या नात्यानें आपली चौकशी त्या जमातीपुढें व त्या जमातीच्या नियमांप्रमाणें झाली पाहिजे. आपणास अटक त्या जमातीच्या सदस्यांवांचून कोणास

करतां येत नाहीं. शिवाय एग्मॉन्टची अशी तक्रार होती कीं, ब्राबंट-प्रांताच्या " सानंद प्रवेश " सनदेचा फायदा आपणास मिळाला पाहिजे. हॉर्नची विशेष विनंति अशी होती कीं, कॅथोलिक धर्मी सरदार या नात्यानें आपली चौकशी तद्धर्मीय राजे व संस्थानिक यांच्याकडूनच झाली पाहिजे. हे जबाब दाखल झाल्यानंतर आरोपींस वकील देण्याची परवानगी मिळाली. मात्र सरकारतर्फे कांहीं पुरावा पुढें आला नाहीं व आरोपींस पुरावा देण्याची सवड मिळाली नाहीं. पुरावा घेण्याकरितां अधिकारी मात्र नेमले होते; परंतु त्यांच्या कामास सुरवात होण्यापूर्वीच निकालाची तारीख प्रसिद्ध झाली. आरोपींस भेटण्यास वकीलांस क्वचितच संधि मिळत असे; व भेट झाली तर आल्व्हाच्या वतीनें कोणी मनुष्य तेथें हजर राहत असे. अशा प्रकारची ही या खटल्यांची अद्भुत चौकशी चालू असतां एग्मॉनची विपन्नावस्थेस जाऊन पोंहोचलेली बायको आपलीं अकरा मुलें घेऊन फिलिप, आल्व्हा, जर्मनीचा बादशहा, आपला भाऊ इलेक्टर पॅलेटाईन व फ्लीसच्या जमातीचे इतर सभासद यांजकडे आपल्या नवऱ्याच्या मुक्ततेबद्दल विनवणी करीत होती. तोच क्रम हॉर्नच्या वृद्ध मातेनेंही चालविला होता. या राजमंडळापैकीं प्रमुख राजांनीं व संस्थानिकांनीं फिलिपला स्वतः पत्रें लिहून राजमंडळाचे नियम पाळण्याविषयीं त्यास विनंति केली; एग्मॉनच्या पत्नीच्या अर्जावरून ब्राबंटच्या राजसभेनें " सानंद प्रवेश " सनदेवरून ब्राबंटच्या रयतेस मिळालेल्या हक्कांचा योग्य विचार करण्याविषयीं राजास भीतभीत एक यादी पाठविली; शिवाय जर्मन बादशहानें कॅथोलिक संस्थानिकांपुढें हॉर्नची चौकशी होण्याबद्दल एक स्वतंत्र पत्र राजास पाठविलें. या विख्यात आरोपींच्या वतीनें आलेल्या शेंकडों पत्रांस राजानें उत्तरसुद्धां न पाठवितां आल्व्हास मात्र काम लौकर आटोपण्याबद्दल तगाद्याचीं पत्रें पाठविलीं. फिलिपनें बादशहास असें कळविलें कीं, " कालांतरानें माझें कृत्य सर्व जगास पसंत वाटेल; हल्लीं नेदर्लंड देशास मी मुकलों, तरी अगर तो माझ्या डोक्यावर येऊन पडला, तरी माझा निश्चय बदलणार नाहीं. " ब्राबंटच्या हक्कांचा विशेष बाऊ नव्हता; कारण नेदर्लंडचे बहुतेक सर्व हक्क धुळीस मिळाले होते. मुख्य

अडचण जमातीच्या नियमांची होती; कारण यांत चार्लस बादशहानें स्वतः असें स्पष्ट ठरविलें होतें कीं, जमातीपैकीं कोणाही इसमाची कोणत्याही गुन्ह्याबद्दल चौकशी करणें झाल्यास जमातीच्या नियमानें झाली पाहिजे. त्यावर आल्व्हानें असें प्रतिपादन केलें कीं, हे गुन्हे त्या सदरांत येत नाहींत व ही चौकशी राजा आपल्या स्वतंत्र अधिकारांत करीत आहे, त्याचा जमातीशीं कांहीं संबंध नाहीं. ता. १ जून रोजीं खटल्याची चौकशी संपली; व ता. ४ रोजीं राजाच्या सहीचा, आरोपीवर गुन्ह्याची शाबिती धरून शिरच्छेदाची शिक्षा फर्माविल्याचा हुकूम प्रसिद्ध झाला; तीन दिवसांत आल्व्हानें सर्व कागदपत्र केव्हां वाचून पाहिले व हुकूम केव्हां लिहिला, व राजाची सही या हुकुमावर तीन दिवसांत कशी येऊन पोंहोचली हें सर्वच मोठें गूढ आहे. ही चौकशी केवळ थट्टा होती; जासीच्या वाड्याच्या चौकांत गोळ्या घालून आरोपींस मारलें असतें तरी देखील लोकांस जास्त खेद अगर आश्चर्य वाटण्याचा संभव नव्हता. नेदर्लंडच्या राजकीय हक्कांस किंबहुना मानवीप्राण्याच्या नैसर्गिक हक्कांस या खटल्यांनीं पूर्ण हरताळ लाविला होता. पाखंडी लोकांवर झालेला ईश्वरी क्षोभ भासविण्यासाठीं फिलिपचा अवतार होता व आल्व्हा हें त्याचें अमोघ वज्र होतें. दोन्ही आरोपी निर्दोषी होते हें मागील कथानकावरून स्पष्ट दिसून येण्यासारखें आहे; व यमासनाच्या एका सभासदानें ही गोष्ट कायदेशीर रीतीनें सिद्ध करून राजानें शिक्षा देण्याऐवजीं या लोकांस बक्षीस द्यावें असें सुचविलें होतें. पण यांस दाद मिळण्यास कांहीं मार्गच नव्हता. मध्यंतरीं अन्य ठिकाणीं कांहीं लढाईचे प्रसंग झाल्यामुळें या नाटकाचा शेवटचा अंक कांहीं दिवस तहकूब राहिला.

राजपुत्र ऑरेंजनें सरतेशेवटीं कंबर बांधली. कायद्यानें बहिष्कृत व हद्दपार झाल्यामुळें व आपल्या जहागिरीला व मुलाला मुकल्यामुळें, जुलुमाच्या चरकांत सांपडलेल्या आपल्या राष्ट्राच्या वतीनें आखाड्यांत उतरण्यास त्याला आतां कांहींच संशय उरला नाहीं. बंडाचा परिणाम काय होईल, त्यांत शिरल्यामुळें आपल्या मस्तकावर मुगुट बसतो अगर कुऱ्हाड येते याचा त्याला यावेळीं अंदाज होणें शक्य नव्हतें. नवीन धर्मतत्त्वांवर

त्याचा विश्वास जास्त बसत चालला होता; त्यामुळें या तत्त्वांचा स्वीकार करून त्यांच्या जोरावर स्पॅनिशसत्ता झुगारून देतां येईल असें मानण्यास जागा होती; कदाचित् धर्मसंशोधनाची लाट पुन्हां जोरानें येऊन त्यांत ऑरेंजप्रभृति मंडळी वाहून जाण्याचाही तितकाच संभव होता. यूरोपांतील सर्वमान्य सेनापतीच्या आधिपत्याखालीं स्पॅनिश लोकांनीं नेदर्लंड-देश व्यापला होता. फ्रान्स देशांतील नवीन धर्मी लोक जेर येऊन त्यांनीं कॅथोलिक राजसत्तेशीं सलोखा केला होता. नवीन पंथाचे प्रमुख लोक हद्दपार अगर कारागृहांत होते. त्यांच्या मिळकती जप्त झाल्या असल्यामुळें लढाईची मुख्य सामुग्री शत्रूंच्या स्वाधीन झाली होती. सर्व देश भीतीनें गर्भगलित, दीन, धर्मच्युत व केवळ जीव रक्षण करण्याकरितां उत्कंठ झाला होता. अशा समयीं ऑरेंज रंगभूमीवर आला. त्याच्या गैरहजिरींत जाहिर केलेल्या आरोपांस त्यानें स. १५५८ च्या उन्हाळ्यांत थोडक्यांत पण फार जोरदार भाषेंत जबाब प्रसिद्ध केला. त्या लेखाचा सारांशः--

"धमासनांतील चोरांची माझे व माझ्या दर्जाच्या लोकांचे बूट साफ करण्याची सुद्धां योग्यता नाहीं; त्यांच्यापुढें चौकशीकरितां उभें राहणें आह्मांस सर्वस्वीं गौण आहे. संस्थानिकांच्या जमातीचा मी सभासद; त्या जमातीशिवाय इतर कोणासही माझी चौकशी करण्याचा अधिकार नाहीं. सरकारानें मजवर बिनाकारण आग पाखडली आहे. मीं सरकारची नोकरी इमानानें केली असतां त्याचा कांहींच विचार झाला नाहीं; कटवाल्यांच्या कृत्यांशीं माझा कोणताही संबंध नाहीं; धर्मासंबंधीं जाहिरनामे, धर्मसंशोधन, नवीन धर्माध्यक्षांच्या नेमणुका व धर्मच्छल हीं बंडाचीं कारणें होत. या सर्वांचा उत्पादक ग्रॅन्व्हिल; त्यानें बंडाचा मोड करण्याच्या कामीं आमचा उपयोग करून हल्लीं आमच्या विरुद्ध कारस्थान चालविलें आहे, इत्यादि." हा जबाब दिल्यावर ऑरेंजनें द्रव्य गोळा करण्यास प्रारंभ केला. जर्मनींतील प्रमुख लोकांशीं त्याच्या वारंवार मसलती होऊं लागल्या. नवीनधर्मी संस्थानिकांनीं त्यास मदत करण्याचें अभिवचन दिलें. उघडपणें हातीं घेतलेल्या या कार्यांत लोकांची मदत मिळविण्यासाठीं त्यानें आतां आपली वक्तृत्वशक्ति व मुत्सद्दीगिरि यांचा सारखा

उपयोग चालविला. ऑरेंजनें यावेळीं हजारों गुप्त कट उपस्थित केले. इंग्लंडमधील बड्या बड्या लोकांशीं त्यानें पत्रव्यवहार सुरू केला. जर्मनींतील बहुतेक संस्थानिकांशीं त्यानें सूत्र बांधिलें. फ्रान्समधील प्रॉटेस्टंट लोकांस तोच आपला त्राता असें वाटूं लागलें. नेदर्लंडच्या देशबाह्य झालेल्या सरदारांशीं त्यानें पत्रव्यवहार ठेवला. त्याच्या सैन्यांत बिनबोभाट भरती होऊं लागली. आपला भाऊ लुई यास सैन्य जमा करण्यास ता. ६ एप्रिल १५६८ रोजीं त्यानें लेखी हुकूम दिला. त्यांत फिलिपच्या हितार्थ, स्पॅनिश लोकांच्या घोर जुलुमांतून नेदर्लंडची सुटका करण्याकरितां, धर्माच्या व राष्ट्रीय हक्कांच्या संरक्षणार्थ व नेदर्लंडांतील स्त्रीपुरुषांस गुलामगिरींतून सोडविण्याकरितां लुईनें जरूर दिसेल तितकी फौज ठेवावी असा मजकूर होता. असेच हुकूम व्हांडेन्बर्ग व हूस्ट्राटन यांस मिळाल्यामुळें त्यांनींही सैन्याची भरती चालविली होती. बंडाचा मुख्य कल्पक ऑरेंज व मुख्य साधक लुई होता. नेदर्लंडच्या स्वारीस सुमार दोन लाख क्राऊन ( ३॥· रुपये ) खर्च येईल असा ऑरेंजचा अंदाज होता; यापैकीं निम्मी रकम अँटवर्प, आम्स्टर्डम, लीडन, हार्लेम, मिडल्बर्ग, फ्लशिंग वगैरे मोठमोठ्या शहरच्या लोकांकडून व इंग्लंडमध्यें जाऊन राहिलेल्या व्यापाऱ्यांकडून आली; बाकी निम्मी रकम ऑरेंज ५००००, हूस्ट्राटन ३००००, लुई १००००, क्युलेंबर ३००००, व्हांडेन्बर्ग ३०००० फ्लोरिन व इतर कांहीं गृहस्थांनीं कमी अधिक वर्गणी देऊन तयार झाली. ऑरेंजनें घरचें सर्व जवाहीर, सोन्यारुप्याचीं भांडीं, कापडचोपड विकून आपल्या हिश्शाची भरती केली; त्याच्या दुसऱ्या बंधूंनीं तोच मार्ग स्वीकारला.

या सुमारास आल्व्हास पकडण्याचा गुप्त प्रयत्न ब्रुसेल्स येथें झाला, पण त्यास यश आलें नाहीं.

राजपुत्र ऑरेंजचा चार दिशेनें नेदर्लंडवर हल्ला करण्याचा बेत ठरला. पहिली तुकडी जूनच्या अखेर फ्रान्सच्या बाजूनें आर्ट्वा प्रांतांत शिरली, तिचा सेंट व्हॅलेरी येथें ता. १८ जुलई रोजीं पराभव होऊन पूर्ण वाताहत झाली. दुसरी तुकडी घेऊन व्हिलर्स ता. २० एप्रिल रोजीं नेदर्लंडमध्यें शिरला व रोर्मोडच्या रोखानें चालला. लोक बंडास येऊन मिळण्यास

अद्याप तयार झाले नव्हते. रोर्मांडमध्यें व्हिलर्सचा रिघाव होईना; ह्मणून तो एर्केलेन्सकडे वळला; येथें सँचोच्या सोळाशें निवडक शिपायांनीं त्यांस गांठलें. या चकमकींत त्याचें सर्व घोडदळ व कांहीं पायदळ मिळून सुमार १६००।१७०० शें लोक खराब झाले. बाकी राहिलेल्या १३०० लोकांस सॅलेम येथें गांठून सँचोनें त्यांची कत्तल उडविली. व्हिलर्सनें मरणापूर्वीं ऑरेंजचे बेत शत्रूस सांगितले. ऑरेंज तिसरी तुकडी घेऊन नेदर्लंडमध्यें शिरण्याच्या तयारींत होता. इकडे फ्रीझलंडमध्यें लुईनें मोहिम सुरू केली होती. ता. २२ एप्रिल रोजीं आल्व्हास अशी बातमी समजली कीं, एम्डेनजवळ भिक्षेकऱ्यांचा मोठा जमाव जमत आहे व कांहीं महत्वाच्या कामगिरींत ते गुंतले आहेत. पुढें दोन दिवसांनीं लुई नॅसा थोडें सैन्य बरोबर घेऊन या प्रांतांत शिरला. त्याच्या ध्वजावर "पितृभूमि व धर्म यांच्या स्वातंत्र्याकरितां" अशीं अक्षरें फडकत होतीं. प्रथम त्यानें प्रांताचा सुभेदार अरेंबर याचा वेडकिल्ला त्याच्या गैरहजिरींत स्वाधीन करून घेतला; नंतर तो डॅमशहरीं जाऊन बसला. या ठिकाणीं त्याचा धाकटा भाऊ ॲडोल्फस कांहीं घोडेस्वार घेऊन त्यास येऊन मिळाला. शहरोंशहरीं यांनीं बंडाचे झेंडे उभारले; ग्रॉनिंजेन शहरच्या अधिकाऱ्यांस लुईनें शहर स्वाधीन करण्याविषयीं हुकूम पाठविला. अधिकाऱ्यांनीं शहरास अपाय होऊं नये ह्मणून खंडणी पाठविली. इकडे आल्व्हानें फ्रिझलंडचा सुभेदार अरेंबर फ्रान्समधील कामगिरी आटोपून परत येतांच त्याजबरोबर पांच पायदळें व घोडेस्वारांची एक तुकडी मिळून एकंदर पंचवीसशें लोक देऊन त्यांस तावडतोब रवाना केलें. शिवाय गेल्डेजचा सुभेदार मेघेम यास पायदळ, घोडदळ व तोफखाना यांसकट पंधराशें लोक घेऊन अरेंबरला कुमक करण्याचा हुकूम झाला. उभयता सरदारांच्या भेटी झाल्या; त्यांत दोन्ही सैन्यांचा मिलाफ झाल्याशिवाय स्वतंत्रपणें शत्रूशीं सामना करणें धोक्याचें आहे असें ठरलें. अरेंबर संधिवातानें हैराण झाला; तथापि डोलींत बसून तो डॅम येथें येऊन पोंहोचला. तेथें उभय पक्षांची चकमक झडली. देशभक्तांचें सुमार २५।३० लोक खराब झाले. मेघेमला ब्रुसेल्समधून येण्यास जरा अवकाश लागला. ता. २२ मे रोजीं तो सुमार पन्नास

मैलाच्या टप्प्यांत येऊन पोंहोचला. तेथून दुसरे दिवशीं अरेंबरला येऊन मिळण्याचें त्यानें आश्वासन पाठविलें. शत्रूची चांगली खबर घेऊन उद्ईक लिहून पाठवितों असें अरेंबरचें ता. २३ चें शेवटचें पत्र आल्व्हास गेलें. लुईनें तळ हालवून जंगलच्या रस्त्यानें चालून सुमार तीन मैल दक्षिणेस "होली लायन" नामक मठापाशीं डेरे दिले. या ठिकाणीं मेघेमचें सैन्य अद्याप येऊन पोंहोचलें नाहीं अशी बातमी घेऊन, स्वदेश व स्वातंत्र्य यांच्याकरितां अरेंबरवर तुटून पडण्यास लुई सिद्ध झाला. आसपासच्या रेताड जंगलांत हेंच उंचवट्याचें व माऱ्याचें ठिकाण होतें. प्राचीन जर्मन योद्धा हर्मन याची ही विजयभूमि असल्याबद्दल जुनी दंतकथा होती. या ठिकाणीं येण्याच्या अरुंद वाटेच्या दोहों बाजूस भयंकर दलदल होती. या अरुंद धक्क्यावरून आपल्या शेंदाड गणलेल्या शत्रूंचा माग काढीत अरेंबर येथवर येऊन पोंहोचला. लुईनें आपल्या सैन्याचे दोन चौक करून एक टेंकडीच्या आड लपवून ठेविला; घोडेस्वार अघाडीस व बंदुकवाले लोक दोन्ही बाजूवर होते. अरेंबरला या जागेची बरीच माहिती असल्यामुळें त्यानें एकंदर परिस्थितीचा नीट विचार करून मेघेम येईपर्यंत शत्रूशीं सामान्य झटापटी करण्याचा निश्चय केला. परंतु त्याच्या हाताखालचे सैनिक व अधिकारी लढाईविषयीं फार आतुर झाले होते. अरेंबरला भेंकड ठरवून ते त्याची निर्भर्त्सना करूं लागले. या प्रवादानें अरेंबरचें रक्त तापलें; व त्यानें शत्रूच्या घोडदळावर तोफांचा मारा सुरू करण्याचा हुकूम फर्मावला. लुईच्या पूर्वसंकेताप्रमाणें या घोडदळानें थोडी चलबिचल दाखवितांच त्याच्यावर हल्ला करण्याच्या हेतूनें सर्व स्पॅनिश सैन्य एकदम पुढील खोल दलदलींत लोटलें. त्यांच्यावर देशभक्तांनीं गोळ्यांचा भडिमार केला. या दलदलींतुन बाहेर पडण्याचा ज्या लोकांनीं यत्न केला त्यांस शत्रूच्या भाल्याखालीं प्राण सोडावे लागले. इकडे टेंकडीच्या आश्रयाखालील तुकडीनें फेरा घेऊन दलदलींत सांपडलेल्या लोकांची पिछाडी गांठली व त्यांच्या मदतीस येणाऱ्या मागील भागाची वाताहत उडविली. ज्या सैनिकांनीं अरेंबरला दोष दिले, तेच आतां सरावैरा पळूं लागले; अरेंबर आतां जिवावर उदार झाला; अडोल्फसला द्वंद्वयुद्धांत त्यानें ठार केलें; व जखम लागून व अश्वहीन होऊन तो

रणांत फिरत असतां त्याला देशभक्तांपैकीं एका बड्या गृहस्थानें धारा-तीर्थाची वाट दाखविली. लढाई संपतांच लांबून चालून येणाऱ्या सैन्या-च्या तुताऱ्या ऐकूं येऊं लागल्या, त्यामुळें देशभक्त पाठलाग करतांना थबकले व स्पॅनिश सैन्यापैकीं अवशिष्ट लोकांना आपला बचाव करून घेण्याची संधि मिळाली. मेघेम एकटाच कांहीं रक्षकांसह पुढें आला होता; त्याचें सैन्य पन्नास मैलांची मजल झाल्यामुळें अगदीं थकून मार्गेंच राहिलें. " होली लायन " येथील पराजयाची वार्ता समजतांच मोर्चा फिरवून तो ग्रॉनिंजेन शहरानजीक बंदोबस्तानें जाऊन राहिला. या रणभूमीवर लुईनें सुमार हजार बाराशें स्पॅनिश शिपाई नाहींसे केले व स्पॅनिश सैन्य अजिंक्य नाहीं असें लोकांच्या नजरेस आणून दिलें; एवढाच काय तो या जयाचा तात्त्विक परिणाम झाला. जवळ तोफखाना नसल्यामुळें ग्रॉनिंजेन हातीं लागण्यास मार्ग दिसेना व लष्करांत पैशावांचून ओरड वाढत चालली. अडोल्फस-बद्दल शोक करीत, ग्रॉनिंजेनपुढें खंदक खणून व मातीचे उंचवटे करून तो आंत छावणी देऊन बसला.

आल्व्हाला ही बातमी समजतांच त्यानें स्वतः मोहिमेवर जाण्याचा निश्चय केला. परंतु तिकडे जाण्यापूर्वीं त्यानें ऑरेंज, लुई, व्हांडेन्बर्ग, हूस्ट्राटन यांस हद्दपार केल्याचें व ते देशीं आल्यास त्यांस फांशीं देण्याविषयीं जाहिरनामे प्रसिद्ध केले. क्यूलेंबर्गचा वाडा याच सुमारास जमीनदोस्त करून आल्व्हानें त्या जाग्यावर कटवाल्यांचा नाश झाला असें दर्शविण्याकरितां एक स्तंभ उभा केला. ता. १ जून रोजीं अठरा मोठ्या घराण्यांतील लोक त्यानें फांशीं दिले. ता. ३ रोजीं व्हिलर्स व आणखी तीन इसमांचा वध झाला. ता. ४ रोजीं एग्मॉन व हॉर्न यांच्याविरुद्ध राजद्रोहाची शाबिती होऊन त्यांस तरवारीनें तोडून टाकण्याचा हुकूम झाला. त्याच दिवशीं दोनप्रहरीं आल्व्हानें इप्रेच्या धर्माधिकाऱ्यास बोलावून, झालेली शिक्षा आरोपीस कळवून व प्राय-श्चित्तादिक करणें झाल्यास तें आटोपून त्यांस दुसरे दिवशीं परलोकीं जाण्यास तयार करून ठेवण्याविषयीं आज्ञा केली. धर्माधिकाऱ्यानें आरोपीस क्षमा करण्याविषयीं आल्व्हाची विनवणी केली. 'तुमचा उपदेश

ऐकण्यासाठीं येथें तुह्मास बोलावून आणिलें नाहीं,' असें त्यास उत्तर मिळालें. एग्मॉनच्या बायकोस ही बातमी समजतांच ती आल्व्हापुढें पदर पसरून उभी राहिली. "तुझ्या नवऱ्याचा लौकरच मुक्तता होईल," असें तीस संदिग्ध आश्वासन मिळालें. रात्रौ मध्यान्हीच्या सुमारास आल्व्हाचा हुकूम धर्माधिकाऱ्यानें एग्मॉनच्या हातांत मुकाट्यानें दिला. माफीची वगैरे आशा नाहीं असें समजतांच त्याची तलमळ सुरू झाली. धर्माधिकाऱ्यानें ईश्वराचिन्तनांत आपला अवशिष्ट काळ घालविण्याविषयीं त्यास उपदेश केला. "ईश्वराचें स्मरण करण्याच्या समयीं बायकामुलांच्या आकृति डोळ्यांपुढें येतात," असे त्याचे उद्गार निघत. त्यानें राजास या स्थितींत एक आशीर्वादपर पत्र लिहिलें; यांतही राजभक्तीचें ओतप्रोत प्रदर्शन केलें होतें. हॉर्नचें सांत्वन अशाच प्रकारें दुसऱ्या एका धर्माधिकाऱ्यानें केलें. रात्रौ ब्रुसेल्सच्या बड्या चौकांत या नामांकित राजद्रोह्यांच्या शिरच्छेदाची कडेकोट तयारी केली होती. ता. ५ रोजीं प्रातःकाळीं तीन हजार स्पॅनिश शिपाई वध-स्थानाच्या सभोंवार हत्यारबंद उभे केले होते. चौकाच्या मध्यभागीं शिरच्छेदाची जागा काळ्या वस्त्रांनीं मढविली होती व तेथें भाले, दोन मखमलीचे तक्ये, एक मेज व एक ख्रिस्तांचें क्रूस अशीं उपकरणें मांडलीं होतीं; शहरचा कोतवाल बाजूला घोड्यावर उभा होता. सकाळीं अकरा वाजतां एग्मॉन धर्माधिकाऱ्यासह ईश्वराची प्रार्थना करीत व राजास दुवा देत वधस्थानीं येऊन पोंहोचला. वधस्थानावर दोनतीनदां हिकडून तिकडे फिरून, जवळ रोमेरो उभा होता त्यास त्यानें विचारलें, "मला माफी मिळण्याची आशा नाहीं काय?" रोमेरोची मान हलतांच त्यानें अंगावरील दमास्कचा कोट, त्यावरील उत्तरीय व गळ्यांतील संस्थानिकांच्या जमातीचें चिन्ह काढून खालीं ठेविलें; गुडघे टेकून ईश्वराचा स्तव केला व क्रूसचें चुंबन घेतलें. धर्माधिकाऱ्यांनीं त्याला आशीर्वचन दिल्यावर त्यानें आपली टोपी काढून ठेवली व डोळ्यांवर फडकें ओढून ईश्वराचा धांवा करीत मान आडवी केली. लागलीच तिचे दोन तुकडे झाले. प्रेक्षकसमुदायाच्या अंगावर कांटा उभा राहिला; खुद्द स्पॅनिश शिपायांच्या डोळ्यांस अश्रु आले. हॉर्नचा वध मागोमाग झाला.

दोघांचीं शिरें दोन एक तास वधस्तंभावर ठेवलीं होतीं. धडें पेटींत घालून संस्काराकरितां बंधुवर्गाच्या स्वाधीन करण्यांत आलीं. त्यांचीं मुंडकीं पुढें स्पेनमध्यें राजाकडे पाहण्याकरितां पाठविलीं असा लोकांचा समज आहे.

एग्मॉन हा नामांकित पुरुष होऊन गेला; परंतु ही मोठी विभूति होती असें मानण्यास बिलकुल जागा नाहीं. एग्मॉनचा शिरच्छेद करण्यांत राजाचा क्रूर व घातकी स्वभावच काय, परंतु त्याचा मूर्खपणाही व्यक्त झाला. एग्मॉनसारख्या अनिश्चित स्वभावाच्या व डौली मनुष्यास आपल्या बगलेंत वागविण्याचें सोडून त्याचा निष्कारण वध करून त्यास लोकांचें पूज्य दैवत करून ठेवण्यांत राजानें अपरिहार्य चूक केली असें ग्रॅनव्हिलचें सुद्धां मत होतें. आपल्या मोठेपणाच्या गर्वांत एग्मॉन ग्रॅनव्हिलचा तिरस्कार करीत असे. आपला बडा दर्जा व लोकोत्तर लष्करी कामगिरी यांजमुळें आपणास राजानें मोठमोठीं हुद्याचीं कामें सांगावीं अशी त्याला हांव होती. ती इच्छा तृप्त न झाल्यामुळें तो सरकाराशीं असंतुष्ट होता. लोकांसंबंधानें त्याला बिलकुल कळकळ नव्हती; राष्ट्राचा पुढारी होण्याची त्याच्यांत तिळमात्र लायकी नव्हती; आपल्या ऐश्वर्यास पाहून लोकांनीं आपणापुढें हात जोडून उभें रहावें व आपले पराक्रम पाहून आपली वाहवा करावी ही त्याची मुख्य मनीषा होती. तो कट्टा कॅथोलिकधर्मभक्त होता, हें त्यानें इतर धर्मांच्या उपदेशकांस व त्यांच्या अनुयायांस व्हॅलेंसिनीज वगैरे ठिकाणीं दिलेल्या कडक शिक्षेवरून स्पष्ट होतें. ऑरेंजच्या उदात्त विचाराचा व वृत्तीचा त्याच्या मनावर क्षणिक परिणाम होत असे; परंतु राजाश्रयाचा लाभ व राजसेवेची व राजानुग्रहाची आशा त्याच्या स्त्रैण बुद्धीला दिपवून टाकीत. असा हा पुरुष फिलिपच्या जुलुमास बळी पडल्यामुळें मरणोत्तर महान् लोकनायक बनला. हॉर्न हा प्रजापक्षीयही नव्हता अगर राजपक्षीयही नव्हता; आपली सर्व मिळकत सावकारांच्या घरीं गेल्यामुळें व आपली पूर्वस्थिति परत आणण्यास कांहीं मार्ग न राहिल्यामुळें त्यानें वानप्रस्थाश्रम स्वीकारला होता. ग्रनव्हिल, कटवाले भिक्षेकरी, अगर राजदूत या सर्वांविषयीं तो सारखाच उदासीन होता. मात्र टुर्ने येथें नवीनधर्मी लोकांस त्यानें समदृष्टीनें वागविलें हें त्यास भूषणावह आहे.

या वधामुळें नेदर्लंडांत आल्व्हाविषयीं तिरस्कार व द्वेष अत्युत्कट दशेस जाऊन पोंहोचले. आल्व्हानें राजास या शिरच्छेदाची व फ्रीझलंड-प्रकरणाची हकीकत लिहून कळविली; त्यांत एग्मॉनच्या बायकोस खावयास अन्न नाहीं; तीस मुलींसह स्पेनच्या एखाद्या मठांत ठेवून त्यांची खाण्यापिण्याची कांहीं व्यवस्था करावी असें सुचविलें होतें.

आपल्या पश्चात् राजधानीमध्यें गडबड न होण्यासाठीं वरील सर्व कामें आटोपून आल्व्हा बंडवाल्यांवर स्वतः चाल करून जाण्यास निघाला. ता. १० जुलई रोजीं डेव्हेंटर येथें आल्व्हानें सर्व सैन्याचें आधिपत्य स्वीकारलें. त्याचें एकंदर सैन्य सुमारें पंधरा हजार होतें व शिवाय बाजार-बुणग्यांची संख्या बरीच होती. पैशाच्या टंचाईमुळें ग्रॉनिंजिनजवळ लुईची हालचाल अगदीं बंद पडली होती. त्याच्या भाडोत्री सैन्याचे पगार थकत चालल्यामुळें व लूट मिळण्याची आशा दिवसेंदिवस मावळल्या-मुळें लोक बिथरून गेले. बंडास मदत न केल्यास गांवें जाळून फस्त करण्याचे जाहिरनामे लुईनें प्रसिद्ध केल्यावरून सुमार दहा हजार फ्लोरिन जमले. इकडे बंडवाल्यांस मदत केल्यास घरेंदारें लुटून फस्त करण्याबद्दल उलट जाहिरनामे आल्व्हानें प्रसिद्ध केल्यामुळें बंडवाल्यांस निम्मी मिळकत व सरकारास बाकी राहिलेली निम्मी मिळकत देऊन शेवटीं फांशीं जाण्याची पाळी लोकांस येऊन पोंहोचली. आल्व्हा आल्याची बातमी समजतांच लुईनें मोठ्या श्रमानें सुमार १०००।१२०० लोक गोळा केले. आल्व्हा ता. १४ जुलई रोजीं तडख ग्रॉनिंजेन शहरांत शिरला; त्याच दिवशीं त्यानें कांहीं स्वारांसह बाहेर पडून शत्रूची जागा नीट टेहळून पाहिली. लुईच्या सैन्यांत बेदिली दिसल्यामुळें तो लढाई देण्यास धजावेना. आल्व्हाचाही बेत शत्रूच्या सैन्यांत दिरंगाईनें फूट पाडण्याचा होता. सायंकाळीं लुईचे कांहीं स्वार खंदकाबाहेर बरेच लांब आले; त्यांची व स्पॅनिश लोकांची गांठ पडून मोठी चकमक झडली. देशसेवक खाडीच्या लांकडी पुलावरून आपल्या गोटांत परतले व त्यांनीं लांकडी पुलास आग लावून दिली; या पेटलेल्या पुलावरून व भरलेल्या खाडींतून स्पॅनिश लोकांनीं त्यांचा दूरवर पाठलाग केला. देशभक्तांचें सैन्य तळ सोडून पळून गेलें. या दिवशीं त्यांचे तीनशें लोक रणांत पडले. ता. १९

जुलई रोजीं आल्व्हा रेडन् येथें येऊन पोंहोचला; ही जागा चालून येणाऱ्या शत्रूस मागें हटविण्यास लुईला फार सोईची होती, व मागें एम्स नदीवर चांगला पूल असल्यामुळें प्रसंग पडल्यास जर्मनींत उतरण्यासही येथें उत्तम सोय होती. लुई या गांवीं नाहीं असें समजतांच आल्व्हास फार समाधान वाटलें. खालीं बारा मैलांवर एम्स नदीच्या मुखाजवळ जेमिंगेन गांवीं त्याचा तळ असल्याचें ऐकून आल्व्हास विशेषच आनंद झाला; कारण या ठिकाणीं नदीस भरतीचें पाणी येऊन त्याचें तिन्ही बाजूनें वेष्टन पडल्यामुळें या गांवाजवळ एक लहानसें द्वीपकल्प बनलें होतें. नदीस अर्थातच उतार नव्हता. लुईनें आपल्या पद्धतीप्रमाणें सैन्याचे दोन चौक केले. त्याच्या सैन्याच्या मागील बाजूस जेमिंगेन, डाव्या बाजूस एम्स नदी, उजव्या बाजूस घोडदळ व अग्रभागीं दोन मोठे खंदक असा व्यूह होता. त्याच्या छावणीकडे पुढच्या बाजूनें येण्याचा एक रस्ता होता; त्याच्यावर त्यानें भालेवाले लोक दुतर्फा उभे केले व आपल्या पांच तोफाही रोखून ठेविल्या. आल्व्हानें टेहळणी करतांच त्यास या ठिकाणाहून लुईची सुटका होण्यास मार्ग नाहीं असें पक्कें कळून चुकलें. पाण्यांतून तरून जाण्यास या ठिकाणीं नावाही दिसत नव्हत्या. बंडवाल्यांच्या सैन्यांत बेबंदशाही माजली होती. लुईच्या वक्तृत्वाचा व धिमेपणाचा कांहीं उपयोग होईना. शिपाईलोक पगार मागूं लागले; ते लढण्यास तयार होईनात; शेवटीं लुईनें त्यांस असें समजून सांगितलें कीं, लढणें अगर मरणें याशिवाय तिसरा तरणोपायच राहिला नाहीं. त्यावरून त्यांची आत्मसंरक्षणाची बुद्धि जागृत झाली. इतक्यांत आल्व्हाच्या येण्याच्या वाटेवरील समुद्राचे धक्के फोडून आंत समुद्राचें पाणी घेऊन स्पॅनिश सैन्य जागच्या जागीं पाण्यांत बुडविण्याचा विचार लुईस सुचला. त्याच्या एका खंबीर तुकडीनें जाऊन दोन तीन पाण्याचीं तोंडें फोडतांच कंबरेइतकें पाणी आंत पसरलें. आल्व्हानें या धक्क्यावर जाऊन पाण्याचीं तोंडें बंद करण्याकरितां पंधराशें बंदुकवाले पाठविले. त्यांनीं लुईच्या टोळीवर हल्ला करतांच धक्क्यावरील लोकांत फाटाफूट झाली. आल्व्हाच्या सैन्यानें धक्क्याची दुरुस्ती करून पाणी आंत येण्याचें बंद केलें व धक्क्यावर आपले पहारे

ठेविले. लुईनें या धक्क्यांवर पुनः पुनः हल्ले केले, परंतु स्पॅनिश लोकांची मिठी कांहीं केल्या सुटेना. आल्व्हानें या पुढें गेलेल्या टोळीपैकीं कांहीं लोकांस पुढें जाऊन शत्रूस युद्धांत गुंतविण्याकरितां पाठविलें. लुईच्या हेरांनीं चोहोंबाजूनें टेहळणी करून स्पॅनिश लोकांचे हजार पंधराशेंपेक्षां जास्त लोक नाहींत असें लुईस खात्रीनें कळवितांच त्यानें या लहानशा तुकडींतून तरवारीनें वाट काढून निसटून जाण्याचा बेत केला; व निशाणें फडकावीत व वाद्यें वाजवीत तो पुढें सरसावला. देशसेवक पुढें येतांच त्यांच्या अदमासापेक्षां जास्त गरम स्वागत त्यांस मिळालें. शत्रूचें छपून राहिलेलें सर्व सैन्य बाहेर आलें व त्यांनीं देशसेवकांवर एकच गर्दी केली. तें शत्रूचें स्वरूप दृष्टीस पडतांच लुईचें सैन्य गर्भगळित होऊन त्यांनीं एक बार सुद्धां न काढतां वाट फुटेल तिकडे पळ काढला. तोफखाना उघडा पडला तो स्पॅनिश सेनापतींनीं हस्तगत करून बंडवाल्यांवरच त्याचा मारा सुरू केला. देशसेवकांची खंदकांतून पळापळ सुरू होतांच स्पॅनिश लोकांनीं आपल्या तरवारी उपसल्या व त्यांची सरसकट कत्तल चालविली. सात स्पॅनिश सैनिक व सात हजार बंडवाले या दिवशीं मृत्युमुखीं पडले. स्पॅनिश सैन्यापैकीं अल्पवयी पोरांनासुद्धां कांहीं बंडवाले मारण्याची या प्रसंगीं संधि मिळाली. खुद्द लुई कपडे काढून व कांहीं लोक बरोबर घेऊन नदींत पडला; व नदी पार जाऊन त्यानें जर्मनींत आश्रा घेतला. स्पॅनिश सैन्य ग्रॉनिंजेनकडे परतलें. वाटेनें त्यांनीं गांवेंच्या गांवें, शेतांतील झोंपड्या व अन्य इमारती जाळून फस्त केल्या; असंख्य कुमारिका व विवाहित बायका बाटविल्या व लूटही अमूप मिळविली. ग्रॉनिंजेनच्या ग्रामसभेस बंडासंबंधानें त्रयस्थवृत्ति धारण केल्याबद्दल तंबी देऊन आल्व्हा आम्स्टर्डम, यूट्रेक्ट वगैरे शहरांकडे गेला. सर्व मुलुखांत राजसत्तेची बिडी दृढतर बसवून, लुईचे बेत विफल करून व फ्रिझलंडमधील बंडाचा नाश करून जयलक्ष्मीमंडित होऊन आल्व्हा ब्रुसेल्सला परत आला

आल्व्हा परत येतांच पुन्हा होमकुंडांत निरपराधी लोकांच्या आहुति पडूं लागल्या. मानवी देह बाकी आहेत तोंपर्यंत त्यांस फांशीं देऊन, जाळून, बुडवून, शिरच्छेद करून, आपली धर्मवासना तृप्त करून घेणें आल्व्हा

आपल्या राजनीतीचें मुख्य तत्त्व समजत असे. या सुमारास सरदार गॅलेन, बॅकर्झील, लालू व स्ट्रालन यांचा शिरच्छेद झाला. शिवाय शेंकडों अप्रसिद्ध लोकांची हीच गति चालली होती.



---

# भाग ७ वा.

## इ. स. १५६८–७०.

ऑरेंजची मोहीम-आल्व्हाचें युद्धकौशल्य—बंडवाल्यांचा मोड—ऑरेंज फ्रान्समध्यें जातो-आल्व्हाचा जयोत्सव-जर्मन बादशहाची मध्यस्थी-इलिजाबेथशीं आल्व्हाची कलागत- एक टक्का, पांच टक्के व दहा टक्के करांचें मांडण-नेदर्लंडला माफी-मॉंटिनीचा अंत—जलप्रव—लोवेस्टीन किल्ला.

वरील भागांत वर्णन केल्याप्रमाणें ऑरेंजनें मोठ्या विचारानें कल्पिलेले, काळजीनें रचलेले व धीटपणानें अमलांत आणलेले तीन बेत विफल झाले; तथापि, त्याच्या मनाची समता बिलकुल ढळली नाहीं. जेमिंगेनच्या जयानें जुलुमाची सरशी झाली व राष्ट्रांत भीतीनें जास्तच दबदबा बसला. त्यामुळें ऑरेंजचे जर्मनींतील खऱ्या अंतःकरणाचे व उदात्त विचाराचे दोस्तही पाऊल मागें घेऊं लागले. मॅक्सिमीलियन बादशहानें नेदर्लंडमधील राज्यव्यवस्थेसंबंधानें व ऑरेंजसंबंधानें फिलिपला एक पत्र पाठविलें होतें; व बादशहा व सर्व लहानमोठे जर्मन संस्थानिक ऑरेंजला असें सांगूं लागले कीं, 'या पत्रास जबाब येईपर्यंत स्वस्थ रहावें, लढाईची कोणतीही तयारी करूं नये.' परंतु या पत्रापासून अगर स्वस्थ राहण्यापासून कितपत उपयोग होईल याचा ऑरेंजनें बरोबर अंदाज केला होता. राष्ट्रावर जुलुमाचा अंधकार जास्त पसरत चालला असतां हात जोडून स्वस्थ बसणें, स्वदेश व स्वधर्म यांस परिणामीं फार घातक होईल, असें त्यास पक्कें कळून चुकलें होतें.

ज्या धर्माकरितां तो आतां आपलें तन, मन, धन अर्पण करण्यास तयार झाला होता, त्याच्या मुळाशीं असलेलीं तत्त्वें समजून घेण्याचा त्यानें यत्न चालविला; व विचारान्तीं तो नवीन धर्माचा पक्का भक्त बनला.

नवीनधर्म हें त्याचें माहेरघर झालें; भक्तिपुरःसर त्याच्याकरितां झटणें हें त्याचें मुख्य कर्तव्य ठरलें. त्याच्या धर्मांचें सर्वांत उच्च तत्त्व परधर्मसहिष्णुता हें होतें. जर्मनींत जाते वेळीं त्याचा नेदर्लंडच्या लोकांस मुख्य उपदेश हा होता कीं, त्यांनीं धर्मविषयक मतभेद विसरून एकमेकांच्या धर्मतत्त्वांस योग्य मान द्यावा व आपापसांत एकी करावी. प्रत्येक पंथाच्या लोकांनीं विचारानें आपले दोष कमी करावेत. त्यानें मोठ्या कळकळीनें सर्व पंथांच्या पुढाऱ्यांस असें सुचविलें कीं, सर्व पंथांनीं एकजूट ठेवून जुलुमाचा प्रतिकार करावा. या वेळच्या समाजाच्या विचारास्थितीवरून ऑरेंजची विचारसरणी केवळ ईश्वरप्रेरित होती असें ह्मटल्यावांचून गत्यंतर नाहीं. येथवर ऑरेंज केवळ ऐहिक व व्यावहारिक वृत्तीचा मुत्सद्दी होता. यापुढें त्याच्या अद्भुत आयुष्याच्या सर्व लहानमोठ्या प्रसंगीं तो ईश्वरावर भरंवसा ठेवून नेहमीं समाधानवृत्तीनें व दृढनिश्चयानें वागत असे. नेदर्लंडवर मोहिमेस निघण्यापूर्वीं त्यानें बायकोस पत्र लिहिलें त्यांत, "मी उद्ईक निघणार,...सर्वस्वी ईश्वरावर हवाला टाकून तो वाट दाखवील तिकडे मी जाणार आहें. हें माझें आयुष्य कष्टांत व दगदगींत जावें असा ईश्वरी संकेत दिसतो; त्यांतच मला समाधान वाटत आहे. ती दगदग सोसण्यास तो मला धैर्य व बल देईलच," असे उद्गार होते. सन १५६८ च्या मे महिन्यांत मॅक्सिमीलियननें ऑरेंजला जाहिरपणें असा सक्तीचा हुकूम पाठविला कीं, "आमच्या राज्यांत फौजफाटा वगैरे लढाईची सामुग्री जमा करण्याचें अगर गुप्त मसलती करण्याचें आपण बंद न केल्यास आपल्या सर्व जहागिरी जप्त होतील." जर्मनींतील इतर संस्थानिकही निराशेनें थंड पडत चालले; तथापि ऑरेंजच्या कार्यक्रमांत कांहींच बदल झाला नाहीं. त्यानें आगष्ट महिन्यांत बादशहास जबाब पाठवून असें कळविलें कीं, 'आल्व्हाचा जुलूम व ग्रॅन्व्हिलचें कारस्थान यांचा प्रतिकार करण्याकरितां आमची सर्व खटपट चालली आहे. राजा सुज्ञ व सदय आहे; त्याच्या हातून दुष्कृत्यें होणें शक्य नाहीं. ख्रिस्ती लोकांचा छल होऊं नये ह्मणून आह्मीं प्रयत्न चालविला आहे. त्यांस बादशहाची मदत असावी.' या संधीस ऑरेंज पुढें आला नसता व त्यानें

खटपटी केल्या नसत्या तर नेदर्लंडांत लोकसत्ताक राज्य स्थापन झालें नसतें; उलट पक्षीं लोकांत राष्ट्रस्वातंत्र्य व धर्मस्वातंत्र्य यांजविषयीं उत्कट इच्छा अगोदरच उत्पन्न झाली नसती, तर ऑरेंजचे यत्नही फुकट गेले असते. ऑरेंजला आपल्या देशबांधवांचें हृद्गत पूर्णपणें समजलें होतें व तेही रंकापासून रावापर्यंत त्यास आपला मायबाप समजत होते. या राष्ट्रनायकाचा मुख्य हेतु प्रथम आल्व्हाचा जुलमी अंमल बंद करून राजनिष्ठापूर्वक राष्ट्राचें जुनें स्वातंत्र्य कायम राखणें हा होता. राज्याची उलटापालट करण्याची कल्पना त्याच्या मनांत यावेळीं बिलकुल आली नव्हती. असा सात्विक उद्देश मनांत धरून हा एका चिमुकल्या संस्थानाचा मालक जगांतील अत्यंत बलिष्ठ राजसत्तेशीं झगडण्यास उभा राहिला व त्यानें फौजफाटा गोळा करण्यास सुरुवात केली. राजपुत्रानें आपल्या खर्चानें व जिवापाड मेहेनत करून तीस हजार सैनिक तयार केले. नेदर्लंडच्या प्रजाजनांस उद्देशून त्यानें या संधीस एक विनंतिपत्र प्रसिद्ध केलें; त्याचा सारांशः–" स्पॅनिश लोकांनीं या देशांत स्वेच्छाचार चालविला आहे हें सर्वांस महशूर आहेच. धर्मसंशोधन सुरू करून त्यांनीं चालविलेल्या खून, दरवडे, जबरी संभोग वगैरे कृत्यांकडे दुर्लक्ष करणें आपल्या राजनिष्ठेस व देशभक्तीस कलंककारक आहे. राजास आपल्याबद्दल भलतीच बातमी समजाविण्यांत येते. ईश्वरावर भार टाकून स्पॅनिश लोकांचा जुलूम बंद करण्याकरितां आह्मी शस्त्रधारण करीत आहों; आह्मी या कामीं आपला जीव व सर्व मालमत्ता खर्चीं घालण्यास तयार असल्यामुळें ईश्वरकृपेनें आमच्याजवळ चांगलें सैन्य तयार झालें आहे. सर्व नेदर्लंडवासी जनांनीं राष्ट्राची निकृष्टावस्था, आपल्या मुलाबाळांस भोगावी लागणारी भावी गुलामगिरी, नवीन धर्मीची होत असलेली दुर्दशा, यांजकडे लक्ष पोंहोचवून आल्व्हाची दानवी मोडण्याकरितां आह्मास सर्वप्रकारें मदत करावी." त्यानें स्पॅनिशसत्ता समूळ नाहींशी करण्याकरितां तीन लक्ष क्राऊनची मागणी व्यापारी व बडेलोक यांजपाशीं केली. त्यांपैकीं कायती दहा हजारांची रक्कम त्यास पावती झाली. ही रक्कम बाहेर देशांत जाऊन राहिलेल्या गरीबगुरीब नवीन धर्मी लोकांकडून जमवून त्यांच्या

धर्मोपदेशकांनीं पाठविली होती. त्यांस पावती लिहून देतांना राजपुत्राच्या डोळ्यांस कृतज्ञतेचे अश्रु आले.

ऑरेंजचें वीस हजार पायदळ व दहा हजार घोडदळ रोमर्सडोर्फच्या मठाजवळ गोळा झालें. या ठिकाणीं स. डीलामार्क कांहीं निवडक शिपायांसह त्यास येऊन मिळाला. हा गृहस्थ एका विख्यात बटेव्हियन घराण्यापैकीं असून एग्मॉनचा नातेवाईक होता. प्रसिद्ध बटेव्हियन वीर सिव्हिलिस याच्याप्रमाणें राष्ट्राची मुक्तता होईपर्यंत अगर निदान एग्मॉनच्या खुनाबद्दल सूड मिळेपर्यंत दाढी व इतर केश यांचें वपन करावयाचें नाहीं असा त्याचा संकल्प होता. या शूर व साहसी वीराच्या सैनिकांनीं कॅथोलिकधर्मी व मठवासी लोकांवर केलेच्या नानाप्रकारच्या जुलमामुळें देशभक्तांच्या वर्तनासंबंधानें बराच गवगवा होऊन त्यांनीं हातीं घेतलेल्या महत्कार्यास कमीपणा आला; परंतु डीलामार्कसारखीं शूर माणसें बाजूस ठेवून आपलें काम चालविण्याचें सामर्थ्य या वेळीं बंडवाल्यांत नव्हतें.

ऑरेंजनें व्हाईन नदी ओलांडली. स्टॉकेमजवळ त्याचें सैन्य म्यूज़् नदीपार आलें. हें कृत्य इतक्या धाडसाचें व महत्वाचें होतें कीं, त्याची कीर्ति सर्वत्र पसरली. आल्व्हास ही गोष्ट खरी सुद्धां वाटेना. ऑरेंज निशाणें फडकावीत व रणवाद्यें वाजवीत थेट ब्राबंट प्रांतांत शिरला व आल्व्हाच्या छावणीपासून सुमार तीन मैलांवर त्यानें आपला तळ दिला. एकंदर परिस्थितीचा विचार केल्यावर ऑरेंजला समोरासमोर उभें राहून लढाई करण्याची संधि द्यावयाची नाहीं असा आल्व्हाचा पक्का निश्चय झाला. बंडवाल्यांचा तीन मोहिमांत मोड झाला असल्यामुळें त्यांना कोणीही मदत करण्यास धजावत नव्हता. शिवाय ब्राबंट हा नेदर्लंडचा अगदीं मध्यप्रदेश असल्यामुळें या ठिकाणीं स्पॅनिश सैन्याची पीछेहाट झाल्यास त्यांची नामुष्की सर्व देशभर थोडक्याच अवकाशांत पसरेल व बंडवाल्यांस विशेष बल येईल ही गोष्ट त्याच्या ध्यानांत येऊन चुकली होती. त्याचें सैन्यही संख्येनें बंडवाल्यांपेक्षां फार कमी होतें व घोडदळाची त्याला फार उणीव होती. यामुळें दिवाळा पडेपर्यंत ऑरेंजच्या भाडोत्री सैन्याची पगारावांचून व अन्नावांचून कुचंबणी केल्यास तें

जर्मनींत आपोआप निघून जाईल असा त्याचा अंदाज होता. एवंच ऑरेंजला सामना करण्याची संधि मिळाल्यापासून आपलें सर्वस्वी नुकसान आहे व बंडवाल्यांस त्यापासून फायदाच होण्याचा संभव आहे, असें आल्व्हानें पक्कें अनुमान बांधिलें; व शत्रूच्या सैन्याच्या बाजवांवर छापे घालून, त्यांचा नेहमीं पाठलाग करून, पावलोंपावलीं त्यांस प्रतिबंध करून व अगदीं सताबून, त्यांचे सर्व बेत हाणून पाडून, त्यांचे प्रहार निवारण करून, व ऑरेंजला कंगाल व हताश करून, देशांतून हांकून लावण्याचा आल्व्हानें निश्चय केला. हा आपला बेत आल्व्हानें शब्दशः खरा केला. ऑरेंजनें एकोणतीस वेळ आपला तळ हालविला; परंतु प्रत्येक ठिकाणीं पिशाचाप्रमाणें आल्व्हा त्याच्या पिछाडीवर होताच. दोन चार वेळ दोन्ही सैन्यें अगदीं बंदूकीच्या टप्पावर आलीं व त्यांच्या दरम्यान खंदक अगर तट सुद्धां राहिला नव्हता. परंतु बंडवाल्यांस क्षणांत शत्रु अगदीं समीप आलासें वाटून लढाईची आशा उत्पन्न होतांच वेताळाप्रमाणें तो नाहींसा होत असे. याप्रमाणें वारंवार निराशेनें व अन्नावांचून ऑरेंजचें सैन्य अगदीं अनावर झालें. यानंतर तो व्हेवरन येथें फ्रान्समधून आलेल्या नवीन धर्मी लोकांच्या टोळीस जाऊन मिळण्याच्या इरायानें निघाला; या ठिकाणीं पोंहोचल्यावर सैन्याचा पश्चाद्भाग रक्षण करण्याकरितां हूस्ट्राटनच्या हाताखालीं तीन हजार सैन्याची एक फळी ग्रेटा नदीच्या दक्षिणतीरावर ठेवून पैल तीरावरील फ्रेंच टोळीस जाऊन मिळण्याकरितां बाकीचें सैन्य नदीपार गेलें. ही बातमी समजतांच डॉन फ्रेडरिक व सेनानी व्हाइटेली यांनीं जाऊन हूस्ट्राटनच्या तुकडीचा खरपूस समाचार घेतला; व तिचा पूर्णपणें निकाल लावला. या रणभूमीवर प्रजापक्षाचा आधारस्तंभ सरदार हूस्ट्राटन यास पायांत गोळी लागून त्याचें देहावसान झालें. इकडे ऑरेंजला कोणत्याही शहरांत थारा मिळेना अगर त्यास कोणी मदत करीना. आल्व्हाच्या अंदाजाप्रमाणें बंडवाल्यांचें सैन्य फुटत चाललें. अशी स्थिति पाहून ऑरेंजनें नोवेंबरच्या पहिल्या पंधरवड्यांत फ्रान्सची सरहद्द गांठली. फ्रान्सच्या भूमीवर पाय ठेवतांच फ्रान्सच्या राजाचे वकील येवढें मोठें सैन्य घेऊन परवानगी-

शिवाय फ्रेंच हद्दींत आल्याबद्दल त्याची कानउघाडणी करण्यास आले. त्यांस मित्रभावानें फ्रान्सच्या राजास मदत करण्याचा आपला इरादा ऑरेंजनें कळविला. वास्तविक ऑरेंजच्या मनांत यावेळीं नव्या पंथाची बाजू स्वीकारून फ्रान्सदेशांत यादवी माजविण्याचा बेत होता; परंतु त्याच्या सैन्यांत फ्रेंच सरकारानें गुप्त हेर पाठवून बेदिली वाढविली होती. त्यामुळें जवळचा सर्व पैसा घालून व जवळचें सर्व सामान विकून त्यांच्या पगाराची करवेल तितकी भरती करून, व बाकीबद्दल आपल्या जामीनकीचे त्यांस रोखे लिहून देऊन त्यांची बोळवणी करणें भाग पडलें. याप्रमाणें या मोहिमेंत आठ हजार सैन्य व जवळचें सर्व द्रव्य खर्चीं घालून ऑरेंज अपयशाचें खापर माथीं घेऊन बसला असतां, फ्रान्समध्यें नव्या व जुन्या धर्मीयांमध्यें युद्ध जुंपलें. या युद्धास सुमार बाराशें इमानी सेवक व आपले कनिष्ठ बंधू लुई व हेनरी यांसमवेत ऑरेंज जाऊन मिळाला. ग्रॅन्व्हिलनें ऑरेंजच्या मोहिमेविषयीं हें भाकित पूर्वींच करून ठेविलें होतें; त्याच्या मतें ऑरेंज व त्याचें बंड या दोहोंचाही हा शेवट होता. ऑरेंजचें आत्मसमर्थन, विनंतिपत्र व जर्मनबादशहास पत्र वगैरे लेखांवरून त्यानें त्यास कलमबहाद्दर व अस्त्रशत्रु ठरविलें होतें. आल्व्हासारख्या शूर, कल्पक व अद्वितीय योद्ध्यापुढें ऑरेंजसारख्या भित्र्या व मतिमंद माणसाचा टिकाव लागणार नाहीं; ऑरेंजला आपली मिळकतच मिळवावयाची होती, तर अशा वांकड्या वाटेनें जाण्याचें कारण नव्हतें; आपल्या शक्तीचा विचार न करतां उड्या मारणारांचा असाच पाय मोडावयाचा; असें तो आतां बोलूं लागला.

आल्व्हानें फ्रान्सच्या सरहद्दीपर्यंत शत्रूचा पाठलाग केला. कॉन्ब्रेझी शहर घेऊन व तेथून या मोहिमेचा वृत्तांत राजास कळवून आल्व्हा ब्रुसेल्सला परत आला. येथपर्यंत आपल्या हाताखालच्या सेनापतींच्या हातून त्यानें दोन सैन्यांचा निकाल लावला होता. एक जंगी लढाई देऊन त्यानें स्वतः तिसऱ्या सैन्याचा मोड केला व नेदर्लंडच्या आधिदेवतेच्या धुरीणत्वाखालीं आल्व्हाच्या छातीपर्यंत येऊन भिडलेल्या चौथ्या सैन्यापैकीं आठ हजार लोक केवळ कल्पक बुद्धीच्या हालचालीनें त्यानें नाहींसे केले व बाकी तीस हजार वाऱ्याप्रमाणें चोहोंकडे फुंकून

टाकिले. अशीं अचाट कृत्यें करून राजकीय हक्कांनीं नियंत्रित राजसत्तेच्या मुलुखांत लष्करी जुलुमाचा अंमल मनाप्रमाणें बसविल्याबद्दल एखाद्या सामान्य अभिमानी संस्थानिकासही गर्व झाला असता; मग आल्व्हासारख्या उग्रस्वरूपी व सर्व शक्तिमान वीर आपणास आतां ईश्वरी अवतार मानूं लागल्यास त्यांत विशेष आश्चर्य नव्हतें. ब्रुसेल्समध्यें परत येतांच त्यानें जयोत्सवांची परंपरा सुरू केली. लोकांना आपल्या बांधवांच्या रक्तानें स्नान करून आलेल्या आल्व्हाचे स्तुतिपाठ गाण्याविषयीं व आनंदानें त्याच्या वाटेंत पुष्पास्तरण पसरण्याविषयीं हुकूम सुटले; घरोघर आल्व्हाच्या सत्रांत बळी पडलेल्या लोकांबद्दल दुःखसूचक चिन्हांच्या ठिकाणीं दारावर गुड्यातोरणें लावलेलीं दृष्टीस पडूं लागलीं; मनुष्यहानि झाल्यामुळें उदास व भयाण झालेल्या राजधानीच्या शहरांत सर्वत्र मंगलवाद्यें वाजूं लागलीं; व शहरच्या बड्या चौकांत घोड्यांचे खेळ सुरू झाले; एवढ्यानेंच आल्व्हाची तृप्ति झाली नाहीं. त्यानें आपला एक अवाढव्य पुतळा उभा केला; त्याच्या खालच्या चौथऱ्यावर अशीं अक्षरें खोदलीं होतीं,–" **फर्डिनंड आल्व्होरेझ डी टोलेडो,** दुसऱ्या फिलिप राजाचा नेदर्लंडवरील सुभेदार, या राजनिष्ठ सेवकानें राजद्रोहाचा बीमोड, बंडाचा उपशम, धर्मसंस्थापना, न्यायनीति व स्वास्थ्य यांचें पुनरुज्जीवन वगैरे कामगिऱ्या केल्याबद्दल हा त्याचा पुतळा उभा केला आहे." आपल्या हयातींत आपल्या हातानें आपणास वाहून घेतलेल्या पुष्पांजलीचें असें अनुपम उदाहरण दुसरें आढळेल असें वाटत नाहीं. नेदर्लंडवासी लोकांच्या हृदयांत सदैव आश्चर्य व तिरस्कार उत्पन्न करणारा हा पुतळा आल्व्हाच्या मागून आलेल्या सुभेदारानें पाडून चूर्ण केला.

ता. २२ सप्टेंबर १५६८ रोजीं जर्मनीच्या सहा प्रमुख संस्थानिकांनीं बादशहाकडे एक यादी पाठविली; त्यांत "आल्व्हाच्या जुलुमी अमलांत बड्या लोकांपासून तों गरीबगुरीबांपर्यंत सर्व लोकांच्या जीविताचा व वित्ताचा अन्यायानें नाश होत आहे; ऑग्सबर्ग शहरीं नेदर्लंडच्या वकिलांच्या विद्यमानें ठरलेल्या धर्मविषयक तहाअन्वयें आमच्या नेदर्लंडवासी बांधवांस धर्मस्वास्थ्य मिळत नाहीं; फिलिपनें वरचेवर अघळपघळ आश्वासनें देऊन नेदर्लंडांत धर्मसंशोधन व 'यमासन' वगैरे निर्माण

केलीं आहेत. त्या तऱ्हाची बजावणी न झाल्यास आम्ही आमच्या बांधवां-करितां आपले प्राण खर्चीं घालण्यास तयार आहों, ही गोष्ट स्पष्टपणें स्पेनच्या राजास समजली पाहिजे," वगैरे मजकूर होता. या यादीचा विचार होऊन ता. १० डिसेंबर रोजीं बादशहाचा भाऊ बडा चार्लस बादशहाच्या वतीनें माद्रिद् येथें दाखल झाला. त्याला बादशहाकडून निघतांना पूर्ण माहितीचें टिपण मिळालें होतें. त्यांत जर्मनीकडून पूर्वीं फिलिपला गेलेल्या सूचनांचें स्मरण ताजें करून, ऑरेंजला जर्मनींत लोकांचें फार पाठबळ असल्यामुळें त्याला राष्ट्रबाह्य न ठरवितां आपल्या आश्रयाखालीं पुन्हां घ्यावा, व नेदर्लंडमधून स्पॅनिश सैन्य परत बोलावून सदय अंतः-करणानें राज्य चालवावें वगैरे गोष्टी सुचविल्या होत्या. या बड्या वकिलानें या टिपणाची नकल फिलिपच्या हातांत टाकतांच तो आश्चर्यानें चकित झाला. आपल्यासारख्या मोठ्या सत्ताधीशास एवढा मोठा वकील पाठवून बादशहानें अशा प्रकारचा उपदेश करावा हें त्यास सहन झालें नाहीं. या मर्यादातिक्रमाबद्दल बादशहास पाठविण्याकरितां एक पत्र त्यानें ता. २० जानेवारी १५६९ रोजीं चार्लसपाशीं दिलें. त्याचा सारांश :–" आह्मांवर आपल्या वर्तणुकीबद्दल कोणास जाब देण्याची जोखीम आहे असें वाटत नाहीं. आह्मीं आपल्या प्रजेस सक्तीनें वाग-विल्यामुळें सर्व राष्ट्रांचे प्रजाजन नम्र व राजनिष्ठ होऊन त्याबद्दल आमचा गौरव होईल अशी आमची समजूत होती. ऑग्स्बर्ग येथें सामंतचक्रानें ठरविलेले नियम आह्मांस बंधक नाहींत. कॅथोलिक धर्माची सर्वत्र स्थापना करण्याचा आमचा यत्न आहे. धर्माच्या बाबतींत सौम्यपणाचा फार घातक परिणाम होतो; धर्माच्या बाबतींत आह्मा कॅथोलिक लोकांस धर्मगुरूवांचून दुसऱ्या कोणासही उपदेश करण्याचा अधिकार नाहीं. नेदर्लंडमधील बंडवाल्यांस योग्य शासन झालें नाहीं येवढेंच नाहीं, तर त्यांस अत्यंत सौम्य व दयार्द्र दृष्टीनें वागविण्यांत आलें आहे. नेदर्लंडच्या जुन्या राज्यव्यवस्थेंत अगर राजशासनांत आह्मीं कांहींमात्र फरक केला नाहीं. आल्व्हाची सुभेदारीच्या कामावर योजना आम्हीं आपल्या मर्जीनुरूप केली आहे. बंडवाल्यांस शासन करण्याकरितां स्पॅनिश सैन्याची नेदर्लंडमध्यें जरूर आहे, त्यास परत

बोलावतां येत नाहीं. ऑरेंजबद्दल मध्यस्थी हा या शिष्टाईचा मुख्य उद्देश दिसतो; परंतु त्याचीं कृत्यें इतकीं अघोर आहेत कीं, त्यांचें समर्थन करणें दुर्घट आहे. नेदर्लंडमध्यें झालेले सर्व कट, दंगे, राजद्रोहात्मक खटपटी यांचा तोच उत्पादक होय; राष्ट्रांत झालेल्या चोऱ्या, मूर्ति व मंदिरें यांचा विध्वंस वगैरे अपराधांचें श्रेय त्यालाच आहे; याशिवाय सैन्य जमा करून सरकारच्या मुलुखावर त्यानें स्वारीही केली. अशा अघोरकर्मी मनुष्यास माफींत घेण्याबद्दल कोणाच्याही मध्यस्थीचा उपयोग होणें संभवनीय नाहीं." शिवाय एक खासगी पत्र फिलिपनें बादशहास पाठविलें. या पत्रांतील मजकूर व भाषा जास्त आवेशाची होती. ऑरेंजला आपल्याच यजमानावर स्वारी करण्याकरितां माणसांची व पैशाची मदत जर्मनींत व्हावी व त्यास बादशहाकडून कांहीं प्रतिबंध होऊं नये याबद्दल या लेखांत खेद प्रदर्शित केला होता; तसेंच ऑरेंजकडे व ऑरेंजच्या वतीनें आपणाकडे वकील पाठविणें हेंही राजाच्या मतें गैराशिस्त होतें; विशेषतः धर्माच्या बाबतींत सौम्य रीतीनें वागण्याचा उपदेश करणें हें अगदींच अतर्क्य होतें; धर्माच्या बाबतींत आपण ठेवलेलें धोरण कोणत्याही ऐहिक विचारांनीं बदलणार नाहीं; व त्या कामांत उपदेश अगर विनवणी हीं व्यर्थ आहेत; व सध्यां बादशहानें पाठविलेला निरोप केवळ धमकीच्या स्वरूपाचा आहे, त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं असा स्पष्टार्थ या पत्रांत समजाविला होता. ता. २३ जानेवारी रोजीं चार्लसनें फिलिपच्या पहिल्या यादीस फार कळकळीचें व आवेशयुक्त उत्तर दिलें. नेदर्लंड-मधील राज्यव्यवस्थेसंबंधानें व स. १५५५ सालीं चार्लस बादशहाच्या समक्ष ठरलेल्या ऑग्स्बर्गच्या धर्मतहावरून नेदर्लंडच्या लोकांस मिळालेल्या सवलतीसंबंधानें फिलिपचें ह्मणणें सर्वस्वीं अशुद्ध होतें; त्या तहाच्या वेळीं सर्व सामंतचक्रांतील लोकांस धर्मस्वातंत्र्य देऊं केल्यामुळेंच कॅथोलिक धर्माचा पाय टिकला होता. जर्मनीच्या दक्षिणभागांत अशी अस्वस्थता राहूं दिल्यास त्याचे बादशहाच्या राज्यांत अनिष्ट परिणाम झाल्यावांचून राहणार नाहींत; इताली व स्पेनप्रमाणें लष्करी अंमल फ्लॉंडर्ससारख्या स्वातंत्र्यप्रिय प्रांतांत चालणें शक्य नाहीं, वगैरे गोष्टी बादशहाच्या नामांकित वकीलानें फिलिपला स्पष्टपणें कळविल्या. परंतु

फिलिप कॅथोलिक धर्मासंबंधानें बादशहाची अनास्था फार अश्लाघ्य व घातक आहे, त्या धर्माबद्दल मनांतून त्यास योग्य अभिमान असणें जरूर आहे, वगैरे उपदेश उलट बादशहास करूं लागला. इकडे बादशहाची वृत्ति वकील माद्रीदपर्यंत जाऊन पोंहोंचण्यापूर्वींच सर्वस्वीं बदलली होती. त्याच्या मार्गांत फिलिपच्या नुकत्याच मेलेल्या स्त्रीचें पिशाच आडवें येऊन उभें राहिलें. त्यानें बादशहाच्या कानांत आपली अनूढ कन्या स्पेनच्या विधुर राजास देण्याविषयीं मंत्र फुंकतांच पूर्वीं फ्रान्सच्या राजाशीं ठरलेल्या लग्नाचा बेत रहित करून तिला बादशहानें आपल्या वकीलामार्फत फिलिपराजास देऊं केली. ऑरेंजच्या मोहिमेचाही निकाल पूर्वींच लागून गेला होता; त्यामुळें वकीलाची शिष्टाई सुरू होण्यापूर्वींच बादशहानें फिलिपला नम्रपणाचीं व विशेष स्नेहसूचक पत्रें पाठविण्यास सुरवात केली; त्यांत त्यानें आपणास राजाच्या स्नेहाची विशेष अपेक्षा आहे, आपल्या नेदर्लंडविषयक सूचनांचा वाटेल त्या रीतीनें विचार करण्यास आपण मुखत्यार आहां, मात्र दरबारच्या पत्रव्यवहारांत जर्मन संस्थानिकांस न रुचेल असा मजकूर येऊं नये, वगैरे मजकूर असे. बडे चार्लस फिलिपकडून एक लक्ष डच्यूकटची नजर घेऊन कृतार्थ होऊन जर्मनीस परत गेले. या रीतीनें धर्मज्ञ व परोपकारी मॅक्सिमिलियन बादशहाच्या मध्यस्थीचा धुरांत शेवट झाला.

आल्व्हा ब्रुसेलसला परत आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं त्याची इंग्लंडच्या इलिजाबेथ राणीशीं स्वल्प कालपर्यंत मोठी बाणीची कलागत जुंपली. फ्रान्समधील प्रजापक्षाचा सेनानायक कॉंडी यानें कांहीं जहाजां-च्या मालकांस नेदर्लंडमधील स्पॅनिश सैन्यास पैशाचा पुरवठा करण्या-करितां निघालेल्या जहाजांचा पाठलाग करण्याचा हुकूम सोडल्यावरून स्पॅनिश जहाजांस कॉंडीच्या तांडेलांनीं इंग्लंडच्या किनाऱ्यापर्यंत रेटीत नेलें. या वेळीं ऑरेंज कॉंडीच्या सैन्यास मिळाला होता हें लक्षांत ठेविलें असतां या कृत्याचा मुख्य कल्पक कोण हें निराळें सांगण्याची जरूर नाहीं. स्पॅनिश नौवाहकांनीं लंडन येथील स्पॅनिश वकीलास ही गोष्ट कळवून त्याच्यामार्फत इलिजाबेथकडे दाद मागितली. इलिजाबेथनें त्यांस सुरक्षितपणें पोंहोंचविण्याचें आश्वासन देऊन, त्याच दिवशीं

जहाजांतील सर्व पैसा जप्त करून आपल्या उपयोगास लाविला व स्पॅनिश वकीलाची तिनें अशी समजूत काढली कीं, पैसा आपल्याजवळ राहिल्यानें जास्त सुरक्षित राहील. शिवाय तो खजिना स्पेनचा नसून कांहीं अन्य राष्ट्राच्या व्यापाऱ्यांनीं आपणास कर्जाऊ पाठविला आहे असेही तिचे उद्गार निघाले. ही बातमी समजतांच आल्व्हा पैशाची चातकाप्रमाणें वाट पहात असल्यामुळें तो रागानें अगदीं खवळून गेला. त्यानें ताबडतोब इलिजाबेथकडे वकील पाठविले; त्यांस राणीची भेट होईना; व इलिजाबेथनें असें ध्वनित केलें कीं, छत्रधारी राज्ञीकडे आल्व्हा-सारख्या सामान्य मनुष्यानें वकील पाठविणें अगदीं उद्धटपणाचें वर्तन होय. इलिजाबेथनें स्पेनच्या राजाकडे या गोष्टीची वाटाघाट करण्याकरितां एक गुप्त वकील पाठविला. इकडे आल्व्हास पैशाची प्राप्ति न होतां उलट मानहानि झालेली पाहून फारच त्वेष आला. नेदर्लंडमधील प्रत्येक इंग्लिश मनुष्यास पकडून त्याची मालमत्ता त्यानें जप्त करण्याचा हुकूम सोडला. राणीनेंही इंग्लंडमधील डचलोकांविरुद्ध असेच जाहिरनामे प्रसिद्ध करून आल्व्हाचा प्रतिकार करण्याचा यत्न केला. सारांश, नेदर्लंडवासी लोकांची चोहोंबाजूनें छळणूक चालू झाली. या भांडणाचा शेवट सन १५७३ च्या एप्रिल महिन्यापर्यंत झाला नाहीं.

ऑरेंजविरुद्ध जय मिळाल्यामुळें अगर इलिजाबेथशीं कलह झाल्यामुळें आपलें मुख्य कर्तव्य आल्व्हा कधींही विसरला नाहीं. फांसावर व सुळावर माणसांचे शतशः बळी पडत होते. याशिवाय सुभेदारसाहेबांचे असे हुकूम सुटले कीं, सर्व सुइणी कॅथोलिकधर्मी असाव्यात व त्यांनीं मूल जन्मल्या-पासून चोवीस तासांच्या आंत अधिकाऱ्यांस वर्दी द्यावी; तसेंच कोणत्याही ठिकाणीं प्रायश्चित्तादिक होत असल्यास किंवा प्रेतसंस्कार चालले असल्यास त्याची तत्काल खबर लागण्याकरितां जास्त गुप्तहेरांचा भरणा करावा. याच सुमारास एका नवीन धर्माच्या उपदेशकास, नवीन धर्मा-विषयीं अनुकूल अभिप्राय प्रगट करणाऱ्या चार पाद्र्यांस देहान्त प्रायश्चित्त मिळालें. याप्रमाणें आल्व्हाचे दूत त्याचे हुकूम शब्दशः व मोठ्या मेहनतीनें अंमलांत आणीत असतां कॅथोलिकधर्माचे मुख्य आचार्य पोप यांजकडून या अद्वितीय धर्मभक्ताकरितां एक मौक्तिकमंडित शिरोभूषण व

एक खड्ग घेऊन कासीद आला. पोपचा हा प्रसाद फार दुर्मिळ होता. या देणग्यांसोबत आचार्यांचें पत्र आलें; त्यांत "हें शिरोभूषण आपल्या धार्मिकपणाचें व ईश्वरी प्रसादाचें चिन्ह समजून धारण करावें; यावरुन सत्यधर्म व कॅथोलिक सांप्रदाय यांच्या पुरस्कर्त्यांस परलोकीं काय बक्षीस मिळतें याची कल्पना होईल," असें लिहिलें होतें. येशू ख्रिस्ताच्या प्रतिनिधीकडून हें सन्मानपूर्वक प्रोत्साहन मिळाल्यामुळें धर्मच्छलास एखादें नवें बीभत्स स्वरूप आणण्याची एखादी अपूर्व कल्पना आल्व्हाच्या बुद्धीस सुचेना. नेदर्लंडच्या अवशिष्ट संपत्तीवर घाला घालण्याचें काम अद्याप शिलक राहिलें होतें, त्याच्याकडे त्यानें आतां आपलें लक्ष फिरविलें.

आपली जमाबंदीची व्यवस्था आल्व्हास समाधानकारक वाटेना. हद्दपार व खून केलेल्या लोकांच्या जप्तींत असलेल्या मिळकतींपासून अर्थातच निरंतरचें उत्पन्न कांहीं होईना; स्पेनदेशांत सोन्याचा निरंतरचा पूर लोटणार होता तो अजीबात बंदच पडला. जुलुमाच्या कल्पनांनीं ग्रस्त झालेल्या आल्व्हाच्या बुद्धीस प्रजा संपन्न असल्यास राजा संपन्न राहील हें तत्त्व बिलकुल स्पर्श करीना. आतां त्यानें नवीन हास्यास्पद प्रयोग करून आपल्या अज्ञानाचा व अल्पबुद्धीचा मासला जगास दाखविण्यास प्रारंभ केला. स्पेनमधून निघतेवेळीं राजास त्यानें असें वचन दिलें होतें कीं, स्पेनमधून नेदर्लंड देशांत यापुढें पैशाची बिलकुल रवानगी करावी लागणार नाहीं; उलट नेदर्लंडची दोन लाख फ्लोरिन खंडणी प्रतिवर्षीं स्पेनदेशांत पोंहोंचत जाईल. या फुषारकीबद्दल स्पेनमध्यें त्याची बरीच थट्टा उडाली होती; त्यामुळें ईर्षेस चढून आपली कल्पनाशक्ति नाशकशक्तीप्रमाणेंच फार जबरदस्त आहे असें सिद्ध करण्याचा त्यानें निश्चय केला. त्यानें आतां अशी तजवीज काढली कीं, नेदर्लंडच्या निरनिराळ्या प्रांतिकसभांचा आपल्या प्राचीन चालीप्रमाणें नवे कर बसविण्याचा हक्क यापुढें राजानें आपल्या मर्जीनुरूप चालवावा. ही कल्पना नवी नव्हती; परंतु ती बरीच धाडसी होती. नव्या बाबी बसविणें सोपें काम होतें; परंतु त्या वसूल करणें फार कठिण होतें. शिवाय धर्मच्छलापेक्षां नवीन करांनीं लोकांत जास्त हाहाकार उडावयाचा होता. देशांत पुष्कळ कट्टे कॅथोलिक होते, त्यांस मांगांच्या हातून मरण येण्याची भीति नव्हती;

मात्र त्यांस कर गोळा करणाऱ्यांच्या तावडींतून सुटण्याची आशा नव्हती, परंतु या विचारांची आल्व्हास बिलकुल बाधा झाली नाहीं; त्याचें धैर्य अमानुष होतें; नेदर्लंडवासी लोकांच्या सहनशक्तीचा ठाव घेण्याचा त्याचा संकल्प होता. या राष्ट्रांतील सर्व स्त्रीपुरुषांस देहांतशिक्षेचा हुकूम फिरला होता; त्यांपैकीं दैववशात् पाळी येईल त्या इसमांचा वध होत असे; लक्षावधि रुपयांची मिळकत जप्त झाली होती, तथापि कांहीं लोकांचीं डोकीं अद्याप सडकावयाचीं राहिलींच होतीं; श्रीमान् व उद्योगी लोक कफल्लक होऊन परदेशांत भटकत होते; देशांतील लोकांची वाताहत झाली होती, परंतु त्यांचा अद्याप समूळ नाश करावयाचा राहिला होता; राष्ट्राची अर्थोत्पादन शक्ति अद्याप सर्वस्वीं नाहींशी झाली नव्हती. हें अभागी राष्ट्र प्रपंचसुखास व राजकीय हक्कांस सर्वस्वीं मुकलें होतें, तथापि राजास अद्याप नवे कर बसविण्याचा अधिकार प्राप्त झाला नसल्यामुळें जुलमाचा प्रतिकार करण्याचें एक मोठें साधन येथपर्यंत त्यांच्या हातांत राहिलें होतें. ब्राबंटच्या "सानंदप्रवेश" सनदेंत, व फ्लँडर्झ, यूट्रेक्ट, हॉलंड वगैरे सर्व प्रांतांच्या राज्यव्यवस्थेच्या नियमांत त्या त्या ठिकाणच्या प्रांतिकसरकारानें राज्यव्यवस्थेच्या खर्चाकरितां पैसा कसा मिळवावा याबद्दल मार्ग ठरविले होते. राजा किंवा त्याचा प्रतिनिधि-प्रांताचा सुभेदार याला प्रांतिक सभेपुढें स्वतः येऊन सभेस पैशाची मागणी करावी लागत असे. या सभेच्या निरनिराळ्या शाखांचा आपल्या मतदारांशीं या मागणीविषयीं विचार होऊन सर्वांचा एक विचार झाल्यास राजाचा अर्ज मान्य होत असे; त्यांत कोणत्याही एका शाखेचा नकार पडल्यास अर्ज नामंजूर होत असे. ही नेदर्लंडची पूर्वापार चाल चालत आली होती, व या प्राचीन रिवाजामुळें कोणत्याही राजास कधींही पैशाची उणीव पडली नाहीं. परंतु बळी देण्यास काढलेल्या लोकांच्या हातीं खजिन्याच्या किल्ल्या रहाव्या व त्यांनीं राजास भिक्षा घालावी ही गोष्ट आल्व्हाच्या मानी स्वभावास अर्थातच आवडली नाहीं. ता. २० मार्च १५६९ रोजीं ब्रुसेल्सची प्रांतिक सभा भरवून तिजपुढें त्यानें खालील ठराव विचाराकरितां मांडिलेः-

१. देशांतील सर्व स्थावर मिळकतींच्या किंमतीवर शेंकडा एक टका

बाब एकदम घेतली जाईल. ती पुनः हुकूम होईपर्यंत एक वेळच वसूल करण्यांत येईल.

२. स्थावर मिळकत तबदील करणाच्या प्रत्येक प्रसंगीं मिळकतीच्या किंमतीवर पांच टक्के बाब घेतली जाईल. ही निरंतरची बाब राहील.

३. शिल्पानें तयार केलेली अगर इतर जंगम वस्तु विक्री होण्याच्या प्रत्येक वेळीं तिच्या किंमतीवर शेकडा दहा टक्के बाब वसूल केली जाईल. हीही निरंतरची बाब राहील.

हे ठराव कानीं पडतांच सभेंत एकच गोंधळ उडाला. धर्मतत्त्वांसंबंधीं लोकांत मतभेद असूं शकेल. धर्मच्छलांत खऱ्या भावानें जुलुमास मदत करणारे लोक सांपडतील. धर्मच्छलाचा प्रतिकार करण्याची इच्छा ही मानवी स्वभावापैकीं कांहीं उदात्त विकारांनीं उत्पन्न होते व त्यासंबंधाचे प्रयत्नही दीर्घ व उत्तेजक असतात; परंतु धर्माकरितां देह वाहिलेल्या दृढसंकल्पांच्या व दृढदेहांच्या लोकांची संख्या फारच स्वल्प असते. त्यांतूनही श्रद्धाविषयक व्यवहारांत स्वार्थबुद्धीमुळें अगर सक्तीमुळें पुष्कळ लोकांच्या वृत्तींत पालट पडेल. परंतु ऐहिक व भौतिक विषयांत जुलूम होऊं लागल्यास त्याचा प्रतिकार करण्यासाठीं तत्काल ऐकमत्य व्हावयाचें-च. हा नवीन कायदा इतका अपूर्व, व्यापक, स्वैच्छिक होता कीं, त्याच्या तावडींतून कोणताही इसम सुटत नव्हता. सभेंत चोहोंबाजूंनें अशी तक्रार ऐकूं येऊं लागली कीं, बाबी नंबर २।३ सुरू झाल्यास सर्व व्यापारधंदा बंद होईल; पहिली बाब जरी बरीच जड जाणार आहे, तरी ती एकवार यावयाची असल्यामुळें कशी तरी सोसतां येईल; परंतु दुसरी बाब कायम झाल्यास, एक घर वर्षांतून वीस वेळ विकलें गेल्यास त्याची सर्व किंमत सरकारास भरावी लागेल; याचा परिणाम स्थावर मिळकतींच्या किंमती दुप्पट होऊन त्यांचा क्रयविक्रय बंद होणें हा होईल; बाब तीन अमलांत आल्यास सर्व व्यापाराचें उद्वासन होईल; एका आठवड्यांत एखादा जिन्नस दहा हातांतून जाईल; व तितक्या मुदतींत या बाबी-अन्वयें शेकडा शंभर टक्के कर त्यांजवर भरावा लागेल; शिवाय एखादा पदार्थ दहा निरनिराळ्या वस्तूंनीं बनला असतो; प्रत्येकावर शंभर टक्के कर भरल्यास या मिश्र वस्तूवर हजार टक्के कर व्हावयाचा; शीघ्र अदला-

बदली व अनियंत्रित चलन हे व्यापाराचे मुख्य स्नायु असल्यामुळें त्याला या कराचा पक्षाघात होतांच त्याचें प्राणोत्क्रमण होईल. या बाबी वसूल करण्याचें कठीण पडेल, त्यांपासून उदीमधंदा बंद होईल व सरकारास विशेष फायदा होणार नाहीं. सरळ युक्तिवाद अगर मनोभावाच्या विनवण्या या दोहोंचा कांहीं उपयोग होईना. बुद्धीच्या स्थूलपणामुळें ज्ञान-किरणास अगम्य व हृदयाच्या कठोरपणामुळें प्रजेच्या दुःखाश्रूंना अभेद्य असा सुभेदार आल्व्हा आपला दुराग्रह सोडिना. व्हिग्लियस या प्रसंगीं आल्व्हाच्या विरुद्ध होता. धर्मच्छलाच्या गगनचुंबित व जगड्व्याळ होळींतून एक देखील जळकें लांकूड बाहेर ओढून काढण्याचा व्हिग्लि-यसनें यत्न केला नाहीं; परंतु राष्ट्राच्या भौतिक संपत्तीवर कुऱ्हाड आलेली पाहून शेवटीं त्याच्या हृदयांत कळवळा उत्पन्न झाला. या कल्पनेचा उद्गम राजापासून झाला नव्हता; किंवा याविषयीं त्याचा विशेष आग्रहही नव्हता, असें जाणून व्हिग्लियसला या कामांत थोडें धैर्य आलें असावें! या बाबींचें अन्यायी स्वरूप व्हिग्लियसनें व्यक्त केल्यावरून आल्व्हानें असे कर आपल्या जहागिरींत बसवून आपण पन्नास हजार ड्यूकट दर-साल उत्पन्न करतों असें त्यास समाधान सांगितलें. त्यावर तुरळक लोकसंख्येच्या स्पेनदेशामध्यें, व व्यापार व कारखाने यांनीं गजबजलेल्या नेदर्लंड देशांत महदन्तर आहे; स्पेनमध्यें अशा प्रकारचे कर फलप्रद होत असतील, परंतु नेदर्लंड देशांत असे कर वसूल करणें शक्य नाहीं; वगैरे हरकती प्रेसिडेंटनें कळविल्या. शेवटीं आल्व्हाचें असें ह्मणणें पडलें कीं, ही बाब केवळ कारखानदार व व्यापारी यांजवर पडणार आहे. वास्तविक अर्थशास्त्रदृष्ट्या हा कर सर्व प्रजेवरच बसणार होता; कारण कराप्रमाणें मालाची किंमत वाढते हें अनुभवसिद्ध आहे. या नवीन करांची बातमी सर्वत्र समजतांच लोकांस अत्यंत चिंता व भीति उत्पन्न झाली. सरकारास अर्जावर अर्ज व यादी दररोज येऊं लागल्या. पूर्वी-पेक्षां जास्त निराशेच्या व त्वेषाच्या आरोळ्या चोहोंबाजूनें ऐकूं येऊं लागल्या. आल्व्हाच्या वृत्तींत जरा नरमपणा आणण्याकरितां एक टक्का कर या प्रांतिक सभेनें मान्य केला. पांच टके व दहा टके यांच्यासंबंधानें

पुष्कळ कालपर्यंत धडपड चालली होती; परंतु शेवटीं हताश होऊन व ते गोळा करण्याच्या कामांत तरी विशेष सक्ती होणार नाहीं या आशेनें बऱ्याच मुख्य मुख्य प्रांतांतील सभांनीं ते कर कांहीं अटींवर कबूल केले. मुख्य अट अशी होती कीं, हे नवीन कर बेकायदेशीर असल्यामुळें सर्व प्रांतांनीं ते मान्य केल्यावांचून कोणत्याही एका प्रांतांत कायम करूं नयेत. हॉलंडप्रांतांनेंही पुष्कळ आढेवेढे घेऊन शेवटीं हें जूं मानेवर घेतलें. आम्स्टर्डम शहरानें मात्र बरेच दिवस या बाबी कबूल केल्या नाहींत. यूट्रेक्ट शहर व प्रांत यांचा तर कृतसंकल्पच झाला होता. त्यांनीं हे नेहमींचे कर डोक्यावर घेण्याऐवजीं दोन लाख फ्लोरिनची एकदम खंडणी देऊं केली. या त्यांच्या दुराग्रहाबद्दल त्यांस लवकरच कडक शासन मिळालें. थोडे दिवस वाट पाहून ते वाटेवर येत नाहींत अशी खात्री झाल्यावर आल्व्हानें त्या प्रांतांत लोकांच्या घरोघर आपले पलटणी लोक ठेवून लोकांस फार त्रास दिला; व त्यांस ताळ्यावर आणण्याकरितां सक्तीचे अन्य उपायही योजिले. परंतु लोकांचा पूर्ण निर्धार ढळेना. त्यामुळें ता. १५ दिसेंबर १५६९ रोजीं खुद्द प्रांतिकसभेस यमासनापुढें पाचारण झालें. नेमलेल्या वेळीं सरकारतर्फे वकील सरकारानें सदर संस्थेवर समवायानें ठेवलेल्या आरोपांचा तक्ता व त्याबरोबरच शिक्षेचा ठराव घेऊन कोर्टांत हजर झाला. आरोपांच्या तक्त्यांत या प्रांताचे सर्व जारी अपराध व विशेषेंकरून सन १५६६ च्या दंग्यांत व मार्गरेटशीं तह करण्यांत घडलेले दोष सविस्तर नमूद केले होते. या प्रांतांतील प्रत्येक रहिवाशावर धर्मद्रोह, राजद्रोह व दंग्याधोप्यांस मदत वगैरे गुन्ह्यांचीं शाबिती धरून त्यांच्या जुन्या सनदा, कायदे, हक्क, सवलती व रूढी रद्द करण्याचा हुकूम झाला. व्यक्तींच्या व सभेच्या सर्व मिळकती सरकारांत जप्त झाल्या. सभेस जबाब देण्याकरितां थोडी सवलत देऊन शिक्षेचा अंमल कांहीं कालपर्यंत तहकूब ठेवण्यांत आला. या तहकुबीपासून लेखी सुनावण्या, पुरशीशी, जबाब, अर्ज, पुरावे यांची गर्दी होऊन वकील लोकांचे खिसे जड झाले. परंतु हे कागदपत्र पाहण्यास कोणास फुरसतही नव्हती अगर जरूरही नव्हती. या कृत्यांत भरपूर सहा महिने लोटले. या प्रकरणांत रक्तपाताचा प्रसंग नसल्यामुळें मुदतीचा प्रश्न विशेष

महत्वाचा नव्हता. सर्व कागदपत्र व्हार्गसकडे निकालाकरितां गेले. त्यानें त्यांचें पूर्वी कधींही अवलोकन केलें नव्हतें व ज्या भाषेंत ते लिहिले होते तिचें त्यास ईषन्मात्र ज्ञान नव्हतें. तथापि त्याची काम करण्याची अशी विलक्षण शैली होती कीं प्रकरणाच्या पुडक्यावर नजर फेकतांच त्याचा निकाल सांगण्याइतकी माहिती त्यास एकदम झाली; त्यानें एकदम शिक्षा ठोठावली. पूर्वी झालेली जमी वगैरे कायम करण्यांत आली. हजारों लोक या हुकुमावरून धुळीस मिळाले व लक्षावधि लोक आपल्या मिळकतीस मुकले. पाद्री लोकांनीं आपल्या मिळकतींस हा ठराव लागूं पडत नाहीं असें दाखविण्याकरितां जुने धर्मगुरूंचे ठराव छापून प्रसिद्ध केले. या छापखानेवाल्यास जन्मठेप मिळाली व आल्व्हा-चा चिटणीस ला टॉर यानें हे जुने दाखले प्रसिद्ध करण्यास उत्तेजन दिलें असें समजतांच त्याची गजाच्या खोलींत स्थापना झाली. सभा व वतनदार अधिकारी यांनीं राजास अपीलअर्ज केले. ही धर्माची बाब नसल्यामुळें त्याचा कांहीं विचार होईल असा भरंवसा होता. परंतु व्यर्थ. आनंदाची गोष्ट एवढीच कीं या वेळीं राजाकडे गेलेले वकील आपलीं डोकीं धड घेऊन देशीं परत आले. यूट्रेक्ट प्रांतांत लष्करी अंमल चालू झाला. यूट्रेक्टच्या सर्व जुन्या सनदा सरकारानें आपल्या ताब्यांत घेतल्या; त्यापुढील कारकीर्दींत राजाच्या हुकुमानें परत स्वस्थानीं आल्या. सन १५६९ च्या उत्तरार्धांत आल्व्हानें राजास मोठ्या आनंदानें लिहून कळविलें कीं सर्व प्रांतांनीं नवीन कर कबूल केले; व त्याच्या उत्पन्नांतून सरकारखर्च वजा जातां निदान वीस लक्षांची रकम यापुढें स्पेनला दरसाल येऊन पोंहोंचेल. त्याचा नुसत्या एक टक्याच्या वसूलाचा अंदाज पन्नास लक्षांचा होता. हा आल्व्हाचा आनंद अकालिक व मनोराज्या-सारखा होता; तो फार वेळ टिकला नाहीं. प्रत्येक प्रांतिकसभेनें दुसऱ्या प्रांतांची सबब सांगून पांच टक्के व दहा टक्के हे कर बसविण्यासंबंधानें व वसूल करण्यासंबंधानें हरकती उत्पन्न केल्या. आल्व्हा रागानें अगदीं बेफाम झाला व नानाप्रकारच्या धमक्या देऊं लागला. प्रांतिकसभांबरोबर पुन्हां वाटाघाट सुरू झाली. सन १५६९ च्या उन्हाळ्यांत असें ठरलें कीं, सध्यां वादास उभे राहिलेल्या प्रांतांनीं पुढील दोन सालांत सालीना वीस

लाख रुपये नक्त खजिन्यांत भरावे ह्मणजे त्यांस या नवीन बाबींचा उपसर्ग लागणार नाहीं. याप्रमाणें सन १५७१ च्या आगष्ट महिन्यापर्यंत या वादाचा शेवट लागला.

आतां लोकांस सरसकट माफी देण्याबद्दल वाटाघाट ब्रुसेल्स व माद्रीद येथें सुरू झाली होती. व्हिल्यिमसला आपल्या देशबांधवांची पूर्ण माहिती होती. अन्यायाचा व जुलुमाचा घडा ओतप्रोत भरला होता व त्यांत जास्त भर घातल्यास स्पॅनिश लोकांस नेदर्लंड देशांतून गचाळें आटोपून जावें लागेल असा त्याचा ग्रह झाला होता. तसा प्रसंग आल्यास आपण चालविलेल्या नाटकाच्या ललितांत सरकारच्या एकनिष्ठ सेवकांचीं डोकीं कुऱ्हाडीच्या धारेखालीं सांपडून त्यांच्या मिळकती खजिन्यांत जातील अशी त्यास भीति वाटत होती. यामुळें नेदर्लंडच्या लोकांस सरसकट माफी द्यावी अशी सूचना हॉपरंच्या द्वारें त्यानें राजास कळविली व या गोष्टी-संबंधीं आल्वाबरोबरही पुष्कळ वेळ वाटाघाट केली. आल्वाचें राजापाशीं वजन दिवसेंदिवस कमी होत चाललें होतें; त्याची जमाबंदीची व्यवस्था राजास पसंत नव्हती. खुद्द आल्वालाच माद्रीदला परत जाण्याची इच्छा उत्पन्न झाली होती; त्याची शरीरप्रकृति सोडकळीस आली होती; नेदर्लंडांत त्याचा सर्व लोक द्वेष करीत होते व माद्रीद येथें त्याचे शत्रू राजापाशीं त्याच्या कागाळ्या सांगून त्याचें महत्त्व कमी करण्याचा यत्न करीत होते. शिवाय त्याच्या मनांत अशी भावना उत्पन्न झाली होती कीं आपलें नेदर्लंडमधील कार्य संपलें. नेदर्लंडच्या भूमींत शोषण होईल इतका रक्तस्राव त्यानें करविला होता. तेव्हां त्यानें मोठ्या काकुळतीनें व आग्रह-पूर्वक राजास लिहिलें कीं, महाराजांनीं कृपाळू होऊन आपणास नेदर्लंडांतून मोकळें करावें; तेथील कामगिरी आपण शेवटास नेली आहे; यावच्चन्द्रदिवाकरौ महाराजांचा अंमल या राष्ट्रांत सुरळितपणें आतां चालेल; त्यांतूनही हें कार्य पार पाडण्यांत आपणास कोणताही अन्याय अगर जबरदस्ती करावी लागली नाहीं. जमाबंदीखात्याची स्थितीही भरभराटीची आहे; नवीन बसविलेल्या बाबींपैकीं दहा टक्क्याचें उत्पन्न चाळीस लक्षांवर होईल; एक टक्क्याचें उत्पन्न पन्नास लक्ष होईल, नेदर्लंडमधून महाराजांना भरपूर करभार येऊं लागेल; राष्ट्रांत किंवा

बाहेर कोणी शत्रु राहिला नाहीं; ऑरेंजला सावकार लोकांची समजूत घालण्याचें काम बरेच दिवस पुरेल; जर्मनीपासून भीति मुळींच उरली नाहीं; इंग्लंड जर्मनीचा कासोटा धरून चाललें आहे. फ्रान्स तर फार अधम स्थितीस जाऊन पोंहोंचलें आहे.

आल्व्हाचे विचार या प्रकारचे होते. राजा दुसरा सुभेदार नेमण्याचा विचार करूं लागला होता. प्रेसिडेंटला ही गोष्ट कळली होती. मागून कोणी सुभेदार आला तरी त्याची कारकीर्द यापेक्षां थोड्या अंशानें तरी सौम्य होईल असा भरंवसा होता. ही वस्तुस्थिति पाहून, कालांतरानें का होईना, या गृहस्थाची बुद्धि न्याय व भूतदया यांच्याकडे वळली. कराच्या बाबतींत तो आल्व्हाचा प्रतिपक्षी झाला होता. समाधानाची गोष्ट एवढीच कीं, राजा या बाबतींत आपल्या बाजूला आहे असा त्याला पुसट संशय आला होता. आल्व्हानें कागदोपत्रीं त्याची स्तुति पूर्वींप्रमाणेंच चालविली होती. व्हिग्लियसला आपल्या 'जी हुकूम' वृत्तीचा वीट आला होता; तथापि त्यानें मोठ्या दीनभावानें आपला स्नेही हॉपर यास कळविलें कीं, 'सुभेदारांनीं आमच्या विरुद्ध मजकूर महाराजांस कळविल्यास आपण महाराजांपाशीं आमची बाजू संभाळावी.' आल्व्हाच्या दूरदर्शित्वाबद्दल व भूतदयेबद्दल आतां त्याच्या मतांत बराच फरक पडला. राजाच्या दयार्द्रवृत्तीविषयींची त्याची भाषा बंद झाली. "या राष्ट्रांत इतका रक्तपात व वित्तापहार होत आहे कीं, पिशुनता व लोभ यांचा डाग अंशतः राजासही लागेल" अशी त्यास भीति वाटूं लागली. शिवाय सरकारानें रयतेविषयीं यापेक्षां जास्त दयाभूतपणा दाखविल्याचें इतिहासांतरीं आपण वाचल्याचें त्यास स्मरण होऊं लागलें. हे विचार या विद्वान् फ्रीजियन गृहस्थाला जरा पूर्वींच सुचले असते, तर त्यांचा त्याला स्वतःला व त्याच्या पितृभूमीला फार उपयोग झाला असता. त्यानें कालाची, राजाची व आल्व्हाची नोकरी जितक्या इमानानें केली तितक्या नेकीनें आपल्या देशाची सेवा केली असती तर कदाचित् त्याच्या जमिनींचा विस्तार वाढला नसता, त्याच्या पदव्यांची संख्या वाढली नसती; परंतु त्याला वृद्धदशेंत "इमानी नोकर ह्मणजे कायमचा गद्धा" असे उद्गार काढण्याची पाळी खचित आली नसती. नेदर्लंडच्या

लोकांस माफी देण्याचा विषय राजाच्या डोक्यांत घोळत होता. प्रेसिडेंटनें माफीचे पुष्कळ मसुदे करून पाठविले; परंतु आल्व्हाच्या शोधांनीं ते इतके चिताड होऊन जात कीं मूळ लेखकालासुद्धां त्याचें अव्वल स्वरूप ओळखण्याची पंचाईत पडे. ग्रॅनव्हिलनेंही आतां माफीची सूचना केली. देश अगदीं दीन व देशाभिमानशून्य झाला होता. आतां माफी देण्यांत कांहीं खर्च नव्हता व त्यांत विशेष कांहीं अर्थही नव्हता. यापुढें निष्कारण विपुल रक्तपात करण्यापेक्षां भूतदयेची भूमिका धारण केल्यापासून विशेष फायदा होता. आल्व्हाची पशुवृत्ति सीमेच्या बाहेर गेली होती असें या वृद्ध कपीस सुद्धां वाटूं लागलें. ग्रॅनव्हिल जातीचा फार विचारी व दूरदर्शी असल्यामुळें राजाच्या पत्रांत त्यानें आल्व्हास " सुज्ञ, " " दूरदर्शी, " " भरंवशालायख, " " अनुभवी, " " चतुर, " " लोकव्यवहारज्ञ " व " हातीं घेतलेलें काम शेवटास लावण्यास समर्थ " अशीं विशेषणें देण्याचा क्रम चालविला होता. दुसऱ्या लोकांच्या पत्रांत मात्र या सुज्ञ सुभेदाराच्या राज्यव्यवस्थेची तो निंदा करीत असे. सन १५६९ च्या अखेर स्पेनदेशांतून माफीचे चार नमुने येऊन पोंहोंचले त्यांपैकीं एक मसुदा पसंत करून बाकी तीन नाश करण्याबद्दल आल्व्हाला हुकूम होता. ता. १४ जुलै रोजीं अँट्वर्प शहरांत माफीची द्वाही फिरविण्याकरितां सुभेदाराच्या आज्ञेवरून मोठी जत्रा भरली. त्या दिवशीं प्रातःकाळीं शहरच्या मुख्य देवळांत प्रार्थना होऊन सुभेदारप्रभृति मंडळींनीं तीर्थप्रसाद घेतले. या वेळीं आरासच्या धर्माध्यक्षानें भूतदयाधर्माचें निरूपण केलें, व मधून भावी माफीसंबंधानें राजाचा बराच गौरव केला. दोनप्रहरीं शहरच्या मोठ्या चौकांत आपल्या लवाजम्यासह सुभेदार आले. या ठिकाणीं एक रक्तवस्त्राच्छादित मोठें विस्तृत पीठ तयार केलें होतें; त्यावर आल्व्हा-करितां उच्चभागीं भरजरीच्या कपड्यांनीं मढविलेलें आसन ठेविलें होतें; या आसनाच्या पायाजवळ दोहोंबाजूंस नीति व शांति त्यांच्या निदर्शक दोन सुंदर स्त्रिया बसविल्या होत्या; पीठांवर व त्याच्या पायऱ्यांवर लष्करी अंमलदारांकरितां जागा केल्या होत्या; चौकांत सर्व बाजूंनें पलटणी शिपाई उभे केले होते. पोपनें दिलेलें शिरोभूषण व खड्ग धारण करून आल्व्हा स्थानापन्न झाला. एका लष्करी अंमलदारानें भालदारांच्या मध्यें उभें

राहून माफीचा हुकूम हलक्या स्वरानें वाचला. तो जवळ असलेल्या शिपायांशिवाय कोणास ऐकूं गेला नाहीं. कदाचित् ऐकूं गेलाच असता, तरी त्यापासून लोकांस विशेष समाधान होण्यासारखें नव्हतें. या हुकुमाचे तीन भाग केले होते; पहिल्यांत लोकांनीं केलेल्या अपराधांचें कथन, दुसऱ्यांत, माफीचा खुलासा; व तिसऱ्या भागांत माफींतून वगळलेल्या लोकांचा निर्देश केला होता. पहिल्या भागांत धर्मच्युति, मैदानांत प्रार्थना, मूर्तिभंग, तडजोडीचा अर्ज, कट व बंड वगैरे गोष्टींचें मोठें मासलेदार वर्णन होतें. ज्यांच्यावर प्रत्यक्ष दोषारोप झाले नसतील त्यांनीं दोन महिन्यांत जुन्या धर्माचा आश्रय करून, प्रायश्चित्तादिक उपायांनीं पापक्षालन केल्यास त्यांस माफी मिळावयाची होती. तिसऱ्या भागांत अपवादांची लांबलचक याद होती. सर्व नेदर्लंडचे लोक दोषी ठरवून त्यांस शिक्षा फर्माविलेल्या हुकुमांत अपवादांची संख्या फार अल्प होती; व त्यांचा नामनिर्देश केला होता; हल्लींच्या हुकुमांत अपवादांचें शेंपूटच फार लांबलें होतें; व त्यांत निरनिराळ्या वर्गांचा उल्लेख असून, या वर्गांतून थोडेच लोक सुटण्यासारखे होते. क्षमेच्या सावलीस आंचवलेले लोक हे होते; सर्व नवीन मतांचे धर्मोपदेशक, शिक्षक, अनुवादक किंवा त्यांस भजणारे किंवा आश्रय देणारे लोक; मूर्तिभेदाच्या प्रसंगांत ज्यांचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष संबंध आला असेल किंवा नवीन धर्मतत्त्वें अगर नवीन धर्मपंथ ज्यांस संमत असतील ते लोक; तडजोडीचा अर्ज अगर विज्ञप्ति-अर्ज यांजवर सह्या केलेले अगर त्यांस अनुकूल असलेले लोक; ज्यांनीं शस्त्रधारण केलें असेल किंवा बंडास द्रव्याची मदत केली असेल, धर्मपुस्तकें प्रसिद्ध केलीं असतील किंवा ज्यांच्याकडून न कळत नवीन धर्मास मदत झाली असेल ते सर्व लोक. शेवटीं या भागांत असें सुचविलें होतें कीं, ज्यांस वरील गुन्ह्यांपैकीं एखाद्याचा आरोप आपणावर होण्याचा संभव वाटत असेल त्यांनीं सहा महिन्यांचे आंत अधिकाऱ्यांसमोर येऊन खरी हकीकत कळवावी, म्हणजे त्यांच्या कृत्यांचा अनुकूल विचार केला जाईल. हें या माफीचें खरें स्वरूप होतें. त्यांतून कोणताही अपराधी मनुष्य सुटत नव्हता. ही केवळ निर्दोषी लोकांस माफी होती, आणि या लोकांस सुद्धां पोप

महाराजांचा पापनिर्मुक्ततेबद्दल दाखला हजर केल्यावांचून सुटका नव्हती. व्हिग्लियसच्या मतें भीतीनें ज्यांनीं सरकारास करवेल तितकी मदत केली नाहीं त्यांची सुद्धां या माफीवरून सुटका होत नव्हती. शेवटच्या वाक्यांत कबूली देणारास दाखविलेली लालूच केवळ सांपळ्यांत सावज ओढण्याची युक्ति होती. त्यानें कोणीही इसम फसला नाहीं. माफीच्या नांवाखालीं हा दुसरा शिक्षेचाच हुकूम होता, यामुळें लोकांत जास्तच अस्वस्थता व गडबड उत्पन्न झाली. आल्व्हानें प्रथम राजास असें लिहिलें कीं, माफीपासून लोकांत शांतता झाली आहे; परंतु खरी वस्तुस्थिति समजल्यावर त्याची निराशा झाली. थोडक्याच कालांत खुद्द आल्व्हाच्याच लिहिण्याचा झोंक बदलत चालला; परंतु माफीविषयीं स्पेन व नेदर्लंड या ठिकाणीं अधिकारी वर्गाकडून होत असलेली टीका हें असंतोषाचें मुख्य कारण आहे असा त्याचा अभिप्राय होता. शिवाय सर्वांत सौम्य मसुदा आपण पसंत केला असतां, हॉपरनें सर्वांत कडक मसुदा प्रसिद्ध केला असा मजकूर व्हिग्लियसला कळवून उगीच बोभाटा केल्यामुळें नेदर्लंडांत आपली अप्रियता जास्तच वाढत चालली आहे, असें दीनवाणीनें आल्व्हानें राजास लिहून कळविलें. प्रसिद्ध केलेला मसुदा सर्वांत सौम्य असल्यास इतरांचें स्वरूप काय असेल याची कल्पनासुद्धां होत नाहीं. सारांश, लोकांस शासन करण्याची रुद्र आयुधें कायम ठेवून लोकांचें सांत्वन करण्याचा. हा प्रयत्न अर्थांतच विफल होता: 'लोकांस फसवून आंत ओढण्याचें नवें जाळें' या दृष्टीनें पाहिलें असतांही या राजप्रसादाचा विशेष उपयोग होणें शक्य नव्हतें.

हा प्रयोग झाल्यावर थोड्या दिवसांनीं फिलिपची नवोढा स्त्री ॲनी माद्रीदला जाण्याकरितां वाटेंत नेदर्लंडमध्यें उतरली. ब्रुसेल्समध्यें असतांना हॉर्नच्या वृद्ध मातेनें तिची गांठ घेतली; व आपल्या एका मुलाची गति सांगून दुसरा स्पेनमध्यें अडकला आहे, त्याची सुटका करावी व आपणास पुत्रदान यावें असें तिनें ॲनीला पदर पसरून मागणें केलें. ॲनीनें नवऱ्यापाशीं ती पहिली देणगी मागण्याचें कबूल केलें. मागील एका भागांत वर्णन केल्याप्रमाणें बर्घेनचा काल झाल्यावर मॉंटिनी स्वदेशीं परत जाण्याविषयीं अधिकच उत्सुक झाला. आपल्या

नवपरिणीत पत्नीस सोडून गेल्याला त्याला एका वर्षापेक्षां अधिक काल होऊन गेला होता; त्याला पक्की कैद नव्हती; तथापि त्याच्यावर गुप्त परंतु सक्त देखरेख होती. परवानगीवांचून कोणतीही हालचाल करणें त्याला शक्य नव्हतें. एके दिवशीं घोड्यावरून रपेटीकरितां शेजारच्या खेड्यांत गेला असतां तेथें त्याला चाळीस स्वारांनीं गांठून गराडा दिला. अशी वस्तुस्थिति असूनही राजाची हास्यमुद्रा बदलली नव्हतीच. मॉंटिनीनें स्वदेशीं जाण्याची परवानगी मागितली असतां मोठ्या प्रेमळ मुद्रेनें आणखी कांहीं दिवस सहवासाचा लाभ देण्याविषयीं मॉंटिनीस तो विनंति करीत असे. राजानें आपण लौकरच नेदर्लंडला जाणार आहों त्या प्रसंगीं उभयतां बरोबरच जाऊं असेही कित्येक वेळ उद्गार काढले. संशयानें मॉंटिनीस चैन पडेना; संशयापेक्षां कोणतीही अन्य स्थिति पत्करली, असा निश्चय करून त्यानें, आपल्यावर कांहीं संशय अगर आरोप असल्यास, आपणास अटक करून आपली चौकशी करावी असें मोठ्या उत्सुकतेनें सुचविलें. आल्व्हा नेदर्लंडमध्यें जाऊन एग्मॉन, हॉर्न वगैरे लोकांस अटक होतांच, त्याची पहिली मागणी अमलांत आली. सन १५६८ च्या जुलै महिन्यांत मॉंटिनीच्या तटाखालून फ्लेमिश तऱ्हेचा पोषाख केलेले कांहीं यात्रेकरू जात होते; व ते या ठिकाणावरून जातांना हलक्या व तार स्वरानें स्वभाषेंत कांहीं पद्यात्मक मजकूर पुटपुटत चालले होते. मॉंटिनीचें लक्ष तिकडे जातांच या पद्याचा भयंकर अर्थ लक्षांत येऊन तो आश्चर्यानें चकित झाला. यात्रेकरूंचा पेहेराव केलेल्या या लोकांस कैदीची भेट घेण्याचा कांहीं उपाय न सुचल्यामुळें ते एग्मॉन व हॉर्न यांची हृदयभेदक हकीकत हें पद्य गाऊन त्यास समजावीत होते; त्याबरोबर कैदीस त्यांची अशी सूचना होती कीं, वेळेवर पाशांतून निसटण्याची तजवीज न झाल्यास त्याचाही काल समीप येत चालला आहे. शेवटची सूचना मॉंटिनीच्या हृदयांत पूर्ण बाणली. त्यानें एका स्पॅनिश पहारेकऱ्यास वश करून घेऊन, तुरुंगाच्या बाहेरील आपल्या पक्षाच्या लोकांशीं व्यवहार सुरू ठेविला. त्याला घरून अन्न पोंहोचविण्याची परवानगी मिळाली होती, त्यामुळें रोटांतून चिठ्या पाठवून आरोपीशीं पत्रव्यवहार सुरू झाला. तुरुंगांतील खिडकीचे

गज तोडण्याकरितां करवत व खालीं उतरण्याकरितां दोरखंडाची हलकी शिडी हे जिन्नस कैद्यांच्या कोठडींत येऊन पडले. एक घोडेवाला जवळच्या एका खेड्याजवळ त्यास सेबास्टिन बंदरापर्यंत घेऊन जाण्याकरितां तयार राहण्याची योजना झाली. तेथून स्वदेशीं जाण्याकरितां एक जलद चालणारी नावही तयार करून ठेवली होती. ही सर्व तयारी पुरी झाल्यावर माँटिनीस दाढी मिशा वगैरे सर्व वपन करून, वेष पालटून, ठरल्याप्रमाणें बाहेर पडण्याविषयीं शेवटचें पत्र रोटांत घालून पोंहोंचविण्यासाठीं एका गैरमाहीत मनुष्याच्या हातांत देऊन माँटिनीचा मुतालिक आपल्या रखेची शेवटची भेट घेण्याकरितां गेला. या मनुष्यानें रोट किल्ल्याच्या मुख्य अंमलदाराच्या स्वाधीन केला. त्यानें रोट फोडतांच आंत ठेवलेलें पत्र त्याच्या हातांत पडलें. कटांपैकीं सर्व लोक फांशीं देण्यांत आले. माँटिनीवर आतां जास्त सक्तीचा पहारा आला; त्याची सुटण्याची यापुढें आशाच उरली नाहीं. स. १५६८ च्या हिंवाळ्यांत माँटिनीचा खटला नमुन्याप्रमाणें यमासनापुढें आला. त्याचा अपराध एवढाच होता कीं, हा एक लोकप्रिय डच् सरदार होता. आरोपीचा प्रश्नोत्तररूपानें जबाब घेण्याकरितां नेदर्लंडमधून स्पेनमधील कांहीं अधिकाऱ्यांस अधिकार आले. हे जबाब घेतल्यावर आरोपीस नेदर्लंडमध्यें आपलें वकीलपत्र पाठविण्याची परवानगी मिळाली. माँटिनीनें वकीलांचीं नांवें लिहून दिलीं; परंतु मुखत्यारपत्राची नकल व तोहमतींचा तक्ता न मिळाल्यामुळें व्यर्थ जोखीम कोणी घेईना. त्यावर चौकशीचा तमाशा साजरा करण्याकरितां आरोपीच्या वतीनें सरकारांनीं वकील नेमिला. याप्रमाणें माँटिनीस स्पेनमध्यें सक्त पहाऱ्यांत ठेवून त्याची ब्रुसेल्समध्यें चौकशी सुरू झाली. त्याच्या वकीलानें त्याचें तोंडसुद्धां पाहिलें नव्हतें, किंवा वकीलास त्याच्याकडून कांहीं माहिती मिळाली नव्हती. माँटिनीच्या बायकोस हजर राहण्याकरितां समज देऊन यमासनानें खटल्याच्या कामास सुरवात केली. या कुलीन स्त्रीस राजाची करुणा भाकण्याखेरीज अन्य मार्ग उरला नव्हता. "आमचे भ्रतार सर्वस्वीं निर्दोषी आहेत अशी माझी मनापासून खात्री आहे; मी सरकारच्या पायावर आपलें मस्तक अर्पण करतें. आमचे पति यांची मागील सेवा व माझें अल्पवय लक्षांत

घेऊन, व त्यांची चूक झाली असल्यास येशूख्रिस्ताची दयार्द्रबुद्धि स्मरून त्यांना क्षमा व्हावी, वगैरे तिनें दीनभावानें राजास लिहून पाठविलें. फिलिपच्या पाषाणहृदयास दयेचा पाझर फुटणें शक्य नव्हतें. मॉंटिनीच्या जबाबाचाही विशेष उपयोग झाला नाहीं. त्याच्यावर आरोप एग्मॉन व हार्नप्रमाणेंच होते; त्यांच्यापेक्षां सदरहू कृत्यांशीं त्याचा संबंधही फार कमी होता. ता. ४ मार्च १५७० रोजीं त्यास शिरच्छेदाची शिक्षा फर्माविण्यांत आली. ता. १८ मार्चला हा हुकूम अमलांत आणण्याकरितां यादी स्पेनकडे रवाना झाली. हा हुकूम येतांच स्पेनमध्यें त्याच्या युक्तायुक्ततेबद्दल मन्त्रीमंडळांत बराच वाद सुरू झाला. सर्वांच्या मतें असें ठरलें कीं प्रसिद्धपणें हा नवा शिरच्छेद केल्यापासून लोकांत जास्त अस्वस्थता उत्पन्न होईल. परंतु राजा अगर त्याचे सल्लागार यांस हाच विचार मनांत घेऊन या निरपराधी प्राण्यास जीवदान देण्याची बुद्धि झाली नाहीं; हा आरोपी पक्का राजनिष्ठ व कॅथोलिकधर्मी असून वकिलांचा पवित्र वेष धारण करून आला होता; ह्या विचारांचा स्पर्शही स्पेनमधील मुत्सद्दीमंडळास झाला नाहीं. आरोपीच्या अन्नांत थोडें थोडें विष कालवून त्यास मारावें असें ह्या सद्गृहस्थांनीं सुचविलें. राजास तसें करणें कायदेशीर होणार नाहीं असें वाटून त्यानें असें ठरविलें कीं, आरोपिताचा गुप्तपणें प्राण घेऊन तो तापानें मयत झाला असें बाहेर प्रथित करावें. या कामाची सर्व व्यवस्था विचारपूर्वक ठरविण्याचें काम राजानें स्वतः हातीं घेतलें. या काळोखांत करावयाच्या खुनासंबंधीं त्याची हौस, धिमेपणा व तत्परता हीं अवर्णनीय दिसत होतीं. अशा कृत्यांत एक प्रकारचें विशेष कौशल्य असतें असें आल्व्हाच्या व लोकांच्या प्रत्ययास आणून देण्यासाठीं मॉंटिनीचा खून विशेष नमुनेदार करण्याचा त्याचा संकल्प होता. ता. १४ आक्टोबर रोजीं काळोख पडण्याच्या सुमारास राजाच्या आज्ञेप्रमाणें एक सरदार बरोबर एक नामांकित धर्मगुरु घेऊन सीमांकसच्या कारागृहांत आला. रात्रौ दहा वाजतां त्यानें मॉंटिनीला शिक्षेचा हुकूम कळविला. ती अकल्पित वार्ता ऐकतांच या फ्लेमिश गृहस्थाचा चेहरा एकदम बराच पालटला. राणीच्या मध्यस्थीचा कांहीं उपयोग होईल अशी त्याला बरीच आशा होती. त्यानें धर्मगुरूशीं

एकान्तांत राहण्याची इच्छा दर्शविल्यावरून बाकीचे लोक निघून गेले. ती सर्व रात्र व दुसरा दिवस आरोपीनें या धर्मज्ञ गृहस्थासमवेत उपासन करण्यांत घालविला. त्याचें वर्तन फार नेमस्त, धृतिमान, शांत, उदात्त, नम्र व भाविकपणाचें होतें; त्यानें वारंवार आपलें निष्पाप आचरण असल्याचें राजास कळविलें; कॅथोलिकधर्मासंबंधानें पूर्ण अभिमान व त्यावर अढळ श्रद्धा प्रगट केली. त्याच्या सात्विक आचरणानें त्याला सर्वप्रायश्चित्त देण्याकरितां राहिलेला उपाध्यायसुद्धां द्रिवून गेला. त्यानें आपल्या सर्व अनुयायीवर्गाची व्यवस्था लिहून ठेविली; बायकोला पाठविण्याकरितां मुद्रांकित खुणेची आंगठी व सोन्याची सांखळी त्यानें धर्मगुरूच्या स्वाधीन केली. ता. १६ रोजीं प्रातःकाळीं राजाचा मुखत्यार, गांवचा मुशरीफ व मारेकरी घेऊन त्याच्या कोठडींत आला. शिक्षेचा हुकूम आणखी एकवार वाचून दाखवून त्यानें मॉंटिनीस कळविलें कीं, महाराज कृपाळू होऊन त्यांनीं खाजगी रीतीनें आपला वध करण्याचा हुकूम केला आहे. "मीं कांहीं गुन्हा केला असता तर राजाची शिक्षा वास्तविक सौम्यच मानावी लागली असती," असे मॉंटिनीचे शेवटचे उद्गार होते. त्याचा प्राण घेऊन रातोरात हे राजदूत आपापल्या ठिकाणीं गेले. राजानें मॉंटिनीचा अंत तापानें झाला अशी बातमी नोवेंबर ३ तारखेस आल्व्हास लिहून कळविली; त्याबरोबरच एक गुप्त पत्र पाठवून त्यानें खरी हकीकतही कळविली; या पत्रावरून या व्यवहाराची खरी माहिती पुढील पिढ्यांस समजली. याप्रमाणें सन १५७० च्या आक्टोबर महिन्यांत मार्गरेटकडून गेलेल्या दुसऱ्या वकीलाचा शेवट लागला.

इ. स १५७० सालच्या अखेर नेदर्लंडावर आणखी एक मोठें दैवी संकट आलें. समुद्रांत वादळ होऊन भरतीचें पाणी सर्व पश्चिम किनाऱ्यावरून देशांत पसरलें. वायव्य दिशेकडून मोठा वारा सुटून उत्तर समुद्रांतील भरतीचें पाणी बरेच दिवस नेदर्लंडच्या किनाऱ्यावर येऊन आपटत होतें. पाणी वाढतां वाढतां समुद्रतीरावर बांधलेले सर्व धक्के फुटले. फ्लँडर्स प्रांतांतील बहुतेक शहरें पाण्यांत बुडालीं. उत्तर हॉलंड या जलप्लुवांत समूळ वाहून जाईल अशी भीति उत्पन्न झाली. डोर्ट, राटर्डम वगैरे शहरें बराच कालपर्यंत पाण्यांत होतीं. फ्रीजलंड प्रांताची अगदीं

दुर्दशाच झाली. हा सर्व प्रांत खवळलेल्या समुद्राप्रमाणें दिसूं लागला. मध्यदेशांतील शहरांचे मनोरे व किल्ले बेटाप्रमाणें उपयोगांत येऊं लागले. मोठमोठे भूभाग-त्यावरील घरें, शेतें व देवळें यांसह तरंगत स्थलांतर करूं लागले, अगर पाण्यांत अजीबात नाहींसे झाले. असंख्य बायका, पुरुष, मुलें, घोडीं, बैल, शेळ्या व इतर घरगुती जनावरें जीव बचावण्याकरितां पाण्यांत धडपडतांना चोहोंकडे दृष्टीस पडत होतीं. तरंगणाऱ्या सर्व पदार्थांचा उपयोग लोक करूं लागले. झाडांवर, देवळांच्या शिखरावर, मनोऱ्यावर लोक ईश्वराची प्रार्थना करीत चिकटून बसले होते. पाण्याचा जोर कमी होतांच नावा घालून लोकांस वांचविण्याकरितां खलाशी व कांहीं धाडशी लोक निघाले. या महाप्लवांत सुमार एक लक्ष मनुष्य दगावलें असावें; जनावरांची तर गणतीच करतां आली नाहीं. हे अनर्थ ता. १।२ नोवेंबर रोजी झाले. तो पवित्र दिवस होता. स्पॅनिश लोकांच्या मतें पाखंडी राष्ट्रावर हा ईश्वरी क्षोभ झाला. नेदर्लंडवासी लोकांना भावी अनर्थांचे हे जलप्लव सूचक आहेत असें भासलें.

हें साल संपतां संपतां दुसरा एक चमत्कार बॉमिल बेटावर घडला. म्यूज व व्हाल या नद्यांनीं वेष्टिलेल्या या लहान बेटाच्या चिमट्यांत लोवेस्टीन किल्ला आहे. डिसेंबर महिन्याच्या अखेर एके दिवशीं सायंकाळीं फकीरांचा झगा व फेटा घातलेले चार इसम किल्ल्याच्या दरवाज्यांत येऊन रात्रौ पाहुणचार मिळावा ह्मणून बोलूं लागले. किल्ल्याच्या मुख्य अंमलदारापाशीं शिपायांनीं त्यांस नेऊन पोंहोचविलें. हा अंमलदार शेगडीपाशीं बायकोबरोबर बोलत उभा होता. सर्वांत पुढें असलेल्या फकीरानें त्यास विचारलें, "हा किल्ला आल्व्हाचा हुकूम मानतो किंवा राजपुत्र ऑरेंजचा मानतो?" त्यावर त्या स्पॅनिश गृहस्थानें उत्तर केलें, "स्पेनच्या फिलिप राजाशिवाय आह्मास कोणी दुसरा मालक माहीत नाहीं." तें एकतांचें या फकीरानें झग्याच्या खालून पिस्तुल काढिलें व या अंमलदाराच्या कपाळावर गोळी झाडली. हा फकीर डी रायटर नामक व्यापारी असून ऑरेंजचा पूर्ण भक्त होता. बाकीच्या फकीरांनीं किल्ल्यांत सर्वत्र गोंधळ झालेला पाहून पहारेकऱ्यांस ठार करून

किल्ला आपले स्वाधीन करून घेतला. दुसरे दिवशीं किल्ल्यांत आणखी पांच पंचवीस लोक आणले; व त्यांनीं किल्ल्याच्या तटाची दुरुस्ती करून आपला कबजा कायम करण्याची तजवीज सुरू केली. सर्व मुलुखभर पाणी पसरल्यामुळें व नद्यांस पूर आल्यामुळें जास्त कुमक वेळेवर आली नाहीं. ती आली असती तर किल्ल्यानें पुष्कळ दिवस शत्रूस दाद दिली नसती. किल्ल्याच्या तटावर म्यूज व व्हाल नद्यांचें पाणी आपटत होतें व त्यावर दोन भक्कम बुरुज बांधले होते. तट दुहेरी होता. ही बातमी समजतांच सुमार दोन चारशें स्पॅनिश लोक येऊन त्यांनीं तटावर मारा सुरू केला. अडेचाळीस तासांत दोन्ही तट ओलांडून ते किल्ल्यांत शिरले. आंतील लोकांची त्यांनीं कत्तल उडविली व किल्ला परत मिळविला. डी रायटर किल्ल्याच्या आंतील एका इमारतीच्या मधल्या दारांत उभा राहून येईल त्या इसमास तरवारीनें कापून काढीत होता. जास्ती लोकांचा एकदम हल्ला आल्यावरून व रक्तस्रावानें अगदीं थकून गेल्यामुळें तो त्या दारांतून आंतल्या दालनांत गेला. शत्रूचे लोकही त्या ठिकाणीं त्याच्या मागून शिरले. ते आंत येतांच तेथें पूर्वीं मुद्दाम पसरून ठेवलेल्या दारुसामानास त्यानें काडी लावली. दारूच्या भडक्याबरोबर सर्व इमारत हवेंत उडाली; व डी रायटर व त्याचे शत्रु एकदम पंचत्वास मिळाले. डी रायटरच्या बाकी राहिलेल्या सर्व अनुयायांस शत्रूकडून निरनिराळ्या प्रकारची जीवन्मुक्ति मिळाली. हें कृत्य देशभक्ति, स्वामिभक्ति व भयंकर साहस यांचें अपूर्व उदाहरण आहे.

---

# भाग ८ वा.

## इ. स. १५७०–७२.

फ्रान्समधील युद्धप्रसंग—"दर्यावर्दी भिक्षेकरी" अथवा "भणंग"—करांचें भांडण—ऑरेंजचे वकील व लेख—लोकांची हलाखी—ब्रिलडच् स्वराष्ट्राची मुहूर्तमेढ—स्वराज्याची मोठी लाट—मॉन्सवर छापा—मेडीना सीली—डॉर्ट येथील सभा व नव्या राज्यव्यवस्थेचीं आधारतत्त्वें—ऑरेंजच्या मोहिमांचा पूर्वरंग—पारिसमध्यें ह्युजेनाट लोकांची कत्तल—ऑरेंजवर छापा—लुईचें शरणपत्र व मॉन्समधून निर्गमन—न्दाकोर्माज व मॉन्स—मेलिनची दुर्गति.

सन १५६९।१५७० सालीं नेदर्लंडदेशांत वर लिहिलेले प्रकार चालले असतां राजपुत्र ऑरेंज बाहेर देशांत भटकत होता. त्याला व त्याच्या पितृभूमीला वर वर्णन केल्याप्रमाणें पूर्ण शह बसला असतांही त्याची उमेद तिळमात्र खचली नाहीं. तो पुन्हां अनुकूल संधि येण्याची प्रतीक्षा करीत होता. सैन्यास रजा दिल्यावर, स्वतः हातीं घेतलेलें कार्य पुढें चालविण्याचा मार्ग कांहीं कालपर्यंत खुंटल्यामुळें तो फ्रान्समधील आपल्या व्यवसायबंधूस मदत करण्याकरितां जर्मनींत जमलेल्या सैन्यास जाऊन मिळाला. या सैन्यास बुद्धिमान सेनानींची अपेक्षा होतीच. फ्रान्समध्यें राजा व ह्यूजेनाट (सुधारक) लोक यांच्या दरम्यान दोन मोठे संग्राम होऊन बंडवाल्यांचा मोड झाला. शेवटच्या युद्धाची वार्ता ऑरेंजला नेदर्लंडमध्यें असतांनाच समजली. लागलीच वेष पालटून तो नेदर्लंड ओलांडून जर्मनीस परत गेला. स. लुईनें या दोन्ही प्रसंगीं मोठा लौकिक मिळविला व कांहीं कालपर्यंत तो फ्रान्समध्येंच होता. ह्यूजेनॉट लोकांनीं आपल्या सरकारांशीं तह केला. हा तह करून हे लोक भरंवशानें स्वस्थ असतां पुढें कांहीं कालानें फ्रान्सच्या राजानें दगलबाजीनें त्यांची साधुपुरुष बार्थोलोम्यूच्या जन्मदिवशीं सरसकट कत्तल उडविली. याचे अगोदर कांहीं दिवस फ्रान्सच्या राजानें ह्यूजेनॉट लोकांस त्यांच्या नेदर्लंडमधील धर्मबंधूंच्या संरक्षणार्थ त्या राष्ट्रांत सैन्य पाठविण्याचें अभिवचन दिलें होतें; अर्थातच हा केवळ बहाणा होता. त्यानें फसून लुईनें फ्रान्समध्यें राहिलेल्या निरनिराळ्या राष्ट्रांच्या प्रतिनिधींस व खुद्द राजास भेटून त्यांस आपले हेतु व बेत कळविले; यांपैकीं कांहीं गृहस्थांच्या मनावर त्याच्या बोलण्याचा परिणाम होऊन त्यांनीं खऱ्या भावानें त्यास प्रोत्साहन दिलें.

सन १५६९ च्या हिंवाळ्यांत ऑरेंज जर्मनींत जाऊन पोंहोचला. मध्यंतरीं नेदर्लंडची सर्व कच्ची बातमी लीडनचा मुख्य अधिकारी पॉल बाय याच्या द्वारें त्यास मिळत होती. याच गृहस्थाच्या द्वारानें त्यानें नेदर्लंडच्या निरनिराळ्या भागांतील प्रमुख गृहस्थांशीं पत्रव्यवहार सुरू केला होता. या पत्रांतून निरनिराळे ठळक लोक व गोष्टी यांचा उल्लेख कांहीं ठरीव खुणांनीं करण्याचा सांप्रदाय बंडाच्या पुरस्कर्त्यांनीं पाडला

होता. ऑरेंज, आल्व्हा, इंग्लंडची राणी, डेन्मार्कचा राजा वगैरे इसमांस टोपण नांवें ठरविलीं होतीं; तसेंच बारा महिन्यांस बारा राशींचीं नांवें दिलीं होतीं. ही ठरीव भाषा फक्त युरोपभर पसरलेल्या कटवाल्यांसच माहीत होती. फ्रान्समध्यें जाण्यापूर्वी ऑरेंजनें समुद्रावर फिरणाऱ्या लोकांस, स्पॅनिश व्यापाऱ्यांचीं जहाजें लुटून आणण्याबद्दल, सत्ताधीश या नात्यानें आपल्या नांवाचे हुकूम सोडले होते. यांनीं धारण केलेले "दर्यावर्दी भिक्षेकरी" अथवा "भणंग" हें नांव थोड्याच अवकाशांत "जंगली भिक्षेकरी" वगैरे संक्षेप्रमाणें भयोत्पादक होऊन बसलें. फ्रान्समध्यें असतांना, ऑरेंजचे आरमाराधिपति कॉलिग्नीशीं या यांचे लोकासंबंधी बरेंच बोलणें झालें. फ्रान्समधून परत येतांच या समाजाचे दोष परिहार करून त्यास चांगलें स्वरूप देण्याच्या कामास ऑरेंजनें हात घातला. सीनियर डोलेन यानें भणंगवृत्तीनें जहाजें मारण्याचे कामीं बरेंच नांव मिळविलें होतें व त्यानें ऑरेंजचें स्वामीत्वही कबूल केलें होतें; परंतु त्याच्या संशययुक्त व स्वतंत्र वागणुकीमुळें त्याला आरमारावरून कमी करून त्याच्या जागीं ऑरेंजनें सीनिअर लुम्रे याची योजना केली. त्याचप्रमाणें या दर्यावर्दी लोकांस असे सक्तीचे हुकूम सुटले कीं त्यांनीं मॅक्सिमीलियन बादशहा, किंवा सामंतचक्रापैकीं संस्थानिक, किंवा इंग्लंडची राज्ञी, डेन्मार्कचा राजा, अगर दुसरा एखादा सद्धर्मप्रतिपालक राजा अगर संस्थानिक यांच्या विरुद्ध शत्रुत्वाचें कृत्य करूं नये; आल्व्हा व त्याचे पक्षाभिमानी हेच आपले शत्रू समजावेत. शिवाय आरमारांतील व्यक्तींच्या व अधिकाऱ्यांच्या वर्तनासंबंधीं योग्य नियम घालून देण्यांत आले: युद्धाचे सामान्य नियम आरमारानें बिनचूक पाळावेत असें ठरलें; प्रत्येक जहाच्या तांडेलानें जहाजावर एक धर्मोपदेशक ठेवून धर्मशास्त्राचें निरूपण करवावें व खलाशी लोकांत ईश्वरभक्ति जागृत ठेवावी; जहाजांवर विशेष कारणावांचून नेदर्लंडराष्ट्रीयांशिवाय इतर मनुष्य अधिकारी असूं नये; मुलुखगिरींत मिळालेली संपत्ति कांहीं ठरीव नियमांप्रमाणें वांटून घ्यावी; जहाजांवर खलाशी अगर लढवय्ये घेणें ते अब्रूदार लोकांशिवाय घेऊं नयेत; ज्या इसमाला न्यायासनाकडून शिक्षा मिळाली असेल त्यास भरतींत घेऊं नये. सोळाव्या व सतराव्या शतकांत ज्या प्रचंड आरमारानें

शेंकडां जय मिळविले त्याचें बालस्वरूप हें असें प्रथम सिद्ध झालें. "डचलोक आपल्या जहाजांतच घरें करतात व या घरांतच त्यांच्या शाळा असतात. या ठिकाणींच त्यांचा जन्म, त्यांचें प्राथमिक शिक्षण व धंदे-शिक्षण होतें. उत्तरध्रुवापासून दक्षिणध्रुवापर्यंत धांवपळ करणाऱ्या व सूर्यप्रकाश मिळेल त्या ठिकाणीं आपला व्यवसाय चालविणाऱ्या या देशच्या खलाशांची बरोबरी कोणाच्यानेंही करवणार नाहीं."

फ्रान्समधून आला त्या वेळीं ऑरेंजची अत्यंत निराशस्थिति झाली होती. त्याच्याजवळ नवें सैन्य उभें करण्यास द्रव्य नव्हतें; इतकेंच नव्हे, परंतु पूर्वीं निरोप दिलेल्या सैनिकांच्या मागण्यांनीं त्याला त्राहि त्राहि करून सोडिलें होतें. कांहीं वेळ अशी बातमी पसरली होती कीं फ्रान्समध्यें तो रणांत पडला. परंतु दगदगीनें व चिंतेनें कृश, व अकिंचन असा तो परत आल्याची बातमी समजतांच ग्रॅन्व्हिलनें आतां त्याला जर्मनींत द्रव्याची अगर माणसांची बिलकुल मदत मिळणार नाहीं असें भाकित केलें. तथापि नेदर्लंड व जर्मनी येथील जुलुमानें गांजलेले सामान्य लोक नेदर्लंडच्या मुक्ततेकरितां आपल्या सामर्थ्याबाहेर वर्गणी अयाप ऑरेंजकडे पाठवीत होते. मात्र संस्थानिक, जहागिरदार, वतनदार, धनाढ्य, धर्मगुरू वगैरे लोक पाण्याप्रमाणें पटापट गळूं लागले. अशा स्थितींत सुद्धां ऑरेंजच्या निश्चयात रतिमात्र बदल झाला नाहीं. त्याला तत्कालीन देशस्थितीचें खरें स्वरूप नीट समजलें होतें; परंतु त्याच्या या वेळच्या दरोबस्त लेखांत विनयसंपन्नता, अमानुष धैर्य, निर्व्याज व अढळ ईश्वरभक्ति हे विकार दिसून येतात; भीति, हृदयदौर्बल्य अगर निराशा यांचा गंध सुद्धां नाहीं. सैन्यांतील लोकांच्या पगाराबद्दल आपण स्वतः ओलीस राहण्याविषयीं सुद्धां त्याची तयारी होती. त्यानें यावेळीं आपला भाऊ जॉन यास बाकी राहिलेलीं घरचीं भांडींकुंडीं विकून व कसेही एक लक्ष थेलर (३।रु.) गोळा करून शिपायांचीं तोंडें बंद करण्याविषयीं आग्रहपूर्वक लिहिलें. शिवाय नोकरचाकर गेल्यामुळें सर्व प्रपंचकृत्यें तो आतां स्वतः मनःपूर्वक करूं लागला.

दहा टक्के व पांच टक्के करांबद्दल ठरलेल्या खंडणीची मुदत सन १५७१ च्या हिंवाळ्यांत संपावयाची होती; त्यामुळें त्याच्यापुढील

व्यवस्थेसंबंधानें या सालच्या आरंभापासूनच पुन्हां वाद सुरू झाला. राजाचा या कामांत विशेष आग्रह नव्हता. आल्व्हाचें राजापाशीं वजन कमी झालें असून कदाचित् त्याला लौकरच स्पेनला परत जाण्याची पाळी येईल अशी व्हिग्लियसची खात्री होत चालली होती. त्यामुळें प्रेसिडेंटला नवें धैर्य येऊन त्यानें आल्व्हाची आज्ञाधारक वृत्ति सोडून लोकप्रिय सचिवाची भूमिका धारण केली. मंत्रीसभेंत भांडणें, मारामाऱ्या, परस्पर-निंदा व धमक्या यांचा सुकाळ झाला. आल्व्हास वाटूं लागलें कीं, राजास फुषारकीचीं पत्रें पाठविण्यांत आपण घाई केली. सर्व प्रांतांच्या वतीनें या करांसंबंधानें नाकबुलीचे जबाब आले. आल्व्हा रागानें अगदीं खवळून गेला. 'दोन वर्षांची एकदम रक्कम घेण्याचें ठरलें, त्या वेळींच पुढील सालीं बिनहरकत नियमांप्रमाणें कर देण्याचें सर्व प्रांतांनीं कबूल केलें आहे; खंडण्या घेत बसण्यास आतां आपणास सोय नाहीं,' असें बोलून चिटणीस शेझ् यास कर गोळा करण्याबद्दल एकदम तजवीज करावी, असा त्यानें हुकूम पाठविला. ता. २९ मे रोजीं आल्व्हानें मंत्री-मंडळांत या वादग्रस्त प्रश्नासंबंधानें व्हिग्लियसचा अभिप्राय विचारला; व्हिग्लियसनें पुढें कर माफ होण्याच्या आशेनें प्रांतिकसभांनीं दोन सालची रक्कम कबूल केली, असें मत प्रतिपादन केलें. आल्व्हा त्यास या खोडसाळ जबाबाबद्दल शासन करण्याची धमकी देऊं लागला. त्यावर व्हिग्लियस ह्मणाला, 'मंत्रीमंडळांत आपलीं मतें उघडपणें सांगण्याबद्दल शासन होऊं लागल्यास सभासदांनीं तोंडें मिटून घरीं स्वस्थ बसावें हें उत्तम.' आल्व्हानें हे शब्द ऐकतांच राग आवरून मन्त्रीलोकांची माफी मागितली. या प्रसंगीं राजा, लोकमत व इतर सभासदांचा कल यांजवर भरंवसा ठेवून व्हिग्लियसनें नेटानें लोकपक्षाची बाजू उचलली होती. यमासनाच्या स्थापनेपासून इतर सर्व सभांचा लोप झाला होता त्यांची या वेळीं आल्व्हास आठवण झाली; परंतु कोणत्याही संस्थेकडून त्याला पाठबळ अगर अनुमति मिळेना. जुलैच्या अखेरच्या दिवशीं आल्व्हानें हे दोन्ही कर ताबडतोब गोळा करण्यासंबंधानें सक्तीचा जाहिरनामा प्रसिद्ध केला. तो वाचतांच सर्व देशभर एकच आकांत सुरू झाला. प्रांतोप्रांतींच्या सभा भरून व शहरोंशहरीं लोकांचे जंगी जमाव

जमून त्यांनीं या करांविरुद्ध आपल्या तक्रारी सरकारास जाहिर केल्या. व्यापारी लोकांनीं व्यापार बंद ठेवला व लहानसहान दुकानदारांनीं सुद्धां आपापलीं दुकानें बंद केलीं. लोकांचे मोठे संघ जमून उघडपणें या अन्यायी व जुलुमाच्या बाबी द्यावयाच्या नाहींत असें बोलूं लागले. एक कवडी सुद्धां वसूल होईना. "सात (दीड) दमडीचे लोक"-सरकारचे तितका रोजमुरा घेऊन काम करणारे गुप्त हेर, प्रत्येक भटारखान्यांत, दुकानांत व शहरांच्या प्रत्येक गल्लींत भटकत होते. त्यास सुभेदाराच्या जुलुमास ठिकठिकाणीं लोक शिव्याशाप देत होते, त्या सर्वांची हकीकत सरकारांत कळविणें दुरापास्त झालें. आल्व्हाची जरब निःसंशय कमी होत चालली होती. मन्त्रीलोक धडधडीत त्याच्या उलट जाऊं लागले; व सामान्य लोक त्यास जुमानीनातसे झाले. रस्त्यांतून जातांना सुभेदारसाहेबांस कोणी सलाम सुद्धां करीना. आल्व्हा-संबंधानें तिरस्कारबुद्धि लोक धडधडीत दाखवूं लागले. त्या मानानें त्याचा रागही अनावर होत चालला. ता. २५ सप्टेंबर रोजीं आल्व्हानें मंत्री-मंडळास असें कळविलें कीं, नवे कर तावडतोब वसूल करावे असा राजाचा निकराचा हुकूम आला आहे. व्हिग्लियसनें या करांविरुद्ध असलेल्या कायद्याच्या तक्रारी पुढें आणिल्या; व विशेषेंकरून त्यांना निरनिराळ्या स्थानिकसंस्थांची अनुमति मिळाली नाहीं ही गोष्ट जोरानें प्रतिपादन केली. त्यावरून सुभेदार व प्रेसिडेंट यांची मोठी बाचाबाच झाली. व्हिग्लियस कांहीं केल्या आपली तक्रार सोडीना. आल्व्हानें त्यास आपण वेळोवेळीं दाखविलेली कृपादृष्टि व केलेले उपकार यांचें स्मरण करून दिलें. तथापि 'आपली सदसद्विवेकबुद्धि व राजाचें हित यांस स्मरून जें योग्य दिसेल तें बोलण्याचें आपलें कर्तव्य आहे तें आपण आजपर्यंत केलें आहे; व त्यांत राजा आपणास तारो अगर मारो,' असे उदात्त विचार व्हिग्लियसच्या तोंडांतून येऊं लागले. प्रेसिडेंटाचा निश्चय पाहून आल्व्हा फारच खवळला; व आपला हुकूम चालविण्याचा मार्ग आपणास माहीत आहे असें बोलून त्यानें सभा बरखास्त केली. ही बातमी कर्णोपकर्णीं सर्व मुलूखभर पसरली. व्हिग्लियसचे स्नेही त्याच्या जिवासंबंधानें भयाभीत झाले. आल्व्हाच्या धमक्यांचा व रागाचा कांहीं

परिणाम झाला नाहीं. उलट लौकरच सरकारचे असे हुकूम सुटले कीं, धान्य, मांस, दारू व बीर ( एक विशेष प्रकारची दारू ) या चार जिनसांवर दहा टके कर घेऊं नये; तसेंच कारखान्यांत लागणाऱ्या कच्च्या मालावरही ही बाब वसूल करूं नये. या सवलती महत्वाच्या होत्या; तथापि या करांविरुद्ध कायद्याचे आक्षेप अद्याप उरले होतेच. आल्व्हानें राजास असें कळविलें कीं, हे नवे कर बसवूं दिल्यास राजाची सत्ता प्रबल होईल या भीतीनें प्रांतिकमंडळ्या या करांविरुद्ध ओरड माजवीत आहेत. माद्रीद् येथें त्याच्या गाऱ्हाण्यांकडे मुत्सद्दीलोकांचें विशेष लक्ष पोंहोचेना; कारण त्याच्या कल्पना आरंभापासून हास्यास्पद आहेत अशी तेथें सर्व प्रधान-मंडळींची समजूत झाली होती. शिवाय राजाचें मन यावेळीं दुसऱ्या एका मनोवेधक व्यापारांत गुंतलें होतें. 'ईश्वराची इच्छा घडवून आणण्याकरितां फिलिपचा अवतार होता.' हल्लीं त्यानें अशा व्यापक बेत रचिला होता कीं त्याच्या योगानें सर्व इंग्लंडदेश कॅथोलिकधर्माच्या मेळ्यांत परत यावा. इंग्लंडच्या नवीनधर्मी राणीनें स्कॉटलंडची कॅथोलिक राज्ञी मेरीस कारागृहांत ठेवल्यामुळें तिच्या वतीनें कांहीं इंग्लिश सरदारांनीं फिलिपपाशीं बोलणें लाविलें होतें. अशा धर्मकृत्यांत पडणें फिलिपचें आदिम कर्तव्य होतें. इंग्लंडमधून रिडोल्फीनामक अविचारी व बडबड्या गृहस्थ या गोष्टीसंबंधानें शिष्टाई करण्याकरितां त्याच्याकडे आला. त्यावर कटवाल्यांनीं असा व्यूह रचिला कीं, इलिजाबेथ राणीचा खून करून मेरीस गादीवर बसवावें व कॅथोलिकधर्माची देशभर स्थापना करावी. या गोष्टी घडवून आणण्याचा पक्का निश्चय करून राजानें दहा हजार सैन्य इंग्लंडावर पाठविण्याकरितां तयार ठेवावें असा आल्व्हास हुकूम केला; व त्याच्या खर्चाकरितां दोन लाख क्राऊन ( ३॥ रु. ) पाठविले. आल्व्हास हा बेत फार धाडसी व वेडेपणाचा दिसला. शिवाय नेदर्लंडच्या त्यावेळच्या लोकस्थितीकडे लक्ष दिलें असतां तेथून सैन्य बाहेर देशांत रवाना करणें फार धोक्याचें काम होतें. थोड्याच अवकाशांत हा सर्व बेत फुटला, व त्याची बातमी इंग्लंडापर्यंत जाऊन पोंहोचली. तरी फिलिपच्या डोक्यांतील वेड जाईना. आल्व्हास त्याचें बारंवार असें लिहून येई कीं इंग्लंडच्या राणीशीं सलोखा राखून मेरीस

सोडविण्याचा यत्न करावा; व गुप्त रीतीनें दहा हजार सैन्य निरनिराळ्या बाजूनें इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरावें. या परस्परविरोधी व असंभवनीय गोष्टी आहेत असें राजास कळविण्याची सोय नाहीं हें जाणून आल्व्हा स्वस्थ बसला. राजाचा हेतु सिद्धीस नेण्याकरितां त्यानें इतालियन व अन्यदेशीय मारेकरी इलिजाबेथचा खून करण्यासाठीं वेळोवेळीं इंग्लंडमध्यें पाठविले; परंतु त्यांच्या प्रयत्नास यश आलें नाहीं.

ता. २५ सप्टेंबर १५७१ रोजीं सरदार मेडीना सीली याची नेदर्लंडच्या सुभेदारीच्या जागीं नेमणूक झाली. या गृहस्थास कामावर रुजू होण्यास कांहीं अवकाश लागणार असल्यामुळें तो येईपर्यंत राजसेवा पूर्ववत् करण्याविषयीं आल्व्हाला आज्ञा झाली होती. या नवीन करासंबंधानें मंत्रीमंडळ, प्रांतिकसभा, व लोकसमुदाय यांच्याशीं शुष्क वाद करीत बसणें येवढ्यावरच ही राजसेवा येऊन पोंहोचली होती. जे मंत्री लोक नवीनपंथी लोकांस जाळण्याच्या प्रसंगीं स्वस्थपणें बाजूस उभे राहून तमाशा पहात होते, ते राष्ट्राच्या अर्थसंघाशीं विरोध करण्याच्या कामीं त्याच्याकडे पाठ फिरवूं लागले. राजाचीही या कामास मनोभावानें मदत नव्हती. आल्व्हाच्या ग्रहचक्राची ऊर्ध्वगति होती तोंपर्यंत त्याच्या आश्रयानें उच्चस्थानाप्रत पोंहोचलेले बर्लेमॉन, आर्शो, न्वार्कार्मीज वगैरे सरदारलोक त्या चाकाची अधोगति होतांच आल्व्हाच्या बखुलाच्या पद्धतीपासून देशांस फार दुःस्थिति प्राप्त झाली आहे असें राजास समजावूं लागले. हें साल संपतां संपतां ब्राबंटच्या सभेकडून मंत्रीमंडळाकडे दहा टक्क्याविरुद्ध एक लांबलचक अर्ज आला. यावर उत्तर देतांना रागाच्या आवेशांत आल्व्हाचे असे उद्गार निघाले कीं, ‘ नेदर्लंडच्या हिताविषयीं आपण पूर्ण कळकळ बाळगीत असतां कांहीं दुष्ट लोक आपण या राष्ट्रावर जुलूम करीत आहों व या राष्ट्राचा नाश करण्याचा आपला उद्योग आहे, वगैरे खोट्या बातम्या पसरीत आहेत; दहा टक्के कर राष्ट्राच्या लष्करी खर्चाकरीतां बसविणें भाग आहे, वर्गणी करून ठरलेली रकम देण्यापेक्षां जिनसांवर बसलेला कर दिसून येत नाहीं; शिवाय वार्धक्य व चिन्ता यांच्या योगानें आपणांत सामर्थ्य राहिलें नाहीं; मेडीना सीली येण्याची आपण वाटच

'पहात आहों!' यावरून त्यास वैताग आला होता असें दिसतें. तथापि दुराग्रहाची गांठ अद्याप सुटत नव्हती.

इकडे सालभर ऑरेंजची पुन्हां समराची तयारी चालली होती. ज्या ज्या दिशेकडून मदत होण्याची आशा दिसेल तिकडे तिकडे तो आपले मुखत्यार पाठवीत होता; सामान्य लोकांकडून तो पैशाची अपेक्षा करीत असे; राजे व संस्थानिक यांजकडून उघडपणें सैन्यबलाची मदत मागत होता; हलक्यासलक्या लोकांकडून निरनिराळ्या ठिकाणांहून वारंवार येणाऱ्या वर्गणीनें व दर्यावर्दी लोकांच्या धाडसी कृत्यानें त्याचा खजिना फुगत चालला. उत्तर देशांकडील स्वीडन, नॉर्वे वगैरे राष्ट्रांकडून त्याला पोकळ बहुमानाचेच जबाब मिळाले. आल्व्हा तर केवळ तिरस्कार दाखविल्यावांचून त्याचें नांवसुद्धां घेत नसे; तथापि द्रव्यहीन व हद्दपार झालेला हा पुरुष एक शतकावधि चालणाऱ्या युद्धाकरितां घण तयार करीत होता. दैवी व मानवी क्षोभाच्या तावडींत सांपडलेल्या या राष्ट्रास स्वातंत्र्य व स्वराज्य हे प्रसाद मिळवून देण्याकरितां त्याचा अवतारच होता. ग्रॅन्व्हिलनें यावेळीं अशी सूचना केली कीं, स. बूरेन यास स्पेनमध्यें कांहीं मिळकती देऊन तेथें त्यास चिरस्थायी करावें व नॅसा घराण्याच्या नेदर्लंडमधील मिळकती निरंतरच्या सरकारांत जप्त करून तेथें नॅसा घराण्याचें नांव सुद्धां न राहील अशी तजवीज करावी. याच कल्पनेस अनुसरून आल्व्हानें नेदर्लंडमध्यें असें ठरविलें कीं, वुइल्यमचा पुतळा करून तो घोड्याच्या शेपटीस बांधून ओढीत मिरवावा व शेवटीं ऑरेंज व त्याचे वंशज बेअब्रूचे व निंद्य ठरवून या आकृतीचा प्रसिद्धपणें नाश करावा व त्यांच्या सर्व मिळकती सरकारांत जप्त करून टाकाव्या. यापैकीं कोणत्याच गोष्टीपासून राजपुत्राच्या व्यवसायांत फरक पडण्यासारखा नव्हता. डीड्रिच् सानॉय हा त्याचा विश्वासू वकील स्वीडननार्वेकडील कामगिरी संपतांच जर्मनींतील राजेलोक व प्रजाजन यांची सहानुभूति जागृत करण्याच्या उद्योगास लागला. आपल्या वकिलांपाशीं या कामगिरीकरितां ऑरेंजनें यावेळीं स्वतः फार महत्वाचे लेख लिहून दिले होते. त्यांपैकीं एका लेखांत सन १५६८ सालच्या घडामोडीचें फार संक्षिप्त व चटकदार वर्णन असून

आपण आरंभिलेल्या पवित्र कार्याकरितां येथपर्यंत काय काय खटपटी केल्या व कसकसे स्वार्थत्याग केले याचें या अनुपम राष्ट्रभक्तानें आपल्या हातानें कथन करून ठेविलें आहे. पुढें या लेखांत तो लिहितो, "आतां दुसऱ्या लोकांनीं पुढें येऊन हें कष्टाचें व स्वार्थत्यागाचें काम शिरावर घेतलें पाहिजे. कारण यद्यपि सर्व गोष्टी ईश्वराधीन आहेत व त्यानें शून्यापासून सर्व सृष्टि निर्माण केली आहे; तथापि निरनिराळ्या लोकांच्या हातांत निरनिराळीं साधनें देऊन त्यांच्याकडून तो आपलें इष्टकार्य सिद्धीस नेतो असा आपला अनुभव आहे. या उद्देशानें तो कांहीं लोकांस शरीरसामर्थ्य देतो, कांहीं लोकांस अर्थसंपत्ति देतो, व इतरांस इतर देणग्या देतो; त्यांचा व्यय, त्याची महति व वैभव वाढेल अशा रीतीनें त्यांनीं करावयाचा आहे; तसें न केल्यास आपली बुद्धि भुईंत पुरून ठेवणाऱ्या दानवांप्रमाणें त्यांस ईश्वरी शासन होईल...राजपुत्र ऑरेंज हा एकटा हें महत्कार्य पार पाडण्यास असमर्थ आहे; त्यांची सर्व मालमत्ता, जहागिरी व बांधव यांस तो मुकला आहे; व त्याजपाशीं होतें नव्हतें तें सर्व या कामास लावून शिवाय तो लोकांचें डोईजड देणें करून बसला आहे......" याच अर्थाचीं सर्व मुखत्यारांपाशीं त्यानें टिपणें करून दिलीं होतीं. शिवाय "जाहिरविनंति" नामक एक लेख छापवून त्यानें त्याच्या प्रति सर्वत्र वांटल्या. या लेखांत नव्या धर्मतत्त्वांसंबंधानें आपली भक्ति त्यानें प्रसिद्धपणें व्यक्त केली; व निराशा न दर्शवितां करुण भाषेनें गत-संकटांचें व वर्तमान उदासीनतेचें वर्णन करून व भविष्यकालीं वस्तुस्थिति बदलण्याची आशा दाखवून लोकांनीं आपणास साहाय्य करावें अशी त्यानें विनयपूर्वक प्रार्थना केली होती. "ऑरेंजकडे येणाऱ्या सूचना जरी निरनिराळ्या स्वरूपाच्या असतात व त्यांत विविध विनंत्या केल्या असतात, तथापि त्या सर्वांचा उद्देश ईश्वराचें वैभव वाढविणें व पितृभूमीस पारतंत्र्यापासून मुक्त करणें हा एकच आहे. आणि ही कल्पना मनांत पूर्णपणें बाणली असल्यामुळें ऑरेंज व तत्पक्षीय लोक यांस क्षुधा, तृषा, शीत, उष्ण वगैरे ईश्वरप्रेषित दुःखांचा ताप भासत नाहीं. आपले शत्रु पैशाकडे अगर श्रमाकडे न पाहतां त्यांचें काम करीत आहेत; त्यांच्यापेक्षां आपला निश्चय, विश्वास व उत्साह कमी आहेत काय? मात्र

वेळेवर आपण या उद्योगास कंबरा न बांधल्यास ईश्वराचा आपणावर निरंतरचा रोष होईल. तुम्ही हद्दपार असाल; तथापि तुमचें या कार्यास मदत करण्याचें सामर्थ्य संपलें नाहीं; आणि तुमची मदत मागणारा गृहस्थ तुह्मास आपापल्या घरीं परत नेऊन बसवील ! तुम्ही लुटींत सांपडले असाल, तथापि तुमच्याजवळ राहिलेल्या द्रव्यांतून तुह्माला या कार्याकरितां यथाशक्ति मदत केली पाहिजे ! तुम्ही पूर्वी मदत केली असेल; परंतु शत्रू पुनः तुमचीं दावीं वळण्याकरितां सज्ज झाला आहे ! शत्रूइतकें धैर्य व सढळपणा तुम्ही दाखविल्यावांचुन तुमचा निभाव लागेल काय ? " हे उत्तेजनपर लेख फुकट गेले नाहींत. ऑरेंजचें सामर्थ्य दिवसेंदिवस हळू हळू वाढत चाललें. आल्वासंबंधाचा तिरस्कार व द्वेष हे फार विकोपास जाऊन पोंहोचले होते. फ्रान्सिस आल्वा ( फिलिपचा फ्रान्सच्या दरबारचा वकील ) कांहीं कामानिमित्त ब्रुसेल्स येथें आल्यावेळीं त्यानें खरी वस्तुस्थिति स्वतः अवलोकन करून राजास नेदर्लंडच्या भयंकर स्थितीची हकीकत लिहून कळविली. या हकीकतीच्या शेवटीं त्यानें असा ओझरता उल्लेख केला कीं, आल्वा युरोपांतील कॅथोलिक राजांशीं गुप्त कट करीत आहे; त्यामुळें प्रॉटेस्टंट-धर्मी राष्ट्रांची स्वसंरक्षणार्थ एक जूट होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. आल्वा वरचेवर राजास आपलीं गाऱ्हाणीं व दुःखें लिहून कळवीत होता. याच सुमारास निरनिराळ्या प्रांतांचे मुखत्यार राजास भेटून नवीन करांसंबंधीं हरकती कळविण्याकरितां स्पेनमध्यें जाऊन पोंहोचले. राजास ही गोष्ट समजतांच परवानगीशिवाय स्पेनपर्यंत आल्याबद्दल दोष देऊन त्यांस त्यानें भेट न देतां परत पाठविलें. मात्र परत निघतांना 'तुमच्या अर्जाचा योग्य विचार होईल' असें त्यांस राजाकडून आश्वासन मिळालें. या राजाच्या दुटप्पी वर्तनामुळें आल्वा व नेदर्लंडची प्रजा या दोघांचीही सारखीच निराशा झाली.

इकडे सन १५७२च्या प्रारंभीं ऑरेंजची तयारी सारखी चालू होतीच. नेदर्लंडांत लोक या करांच्या बाबतींत उघडपणें बंड करण्यास तयार झाले होते. ऑरेंज या प्रसंगास अनुलक्षून लिहितो, " जवळ द्रव्य असल्यास कांहीं करून दाखविण्याची ही वेळ आहे; पुष्कळ पैशानें

दुसऱ्या वेळीं जें साध्य होण्यासारखें असेल, त्याच्यापेक्षां जास्त महत्वाच्या गोष्टी कमी द्रव्यानें हल्लीं करून दाखवितां येतील." कर देण्याचा प्रसंग न यावा म्हणून व्यापाऱ्यांनीं देवघेवच बंद केली; परदेशांतील नेआण अर्थातच बंद झाली; पेठांच्या पेठा ओस पडल्या; सर्व शिल्पकारांनीं आपापले उद्योग सोडून दिले; हजारों निरुद्योगी लोक भिक्षावृत्ति होऊन मोठमोठ्या शहरांतून फिरूं लागले; आल्व्हाचे स्पॅनिश सैनिक पगारासाठीं ओरड करूं लागले. सामान्य लोक विविध दुःखांनीं होरपळून गेल्यामुळें निराशेनें अगदीं निर्भय होऊन राजाच्या जुलमी सत्तेचा निरोध करण्यास अगदीं तयार झाले. आल्व्हा विरोधामुळें व रागानें इद्दास पेटून जास्तच नृशंस होत चालला. व्हिग्लियसनें यावेळीं राजास लिहिलें, " रोग आमच्या प्राणापर्यंत येऊन पोंहोचला आहे..... असंख्य लोक प्राण वांचविण्यास साधन नाहीं म्हणून तडफडत आहेत." राजधानीस बऱ्या तापाची सांथ येऊन गेलेल्या शहराचें स्वरूप आलें होतें. रोटी, मांस व पेय हे नेहमींचे उपजीविकेचे पदार्थ दुष्प्राप्य झाले. याप्रमाणें चोहोंकडून कोंडलेल्या वाघाप्रमाणें स्थिति झालेली पाहून आल्व्हानें अजम काळ या फांशीं देणारास बोलावून आणून, त्यास गांवांतील अठरा ठळक ठळक व्यापारी लोकांस त्यांच्या दुकानांच्या दारांत फांशीं देण्यासाठीं रातोरात दोऱ्या, शिड्या वगैरे अवश्य लागणारीं उपकरणें तयार करण्याचा हुकूम केला. न्यायदेवता मूर्तिमंत ज्या त्या इसमाच्या दारांत नेऊन पोंहोचविण्याची आल्व्हाची ही कृति होती. रात्रौ या लोकांवर बारंटें तयार झालीं. आल्व्हा रागाच्या त्वेषांत सूर्योदयाची वाट पहात रात्र जागून काढीत होता; इतक्यांत बंडवाल्यांनीं ब्रिल शहर घेतल्याची बातमी येऊन पोंहोचल्यामुळें या निरपराधी व्यापाऱ्यांच्या गळ्यांतील फांस सध्यां मोकळा झाला.

समुद्रावर भटकणाऱ्या देशभक्तांचा मार्ग उल्लेख केलाच आहे. मूळ सृष्टिकर्त्याच्या पक्षपातामुळें आपल्या नैसर्गिक हकांस अंशतः मुकलेले व जुलमामुळें त्यांच्या संकुचित जन्मभूमीसही आंचवलेले हॉलंडचे लोक आतां समुद्रावर भटकूं लागले. हे समुद्रगामी लोक चांचेपणाचा धंदा करूं लागल्यावर त्यांची या ठिकाणीं चांगलीच पोळी पिकली. त्यांची

पूर्वीची नीतिमत्ता नाहींशी झाली. पुष्कळ दरिद्रस्थितीस पोंहोचलेले व कायद्याच्या पाशांतून मुक्त झालेले लोक सन्मार्गाचा अतिक्रम करूं लागले होते. हे 'दर्यावर्दी भिक्षेकरी' तोफांच्या तोडांनीं आतां भिक्षा मागूं लागले. कित्येक प्रसंगीं शत्रु व मित्र त्यांच्या सपाट्यांत सारखेच रगडले जात. प्रत्येक दिवाळखोर व्यापारी, हद्दपार झालेला सरदार, अगर उनाड नावाडी यास आल्व्हाच्या सत्तेवर घाव घालण्याच्या सबबीवर उत्तर समुद्रांतील कोणत्याही बंदरांत एखादी नौका व कांहीं खलाशी हे केव्हांही ठेवल्यासारखे मिळत. त्यांचा सर्वांचा मुख्य उद्देश आल्व्हाच्या सत्तेवर आघात करण्याचाच असे व त्या कामाकरितां त्यांस ऑरेंज-कडून आज्ञापत्रेंही प्राप्त होत. राजपुत्रानें या लोकांचे गैराशिस्त बर्तन बंद करण्यासाठीं पुष्कळ यत्न केले; परंतु त्याच्या उदात्त कल्पना डीलामार्कच्या (ऑरेंजचा नवा आरमाराधिपति) डोक्यांत येणें अशक्य नव्हतें. या केसाट व क्रूर बटेव्हियन सरदाराचा, नेदर्लंडच्या बेंड लोकांचा छल व एग्मॉनचा शिरच्छेद यांजबद्दल आल्व्हा व पोपधर्म यांजवर पूर्ण सूड घेण्याचा संकेत ठरला होता. त्यानें पुढें पाद्रीलोक व मठवासी यांना ज्या यमयातना दिल्या त्यावरून हा देशभक्त ' यमासनाचा ' पक्का शिष्य बनला होता असें दिसून येतें. डीलामार्क यावेळीं इंग्लंडच्या दक्षिण किनाऱ्यावर होता. इलिजाबेथ व आल्व्हा यांचा द्वैतभाव कमी होऊन उभयतांचे तंटे मिटत चालले होते. या संधीस इलिजाबेथच्या दरबारीं असलेल्या स्पॅनिश वकीलानें तिला असें भासविलें कीं, नेदर्लंडच्या चांचेलोकांस इंग्लंडमध्यें नेहमीं आश्रय मिळत गेल्यास स्पेन व इंग्लंड यांचा वैरभाव पेट घेतल्यावांचून राहणार नाहीं. त्यामुळें मार्चच्या अखेर इलिजाबेथनें एक विशेष ठराव प्रसिद्ध करून डीलामार्क व त्याचे भणंग यांस बहिष्कार घातला; राणीनें त्यांच्या विरुद्ध इतके सक्तीचे उपाय अमलांत आणिले कीं, या लोकांस अन्नपेयांचा पुरवठा करणारांस सुद्धां शिक्षा होऊं लागल्या. त्यामुळें डीलामार्कच्या आरमारास पुढें इंग्लंडमध्यें राहणें अशक्य झालें. मार्च संपतां संपतां डीलामार्क, ट्रेस्लाँग, ब्रॅड वगैरे नामांकित तांडेलांच्या आधिपत्याखालीं निरनिराळ्या आकाराचीं सुमार चोवीस जहाजें डोव्हरमधून निघालीं. या जहाजांवरील लोकांचे अगदीं

उपासमार चालले असल्यामुळें ते कोठें तरी अन्नसामुग्री मिळविण्याच्या विवंचनेंत होते; त्यांचा प्रथम असा बेत होता कीं, उत्तर हॉलंडच्या किनाऱ्यावरील एंक्ह्यूझेननामक संपत्तिमान बंदरांत उतरून तें लुटावें. या ठिकाणीं ऑरेंजपक्षाचे लोकही पुष्कळ होते. वाटेंत त्यांनीं स्पॅनिश व्यापाऱ्यांचीं दोन जहाजें मारलीं. पुढें वारा प्रतिकूल वाहूं लागल्यामुळें मंगळवार ता. १ एप्रिल रोजीं आपला मूळचा बेत सोडून देऊन ते झीलंडकडे वळले व म्यूज नदीच्या विस्तीर्ण मुखांत शिरले. येथील आखातासारख्या रुंद प्रवाहाच्या दक्षिण तीरावर ब्रिल् व उत्तर तीरावर मास्लंड स्लूस यांच्यामध्यें हा नौकासमुदाय दोनप्रहरीं दोन बाजतां येऊन दाखल झाला. हा मोठा जहाजांचा समुदाय पाहून दोन्ही गांवचे लोक आश्चर्यचकित झाले. पीटर कॉपल्स्टॉक नांवाचा होडीवाला आपल्या मक्त्याच्या होडींतून माणसें पोंहोचवीत होता, त्यानें हे दर्यावर्दी देशभक्त असावेत अशी अटकळ बांधिली. त्याच्या श्रोतेमंडळींची तें भयोत्पादक नांव ऐकतांच गाळण उडाली व या भटकणाऱ्या लोकांच्या तावडींतून सुटण्याविषयीं ते अधीर झाले. आपल्या गिऱ्हाइकांस या अरिष्टाची बातमी पसरण्यास व आपल्या बचावाची अगर पलायनाची तयारी करण्यास पैल तीरावर सोडून कॉपल्स्टॉक होडी वल्हवीत या जहाजांसमीप आला व त्यानें जहाजांवरील लोकांस कोठें जाणार ह्मणून विचारिलें. कॉपल्स्टॉक मनांतून पूर्ण स्वातंत्र्यभक्त होता. तो प्रथम ज्या जहाजाजवळ गेला तें सीनियर ट्रेस्लाँग याचें होतें. ट्रेस्लाँगच्या भावास सन १५६८ त आल्व्हानें फांशीं दिलें होतें व हा स्वतः लुई नॅसाच्या हाताखालीं जेमिंगेनच्या लढाईंत मोठ्या शौर्यानें लढला होता. त्या प्रसंगांतून जे थोडे देशभक्त जिवानिशीं पळाले त्यांत हा होता. या प्राणसंकटांतून निभावल्यावर त्यानें जलचरवृत्ति स्वीकारली व या स्थितींत त्याचा चोहोंकडे चांगला दरारा बसला. याचा बाप पूर्वी ब्रिल्शहरांत राजाचा मुख्य अधिकारी असल्यामुळें त्याची गांवांत चांगली ओळख होती. कॉपल्स्टॉकला पाहतांच त्यान त्यास ओळखिलें; व त्याला घेऊन तो आरमाराधिपाच्या जहाजावर गेला. डीलामार्कला या गृहस्थाची माहिती सांगून आपणास पाहिजे त्या प्रकारचा हा मनुष्य मिळाला असें त्यानें त्यास कळविलें. जमिनीवर

उतरणें अगदीं अवश्य होतें, कारण जहाजांवरील सर्व सामुग्री निःशेष संपली होती. ट्रेस्लाँगनें डीलामार्कला असें सुचविलें कीं, ब्रिलशहरास आपल्या स्वाधीन होण्याविषयीं हुकूम पाठवावा. सुमारें तीनचारशें नांवानें व भावार्थानें भिक्षेकरी बनलेल्या लोकांनीं असा निरोप शहरांत पाठविणें फार धाडसाचें कृत्य होतें. ब्रिलशहरांत लोकवस्ति विशेष दाट नव्हती; परंतु तेथील गांवकुसूं भक्कम असून किल्ला मजबूत होता. शिवाय बंदराचे धक्के विस्तृत होते. ट्रेस्लाँगनें आपली खुणेची आंगठी कॉपलस्टॉकपाशीं देऊन त्यास शहरच्या मॅजिस्ट्रेटांकडे वकील ह्मणून पाठविला. कॉपलस्टॉक मोठ्या उत्सुकतेनें शहरच्या कचेरींत मॅजिस्ट्रेट जमले होते त्यांच्यापुढें जाऊन उभा राहिला. त्यानें त्यांस कळविलें कीं, आरमारावरील लोकांचा उद्देश 'दहा-टके' व आल्व्हाचा जुलूम यांतून आपल्या देशाची सुटका करावी असा आहे. करितां आरमाराचा नायक व ट्रेस्लाँग यांच्याशीं वाटाघाट करण्याकरितां अधिकाऱ्यांनीं शहरच्या वतीनें दोन वकील पाठवावे. त्यांचा त्या ठिकाणीं योग्य सत्कार होईल. मॅजिस्ट्रेटांनीं त्याचें बोलणें ऐकून घेऊन प्रथम त्यास जहाजांवरील लोकांची संख्या किती आहे असा प्रश्न केला. कॉपलस्टॉकनें सहज बोलण्याच्या झोंकांत 'एकंदर मनुष्यसंख्या सुमार पांच हजार असेल' असा जबाब दिला! या थापेचा प्रतिपक्षाच्या मनावर जबरदस्त परिणाम झाला. या चालून आलेल्या लोकांशीं सामना करण्याचा विचार आतां संपलाच. त्यांच्याशीं सलोखा करावा अगर पळून जावें येवढाच काय तो प्रश्न उरला; विचारा-अंतीं अंशतः दोन्ही गोष्टी करण्याचें ठरलें. शहरच्या तर्फे दोन धीट वकील तयार होऊन डीलामार्ककडे निघतांच बाकीच्या शहरवासी लोकांनीं चंबूगबाळीं बांधलीं. डीलामार्क व ट्रेस्लाँग यांनीं शहरांतील लोकांच्या जिवास अगर मालमत्तेस अपाय करण्याचा आपला विचार नाहीं; फक्त आल्व्हाचा अंमल तावडतोब नाहींसा करावयाचा आहे; सबब दोन तासांच्या अवधींत शहर आमचे स्वाधीन करून राजपुत्र ऑरेंजचा आरमाराधिपति डीलामार्क याचा हुकूम मान्य करणार किंवा नाहीं तें कळवावें असा वकीलांबरोबर निरोप पाठविला. अधिकाऱ्यांनीं ही दोन तासांची मुदत पळ काढण्याच्या उपयोगास लाविली. शहरांतील बऱ्याच

लोकांनीं त्यांचें अनुकरण केलें. एवंच दोन तासांनीं हे दर्यावर्दी लोक दोन टोळ्या करून शहरापाशीं आले, त्यावेळीं दहापांच लोक कुतूहलानें त्यांजकडे पहात गांवकुसवावर उभे राहिले होते. ट्रेस्लॉगची टोळी दक्षिणेकडील दरवाजा फोडून आंत शिरत असतां गांवचा मुख्य कोतवाल आपली चीजबस्त घेऊन बाहेर पळून जातांना त्याच्या हातांत सांपडला. डीलामार्कच्या टोळीनें उत्तरेकडील वेशीवर हल्ला करून आंत प्रवेश केला. दोन्ही तुकड्यांचे मिळून सुमार दोनशें लोक सायंकाळीं गांवच्या मध्यभागीं जमले. स्वातंत्र्यभक्तांस भटकतां भटकतां मुलुख थोडा झाला होता; त्यांस सरतेशेवटीं विसावा खाण्यास विश्रामस्थान या दांडग्या व आडदांड लोकांनीं तयार केलें. हीच डचस्वराष्ट्राची मुहूर्तमेढ होय. गांवांत पुरे पन्नास इसमसुद्धां राहिले नव्हते. डीलामार्क ऑरेंजचा मुखत्यार ह्मणून कायदेशीर रीतीनें या शहरचा कबजा घेऊं लागला, त्यावेळीं हें शहर केवळ शून्यवत् भासत होतें. गांवांतील स्त्रीपुरुषांस विजयी सैन्यानें ईषन्मात्र अपाय केला नाहीं. गांवांतील उत्तम घरांतून बिऱ्हाडें ठोकून दिल्यावर सैन्याची देवळें लुटण्याची तृष्णा मात्र अनावर झाली. देवळांतील सोन्यारुप्याचीं भांडीं, मूल्यवान् जवाहीर व वस्त्रप्रावरण यांजवर या अविचारी व उन्मत्त लोकांनीं यथास्थित हात मारला; तेरा कॅथोलिकधर्मी मठवासी व उपदेशक पकडून अंधारकोठडींत बसविले व पुढें या लोकांचा अत्यंत क्रूर रीतीनें वध केला. आल्व्हास ही बातमी समजतांच तो क्रोधानें भडकून गेला. लोकांना जास्तच स्फुरण चढलें. ब्रिल् शब्दाचा अर्थ फ्लेमिश भाषेंत चाळिशी असा आहे; व हें शहर हस्तगत झालें तो एप्रिल फूल्सडे ( शिमग्याचा दिवस ) होता. त्यावर ब्रुसेल्सच्या कवींनीं-

एप्रिल फूलच्या दिवशीं । हरवली ड्यूक आल्व्हाची चाळिशी ॥

असें पद्य रचिलें. शिवाय आल्व्हासंबंधीं थट्टास्पद व निंदात्मक लेख असंख्य प्रसिद्ध होऊं लागले.

आल्व्हानें गेलेला डाव परत मिळविण्याच्या कामास एकदम सुरुवात केली. त्यानें हॉलंड, झीलंड प्रांतांचा सरकारचा नवा सुभेदार बॉसू यास ब्रिलशहरावर मोहीम करण्याचा हुकूम पाठविला. यूट्रेक्टच्या शिबंदीपैकीं दोन दळें घेऊन बॉसू स्लूसनामक धक्क्यावरून ब्रूर्न बेटावर गेला; व

तेथून त्यानें ब्रिल् मुकाट्यानें परत देण्याविषयीं बंडवाल्यांस निरोप पाठविला. बंडवाल्यांची संख्या फार थोडी असल्यामुळें शहराबाहेर कोणी तोंड काढण्यास धजावेना. या प्रसंगीं शहरांतील एका ऑरेंजभक्त सुतारानें हातांत कुऱ्हाड घेऊन नदींत उडी टाकली; व स्लूस धक्क्यापर्यंत पोहत जाऊन बांधारा मधोमध कुऱ्हाडीचे घाव घालून फोडला. बांधारा फुटतांच नदीचें पाणी आंत पसरून गांवाचा उत्तरेकडील मार्ग बंद झाला. हें पाहून बॉसूनें ब्रिल्च्या दक्षिण वेशीवर आपलें सैन्य नेलें. तेथें या लोकांना तोफांची फार गरम सलामी मिळतांच ते लटपटले. या अवधींत ट्रेस्लाँग व रोबल यांनीं होडींतून जाऊन व्हूर्नबेटाजवळ असलेली बॉसूचीं कांहीं जहाजें दोरखंडें सोडून पाण्यांत लोटून दिलीं व कांहीं पेटवून दिलीं. या जहाजांचा झालेला मोठा जाळ व चोहोंकडे पसरत चाललेलें पाणी पाहून स्पॅनिशलोक भयाभीत झाले. नदीच्या गढूळ पाण्यांतून व चिखलांतून त्यांनीं होतां होईल तितका यत्न करून आपलीं वाहत चाललेलीं जहाजें गांठलीं व वाट सांपडेल तिकडे पळ काढला. या पळापळींत पुष्कळ लोक प्राणांस मुकले. या संकटाचें निवारण होतांच डीलामार्कनें शहरवासी लोकांकडून ऑरेंजचा सुभा या नात्यानें आपला अधिकार चालविण्याविषयीं शपथा घेतल्या.

या डीलामार्कच्या साहसापासून ऑरेंजला विशेष समाधान वाटलें नाहीं. त्याची जर्मनींत सैन्याची व इतर जमवाजमव अद्याप पुरी झाली नव्हती. जास्त मनुष्यबलावांचून ब्रिल्ठाणें कायम राहील असा त्याला भरंवसा वाटेना. शिवाय डीलामार्कच्या वर्तनासंबंधीं त्याला कांहींच शाश्वती वाटत नव्हती. हें ठिकाण धरून बसण्याचा डीलामार्कचा मुळींच बेत नव्हता. बंदरांत उतरून जहाजांवर अन्नाचा पुरवठा केल्यावर, गांवांत बरीच लुटालूट करून तीही सुरक्षितपणें जहाजांवर येऊन पोंहोचल्यावर व कांहीं निरपराधी, अनाथ धार्मिक लोकांचा वध केल्यावर या भणंगवृत्ति नौकाधीशांनीं आपल्या अनुयायांस, शहरास आग लावून तेथून कूच करण्याचा हुकूम फर्माविला. ट्रेस्लाँगच्या विनवणीवरून हा बेत फिरला. बटेव्हियन लोकसत्ताक राज्याचा पाया घालण्याचें सर्व श्रेय या धाडसी व चतुर ट्रेस्लाँगलाच देणें वाजवी आहे. येथपर्यंत झालेले सर्व प्रकार

सहजगत्या घडून आले होते; परंतु या धाग्याला धरून या प्रांतांत कायमची स्वराज्यस्थापना करण्याची कल्पना ट्रेस्लॉंगच्या सूक्ष्मबुद्धीसच प्रथम भासली. त्याच्या वरिष्ठाच्या मनांत हल्लींची मोहीम एक सामान्य चांचेपणाची शिकारच वाटत होती.

ब्रिलू येथें हताश होऊन बॉसू रॉटर्डम शहराकडे वळला. राटर्डम शहराच्या वेशी बंद झाल्या होत्या. शहरचे अधिकारी राजाचें सैन्य शहरांत घेईनात. बॉसूनें आपणास शहरांतून पलीकडे निघून जाण्यापुरता रस्ता पाहिजे असें सांगून एकेक दळानें शहरच्या रस्त्यानें जावें अशी मॅजिस्ट्रेटांकडून परवानगी मिळविली; व एक दळ शहरांत शिरतांच बाकीच्या सैन्यानें वेशीवर हल्ला करून शहरांत प्रवेश केला. थोड्याच अवकाशांत त्यांनीं चारशें लोक रस्त्यांत कापून काढिले व सांपडेल त्या स्त्रीवर बलात्कार करण्याचा सपाटा चालविला. इकडे ब्रिलू येथील जयाची हकीकत ऐकून वाल्चरन् बेटांवरील फ्लशिंग बंदरांत देशभक्तीची लाट जोरानें उसळली. सीनियर हार्प्ट नामक ऑरेंजभक्तानें बाजार-चौकांत शहरवासी लोक जमवून त्यांस शहरांतून स्पॅनिश शिबंदीचे राहिलेले लोक हांकलून लावण्याविषयीं प्रोत्साहन दिलें. कांहीं वेळानें शहरच्या तटबंदीचें काम पुरें करण्याकरितां सरकारानें पाठविलेलें सैन्य शहराबाहेर येऊन पोंहोचलें. चौकांत जमलेल्या लोकांतून एक वेडसर धुंदींत असलेला मनुष्य हसत, खिदळत तटावर चढला व त्यानें एकदोन बार काढले. ते अकस्मिक बार ऐकून स्पॅनिश जहाजें भयाभीत झालीं व त्यांनीं मिडल्बर्गकडे पळ काढला. दुसरे दिवशीं सरकारचा वाल्चरनचा सुभेदार बर्गायन् फ्लशिंग शहरीं आला व तेथील बंड मोडण्याकरितां त्यानें आपल्या वक्तृत्वाचा बराच उपयोग करून पाहिला. राजा फार सुस्वभावाचा आहे, सदय आहे; तो तुमच्या अपराधाबद्दल तुह्माला क्षमा करील; तुह्माला ममतेनें वागवील, वगैरे नवी माहिती त्यानें लोकांस लांबलचक व्याख्यानाच्या द्वारें दिली. मधून मधून श्रोतेजन त्याला राजाच्या मागील कृत्यांचा उल्लेख करून शंका विचारीत; त्या सर्वांस त्यानें आपल्या मतें समर्पक उत्तरें दिलीं. शेवटीं आपल्या वक्तृत्वाचा कांहीं परिणाम होत नाहीं असें पाहून त्यानें जमलेल्या प्रजाजनांस

कळविलें कीं, याउप्पर तुमच्या घरादारांस, बायकामुलांस व तुह्मा स्वतःस अपाय झाल्यास त्याची जबाबदारी तुमच्याच शिरावर राहील. हें वाक्य संपतांच लोकांनीं त्यास धरून धक्के मारीत शहराच्या बाहेर घालवून दिलें. फ्लशिंग येथील बंडवाल्यांची हिंमत मोठी होती, परंतु त्यांस लढाऊ लोकांची उणीव होती. त्यामुळें ऑरेंज व डीलामार्क यांजकडे त्यांनीं कुमक पाठविण्याविषयीं निरोप पाठविले. डीलामार्कजवळ धाडशी व पक्षाभिमानानें युद्ध करण्यांत बाकबगार असे पुष्कळ लोक जमले होते. त्या सर्वांस अन्नाचा व हत्यारांचा पुरवठा करण्याची अडचण पडूं लागली होती. त्यांपैकीं त्यानें सुमार दोनशें लोक व तीन जहाजें ट्रेस्लाँगबरोबर देऊन फ्लशिंगकडे रवाना केलीं. जहाजांवरील लोकांनीं ब्रिलच्या मठांत व देवळांत सांपडलेले धर्मोपदेशकांचे झगे व इतर चित्रविचित्र पोषाक घातल्यामुळें लढाईला निघालेल्या सैन्यापेक्षां हा तमासगिरांचा मेळाच भासत होता. झीलंडच्या लहान लहान आखातांतून जातांना जंगली भिक्षेकऱ्यांच्या पद्यांनीं व सुडाच्या आरोळ्यांनीं या टोळीनें तो जलप्रदेश अगदीं मुखर करून सोडिला. सूड घेण्याला त्यांना विषयही लौकरच प्राप्त झाला. अँट्वर्पच्या किल्ल्याचा कल्पक व प्रसिद्ध शिल्पज्ञ पॅचिको फ्लशिंगच्या कोटाचें काम संपविण्याकरितां आल्व्हानें मोठ्या जरुरीनें पाठविला होता. तो कर्मधर्मसंयोगानें ट्रेस्लाँगचे लोक येण्याच्या वेळींच तेथें येऊन पोंहोचला. इकडील वृत्तान्त त्याला समजला नव्हता. बंदरांत उतरतांच बेफाम व आडदांड लोक-समुदायाचा त्याला गराडा पडला. या इतालियन गृहस्थास जमलेले लोक स्वभाषेंत शिव्याशाप देत होते तें त्यास समजेना. त्याला इतकें मात्र समजलें कीं, आल्व्हाची सत्ता विलयास गेली होती. आपली मोहोरेची आंगठी काढून व तिचा मुका घेऊन त्यानें ती बंडवाल्यांचा सेनानी डी रीक याजपाशीं दिली. त्या खुणेचा अर्थ डी रीक समजला व त्याला सभ्यरीतीनें बागवावा अशी त्याची इच्छा होती. परंतु ट्रेस्लाँग-ला आपल्या भावाची आठवण होऊन त्याची प्रतिकारतृष्णा अनावर झाली. त्यानें पॅचिकोचा वध करण्याचा हुकूम केला. दोन स्पॅनिश अधिकारी दोहों बाजूस उभे करून बंडवाल्यांनीं त्याचा वध

केला. हें दुष्ट कृत्य तर खरेंच; परंतु जातिद्वेषास स्पॅनिश लोकांचें वर्तनच मुख्य कारण झालें होतें. अशा कृत्यांचा निषेध बंडाच्या कल्पकानें कित्येक वेळां केला होता. ऑरेंजनें आपल्या पूर्ण खात्रीपैकीं झेरार्ड्स नांवाचा गृहस्थ वाल्चरन् बेटाचा नायक व सुभा नेमून पाठविला. त्याच्याजवळ कांहीं फ्रेंच पायदळ व इंग्लिश स्वयंसेवकांचीं दळें होतीं.

ब्रिल् व फ्लशिंग यांचें इतर ठिकाणींही झपाट्यानें अनुकरण झालें. सन १५७२ सालची पहिली सहामाही या इतिहासांत प्रजापक्षास एकामागून एक मिळालेल्या जयांबद्दल फार चिरस्मरणीय होऊन बसली आहे; त्याचप्रमाणें हें साल संपतां संपतां त्यांस जागोजाग मिळालेले अपजयही असामान्य होते. फ्लशिंग हें लहान पण फार महत्वाचें बंदर विशेष कांहीं यत्न न करतां ऑरेंजनें चिंतिल्याप्रमाणें हातीं येतांच निम्या वाल्चरन् बेटानें आल्व्हाची सत्ता झुगारून दिली. मागोमाग झूडरझी आखातानें नाक, झीलंडमधील मुख्य शस्त्रागार व सर्व नेदर्लंडांत नाणावलेलें व्यापाराचें ठिकाण, जें एंक्यूझेन शहर त्यानें स्पॅनिशसत्तेचा अव्हेर करून ऑरेंजचा झेंडा आपल्या तटावर उभा केला. तेथील राज्यक्रांति केवळ लोकांनींच घडवून आणिली. मॅजिस्ट्रेट लोकांस एका बाजूस बसवून रक्ताचा एक थेंब न पाडतां व लोकांच्या जीवितास व वित्तास काडीभर अपाय न करितां लोकांनीं आल्व्हाच्या सत्तेचा शेवट लाविला. अशाच नैसर्गिक मनोवृत्तीवरून हॉलंड व झीलंड प्रांतांतील सर्व मोठमोठ्या शहरांनीं ऑरेंजचा बावटा जागोजाग उभा केला. सर्व ठिकाणीं कार्यक्रमाचा नमुना एकच झाला. उत्साहाच्या एका झटक्याबरोबर राष्ट्रानें पारतंत्र्याच्या शृंखला झुगारून दिल्या. ऊडवाटर, डोर्ट, हार्लेम, लीडन, लोवेन्स्टिन, आल्कामार, एडम, वगैरे गांवें ऑरेंजच्या पक्षास येऊन मिळालीं. स्वातंत्र्याचे मार्गदर्शक दीप हॉलंड व झीलंड प्रांतांतच पेटले नाहींत. हेल्डर्लंड, ओव्हरिसल, यूट्रेक्ट या प्रांतांतील बहुतेक शहरें, फ्रीझलंडमधील सर्व महत्वाचे गांव, कांहीं आगाहून, कांहीं मागाहून, कांहीं बिनबोभाट, कांहीं थोडा वेळपर्यंत वेढा खाऊन, कांहीं ग्रामाधिकाऱ्यांच्या विचाराविरुद्ध, कांहीं त्यांच्याशीं एक विचार करून ऑरेंजची शिबंदी घेऊन त्याच्या सत्तेच्या सावलींत जाऊन बसले. चिरकालावधि

चाललेल्या अमानुष जुलुमाच्या ब्रह्मघोटाळ्यांतून न्याय व सुव्यवस्था यांचीं अंधक किरणें हळू हळू दृष्टोत्पत्तीस येऊं लागलीं. या स्थानिकक्रांतीस भरती आल्यावेळीं कांहीं स्थलीं लोकांचें आचरण फार उदात्त व सात्विक घडलें; परंतु अन्य ठिकाणीं मोठे भयंकर व अमानुष प्रकार या सपाट्यांत घडून आले. वाल्चरन् बेटांत दोन्ही पक्षांची सारखीच स्थिति असल्यामुळें या ठिकाणीं उभयपक्षाचा मोठ्या निकराचा व अघोर युद्धप्रसंग झाला. जातिभेद अगर धर्मभेद यांपैकीं कोणत्या विषाचा परिणाम या प्रसंगीं जास्त प्रखर झाला हें सांगवत नाहीं. घनघोर संग्राम सतत चालले होते. लढायांत पकडलेल्या लोकांचा ताबडतोब वध होत असे; शत्रुपक्षाकडे खुद्द भाऊ, बाप असला तरी त्याचा भाऊ अगर मुलगा स्वहस्तानें त्याचा वध करीत असे. कैदी लोकांची संख्या जास्त वाढली ह्मणजे पाठीला पाठ लावून दोघदोघांस बांधून समुद्रांत फेकून देत. या बेटांवरील लोक स्पॅनिशजातीचा प्राणी मनुष्यकोटीपैकीं समजत नसत. एकदां एका शस्त्रवैद्यानें एका स्पॅनिश कैद्याचें काळीज फाडून काढून तें जहाजाच्या अग्रभागीं स्थापन केलें व शहरवासी लोकांस त्याजवर दांतानें प्रहार करण्यास सांगितलें. पुष्कळ लोकांनीं मोठ्या हौसेनें हें पशुतुल्य कृत्य केलें. दुसऱ्या प्रांतांत ही स्थानिकक्रांति अगदीं शांतपणानें झाली. प्रजापक्षास मिळालेलीं सर्व शहरें बंडवाल्यांकडे अर्थातच कायम राहिलीं नाहींत व जीं राहिलीं तीं मोठ्या प्रयासानें राहिलीं. उत्तरेकडील विमुक्त शहरांनीं मात्र आपल्या स्कँडेव्हियन नांवाला उजळ करून स्वातंत्र्याच्या उत्तेजक हवेंत पुष्कळ भरभराटीचे दिवस घालविले. या बर्फाच्छादित लहान द्वीपकल्पांतून स्वातंत्र्याचा उज्वल प्रकाश यूरोपच्या आर्त समाजांवर पुढें पुष्कळ वर्षें-पर्यंत पडत गेला व हेच लोक यूरोपच्या इतर राष्ट्रांना जुलमाच्या खवळलेल्या समुद्रांतून मार्गदर्शक झाले. हार्लेम, लीडन, आल्कामार हीं नांवें मानवी प्राण्याच्या इतिहासांत शौर्याच्या अतिमानुष कृत्यांनीं पवित्र झालीं; व तीं मॅराथॉन, थर्मापली व सॅलॅमिससारखींच जुलूम व अन्याय यांस भेरीस्वनाप्रमाणें भयोत्पादक होऊन बसलीं.

राजसत्तेपासून मुक्त झालेल्या प्रत्येक शहरांत लोकांनीं नवे मॅजिस्ट्रेट निवडले. या अधिकाऱ्यांस स्पेनचा राजा व त्याचा कायदेशीर सुभा

ऑरेंज यांच्याशीं इमान राखण्याविषयीं शपथ घ्यावी लागत असे; व आल्व्हा, दहाटके कर व धर्मसंशोधन यांस उलथून पाडण्याविषयीं अभिवचन द्यावें लागे; व्यक्तिस्वातंत्र्य व राष्ट्राचें हित, बायाबापड्या, अनाथ व पंगु लोक, मुलें व सामान्य जनसमूह यांचे प्राण, अब्रू व मालमत्ता, सत्य व न्याय या सर्वांचें रक्षण करण्याविषयीं शपथ घ्यावी लागत असे.

ता. २ जून रोजीं डीड्रिच् सानॉय उत्तर हॉलंड व वाल्चरन् यांच्या नायब सुभेदारीची ऑरेंजकडून सनद् घेऊन एंक्यूझेन बंदरांत उतरला. सन १५५९ सालीं हॉलंड व झीलंड प्रांतांवर ऑरेंजची सुभेदारीच्या जागीं राजानें नेमणूक केली होती; तो अधिकार त्यानें आतां आपण होऊन पुन्हां धारण केला. हाच नेदर्लंडच्या नवीन राज्यव्यवस्थेचा पाया होता. फिलिपनें राज्यारोहणसमयीं घेतलेल्या शपथांपेक्षां एक रतिभर जास्त स्वातंत्र्य लोक मागत नव्हते. फिलिपच्या स्वामित्वाविषयीं कोणाचाही आक्षेप नव्हता. परंतु आपल्या समजुतीप्रमाणें ईश्वराची उपासना करण्यास परवानगी असावी; व जुन्या सनदांवरून मिळालेल्या हक्कांचा आपणास उपभोग मिळावा असें लोकांचें मागणें होतें; व या गोष्टी ठरवून घेण्याचा त्यांचा संकल्प झाला होता. आल्व्हाच्या राज्यांत यमासन, धर्मसंशोधन व लष्करी कायदा यांचाच अंमल सारखा चालू असल्यामुळें जुन्या सनदा घोरत पडल्या होत्या. या सनदांवरून मिळालेलें खरें स्वातंत्र्य व इतिहासपूत हक्क रक्षण करणें, व रक्तानें ओथंबलेलें परराज्य खांद्यावरून झुगारून देणें याविषयीं वुइल्यम व तत्पक्षाभिमानी लोक यांचे सर्व प्रयत्न चालले होते. सर्वस्वीं एखादी नवीन राज्यव्यवस्था निर्माण करण्याकरितां त्यांनीं बंडाचा उपक्रम केला नव्हता. सानॉयला ऑरेंजनें लेखी सूचना दिल्या होत्या; त्यांत लोकांनीं भगवद्भक्ति आपापल्या समजुतीप्रमाणें निरूपण कराव्या; कॅथोलिकधर्मास कोणत्याही प्रकारचा उपसर्ग लागूं देऊं नये; धर्मतत्त्वांबद्दल हद्दपार व फरारी झालेले लोक परत बोलवावे; व निरनिराळ्या राजकीय संस्थांचे अधिकारी व मॅजिस्ट्रेट यांजकडून इमानाच्या शपथा घ्याव्या, वगैरे गोष्टींचा उल्लेख होता.

ऑरेंज अद्यापपर्यंत जर्मनींत सैन्य व द्रव्य गोळा करण्याच्या कामांत

गुंतला होता. वस्तुस्थितीच्या ओघानें त्याच्याकडे राज्यसत्ता अनायासानें-च प्राप्त झाल्यामुळें राजापासून विभक्त झालेल्या प्रांतांच्या कारभारा-संबंधीं सर्व बारीक गोष्टींत सुद्धां त्यास आतां लक्ष पोंहोचविणें भाग पडलें. इकडे या सुमारास लुईनें एक अतर्क्य व असामान्य पराक्रमाचें कृत्य केलें. तो पुष्कळ दिवस फ्रान्समध्यें ह्यूजेनॉट लोकांशीं व गुप्तपणें दरबाराशीं खलबतें करीत बसला होता. तो अद्यापपर्यंत फ्रान्समध्येंच आहे अशी सर्व जगाची समजूत असतां एके दिवशीं अकस्मात अशी बातमी पसरली कीं त्यानें मॉन्सशहर हस्तगत केलें. डोंगराळ, परंतु सुपीक व रमणीय अशा प्रदेशांत वसलेलें, उंच व भक्कम तट, व तिहेरी खंदक, यांनीं रक्षिलेलें हें हेनोप्रांताचें राजधानीचें शहर सर्व नेदर्लंडमध्यें फार विख्यात व सुंदर ठिकाण होतें. शिवाय फ्रान्सची सरहद्द लागून असल्या-मुळें बंडवाल्यांस ही फार महत्वाची प्राप्ति होती. हें शहर काबीज करण्याचा प्रकार असा झाला. अँटनी ऑलिव्हर नांवाच्या मॉन्सच्या रंगीत नकाशे काढण्याऱ्या चित्रकारानें आल्व्हास नेदर्लंडच्या कांहीं भागांचे नकाशे काढून दिल्यामुळें तो आल्व्हाचें पूर्ण विश्वासपात्र झाला होता. तो कांहीं कामाकरितां फ्रान्समध्यें गेला, त्या वेळीं लुईच्या हालचालीवर नजर ठेवून त्याचें फ्रान्सच्या राजापाशीं चाललेलें कारस्थान कोणत्या थरावर जाऊन पोंहोचलें आहे याविषयीं वेळोवेळीं लेखी माहिती पाठविण्याची कामगिरी आल्व्हानें या गृहस्थास सांगितली होती. हा चित्रकार स्वातंत्र्यभक्त होता, व ऑरेंज व नॅसावराण्याचे लोक यांच्याशीं त्याचा गुप्त पत्रव्यवहार असे; ऑरेंजनें आल्व्हाकडील माहिती समजण्याकरितां त्यास दरबारांत आपला हेर नेमिला होता. त्याचा लुईशीं पत्रव्यवहार होतांच हा गृहस्थ फ्रान्समध्यें गेल्यापासून आल्व्हाच्या अटकळीपेक्षां भलताच परिणाम झाला. मॉन्सशहरांत बरीच फितवाफितवी झाली. लुई व ह्यूजेनॉट लोकांचे पुढारी जेन्लीस, डीलानू वगैरेंचा एक विचार होऊन या शूर व हिंमतदार शिल्पकाराच्या मदतीनें मॉन्सशहर हस्तगत करण्याचा बेत कायम ठरला. ता. २२ मे रोजीं ऑलिव्हरनें व्यापाराच्या मालाच्या मिषानें तीन बंदुकांच्या गाड्या शहरांत बंडवाल्यांस नेऊन पोंहोचविल्या. इतक्यांत लुई पांचशें घोडेस्वार व एक हजार पायदळ

घेऊन मॉन्सनजीक येऊन पोंहोचला. त्यानें आपलें सैन्य जवळच्या जंगलांत छपवून ठेविलें; सायंकाळीं बारा साहसी लोक दारू विकणाऱ्या व्यापाऱ्यांच्या वेषानें शहरांत गेले; व त्यांनीं एका भटारखान्यांत जाऊन वेशीचे दरवाजे सकाळीं केव्हां खुले होतात ही बातमी काढिली. दुसरे दिवशीं पहारेकऱ्यांस चिरीमिरी मिळतांच दरवाजे नेहमींपेक्षां लौकर खुले झाले. दरवाजे मोकळे होतांक्षणींच पहारेकऱ्यास गोळी लागून तो गतप्राण झाला. लागलींच पन्नास निवडक स्वार आंत शिरून "फ्रान्स", "स्वातंत्र्य," "शहर आमचें आहे," "राजपुत्र येत आहे," "धिःकार असो आल्व्हाला," "दहाटक्के कर संपला" वगैरे शब्द मोठमोठ्यांनीं उच्चारीत रस्त्यांतून फिरूं लागले; कोणी आश्चर्यानें खिडकी उघडून तोंड बाहेर काढल्यास त्यांच्यावर हे पाहुणे गोळ्या झाडूं लागले. ह्या पन्नास लोकांनीं इतका गोंगाट व दांडगाई आरंभिली कीं, त्यामुळें यांची संख्या सुमार एक हजार असावी असें लोकांस वाटूं लागलें. रस्त्यांत माणूस तोंड काढीना; त्यांचे शहरांतील साथीदारसुद्धां दृष्टी पडेनात. पन्नास लोक छापा घालण्यास बस्स होते; परंतु शहरांत अंमल बसविण्यास ही संख्या फारच थोडी होती. लुईला या ठिकाणीं कांहीं दगा असावा असा संशय येऊं लागला. त्याच्या बरोबरचें सैन्यही बराच वेळ कोठें दिसेना. संशयानें अगदीं अधीर होऊन त्यांच्या शोधार्थ तो परत शहराबाहेर गेला; व वाट चुकलेल्या या सैन्यास शहरच्या वेशीपर्यंत घेऊन आला. गांवांत लोक जागे होऊन तयारीस लागले होते. वेशीचा दरवाजा बंद करून खंदकावरील पूल काढून पहारेकरी तो उभा करीत होते; इतक्यांत एका फ्रेंच सरदारानें चढत चाललेल्या पुलाच्या फळीवर घोडा फेंकला; त्याबरोबर पूल खालीं बसला. लुईच्या सैन्यानें वेश फोडून मोठ्या शिताफीनें शहरांत प्रवेश केला. शहरची घंटा वाजवून मोठ्या चौकांत शहरवासी लोक ताबडतोब गोळा करण्यांत आले. पाद्री लोक, मॅजिस्ट्रेट व स्थानिक सभेचे मुखत्यारसुद्धां यावेळीं हजर होते. जेन्लीसनें प्रथम जमलेल्या लोकांस फ्रान्सच्या वतीनें मुलुख काबीज करण्याकरितां आपण आलों नाहीं असें आश्वासन दिल्यावर लुईनें आपल्या भाषणास सुरवात केलीः--"आह्मी राजांविरुद्ध बंड

करण्यास प्रवृत्त झालों नाहीं. याला प्रमाण हेंच कीं आह्मी कोणास राजाविरुद्ध नव्या शपथा घेण्यास सांगत नाहीं; तुमच्या जुन्या शपथांवर भरंवसा ठेऊन चाला; मॅजिस्ट्रेट लोकांनीं पूर्वीप्रमाणेंच आपापलीं कामें करून न्यायमनसुबा चालवावा. राजपुत्र ऑरेंजचा भाऊ या राष्ट्राचें स्वातंत्र्य नाहींसें करण्याकरितां कांहीं उद्योग करील असा संशय तुह्मास कधींही येण्याचें कारण नाहीं. कॅथोलिक धर्माविषयीं विचाराल तर त्याचें आम्ही विशेष काळजीनें रक्षण करणार आहों......आल्व्हाविरुद्ध आह्मीं शस्त्र धारण केलें आहे; त्याच्या कृतान्तरूपी जबड्यांतून तुह्मास वांचविण्याकरितां मी आज येथें आलों आहें......माझें आपणास आज एवढेंच मागणें आहे कीं आल्व्हा हा राजद्रोही आहे, लोकांचा संहारक आहे, राष्ट्राचा शत्रू आहे, राज्य चालविण्यास अयोग्य आहे असें ठरवून त्यास अधिकारावरून दूर करावा. " मॅजिस्ट्रेट लोकांस हीं विधानें फार साहसाचीं वाटलीं; अर्थांतच त्यांस तीं मान्य झालीं नाहींत. स्थानिक सभेच्या प्रतिनिधींचा कल लुईच्या बाजूचा होता. बहुमतानें लुईचें मागणें अग्राह्य ठरलें. मुलकी कामगार त्याच्या सैन्यास पोटगी देईनात. शहरास वेढा येण्याची पूर्ण चिन्हें दिसत होतीं. बंडवाल्यांचें सैन्य तर फारच थोडें होतें. परंतु शहरांतील सुती व रेशमी कापडाच्या कारखानदारांनीं आपल्या खर्चानें पलटणें तयार केलीं; पुष्कळ स्वयंसेवकांचीं दळेंही तयार झालीं; या लोकांनीं किल्ल्याची डागडुजी करून नाकेबंदी केली. कॅथोलिकधर्मी लोकांस विशेष ममतेनें वागविण्याचें ठरलें. आसपासच्या देवळांतून सोन्यारुप्याचीं भांडीं, जवाहीर, नक्त व इतर मूल्यवान् पदार्थ शहरांत सुरक्षित राहण्याकरितां आणून ठेविले होते, ते बंडवाल्यांनीं आपल्या उपयोगास लाविले. फ्रान्समधून सैन्याची कुमक वरचेवर येत होती; व प्रसिद्ध फ्रेंच सरदार मॉंटगॉमरी पुढील महिन्यांत कांहीं पायदळ व घोडदळ यांसह मॉन्सशहरांत दाखल झाला. याप्रमाणें आल्व्हा बंडाच्या भयंकर वादळांत सांपडला होता. वज्रामागून वज्र लागोपाठ त्याच्यावर येऊन पडत होतें. ब्रिल, फ्लशिंग तर गेलींच होतीं; मिडलबर्गला वेढा पडला होता; तें शहर बंडवाल्यांस मिळतांच सर्व वाल्चरन् बेट हातांतून जाण्याचा प्रसंग होता. एंक्हूझेन व सर्व जलप्रदेश

बिथरल्याची बातमी त्याला जाऊन पोंहोचलीच होती; व्हॅलेंसिनीजमध्यें गडबड झाली होती; व त्याच्या हेरांनीं त्याला खात्रीपूर्वक लुई पारीस-मध्यें चेंडूचा खेळ खेळत आहे अशी बातमी कळविल्या वेळींच त्यानें मॉन्स शहर काबीज केल्याची खात्रीलायक बातमी येऊन पोंहोचली. आल्व्हाची तबेत गरम झाली, परंतु धैर्य तिळमात्र खचलें नाहीं. त्यानें डॉन फ्रेडरिकला मॉन्सला शह देण्याचा हुकूम करून, त्यास सैन्याची कुमक पाठविण्याची आपण तयारी चालविली. सुमार चार हजार लोकांसह फ्रेडरिकनें मॉन्सजवळील बेथलूहेम टेंकडीवर तळ देऊन वेढ्याच्या कामास नीट तजविजीनें सुरवात केली.

इकडे आल्व्हा नेदर्लंड सोडून जाण्यास अगदीं आतुर झाला होता. "माझ्या वांट्यास या राष्ट्रांतील लोकांस शासन करण्याचें आल्यामुळें मी कितीही सौम्य रीतीनें वागलों तरी त्यांच्या मनांत माझ्याविषयीं द्वेषभाव उत्पन्न झाला आहे; त्यामुळें माझे सर्व यत्न फुकट जात आहेत. दुसरा मनुष्य माझ्या जागीं आल्यास त्याला जास्त सहानुभूति मिळेल व कदाचित् जास्त उपयोगीं पडतां येईल," असे आल्व्हाचे राजाच्या पत्रांत उद्गार निघत होते. ता. १० जूनला मेडीना सीली सुमार चाळीस लहान मोठ्या बोटी बरोबर घेऊन निघाला. या आरमाराबरोबर रोमेरो सुमार दोन हजार स्पॅनिश पायदळ घेऊन आला होता. नेदर्लंडमधील बदललेली वस्तुस्थिति या पाहुण्यांस समजली नसल्यामुळें फ्लशिंगमध्यें कोणत्या प्रकारचें स्वागत मिळणार हें त्यांस अगाऊ समजलें नाहीं. हें आरमार फ्लशिंगजवळ येतांच आघाडीची कांहीं होडगीं बंडवाल्यांनीं मारलीं; त्याचा बोभाट होतांच मेडीना सीलीनें कांहीं भाड्याचीं जहाजें घेऊन मधल्या वाटेनें ब्रुसेल्सकडे पळ काढला. मेडीना सीलीच्या मागोमाग एक लिस्बन येथून जहाजांचा समुदाय येत होता; त्यास बंदरांत येण्याची इषारत करून बंडवाल्यांनीं हीं जहाजें पकडलीं; जहाजें मसाला, जवाहीर, पैका, व मूल्यवान् व्यापाराचे पदार्थ यांनीं ओतप्रोत भरलेलीं होतीं. बंडवाल्यांस आजपर्यंत अशी शिकार कधींच सांपडली नव्हती. पांच लक्ष फ्लोरिन नक्त सांपडले; व या जहाजांवर मिळालेली एकंदर लूट दोन वर्षें लढाई चालविण्यास पुरेल असा अंदाज होता. एक हजार

स्पॅनिश सैनिक व बराच दारूगोळाही शत्रूच्या हातीं लागला. ही अकल्पित वस्तुस्थिति प्राप्त झाल्यामुळें राजसूत्रांचें हस्तांतर करणें जरा विचारावर येऊन पडलें. आल्व्हा व मेडीना सीली बाह्यात्कारी एकमेकांशीं फार अदबीचें भाषण करीत; परंतु त्यांचीं मनें एकमेकांविषयीं मत्सरग्रस्त झालीं होतीं. ता. २४ जून रोजीं सरकारच्या हुकुमावरून हॉलंडची प्रांतिक सभा १५ जुलैस भरविण्याविषयीं निमन्त्रणपत्रिका प्रसिद्ध झाली; त्यांत नेदर्लंडच्या राष्ट्रसभेनें वीस लक्ष फ्लोरीन नक्त देण्याचें पतकरल्यास दहाटक्के कर अजीबात बंद करण्याचा सरकारचा विचार आहे असें जाहिर केलें होतें. राजानें याच सुमारास हा कर तूर्त माफ केला असल्याबद्दल नेदर्लंडच्या वकीलांस कळविलें. हे सामाचे उपाय आल्व्हास फार उशीरा सुचले होते. जुलैच्या ठरलेल्या तारखेस हॉलंडची प्रांतिकसभा भरली; परंतु आल्व्हाच्या निमंत्रणाप्रमाणें हेग येथें भरावयाची ती ऑरेंजच्या विनंतीप्रमाणें डोर्ट शहरीं भरली. ही नेदर्लंडच्या भावी लोकसत्ताक राज्याची पहिली सभा, आल्व्हाची सत्ता प्रसिद्धपणें झुगारून देण्याकरितां जमली होती. राजसत्तेची भाषा कायम राखून ऑरेंजच्या आज्ञेबरहुकूम चालण्याकरितां हे प्रतिनिधि जमले होते. ऑरेंजनें जर्मनींत यावेळीं पंधरा हजार पायदळ, सात हजार घोडदळ व तीन हजार वाळून शिपाई गोळा केले होते. या सैनिकांस पगाराची खात्री मिळाल्यावांचून ते एक पाऊल पुढें टाकीनात. त्यांना आपल्या नांवाचे व हॉलंडपैकीं कांहीं शहरांच्या जामिनकीचे रोखे देण्याशिवाय ऑरेंजपाशीं कांहीं त्राण राहिलें नव्हतें. त्यानें हॉलंडच्या सर्व मोठमोठ्या शहरांच्या प्रजाजनांस या प्रसंगीं फार हृदयद्रावक पत्रें पाठविलीं. "सोनें उराशीं बाळगून तुह्मी, तुमचीं बायकापोरें, व आगामी पिढ्या यांच्या नाशास कारणीभूत होऊं नका; असें केल्यापासून तुमच्या माथ्यावर पापाचा व अपेशाचा घडा फुटेल; व तुमच्या हितार्थ उद्योग करण्यापासून आमचा सर्वस्वी नाश होईल. या वेळीं तुह्मी अंग चोरण्याचा प्रयत्न कराल व आमच्या सैन्याचें काम पुढें चालू न कराल तर इतर राष्ट्रें तुह्मास किती नीच समजतील, ईश्वराच्या दृष्टीनें तुह्मी केवढे गुन्हेगार व्हाल, व कोणत्या प्रकारचें घातक जूं तुह्मी आपण व आपलीं मुलेंबाळें यांच्या मानेवर

निरंतर कायम ठेवाल याचा नीट विचार करा. किंवा यावेळीं आम्हास या स्पॅनिश गिधाडांच्या व शृगालांच्या तावडींतून आपली प्रिय मातृभूमि सोडविण्यास मदत केल्यापासून तुमचे या राष्ट्रावर काय उपकार होतील याचाही योग्य विचार करा!" या व अशाच आशयाचीं पत्रें गांवोगांव गेलीं. त्यांचा लोकांच्या मनावर फार तीव्र परिणाम झाला. ता. १५ जुलै रोजीं बडेलोकांचे व बारा मुख्य शहरचे मुखत्यार डोर्ट येथें जमले. आम्स्टर्डम अद्याप सरकारच्या तावडींतच होतें. ही हॉलंडची लोकसभा होती; परंतु ती राजानें सन १५५९ सालीं नेमलेला सुभेदार ऑरेंज याच्या हुकुमावरून भरली होती. कायदे करण्याचा व राज्यकारभाराचा सर्व अधिकार ईश्वरांशभूत फिलिप राजाचाच आहे हें या हंगामी राज्यव्यवस्थेचें आदितत्त्व होतें. ऑरेंज हा फिलिपचा मुखत्यार, सरदार हे बडेलोकांचे व खेड्यापाड्यांचे मुखत्यार, व शहरांचे प्रतिनिधी हे शहरवासी लोकांचे मुखत्यार याप्रमाणें सर्व दैवी व मानुषी सत्ता या समाजांत एकवटली होती. देशभक्तांची सर्व खटपट आल्व्हा व त्याचा नायबसुभा तांडेल बॉसू यांचें उद्वासन करण्यापुरती होती. पुष्कळ काल-पर्यंत पैसा मिळविण्याकरितां, सैन्य जमा करण्याकरितां, कर गोळा करण्यासाठीं लिहिलेल्या कागदपत्रांवर फिलिपचें नांव आढळून येतें. या सर्व साधनांचा उपयोग मात्र त्याच्याच विरुद्ध होत होता.

ता. १५च्या बैठकींत पॉलबाय याची हॉलंडच्या मुख्य मॅजिस्ट्रेटाच्या जागीं नेमणूक झाली. ता. १८ रोजीं ऑरेंजचा पूर्ण मुखत्यार या नात्यानें महापुरुष आल्डेगोंड याचें सभेंत खुलासेवार व जोरदार भाषण झालें. पूर्वीच्या सालांत राजपुत्रानें लोकांकरितां केलेले यत्न व स्वार्थत्याग यांचें त्यानें लोकांस स्मरण करून दिलें; व सन १५६८ च्या मोहिमेंत ऑरेंजनें केलेले परिश्रम व त्यास एकाही शहराच्या लोकांनीं आश्रा न दिल्यामुळें व कोणत्याही प्रकारें मदत न केल्यामुळें आलेलें अपयश याचेंही दिग्दर्शन केलें. "अशा स्थितींत सुद्धां ऑरेंजचें धैर्य खचलें नाहीं किंवा लोकांविषयीं त्याचे विचार बदलले नाहींत. हल्लीं लोकांचे डोळे उघडले आहेत; व बरींच शहरें त्याच्या बाजूस मिळालीं आहेत. त्यामुळें त्याला मोठा कठिण पेंच येऊन पडला आहे. त्याची सर्व संपत्ति नष्ट

झाली आहे; तथापि त्याच्याकडे दररोज पुन्हां एकवार लोकांचा पुरस्कार करण्याविषयीं असंख्य अर्ज लोटत आहेत त्यांचा त्यास अखेर करवत नाहीं. त्यानें पुन्हां आपल्या आप्तांस व स्नेही मंडळींस भीड घालून एक व्यवस्थित सैन्य तयार केलें आहे. त्या सैन्यास पगार देण्याचा दिवस येऊन पोंहोचला आहे. आतां या परिषदेनें जरूर असलेल्या पैशाची मागणी नाकबूल केल्यास तिच्या डोक्यावर चिरकाल अधमपणाचा टिकला राहील, व या राष्ट्राच्या खांद्यावर निरंतर दुःखाचें ओझें राहील. याकरितां उठा; कंबरा बांधा! तुमच्या शेजारच्या शहरांस जागें करा! आलेली सुसंधि दवडूं नका!" लोकांनीं हें भाषण ऐकतांच थैलीच्या दोऱ्या सोडल्या. आपलें वित्त व जीवित ऑरेंजच्या हवालीं करण्याचा त्यांचा निश्चय झाला. "आमच्या कराचे पैसे वसूल करण्यास कोण हरकती येतात; व इकडे पहावें तर आपलें जीवित व वित्त या बंडवाल्यांच्या स्वाधीन किती तत्परतेनें लोक करीत आहेत. हें पाहून माझें देहभान नाहींसें होतें," असें आल्व्हानें राजास लिहून पाठविलें. या सभेंत असें ठरलें कीं ऑरेंजनें मागणी केलेली रक्कम चालू करांच्या जमेंतून, वर्गण्यांनीं, व श्रीमान् लोक, देवस्थानचे वहिवाटदार व निरनिराळ्या व्यापाऱ्यांच्या जमाती यांजपासून कर्ज काढून, व अंशतः देवळांचें जवाहीर व मूल्यवान् डामडौलाचे पदार्थ यांची विक्री करून तयार करावी. लागलीच सर्व प्रांतांत वर्गणी गोळा करण्यास सुरवात झाली; कित्येक लोकांनीं सोन्यारुप्याचीं भांडीं, जवाहीर वगैरेंचीच वर्गणी दिली. त्या सर्वांची नीट मोजदाद ठेवून सर्वांस मॅजिस्ट्रेटांच्या सहीच्या पावत्या मिळत असत. जिकडे तिकडे लोकांत उत्साहाचें भरतें आलें होतें. आल्व्हाला दशांश देण्यापेक्षां ऑरेंजला सर्व देऊन टाकण्याचा लोकांचा विचार होता. पुढें या सभेनें हॉलंड, झीलंड, फ्रीजूलंड, यूट्रेक्ट प्रांतांचा ऑरेंज हा योग्य राजनियुक्त सुभेदार ठरविला; व राजाच्या गैरहजिरींत, त्यास सर्व नेदर्लंडचा संरक्षक नेमण्याविषयीं इतर प्रांतांसही विनंति करण्याचें ठरविलें. शिवाय राजपुत्र ऑरेंज यांनीं आपणास योग्य दिसेल तो आरमाराधिपति नेमावा; व त्या गृहस्थानें जलप्रदेशांतील कांहीं शहरांचे मुखत्यार मदतीस घेऊन नौकायुद्धाची व्यवस्था ठेवावी,

असा सर्वानुमतें ठराव झाला. खुष्कीवरील युद्धप्रसंगाची सर्व तजवीज डेर्ट, लीडन, एंक्हूझेन या शहरांनीं डीलामार्कच्या सल्लचानें करावयाचें ठरलें. शेवटीं ऑरेंजचा वकील आल्डेगोंड व हॉलंडची प्रांतिकसभा यांच्या दरम्यान असा करार ठरला कीं उभयतांपैकीं कोणीही स्वतंत्रपणें दुसऱ्याच्या सल्लचावांचून व संमतीशिवाय राजाशीं तह करूं नये; नव्या व जुन्या धर्मांच्या लोकांस आपापल्या समजुतीप्रमाणें उपासना करण्यास पूर्ण मोकळीक असावी; व कोणत्याही धर्माच्या उपदेशकांस कसलाही उपसर्ग होऊं नये. इतका कार्यक्रम उरकल्यानंतर डीलामार्क सभेपुढें आला. त्याला ऑरेंजकडून मिळालेलें शासनपत्र वाचून दाखवून मंजूर करण्यांत आलें. त्याला या पत्रांवरून लागेल तितकें सैन्य ठेवण्याचा, प्रजापक्षास येऊन मिळतील त्या शहरांच्या इमानाच्या शपथा घेण्याचा, त्यांत शिबंदी ठेवण्याचा, स्थानिक कायदे व जुने हक्क अमलांत आणण्याचा, धर्मस्वातंत्र्य राखण्याचा, जप्त केलेली मिळकत परत देण्याचा, व मसलतदार लोकांच्या विचारानें अनुकूल असतील ते मॅजिस्ट्रेट कायम करण्याचा व प्रतिकूल असतील ते काढून टाकण्याचा, वगैरे अधिकार दिले होते. या नवीन राज्यव्यवस्थेंत ऑरेंजला एकछत्रीसत्ता प्राप्त झाली होती. परंतु त्याचें लक्ष आपल्या बडेजावीकडे नव्हतें. पांच वर्षें सतत लोकांचीं डोकीं कापून व घरेंदारें जाळून ज्या दुष्टानें सर्व देश बेचिराख केला होता त्याच्या तावडींतून व परदेशी सैन्याच्या कचाटींतून आपल्या जन्मभूमीस सोडविण्याच्या प्रयत्नांत त्याचें मन गुंग झालें होतें. त्यानें आपली खरी इच्छा दर्शविण्याकरितां या राज्यव्यवस्थेच्या यादींत आपण लोकसभेच्या संमतीवांचून कोणतीही गोष्ट करणार नाहीं असें उघडपणें लिहून ठेविलें; सर्व सार्वजनिक वसूल ताब्यांत ठेवण्याकरितां लोकांनीं आपले खजिनदार नेमावे व सर्व लष्करी अंमलदारांनीं सुभेदार व प्रांतिकसभा यांजपाशीं इमानानें व आज्ञेप्रमाणें वागून परकीयांचा जुलूम नाहींसा करण्याच्या कामीं मनोभावानें झटण्याविषयीं शपथा घ्यावा असें ठरलें. या संस्थानिकानें अनियंत्रितसत्ता हातीं आली असतां केलेली ही राज्यव्यवस्था त्याचें शहाणपण व निरपेक्षबुद्धि या दोहोंची पूर्ण साक्ष देत होती.

इकडे हेनो प्रांतांत लढाई जोरानें सुरू झाली होती. मॉन्स शहर हातीं

येतांच जास्त कुमक मिळविण्याकरितां लुईनें जेन्लीसला फ्रान्समध्यें पाठविलें. डॉन फ्रेडरिकनें वेढा गटून दिला होता; व शहराबाहेर कडाक्याच्या चकमकी दररोज झडत होत्या. लुईनें मोठ्या शौर्यानें मिळविलेलें हें ठिकाण वेळेवर मदत न येऊन पोंहोचल्यास त्याला पचेल असें दिसेना. इतक्यांत जेन्लिस फ्रान्समधून दहा हजार सैन्य घेऊन आल्याची बातमी पसरली. लुईस हें सैन्य हेनोमध्यें आल्याची बातमी समजतांच फार विचारपूर्वक पुढें पाऊल टाकावें व कोणत्याही कारणावरून ऑरेंजचें सैन्य येऊन पोंहोचण्यापूर्वीं शहरांत कुमक पाठविण्याचा यत्न करूं नये, असा त्यानें जेन्लीसला निरोप पाठविला. जेन्लीसला आपल्या यशांत कोणी वांटेकरी नसावा अशी हांव होती व अंगांत रगही बरीच होती. सरहद्द ओलांडून तो थेट मॉन्सपासून दोन योजनावर एका वर्तुळाकृति व विस्तीर्ण मैदानावर तळ देऊन राहिला. स्पॅनिश सेनानीला त्याच्या हालचालीची अचुक बातमी होतीच; ता. १९ जुलै रोजीं डॉन फ्रेडरिकच्या सैन्यानें त्यास घेरलें. शत्रूचा मोठा जमाव असल्याचा पुकारा ऐकूनच जेन्लीसचें सैन्य भयाभीत झालें. न्वार्कार्मिजच्या घोडेस्वारांच्या हल्ल्यांत व मागून पायदळाच्या माऱ्यांत त्यांचा सर्वस्वी नाश झाला. स्पॅनिश सैन्यापैकीं फार थोडे लोक या रणभूमीवर पडले. या जयानें फ्रेडरिकची फार कीर्ति झाली. जेन्लिस शत्रूच्या हातीं सांपडला. त्याचा आल्व्हानें कांहीं महिन्यांनीं गुप्त रीतीनें वध करविला. राहिलेसाहिलेले बंडवाले आसपासच्या शेतकऱ्यांच्या फांसांत सांपडून मेले. या सैन्यापैकीं फक्त शंभर लोक मॉन्स शहरांत गेले. ता. ७ जुलै रोजीं ऑरेंज सैन्यासह ऱ्हाईन नदी उतरला. ता. २३ ला त्यानें रोर्मांड घेतलें. या ठिकाणीं त्याच्या भाडोत्री सैन्यानें पुष्कळ गैरशिस्त प्रकार केले. त्यांच्यावर त्याचा विशेष सक्तीचा अंमल चालेना. मॅक्सिमीलियन बादशहानें पुन्हां ऑरेंजला ताकीद केली; ऑरेंजनें तरवारीशिवाय नेदर्लंडला तरणोपाय राहिला नाहीं असें त्यास निर्वाणीचें उत्तर पाठविलें. रोर्मांड येथें त्याच्या सैन्यास पगाराचे हवाले मिळेपर्यंत मुक्काम करावा लागला. ता. २७ आगष्ट रोजीं म्यूज ओलांडून फेऱ्याच्या वाटेनें डीस्ट, टर्लेमॉन, सीशेम, लुव्हेन, मेलिन, टर्मांड वगैरे शहरांवरून तो पुढें चालला. वाटेंत पुष्कळ शहरांनीं व गांवांनीं त्याचा

हुकूम बंद केला व त्याची शिबंदी घेतली. मेलिनवर आल्व्हाचा विशेष दांत बसला. लुव्हेन शहरानें पन्नास हजार ड्यूकट देऊन त्रयस्थवृत्ति स्वीकारिली. ब्रुसेल्स शहर कांहीं केल्या वश होईना. बहुतेक शहरें आपोआप व उत्साहानें ऑरेंजच्या बाजूस मिळालीं. या वेळीं एक अकल्पित धरणीकंप झाला नसता तर त्याच्या मोहिमेचा कांहीं निराळाच परिणाम झाला असता. ईश्वर व आपला दृढनिश्चय यांशिवाय त्याची मुख्य भिस्त फ्रान्सच्या मदतीवर होती. जेन्लीसची वाट लागली, तथापि फ्रेंचसरकारचीं त्यास आश्वासनें चालू होतींच. जेन्लीसपाशीं फ्रान्सच्या राजाचीं लुईला आलेलीं पत्रें सांपडलीं; त्यांत राजाचें त्यास मनोभावानें व आपलें सर्व सामर्थ्य खर्च होईपर्यंत नेदर्लंडला स्पॅनिश जुलुमांतून सोडविण्यासाठीं मदत देण्याचें अभिवचन होतें. ता. ११ आगष्ट रोजीं राजाच्या हुकुमावरून नेदर्लंडकडे निघाल्याबद्दल कॉलिनीची पुढें सूचना आली. ता. २६ रोजीं पारिसमध्यें विवाहाच्या समारंभास विश्वासानें बोलावून कॉलिनी व त्याचे नवीनधर्मी हजारों अनुयायी यांची राजानें कत्तल उडविली. ऑरेंजला ही बातमी वाटेंत समजली; ती समजतांच त्याची कंबर खचली व त्याच्या मोहिमेचा परिणाम त्यास समजला.

पारिसमधील या अघोर कृत्यांत स्पॅनिशसरकारचें अंग नव्हतें. आल्व्हानें नवीनधर्मी लोकांचा उच्छेद करण्याची कल्पना पुढें आणिली त्या वेळीं फ्रान्सच्या राजमातेनें त्याचा निषेध केला होता. त्याच मेडीना सीलीनें आपल्या भोळसर मुलाकडून आज हें अनन्वित कृत्य करविलें. ज्या राजानें नेदर्लंडमधील प्रॉटेस्टंटधर्मी लोकांस मदत करण्याचें आश्वासन लुईला दिलें, व कॉलिनीच्या सल्ल्यानें नेदर्लंडमध्यें जेन्लीस व लानू यांजबरोबर लष्करही पाठविलें, त्याच नवव्या चार्लसनें आपल्या राज्यांतील प्रॉटेस्टंट प्रजेची भयंकर कत्तल केली. रविवारपासून मंगळवार-पर्यंत फ्रान्समध्यें एकंदर एक लाख ह्यूजेनॉट लोक बळी पडले असावे असा अंदाज आहे. यूरोपांतील प्रॉटेस्टंट लोक भयानें चकित झाले. इंग्लंडच्या राणीनें सुतकाचा पोषाक घातला. पोपच्या दरबारांत मात्र आनंदाचा पूर लोटला. सर्वांत अतिशय आनंदाचें भरतें या समयीं फिलिपला आलें. त्यानें आपले सर्व धर्मशासक जमवून फ्रान्सच्या

राजाचा गौरव केला; आपल्या दरबारीं असलेल्या फ्रेंच वकीलामार्फत त्यास अभिनंदनपर पत्रें पाठविलीं. नेदर्लंडच्या बंडवाल्यांशीं सदा कारस्थान करणारा फ्रान्सचा राजा या अघोर कृत्यामुळें अर्थातच फिलिपचा दोस्त झाला; व फिलिपपेक्षांही जास्त नीच मुकुटधारी राजा ख्रिस्ती राष्ट्रांत आहे हें सर्व जगास महशूर झालें. फिलिपनें आल्व्हास या आनंदाच्या प्रसंगीं पत्र पाठविलें. फ्रान्सचा वकील, जेन्लीस व मॉन्समध्यें युद्धांत पकडलेले फ्रेंच लोक यांचा तावडतोब वध करावा असें आग्रहपूर्वक सुचवीत होता. या लोकांपाशीं सांपडलेल्या कागदपत्रां-वरून फ्रान्सच्या राजाचें दुटप्पी कारस्थान चांगलेंच उघडकीस आलें होतें. तथापि नेदर्लंडमधील फ्रेंच वकीलाला त्यानें असें लिहिलें कीं जेन्लीसबरोबर केलेला व्यवहार केवळ त्या लोकांना फसविण्याकरितां आह्मीं केला होता. याबरोबरच मॉन्शूर मॉंडूसे यांस ऑरेंजशीं नेहमीं गुप्त रीतीनें पत्रव्यवहार ठेवण्याविषयीं या मातृबुद्धि राजानें लिहिलें होतें. मॉन्ससमीप तळ देऊन राहिलेल्या सैन्यास ही वार्ता ऐकून नेदर्लंडमधील बंडवाले व त्यांचा समूळ नाश यांच्या दरम्यान राहिलेला एकच मजबूत कोट हवेंत उडून गेल्याचा निरतिशय आनंद यावेळीं झाला. स्वामी ग्युडूलच्या देवालयांत उत्सव, दीपोत्सव, तोफांची सरबत्ती, रणवाद्यांचा गजर यांनीं हा सुदिन साजरा करण्यांत आला. गांवांतील ह्यूजेनॉट लोकांस ही सुवार्ता तावडतोब कळविण्याची तजवीजही या लोकांनीं मुद्दाम केली. नवव्या चार्लसला फ्रेंच कैदी जिवंत असेपर्यंत चैन पडेना व आल्व्हाला हें काम एकदम उरकून टाकण्याचें धैर्य होईना. "मॉन्स शहरचे दांत फार तीक्ष्ण आहेत," असें तो ह्मणे. कांहीं खंडणी घेऊन जेन्लीस वगैरे अंमलदारांस मॉन्समधील दरोबस्त फ्रेंचलोकांसह निघून जाण्याची परवानगी दिल्यास सहज रीतीनें शहर हस्तगत होईल असें आल्व्हास वाटूं लागलें.

(बार्थोलोम्यूची प्रसिद्ध कत्तल)

अशा स्थितींत ऑरेंज परान येथें येऊन पोंहोचला. स्पॅनिश सैन्यास स. सीली, आल्व्हा, धर्माध्यक्ष कोलोन वगैरे मंडळी येऊन मिळाली होती. आल्व्हाला गोटाबाहेर काढून निकराची लढाई दिल्याखेरीज देशभक्तांस

मॉन्समध्यें कुमक पोंहोचविणें शक्य नव्हतें. आल्व्हा विनाकारण लढाई देऊन आपणावर नसतें संकट ओढून घेण्याइतका कच्चा नव्हता. ऑरेंजचें घोडदळ मातब्बर असल्याचें त्यास समजलें होतें. मॉन्सशहरांत सांपडलेले ह्यूजेनॉट लोक अगदीं निराश होऊन बिथरले होते; लुई नॅसा विषम-ज्वरानें आंथरुणांत तडफडत पडला होता; जेन्लीस अटकेंत होता, व त्याच्या सैन्याचा निकाल लागला होता; कॉलिनीचा खून झाल्यामुळें फ्रान्समधील प्रॉटेस्टंट लोक लंगडे झाले होते; ऑरेंजच्या सैन्याची नोकरीची मुदत संपल्यामुळें तें आतां बंड करण्याच्या बेतांत होतें; सन १५६८ सालापेक्षां सध्यां बंडवाल्यांची दुःस्थिति स्वस्थपणें बसून पाहणें विशेष फायद्याचें होतें. दोन्ही सैन्यें एकमेकांपासून, अर्धयोजन अंतरावर तळ देऊन होतीं. ता. १२ सप्टेंबर रोजीं रात्रौ डॉन फ्रेडरिकनें बंडवाल्यांवर छापा घातला. सुमार सहाशें बंदुकवाले बरोबर घेऊन रोमेरोनें शत्रूच्या गोटांत प्रवेश केला. दोन तासपर्यंत निजलेल्या बंडवाल्यांची स्पॅनिश सैन्यानें कत्तल चालविली होती. रात्रीच्या काळोखांत बंडवाल्यांस शत्रूच्या बलाचा अदमास होईना, व शत्रू व मित्र यांतील भेदाभेद समजेना. कांहीं साहसी स्पॅनिश लोकांनीं ऑरेंजच्या तंबूपर्यंत धांव घेतली. पहारेकरी सर्व गाढ झोंपेंत होते त्यांचा स्पॅनिश लोकांनीं शिरच्छेद केला. ऑरेंज या प्रसंगीं शत्रूच्या ताब्यांत सांपडावयाचा, परंतु नेदर्लंडराष्ट्राचें नशीब शिकंदर; शत्रूची चाहूल कानीं पडतांच ऑरेंजच्या आंथरुणावर निजलेला स्पॅनिश कुत्रा जागा होऊन त्यानें आपल्या निजलेल्या धन्याच्या तोंडावर पंज्यानें ओरबडून त्यास जागें केलें; जवळ उभा असलेल्या घोड्यावर बसून पळ काढण्यापुरताच अवकाश राहिला होता. ऑरेंजची पाठ वळतांच शत्रूंनीं तंबूंत शिरून ऑरेंजचे खिदमतगार व चिटणीस यांस कापून काढिलें. या दिवसापासून मरेपर्यंत ऑरेंज रात्रंदिवस एक स्पॅनिश कुत्रा बरोबर बाळगीत असे. स्पॅनिश लोकांनीं अविचारानें तंबूस आग लावतांच त्यांची खरी संख्या शत्रूस समजली. या रात्रींत सुमार हजार पंधराशें बंडवाले मृत्युमुखीं पडले. स्पॅनिश-सैन्यापैकीं साठ लोकांचा पत्ता लागला नाहीं. दुसरे दिवशीं ऑरेंजनें घेरोनकडे पाठ वळविली. त्याच्या मागोमाग हीस्टनामक मारेकरी आल्व्हानें

मोठ्या बक्षिसाची आशा दाखवून त्याला मारण्याकरितां पाठविला होता, परंतु त्याची कामगिरी सफल झाली नाहीं. ऑरेंजचे भाडोत्री सैनिक काहूर करूं लागले. ही स्थिति पाहून ऑरेंजनें होईल तितक्या सवलती मिळवून शत्रूस शरण जाण्याचा उपदेश लुईला लिहून पाठविला व आपण ऱ्हाईनकडे परत कूच केलें. लुईला अशा स्थितींत सोडून जाणें त्याच्या जिवावर आलें होतें. परंतु त्याच्या सैन्यांत बंड उद्भवलें व त्याच्या हाताखालच्या अंमलदारांनीं मध्यस्थी केली नसती तर त्या बेफाम झालेल्या सैन्यानें त्याचा जीव घेतला असता. ऱ्हाईनच्या पलीकडे उतरून त्यानें सैन्यास निरोप दिला व तो एकटा हॉलंडमध्यें परत आला. तो लुईला मदत करण्याकरितां निघाला त्या वेळची वस्तुस्थिति आतां सर्वस्वी बदलली होती; त्यामुळें त्याला अनुकूल झालेलीं सर्व शहरें त्याची सावली पाहून दूर पळूं लागलीं. परंतु त्याची स्वतःविषयीं खात्री व ईश्वरावर भरंवसा तिळमात्र कमी झाला नाहीं. हॉलंडचा त्याच्यावर अद्याप पूर्ण विश्वास होता. "तेथेंच मी आपला देह सांडीन," असें त्यानें भावास लिहिलें.

इकडे लुई भयंकर तापाच्या वेदनेंत आंथरुणावर पडला होता. त्याचे अनुयायी, चार्लस व ऑरेंज यांच्या मदतीची आशा संपल्यामुळें शहराचें संरक्षण करण्यास हयगय करूं लागले. आल्व्हानेंही फारच योग्य सवलती देऊं केल्या. लुईला जास्त वेळ टिकाव धरण्याचें सामर्थ्य उरलें नव्हतें. ता. १९ सप्टेंबरला डीलानू व न्वार्कार्मीज यांच्या दरम्यान शरणपत्र झालें. शहर आल्व्हाच्या स्वाधीन करावयाचें ठरलें; परंतु आंतील शिबंदीस हत्यारेंपात्यारें व मालमिळकत घेऊन जाण्याची परवानगी मिळाली. प्रजापक्षाच्या लोकांनीं व नवीनधर्मी लोकांनीं इष्ट असल्यास या सैनिकांबरोबर निघून जावें; फ्रेंच सैनिकांनीं स्पेनच्या अगर फ्रान्सच्या राजाविरुद्ध शस्त्र धारण करूं नये ( या अटींतून लुई, इंग्लिश व जर्मन शिपाई वगळले होते ) वगैरे कलमें ठरून उभयतांनीं तीं पाळण्याबद्दल ओलीस पाठविले. लुई स्पॅनिश सेनापतींच्या आग्रहावरून त्यांस भेटण्याकरितां त्यांच्या डेऱ्यांत गेला; या वेळीं स. सीली, आल्व्हा वगैरे लोकांनीं त्याचा फार गौरव केला. शहरांतून जाते वेळीं डॉन फ्रेडरिकनें आपल्या मोर्चापाशीं त्याचा रथ थांबवून त्याचा बहुमान केला. ता. २१ रोजीं लुई

व तत्पक्षीय लोक यांनीं मॉन्सशहर सोडिलें. ता. २४ रोजीं आल्व्हानें शहरांत प्रवेश केला. शहरवासी लोकांचीं बहुतेक स्वयंसेवक दळें शिबंदीबरोबर बाहेर निघून गेलीं; यांपैकीं जे लोक आपल्या कुटुंबांचा निरोप घेण्याकरितां दोन दिवस मागें राहिले त्यांना कारागृहवास प्राप्त झाला. व्हॅलेन्सिनीज येथें कसाईगिरी केलेला न्वार्कार्मीज आतां मॉन्स-शहरांत दाखल झाला. त्यानें या प्रसंगीं केलेल्या कृत्यांमुळें त्याच्या नांवास निरंतरचा कालिमा लागला आहे. हेनोप्रांताचा पूर्वापार मुशरीफ या नात्यानें त्यानें मॉन्सशहरांत "यमासनाच्या" नमुन्यावर एक हंगामी न्यायसभा निर्माण केली व या सभेच्या मदतीनें खून व दरवड्यांस सुरवात केली. प्रथम सर्व स्वयंसेवक दोषी ठरवून त्यांस फांशीची व त्यांच्या बायकामुलांस हद्दपारीची शिक्षा फर्माविण्यांत आली; व त्यांची सर्व मालमत्ता सरकारांत जप्त झाली. ता. १५ दिसेंबरपासून शिक्षेचा अंमल सुरू झाला. डीलिस्टी नामक एका शूर देशभक्ताची प्रथम पाळी आली. हा स्वयंसेवकांच्या एका दळाचा नायक होता. त्याला असिधारा-मरण मिळालें. त्याच्यामागून दुसऱ्या लोकांची मालिका लागली. कित्येकांस फांस, कित्येकांस कुऱ्हाड व कित्येकांस अग्निकुंड हे यम-लोकास पोंहोचविण्यास साधनीभूत झाले. ज्यांनीं ज्यांनीं शस्त्र धारण केलें होतें, अगर तटबंदीचें वगैरे काम केलें होतें, त्यांस लुईशीं झालेला करार धाब्यावर बसवून ठार करण्यांत आलें. ज्यांनीं कॅथोलिकधर्म शेवटीं स्वीकारला नाहीं त्यांस होमकुंडांत शुद्धि मिळाली. कोणी उपवासाच्या दिवशीं मांस भक्षण केलें ह्मणून तर कोणी आपल्या नातेवाइकांस स्वयंसेवक होऊं दिल्याबद्दल शिक्षेस पात्र ठरत होते. कांहींच दुसरी तोहमत न सांपडल्यास बंडवाल्यांविषयीं किंवा नवीनधर्मी लोकांविषयीं अनुकूल ग्रह असल्याबद्दल संशय हाच शिक्षेस योग्य कारण होत असे! दहा, बारा, वीस लोक एका दिवसांत जाळीत अगर तोडून टाकीत. छिन्नभिन्न प्रेतांनीं भरलेले वधस्तंभ शहरच्या रस्त्यांतून जागोजाग दृष्टीस पडत होते; तथापि न्वार्कार्मीज आपल्या दूतांना जास्तच उत्तेजन देत होता. धर्मवेड अगर राजकीय द्वेष हे या नराधमाचे मुख्य हेतु असते, तर त्याच्या कृत्यांबद्दल इतका त्वेष अगर तिरस्कार

लोकांस वाटली नसता. परंतु त्याचा सर्व उद्योग सुवर्णप्राप्तीकरितां होता. श्रीमान् लोकांच्या फांशीच्या हुकुमावर सही होतांच त्यांची मिळकत आपल्या घरीं पोंहोचविण्याविषयीं त्याचे हुकूम सुटत. या मिळकती ग्वार्कामीज बहुतांशीं आपल्याच उपयोगास लावीत असे. त्यांपैकीं ठरलेला अंश त्याच्या हाताखालच्या लोकांस न मिळाल्यामुळें त्यांच्या तकरारी वारंवार वरील अधिकाऱ्याकडे जात. या लोकांस देखील या दुष्ट कृत्यांचा शेवटीं कंटाळा येऊन ती बंद करण्याविषयीं त्यांनीं ग्वार्कामीजला विनंति केली. परंतु ग्वार्कामीजचा निश्चय कांहीं केल्या बदलेना. याप्रमाणें दररोजचा कारखाना कित्येक महिनेपर्यंत चालला होता. ता. २७ आगष्ट सन १५७३ पर्यंत मारेकऱ्यांस फुरसद मिळाली नाहीं. आल्व्हाच्या मागून आलेला सुभेदार रिकसन्स यानें तुरुंगाचीं दारें खुलीं केलीं त्यावेळीं पाऊणशें लोक मरणाची वाट पहात बसलेले आढळले.

मॉन्स स्पॅनिश लोकांच्या हातीं येतांच दक्षिण नेदर्लंडांतील बंडाचा शेवट झाला. ही किल्ली हातांत येतांच ब्राबंट व फ्लँडर्झ प्रांतांतील सर्व शहरांचे दरवाजे खुले झाले. नुकतींच ऑरेंजच्या सत्तेखालीं गेलेलीं शहरें पूर्वीप्रमाणें भित्रेपणानें वरकरणीं राजाच्या आश्रयाखालीं गेलीं. मेलिन-खेरीज बाकी सर्व शहरांच्या शपथा मान्य करून त्यांस आल्व्हानें माफी केली. मेलिनला मात्र मासलेदार शासन करण्याचा त्याचा निश्चय ठरला. स्पॅनिश सैन्याची फार दिवसांची बाकी थकली होती; त्यांची बाकी चुकती करण्यासाठीं व या शहरावर ईश्वरी क्षोभ येणार असें आपलें भाकित खरें करण्याकरितां मेलिन शहर आल्व्हानें हापापलेल्या आपल्या सैन्याच्या स्वाधीन केलें. पहिल्या दिवशीं डॉन फ्रेडरिक वेशीजवळ गेला त्यावेळीं शहरांतील कांहीं वेडप्या लोकांनीं बंदुकीचे बार केले; त्यामुळें आल्व्हाचा क्रोधाग्नि विकोपास गेला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं शहरांतुन पाद्री लोक व भगवीं निशाणें पुढें करून शहरवासी लोकांचा समुदाय अनुतापसूचक पदें म्हणत स्पॅनिश छावणीकडे जाण्याकरितां शहराबाहेर आला. इकडे स्पॅनिश सैन्यानें वेशी फोडून व तटावर चढून शहरांत प्रवेश केला. लागलीच लूट सुरू झाली. शत्रू व मित्र, पोपधर्मी व सुधारक सारखेच रगडले गेले. "शहरांतील कोणत्याही इमारतीची एक कुर्णी सुद्धां

जाग्यावर राहिली नाहीं. " एकूण एक देवळें, मठ, प्रार्थनामंदिरें लुटलीं गेलीं; त्यांतील सोन्यारुप्याचीं उपकरणें, जरीचीं व रेशमाचीं वस्त्रें, प्रावरणें, जवाहीर वगैरे मूल्यवान् पदार्थ स्पॅनिश सैनिकांनीं यथेच्छ उचलले; तेथील पवित्र वस्तु पायानें तुडवून त्यांचा विध्वंस केला. सन १५६६ त मूर्तिभंजकांनीं रागाच्या झटक्यांत जे अपराध केल्याबद्दल त्यांचे थवेच्या थवे होळींत प्राणास मुकले, त्यांच्या सहस्रपट अधर्म या कॅथोलिकधर्माची बाजू राखण्याकरितां मुद्दाम आलेल्या कॅथोलिकधर्मी शिपायांनीं मेलिनच्या कॅथोलिक देवळांत केले; आणि तेही केवळ द्रव्याच्या आशेनें. ग्रॅन्व्हिलच्या घरावर या सैनिकांनीं हात मारला; धर्मार्थ फंड मठांच्या तिजोरींत होते त्यांचाही त्यांनीं अपहार केला; गुप्त ठेवी उकरून काढण्याकरितां अजारी व मरणोन्मुख झालेले लोक या नीचांनीं बिछान्यावरून ओढओढून काढले; जेथें सांपडेल तेथें मनुष्य मारण्याचा व स्त्रिया बाटविण्याचा क्रम त्यांनीं चालविला होता. हीं कृत्यें फ्रेडरिक व न्वार्कार्मीज यांच्या देखरेखीखालीं चाललीं होतीं. तीन दिवस खून, बलात्कार व लूट यांचा कहर उडाला होता. पहिला दिवस स्पॅनिश शिपायांच्या वांटणीचा होता व पुढचे दोन वालून व जर्मन सैनिकांकरितां तोडून दिले होते.

---

# भाग ९ वा.

## इ. स. १५७२–७३.

टर्गोचा वेढा व मुक्तता—नार्डेनचा खाटिकवाडा—हार्लेमचा वेढा—तोफांचा भडिमार व हल्ला—धक्के फोडण्याचा यत्न—आरमारांचें युद्ध—तलावांतून हकालपट्टी—शरण—सूड—आल्कामारचा वेढा—हल्ला व जलप्रलय—स्पॅनिश सैन्याचें प्रयाण—लुई, फ्रान्स व स्पेन यांचीं कारस्थानें—ऑरेंजचें आहिरविनंतीपत्र व दुसऱ्या खटपटी—झुडरझीच्या आखातांत नौकायुद्ध—आल्व्हचें स्वदेशगमन.

ब्राबंट व फ्लँडर्स या प्रांतांनीं नुकत्याच तोडून टाकलेल्या शृंखला पुन्हां त्यांच्या पायांत पडल्या. उत्तरेकडे झीलंड प्रांतांतही राजपुत्र ऑरेंजचे बेत विशेष फलद्रूप होण्याचा रंग दिसत नव्हता या चिर-

स्मरणीय सन १५७२ सालीं ऑरेंजप्रभृति देशभक्तांस ज्या निरनिराळ्या अवस्था भोगाव्या लागल्या, तसे प्रारब्धाचे बांकडे व विपरीत फेरे कोणाच्याही अनुभवास आले नसतील. वालचरन् बेटावर मिडल्बर्ग व अर्नेम्यूड हीं शहरें अद्याप राजपक्षाकडे होतीं; कँपव्हीर व फ्लशिंग ऑरेंजचा हुकूम मानीत होतीं. दक्षिण बीव्हलंड बेटावरील महत्वाचें ठिकाण टर्गो यांत अद्याप सरकारची स्पॅनिश शिबंदी होती. हें ठिकाण हातीं पडल्यावांचून मिडलबर्ग बंडवाल्यांस मिळणें दुरापास्त होतें; हीं दोन गांवें हस्तगत झाल्यावर मात्र सर्व वाल्चरन् बेट व झीलंड प्रांत त्यांचाच होता. वाल्चरन् बेटावर झीरार्टस हा ऑरेंजचा मुख्य सेनापति होता. हा अधिकारी शूर व धैर्यवान होता; परंतु वजनदार व यशस्वी नव्हता. त्यानें मिडलबर्गला वेढा दिला, तो फसला; टर्गो शहराला त्यानें वेढा दिला तेथूनही अपेश घेऊन त्याला माघार खावी लागली; तेथून फ्लशिंगला परत आल्या वेळीं तेथील ऑरेंजपक्षीय लोक सुद्धां त्या हतभागी सेनानीला शहरांत घेईनात. येथवर मिळालेलें अपयश धुवून काढण्याचा निश्चय करून त्यानें सात हजार सैन्य जमविलें व पुन्हां टर्गो शहराकडे चाल करून ता. २४ आगष्ट रोजीं त्या शहरास वेढा दिला. शहरांत सरकारची शिबंदी फार थोडी होती; तिचा उच्छेद झाल्यास स्पॅनिश लोकांच्या हातांतून सर्व झीलंड प्रांत जाण्याचा समय असल्यामुळें आल्व्हानें अँटवर्पचा सेनानी डव्हिला यास टर्गो शहरांत तावडतोब कुमक पोंहोचविण्याचा हुकूम केला. समुद्रावरून व खुष्कीनें या ठिकाणीं कुमक पोंहोचविण्याबद्दल पुष्कळ यत्न झाले, परंतु ते सर्व व्यर्थ गेले. झीलंडच्या लोकांनीं आपल्या आरमारानें समुद्र व्यापला होता व त्यांस त्या प्रदेशांतील लहानलहान खाड्या व आखातें यांची पूर्ण माहिती असल्यामुळें त्यांच्यापुढें शत्रूंचें कांहीं चालेना. दोहोंमार्गानें निराश झाल्यावर स्पॅनिश लोकांनीं एक तिसराच, धड समुद्र नव्हे, धड भूमि नव्हे, असा मार्ग काढून या महायुद्धाच्या इतिहासांत अपूर्व असा एक शौर्याचा प्रसंग घडवून आणिला. शेल्ड नदी समुद्रास मिळण्यापूर्वीं तिच्या दोन शाखा झाल्या आहेत व या दोन प्रवाहाच्या दरम्यान झीलंड बेटाचा समुदाय आहे. यापैकीं दक्षिणबीव्हलंड बेट सुमारें पन्नास वर्षांपूर्वी समुद्राचें पाणी

झावंट प्रांतांत शिरून झावंटपासून तुटक झालें. या वेळीं या बेटाच्या दक्षिणेकडे निर्माण झालेल्या सामुद्रधुनीस "मग्न देश" अशी संज्ञा मिळाली. ओहटीच्या वेळीं या सामुद्रधुनींत तीन चार हात खोल पाणी असे; तळाची जमीन रेताड व दग्याची होती. एक दोन खाड्या व प्रवाह यांचें पाणी या धुनींत पडत असे. तथापि माहितगार व अनुभवी वाटाड्याच्या सहाय्यानें ओहटीच्या वेळीं ही उतरून जातां येत असे. भरतीच्या वेळीं पाणी दोन पुरुषापर्यंत चढत असे. कप्तान प्लोमार्ट या फ्लेमिश वीरानें दोन शेतकरी बरोबर घेऊन दोनदां या कठिण व घातक रस्त्यानें पैलतीरावर जाऊन, या सामुद्रधुनींतून उतरून जातां येईल अशी स्वतःची खात्री करून घेतली. दोन्ही तीरांच्या दरम्यानचें अंतर सुमार दह मैल होतें. आपली खात्री झाल्यावर स्पॅनिश सेनापति मॉंड्रेगॉन यांजपुढें त्यानें आपला बेत मांडिला. या शूर वृद्ध सेनानीनें स्वतः हा मार्ग तपासून व डव्हीलाशीं या गोष्टीची वाटाघाट करून ही सूचना मोठ्या उत्सुकतेनें मान्य केली. स्पॅनिश, वालून व जर्मन मिळून तीन हजार सैनिकांस तावडतोब गुप्त रीतीनें बर्गेन येथें जमण्याचा हुकूम झाला. हिंवाळ्याचे दिवस होते तथापि हवा सौम्य होती. ता. २० ऑक्टोबर रोजीं मॉंड्रेगॉननें या शूर सैनिकांस योजिलेलें धाडसाचें कृत्य व टर्गो शहराचें महत्व समजून सांगतांच त्यांच्या अंगीं अतोनात स्फुरण चढलें. ओहटीची वेळ येतांच प्लोमार्ट व त्याचे वाटाडे पुढें, त्यांच्या मागून वृद्ध मॉंड्रेगॉन, व त्याच्या मागून शिपायांची एकेरी फाइल पाण्यांत शिरली; प्रत्येक शिपायाच्या डोक्यावर एक बिस्कुटें व दारुसामान यांनीं भरलेलें पोतें होतें; पाणी गळ्याइतकें होतें; दहा मैलांचा पट्टा भरतीच्या अगोदर ह्मणजे सुमार सहा तासांत तुडवून जावयाचा होता; चिखलांत पाय टिकेना; लाटांच्या जोरामुळें पाऊल सरळ पुढें पडेना; अशा या लाटांशीं झगडत, कचित् प्रसंगीं पाणी जास्त झाल्यास पोहत मध्यरात्रीच्या काळोखांत हे शूर व धाडशी लोक चिखलांतून व पाण्यांतून पांच तास मार्गक्रमण करीत होते. निमी भरती येण्याच्या अगोदर व सूर्योदयाच्या पूर्वीं ते कोरड्या जमिनीवर दाखल झाले. फक्त नऊ इसम पाण्यांत दगावले. जमिनीवर पाय ठेवतांच या लोकांनीं डव्हीलाला बातमी पोंहोचण्याकरितां पूर्वीं ठरल्या-

प्रमाणें आगी पेटविल्या. नंतर कांहीं वेळ विश्रान्ति घेऊन सूर्योदय होतांच हें सैन्य टर्गोकडे निघालें. टर्गो येथून सुमारें बारा मैल अंतरावर होतें. एक स्पॅनिश सैन्य समुद्रांतून आलें आहे अशी बातमी ते कुच करीत असतां त्यांच्या पुढें गांवोगांव पसरत चालली होती. बंडवाल्यांचें सैन्य मोठें होतें, तथापि तें अगदीं भयचकित झालें व तत्काल चोहोंकडे सैरा-वैरा पळूं लागलें. झीरार्ड्सनें शत्रूंशीं सामना करण्याविषयीं केलेली विनंति कोणी मान्य करीना. बंडवाल्यांच्या सैन्यानें समुद्रांत नांगर टाकून पडलेलीं जहाजें गांठलीं. त्यांचा शत्रूंनीं मोठ्या त्वरेनें व वेगानें पाठ-लाग केला व त्यांच्या पिछाडीवरील संरक्षकांची फार खराबी केली. टर्गो शहरांत कुमक पोंहोचवून मॉड्रेगॉन ब्रावंट प्रांतांत परत आला.

उत्तरेकडील व पूर्वेकडील प्रदेशांत स्थिरस्थावर करण्याचें काम डॉन फ्रेडरिककडे होतें. अलीकडे ऑरेंजच्या पक्षास मिळालेल्या शहरांपैकीं कोणत्याही शहरानें त्याला निरोध केला नाहीं. झुट्फननें मात्र राजाच्या सैन्यास शहरांत येण्यास थोडा प्रतिबंध केला; त्याबद्दल त्यास शासनही कडक मिळालें. आल्व्हानें असे हुकूम पाठविले कीं, झुट्फनमध्यें एक प्राणी जिवंत ठेवूं नये व एकूण एक घरें जाळून जमीनदोस्त करावीं. डॉन फ्रेडरिक झुट्फनमध्यें शिरतांच त्यानें सर्व शिबंदी प्रथम कापून काढिली; नंतर अनाथ शहरवासीजनांकडे त्यानें दृष्टि फेकिली. कित्येक लोक रस्त्यांतच कापले गेले; किंवा शहरच्या रस्त्यांवरील झाडांवर फांशीं देण्यांत आले; कांहीं लोकांस नग्न करून शेतांत रात्रौ बर्फानें बधिर होऊन प्राण जावा या हेतूनें बाहेर सोडून दिले. कित्येक लोकांस हात-पाय बांधून वधस्तंभावर उलटें टांगून ठेवीत; त्या ठिकाणीं क्वचित् प्रसंगीं प्राण जाईपर्यंत त्यांची चार चार दिवस तडफड चालत असे. स्त्रियांवर बलात्कार असंख्य झाले हें निराळें सांगावयास नकोच. इतर ठिकाणीं या कृत्यांमुळें इतकी दहशत बसली कीं हे काय प्रकार चालले आहेत तें पाहण्या-करितां सुद्धां कोणी तोंड वर काढीना. यावेळीं ऑरेंजचा मेहुणा व्हान्डेन्बर उत्तरेकडे कँपेन शहरीं होता; तो आपली गर्भिणी स्त्री मेरी नॅसा इजला सोडून एकाएकी गुप्तपणें पळून गेला. त्यानें पळ काढतांच हेल्डर्लँड व ओव्हरी-सल प्रांतांतील सर्व शहरें ऑरेंजची बाजू पटापट सोडूं लागलीं.

फ्रीझलंड प्रांतानेंही पुनः सरकारचें जड जूं मानेवर घेतलें. हॉलंड प्रांतांतील लोकांच्या मनाची दृढता मात्र अद्याप कायम होती. ड्युइल्यम या ठिकाणीं असल्यामुळें त्याचा लोकांस आधार वाटत होता. इतर सर्व प्रांतांतील बंड मोडलें होतें; त्यामुळें आम्स्टर्डम येथें जाऊन हॉलंड प्रांत काबीज करावा असा आल्व्हानें डॉन फ्रेडरिकला हुकूम पाठविला. वाटेंत नार्डेन शहर होतें. त्या ठिकाणीं लोकांची संख्या फार थोडी होती व शहरांत देशभक्तांचीं शिबंदीही फार नव्हती; तथापि शहर शत्रूला शरण जाईना. आह्मी राजा व राजपुत्र ऑरेंज. यांच्या हुकुमानें वागत आहों व पुढेंही वागणार, असा शहरांतून स्पॅनिश सेनापतीला जबाब मिळाला व गांवांतील कांहीं वेडप्या लोकांनीं बंदुकींचे बारही काढले. हें ठिकाण विशेष मजबूत नव्हतें, व गांवांत हत्यारें, दारूगोळा व लढाऊ लोक यांचा पुरवठा फार कमी होता. शहरवासी लोकांनीं सानॉय व दुसरे आसपास असलेले प्रजापक्षीय सेनापती यांस रसद पाठविण्याविषयीं निरोप पाठविले. त्यांचे दूत हात हालवीत परत आले. थोडा दारूगोळा व भाराभर वचनें याशिवाय एक शिपाई, एक ड्यूकट, अगर एखादी तोफ सुद्धां त्यांस मिळाली नाहीं. सर्व धुरंधर देशभक्तांनीं शक्य असल्यास मोठेपणा राखून शरण जावें असा उपदेश केला. शहरवासी लोकांनीं डॉन फ्रेडरिककडे दोन वकील पाठविले; त्यांस भेट न होतां, ‘सैन्याबरोबर नार्डेनला परत जा; शहरच्या वेशीपाशीं तुह्मास आमचा जबाब समजेल’ असा निरोप आला. त्याचा अर्थ उभयतां वकीलांच्या ध्यानांत पूर्णपणें येऊन चुकला; पैकीं एकानें सैन्याबरोबर परत जातांना वाटेंतच नजर चुकवून पळ काढला; दुसऱ्यास संकटाच्या वेळीं आपलीं बायकामुलें व शहरवासी बांधव यांस सोडून जाणें प्रशस्त वाटलें नाहीं. फ्रेडरिकनें या वकीलास शहरांत जाऊन आणखी कांहीं प्रतिष्ठित लोक शिष्टाईकरितां बोलावून आणण्याचा हुकूम केला. हा वकील गांवांत जाऊन आणखी पांच चार लोक बरोबर घेऊन परत येत असतां से. रेंमरोनें त्यांस वाटेंत गांठलें; व आपणास फ्रेडरिकनें तहाचें बोलणें करण्याकरितां पाठविलें आहे असें सांगून त्यानें शहरच्या किल्ल्या मागितल्या. गांवांत कोणास कोणत्याही प्रकारची इजा होणार नाहीं

अशी शपथ घेऊन गांवांतून आलेल्या प्रमुख मंडळींनीं वेशीच्या किल्ल्या रोमेरोच्या स्वाधीन केल्या. रोमेरो पांचसहाशें बंदुकवाले घेऊन गांवांत शिरला. शहरच्या सर्व कुलीन स्त्रियांनीं या पाहुण्यांचा आदरसत्कार करण्याकरितां वडा मेजवानीचा थाट केला; त्याचाही या स्पॅनिश लोकांनीं योग्य परामर्श घेतला; व जेवण होतांच शहरची मोठी घंटा वाजवून सार्वजनिक मंदिरांत शहरवासी लोकांस बोलावून आणिलें. माफीच्या सवलती समजण्याच्या आशेनें सुमार पांचशें लोक हां हां ह्मणतां देवळांत जमले, इतक्यांत एक पाद्री येऊन त्यानें त्यांस मरण्याची तयारी करा अशी सूचना दिली. मागोमाग रोमेरोचे बंदुकवाले येऊन त्यांनीं जमलेल्या लोकांवर गोळ्या झाडल्या; लागलीच देवळांत शिरून त्यांनीं दारें बंद करून घेतलीं व आंत जमलेला शेळ्यांचा कळप कापून काढिला. तें काम संपतांच देवळास आग लावून मेलेल्या लोकांचे देहसंस्कार या यमदूतांनीं शेवटास नेले. या कृत्यानें जास्तच बेफाम होऊन स्पॅनिशसैन्य रस्त्यांत आलें. प्रत्येक घराची झडती सुरू झाली. प्रत्येक घरांतील सामान फौजेच्या तळावर मालकाकडून पोंहोंचवून नंतर बक्षिसादाखल त्यास तरवारीनें भोसकून मारावें असा कांहीं वेळ क्रम चालला. पुढें घरांतून लपून बसलेले इसम बाहेर हाकलून काढण्याकरितां गल्लोगल्लीं घरांस आगी लावण्यांत आल्या. घरांतून लोक बाहेर पडतांच त्यांस तरवारीनें भोंसकून, अगर कुऱ्हाडीनें तोडून, अगर भाल्यानें टोचून मारण्याचा सपाटा सुरू झाला. ज्यांनीं ज्यांनीं यत्किंचित् दांडगाई करण्याचा कल दाखविला त्यांस माशांप्रमाणें जाळावर भाजून टाकण्याची शिक्षा मिळाली. स्पॅनिश लोक क्षणोक्षणीं जास्त खून चढल्याप्रमाणें वर्तन करूं लागले; कित्येकांनीं आपल्या हातांत सांपडलेल्या यज्ञपशूंचीं आंतडीं तोडून त्यांचें रक्त प्राशन केलें. कित्येक सभ्य लोकांच्या बायका व मुली त्यांच्या समक्ष बाटवून मग सर्वांस एकदम कुऱ्हाडीनें तोडून टाकीत! दानवीचा कळस झाला. देवळें व घरें, पुरुष व बायका यांत कोणताही भेद मानला जात नव्हता. स्त्रियांची मर्यादा सर्वस्वी लयास गेली. एकही स्त्री अगर पुरुष या सपाट्यांत वांचला नाहीं. मुख्य मॅजिस्ट्रेटाच्या पायाचे

तळवे विस्तवावर जाळल्यावरून, त्यानें आपला जीव वांचविण्याकरितां मोठी खंडणी देण्याचें कबूल केलें. ही रकम पटतांच त्याच्या वाड्याच्या द्वारांत त्यास फांशीं देऊन त्याचें धड या नराधमांनीं शहरच्या वेशीवर लावून ठेविलें. शिपाई व सामान्य लोक यांचा याप्रमाणें समूळ नाश झाला असतांही डॉन फ्रेडरिकनें पळून जाणारास कोणी आश्रय देईल तर त्यास कडक शासन फर्माविलें. तीन आठवडेपर्यंत रस्त्यांत प्रेतें कुजत पडलीं होतीं; त्यांना प्रेतसंस्कार सुद्धां मिळूं नयेत असा फ्रेडरिकचा हुकूम फिरला होता. कांहीं दिवसांनीं शहरचे तट पाडून जमीनदोस्त करण्यांत आले; व पुष्कळ कालपर्यंत नार्डेनशहर भूपृष्ठावरून नाहींसें झालें.

आल्व्हानें मोठ्या प्रसन्न अंतःकरणानें ही हकीकत राजास कळविली. "नार्डेनचा विध्वंस हें ईश्वरी नेमानेमाप्रमाणें मिळालेलें शासन होय; नार्डेन पांखडमताचें पहिलें घरटें होतें; व तेथून तें विष इतर शहरांत पसरलें," असे एका स्पॅनिश गृहस्थाचे उद्गार निघाले. ईश्वराच्या नांवाखालीं एका अनाथ राष्ट्राचे जुलमी राजसत्तेनें काय हाल केले, याचें हें मासलेवाईक चित्र आहे. जुलुमाची वृद्धावस्था, तारुण्य, पाषाणासारखा कठोर मोहोरा, व नेहमींचें डौलदार बाह्यस्वरूप यांचें विचारी पुरुषांनीं बारंवार सूक्ष्म निरीक्षण करणें अवश्य आहे. सांप्रतच्या इतिहासांत वरील गोष्टींचें वर्णन या नाटकांतील पात्रांनीं आपल्या हातांनीं लिहून ठेविलें असल्यामुळें त्यास विशेष महत्व आलें आहे. तें वाचून मानवी प्राण्याच्या हृदयांत लोकस्वातंत्र्याविषयीं विशेष उत्कंठा उत्पन्न झाल्यास त्यांत नवल नाहीं. आल्व्हाच्या कारकीर्दीचा इतिहास वाचून मन क्षणभर स्तब्ध होतें; व आपल्या नांवानें असलीं घोर पातकें ईश्वरानें कां करविलीं असा प्रश्न उत्पन्न होतो. अथवा पुढील पिढ्यांना राजकीय व धार्मिक स्वातंत्र्य प्राप्त होण्यास मागील पिढ्यांनीं रक्ताच्या पुरांतून चाललेंच पाहिजे असा ईश्वरी संकेत असावा काय ? किंवा वुईल्यम ऑरेंजसारख्या पवित्र महापुरुषाची उज्वल मूर्ति लोकांच्या डोळ्यांत पूर्णपणें भरण्याकरितां आल्व्हाच्या दुष्कृतींचा काळोख सर्व नेदर्लंडभर पसरण्याची ईश्वरी योजनाच होती !

मॉन्सच्या मोचनार्थ तयार केलेल्या सैन्यास रजा दिल्यावर झुडरझीच्या आखात ओलांडून राजपुत्र यूखायझेन येथें आला. राष्ट्राच्या आपत्कालीं

सुद्धां लोकांनीं या हताश झालेल्या महापुरुषाचें या प्रांतांत प्रेमानें व सत्कारपूर्वक स्वागत केलें. यावेळीं त्याच्याबरोबर फक्त सत्तर स्वार होते. नवीन सैन्य निर्माण करण्याची आतां विशेष आशा उरली नव्हती. हॉलंडचें विमोचन न झाल्यास त्याच्याशीं सहगमन तरी करावें या हेतूनें तो हल्लीं या प्रांतांत आला होता. येथें आल्यावर ऑरेंज शहरोशहरीं जाऊन अधिकारी व इतर लोक यांच्याशीं राज्यव्यवस्थेच्या व लढाईच्या गोष्टीविषयीं नेहमीं वाटाघाट करीत असे. त्याच्या सूचनेवरून हॉलंडची सभा हार्लेम येथें भरली. या सभेनें आल्व्हाचा प्रतिकार करण्यास अद्याप कांहीं उपाय शक्य असल्यास कळवावा असें त्यास विचारल्यावरून, त्यानें सभेची एक खाजगी व गुप्त बैठक भरवून आपले बेत व अंदाज त्यांजपुढें मांडिले; व राष्ट्रभक्तांच्या यत्नास अद्याप पूर्ण यश येण्याचा संभव आहे अशी त्यांची खात्री करून दिली. त्याच घटकेस त्यानें इंग्लंडशीं पुन्हां गुप्त कारस्थान चालू केलें, व लुईला पुन्हां फ्रान्सच्या दरबाराशीं सूत्रें बांधण्याविषयीं नवीन मार्ग सुचविले. हॉलंड हें डच् स्वातंत्र्याचें उगमस्थान होतें. येथील पूर्ण काळजाच्या लोकांस शेवटच्या निकराच्या युद्धांकरितां ऑरेंज तयार करीत होता. नार्डेन येथें केलेल्या प्रशस्य धर्मकृत्याबद्दल आपल्या पित्याचे व राजाचे धन्यवाद घेऊन डॉन फ्रेडरिक आम्स्टर्डमला आला. आम्स्टर्डमच्या पश्चिमेस समुद्रतीराजवळ हार्लेम शहर आहे. हार्लेमच्या उत्तरेकडील प्रदेशांत सानॉय व दक्षिणेकडे ऑरेंज होता. हार्लेम हस्तगत झाल्यास बंडवाल्यांची ताटातूट होऊन सर्व तुकड्यांचा उच्छेद होईल; व हॉलंड प्रांत सर करतां येईल असा स्पॅनिश सेनानींचा अंदाज होता.

हार्लेमच्या प्रजाजनांस आपणावर येऊं घातलेल्या संकटाचा वेळींच वास पोंहोचला. आल्व्हानें हॉलंडावर नेमलेला सुभेदार बॉसू ज्या ज्या शहरच्या अगर गांवच्या लोकांनीं सरकाराशीं विरोध दर्शविला असेल त्याची स्थिति मेलिन, झुटफन व नार्डेनप्रमाणें करण्याचा ठराव झाला आहे असें लोकांस उघडपणें सांगत होता. परंतु नार्डेनची अवस्था ऐकून सरकारच्या फौजेशीं सामना करण्याविषयीं हॉलंडच्या लोकांचीं मनें वज्राप्रमाणें तयार झालीं. त्यांतूनही हार्लेमच्या लोकांस प्रथमच शुभ-

शकून वाटण्यासारखी एक गोष्ट त्या वेळीं घडून आली. आम्स्टर्डमनजीक देशभक्तांचीं कांहीं जहाजें समुद्राचें पाणी गोठल्यामुळें बर्फांत अडकून पडलीं होतीं. त्यांच्यावर हल्ला करून तीं हस्तगत करून घेण्याचा स्पॅनिश लोकांनीं घाट घातला. बंडवाल्यांनीं बर्फांतच आपल्या जहाजांभोंवतीं खंदक खंदले. व पायांत बर्फावरून चालण्याचे जोडे घालून बंडवाल्यांची एक टोळी गोटांतून बाहेर पडली. त्यांनीं शत्रूचा अगदीं मोड केला व सातशें लोक ठार केले. आल्व्हाला या गोष्टीचें फार आश्चर्य वाटलें. त्यानें आपल्या सैन्यानें बर्फावर चालण्याकरितां विसर्पण-पादुका घालण्याचा अभ्यास ठेवावा असा हुकूम केला. इकडे हार्लेमच्या मॅजिस्ट्रेटांपैकीं तीन गृहस्थांनीं शत्रूशीं गुप्तव्यवहार सुरू केला. एक तर शत्रूच्या गोटांतच जाऊन राहिला; बाकीचे दोन इसम परत येतांच त्यांची यथान्याय चौकशी होऊन त्यांस फांशीं देण्यांत आलें. शहरचा मुख्य लष्करी अंमलदार रिपर्डा यानें लोक जमवून त्यांस नार्डेनची आठवण करून दिली; शत्रू जितके दुष्ट तितकेच कावेबाज आहेत व त्यांची अस्त्रतृष्णा दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत आहे; सामाचा कांहीं उपयोग होणार नाहीं; शहरवासी जनांनीं शत्रूशीं झगडण्यास कंबर बांधिली पाहिजे; वगैरे विचार रिपर्डानें स्पष्टपणें लोकांपुढें मांडिले. शिपायांस व सामान्य लोकांस रिपर्डाचे साहसी परंतु उदात्त विचार एकदम पसंत पडले. स्पॅनिश सैन्याचा प्रतिकार करण्याचा सर्वांचा एकच विचार ठरला.

उत्तरसमुद्र व झूडरझीचें आखात यांजमधील संयोगीभूमिच्या दक्षिणेकडील अरुंद पट्ट्यांत हार्लेम शहर आहे. या ठिकाणीं ही संयोगीभूमि अवघी पांच मैल रुंद आहे. हार्लेमच्या पश्चिमेस एक बारीक जमिनीचा पट्टा आहे; त्यांत या वेळीं बागाईत पिकें व बगीचा होता व समुद्रतीरालगत वाळूचे व लवाळ्याचे धक्के होते. पूर्वेस समांतर रेषेवर आखाताच्या दक्षिणबिंदूजवळ व हार्लेमपासून सुमारें दहा मैलाच्या अंतरावर आम्स्टर्डम शहर आहे. या दोन शहरांच्या दर्म्यान पूर्वदक्षिण हार्लेमचा तलाव आहे; त्याचा विस्तार सुमार सत्तर चौरस मैल असून खोली पंधरा फूट होती. तलावाच्या उत्तरतीरावर एक धक्का होता; त्याच्यावरून हार्लेम व आम्स्टर्डम यांच्या दरम्यानची वाट होती. या धक्क्याच्या उत्तरेस वाय

नदीचा प्रवाह होता; धक्क्याच्या मध्यभागीं पाण्याचे निकाल असून त्यांत दट्टे बसविले होते. हे पाण्याचे निकाल मोकळे करतांच तलावाचें पाणी वायच्या मुखांत शिरून हार्लेमच्या आसपासचा प्रदेश जलमय होत असे. हार्लेम हें नेदर्लंडपैकीं फार मोठें व सुंदर शहर आहे; परंतु त्याचे कोट पुरातन असल्यामुळें या वेळीं फार मोडकळीस आले होते. शहरच्या मध्यभागीं बेव्हनचें प्रसिद्ध देवालय असून त्याचा मनोरा व त्यावरील शिखर फार लांबून दिसत होतीं. शत्रूच्या गोटांत जाऊन राहिलेल्या मॅजिस्ट्रेटानें शहरच्या लोकांस शरण जाण्याविषयीं निरोप पाठविला. हा निरोप आणणारास शहरच्या लोकांनीं फांशीं दिलें. ता. १० दिसेंबर रोजीं एक तद्देशीय बाटाड्या घेऊन स्पॅनिश सेनापति झपाटा पुरांतून व बर्फांतून स्पॅरेंडम किल्ल्यावर चाल करून गेला व तो किल्ला व नजीकचें गांव त्यानें हस्तगत करून बंडवाल्यांची दाणादाण केली व त्यांचे तीनशें लोक खराब केले. नंतर हार्लेमला तीस हजार सैन्यानिशीं डॉन फ्रेडरिकनें वेढा दिला. स. ओव्हर्स्टीनचें जर्मन सैन्य दक्षिणेस हार्लेमचा तलाव व शहरचा कोट यांच्या दरम्यानच्या सुंदर उपवनांत छावणी देऊन बसलें; डॉन फ्रेडरिकनें आपला तळ उत्तरेकडे क्रीफ नामक ठिकाणीं दिला. बाल्लून वगैरे पलटणींनीं इतर दिशा रोखल्यामुळें शहराला चोहोंबाजूनें पूर्ण वेढा बसला. तलावाच्या पृष्ठभागावर बंडवाल्यांचा मारा रहावा म्हणून तलावाच्या कांठावर ऑरेंजनें कांहीं लहान लहान किल्ले तयार करविले. मागोमाग डान फ्रेडरिकनेंही त्याचें अनुकरण केलें. हार्लेमची शिबंदी फारच थोडी होती. परंतु हिंवाळ्याचे दिवस असल्यामुळें तलावाच्या पृष्ठावर बर्फाचे थर सांचले होते व हिमप्रचुर दाट धुकें वर पसरलें होतें. या आवरणांतून लढाऊ लोक, खाण्यापिण्याचे पदार्थ व दारुगोळा, गाड्यांतून व स्त्रीपुरुषांच्या डोक्यावरून रात्रंदिवस शहरांत पोंहोचविण्याचा क्रम चालला होता. सैन्यसंख्या चार हजारांपर्यंत जाऊन पोंहोचली. त्यांत एक तीनशें कुलीन व सुशील स्त्रियांची तुकडी होती. या तुकडीची नायिका हासेलर नामक एक सत्तेचाळीस वर्षांची उञ्च, कुलीन व धार्मिक विधवा होती. या रणशूर स्त्रियांनीं तरवारी, बंदुका व कट्यारी वगैरे शस्त्रें धारण केलीं होतीं; व त्यांनीं शहरच्या आंत व बाहेर

पुष्कळ निकराच्या प्रसंगीं पुरुषांबरोबर लढून पराक्रम गाजविला. राजपुत्र ऑरेंजनें लीडन येथें सुमार चार हजार सैनिक जमवून त्यांस डीलामार्क-च्या आधिपत्याखालीं हार्लेमला कुमक करण्याकरितां पाठवून दिलें. या सैन्यावर छापा घालून रोमेरो, बॉसू व न्वार्कार्मीज यांनीं त्याची पूर्णपणें वाताहत केली. ता. १८, १९ व २० डिसेंबर रोजीं क्रॉस-वेश, सेंट जॉन-वेश, व त्यांच्या दरम्यानचें गांवकुसूं यांच्यावर तोफांची सरबत्ती सुरू झाली. तटाची भिंत बरीच खराब झाली; परंतु स्त्री, पुरुष व मुलें ही झालेली खराबी दुरुस्त करण्याकरितां रात्रंदिवस झटत होतीं. वाळूचीं पोतीं, दगड व माती हीं आणून पोंहोचविण्याचा कारखाना रात्रंदिवस चालला होता; त्यांच्याबरोबर कॅथोलिक देवळांतील मूर्ति व इतर धनद्रव्यें हीं उपयोगांत येत होतीं. ता. २१ रोजीं रोमेरोनें तटावर हल्ला केला. एका आठवड्यांत नॉर्डनाप्रमाणें हार्लेमची स्थिति करून पुन्हां नवी शिकार साधण्याचा त्याचा विचार होता. परंतु हल्ला होतांच शहरची घंटा भय सुचविण्याकरितां वाजूं लागली. सर्व शहरवासी लोक गोळा झाले. तटाच्या विच्छिन्न भागांतून रोमेरोचें सैन्य चाल करीत असतां त्यांच्यावर दगड, कढलेलें तेल, निखारे वगैरे अस्त्रांचा एकच वर्षाव झाला. बंदुका व तरवारी यांचे प्रयोग चाललेच होते; शिवाय पेटविलेले वर्तुलाकृति चुडे स्पॅनिश लोकांच्या गळ्यांत वरून नेमके येऊन पडत होते. दैत्यस्वरूपी स्पॅनिश सैन्यासही या माऱ्यापुढें टिकाव धरवेना. ऑरेंजनें पुन्हां एक दोन हजार लोकांची टोळी बॅटेन्बरबरोबर देऊन हार्लेमकडे पाठविली. डीलामार्कच्या गैरवर्तनामुळें या संधीस राजपुत्रास त्याला अधिकारा-वरून दूर करणें भाग पडलें. हें दुसरें सैन्य धुक्यांत वाट चुकल्यामुळें शत्रूच्या हातीं सांपडलें. या सैन्याचा नायब सेनापति डी कॉनिंग शत्रूच्या हातीं सांपडला; त्याचा शिरच्छेद करून व डोक्यावर " कप्तान कॅनिंगचें हें शीर आहे; तो भल्या हार्लेमला कुमक घेऊन येत आहे, " अशी चिठ्ठी मारून स्पॅनिश सैनिकांनीं तें शहरांत फेंकून दिलें. त्यावर अकरा स्पॅनिश कैद्यांचीं डोकीं कापून तीं एका पिपांत भरून देशभक्तांनीं तें पीप तटावरून बाहेर लोटून दिलें. या पिपावर अशीं अक्षरें होतीं:— " दहा मुंडकीं दहाटके कराऐवजीं आल्व्हास पोंहोचवावीं, व एक मुंडकें व्याजा-

बद्दल पाठविलें आहे." उभय पक्षांच्या झटापटी हरहमेश होत होत्या. या प्रसंगीं सांपडलेले कैदी ताबडतोब फांशीं देण्याचा सपाटा दोन्ही छावण्यांत सारखा चालू होता. ता. २१ दिसेंबरच्या हल्ल्यापासून फ्रेडरिकनें तटाखालीं पोंखरण्याचें काम नियमानें सुरू केलें. स्पॅनिश लोकांनीं चालविलेल्या भुयारांची बातमी ठेवून बंडवाले आंतल्या बाजूनें पोंखरीत. उभय पक्षांच्या भुयारांत कव्यारी वगैरे लहान शस्त्रांनीं झटापटी होऊं लागल्या; कित्येक वेळां बंडवाल्यांनीं खालीं सुरुंग लावून वरील भागांत काम करीत असलेल्या लोकांस उडवून दिलें. अशा वेळीं ज्वालामुखी पर्वताच्या मुखांतून निघणाऱ्या द्रव्यांप्रमाणें भूगर्भांतून छिन्नभिन्न मुंडकीं, शरीराचे इतर भाग व धडें एकदम बाहेर उडून येत. असे राक्षसी प्रकार रात्रंदिवस चालले होते. ऑरेंज पारव्याबरोबर लहान चिठ्या पाठवून शहरच्या लोकांस वरचेवर धीर देत होता. ता. २८ जानेवारी १५७३ रोजीं त्यानें भाकरी व दारुसामान यांचा शहरांत पुरवठा पाठविला व चारशें कसलेले शिपाई तलावावरून शहरांत पोंहोचविले. क्रास-वेशीपाशीं तटाचा बचाव करण्याची कोंडलेल्या लोकांनीं शिकस्त केली; परंतु त्या ठिकाणीं त्यांचा फार वेळ टिकाव लागेल असा भरंवसा दिसेना. यामुळें हिंवाळ्याच्या मोठ्या रात्रींतून वेशीच्या आंतल्या बाजूनें दगडाचा अर्धचंद्राकृति नवा तट चुन्यानें मजबूत रीतीनें बांधण्याचें काम शहरांतील लोकांनीं गुप्त रीतीनें, नेटानें व जलदीनें चालविलें होतें. वृद्धलोक, दुर्बळ स्त्रिया, व कोंवळीं मुलें सुद्धां या कामांत सदृढ व तरुण लोकांस मदत करीत होतीं. ता. ३१ जानेवारी रोजीं मध्यरात्रीं फ्रेडरिकनें पुन्हां हल्ला करण्याचा हुकूम केला. तीन दिवस तोफांचा भडिमार सारखा चालल्यामुळें तटाच्या भिंती अगदीं जर्जर झाल्या होत्या व सेंट जॉनची वेश सबंध पडली होती. स्पॅनिश लोक पडक्या तटावर चढूं लागले. हा हल्ला अकल्पित होता. तथापि पहाऱ्यावर असलेल्या चाळीस पन्नास लोकांनीं तटाचें संरक्षण करून भयसूचक घंटा वाजविली व सर्व शहरवासी लोक पुन्हां गोळा केले. पूर्वीप्रमाणेंच बंदुका, भाले, तरवारी, सोटे, दगड व जळकीं कोलतीं यांच्या सहाय्यानें आंतील लोकांनीं आपलें संरक्षण करण्याचा क्रम चालविला. सूर्योदय झाला. हल्ला सर्व बाजूनें एकदम करण्याविषयीं

स्पॅनिश सेनापतीनें रणवाद्यें वाजवून सुचविलें. मोठ्या निकराचा हल्ला करून स्पॅनिश लोक तटावर व क्रास-वेशीच्या बुरुजावर लुटीच्या आशेनें भराभर चढूं लागले. तेथून पाहतात तों त्यांच्यापुढें याहीपेक्षां मजबूत अर्धचंद्राकार तट काळाप्रमाणें उभा दिसला; व त्याच्यावर तोफाही रोखून ठेवलेल्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. तें विराट स्वरूप दिसतांच त्यांच्या डोळ्यांस अंजन पोंहोचलें. इतक्यांत आंतील तटावरून तोफांची सलामी सुरू झाली; व तत्क्षणींच ज्या तटावर हें विजयी सैन्य उभें होतें तो दारूच्या भडाक्यानें उडून गेला. या तटाच्या नाश पावलेल्या सामानाखालीं तीनशें स्पॅनिश लोकांचीं थडगीं झालीं.

आतां उपासमारानें बंडवाल्यांस जेरीस आणण्याचा उपाय तेवढा शिल्लक राहिला होता. परंतु सरकारच्या अवाढव्य सैन्यासच दाणावैरणीची तूट पडण्याचा प्रसंग आला होता. शिवाय हिंवाळ्याच्या कडक थंडीमुळें सैन्यांत आजार वाढला; मृत्युसंख्या वाढत चालली. शहरांत अर्थातच लोकांचे हाल दिवसेंदिवस जास्त होऊं लागले. सर्व शहरवासी लोकांना कांहीं नियमित अन्न देण्याचा क्रम सुरू झाला. अन्नाचा पुरवठा संपुष्टांत येत चालला; वसंतऋतु येऊन तलावांतील बर्फ वितळल्यावर पुरवठा येण्याचा मार्गच बंद होण्याची भीति उत्पन्न झाली. तलावावर नवें आरमार तयार करण्यास ऑरेंजपाशीं साधनें असतील असा लोकांस भरंवसा नव्हता. दुष्काळचें उग्र स्वरूप त्यांच्यापुढें मूर्तिमंत दिसूं लागलें. त्यामुळें शत्रूचा हल्ला पुन्हां आणविण्याकरितां त्यांनीं हरप्रयत्न केले. यावेळीं स्पॅनिश छावणींत वेढा उठविण्याची मसलत चालली होती. परंतु आल्व्हानें फ्रेडरिकला असा निरोप पाठविला कीं, वेढा उठविशील तर मी तुला आपला मुलगा समजणार नाहीं; तूं रणांत मेलास तर मी तुझी जागा भरण्यास सिद्ध आहें; मी वेढ्यांत पडलों तर माझी बायको स्पेनमधून येऊन माझें काम चालवील. पुन्हां जोरानें संग्राम सुरू झाला. आंतील लोकांच्या टोळ्या निर्भयपणें शहराबाहेर पडूं लागल्या; एक टोळी शत्रूच्या तोफखान्यावर चाल करून गेली; तेथें तोफांच्या तोंडीं त्यांचा नाश झाला. शहराबाहेर गुरांचे कळप निर्भयपणें जात येत असत; त्यांपैकीं एका गुरास कोणी हात लावल्यास बारा स्पॅनिश शिपाई बळी

पडत होते. हें शौर्य पाहून आल्व्हा सुद्धां आश्चर्यानें चकित झाला. फेब्रुवारीअखेर तलावांतील बर्फ वितळलें. बॉसूनें नावांचें एक छोटें आरमार तयार करून तें तलावांत आणिलें. तलावाचें स्वामित्व स्पॅनिश सैन्याकडे जाण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. राजपुत्र ऑरेंजही कांहीं जहाजें तयार करीत होता. तलावाच्या पूर्वबाजूचे धक्के फुटल्यास खुद्द आम्स्टर्डम शहराची वाट पाण्यानें बंद होऊन तेथील सरकारच्या सैन्याचाही उपासमार होण्याचा संभव होता. "हा धक्क्यावरील मार्ग शत्रूंस बंद करितां आल्यास आम्हास हार्लेमचा वेढा उठवावा लागेल व हात जोडून शत्रूस शरण जावें लागेल किंवा अन्नावांचून मरावें लागेल" असे आल्व्हाचे उद्गार निघाले. ही वस्तुस्थिति ऑरेंजच्या पूर्णपणें लक्षांत आली होती; परंतु मनुष्य व युद्धसामुग्री यांवांचून त्याचा हात चालेनासा झाला. त्यानें इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरे देशांतील आपल्या मित्रांस व लुईस फार विनवणीचीं पत्रें पाठविलीं. इकडे ऑरेंजनें सानॉयबरोबर पाठविलेल्या स्वयंसेवक पलटणींनीं तलावाचे धक्के फोडून व पाण्याचे निकाल उघडून आसपासच्या प्रदेशांत जलप्रलय करण्याची खटपट चालविली असतां शत्रूंनीं त्यांच्यावर छापा घालून त्यांस मागें हटविलें. सानॉयच्या सैन्याची दुर्दशा झाली. त्यानें नवीन भरती केलेले लोक पुढें पाऊल काढीनात. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं जॉन हेरिंग नामक डच् गृहस्थानें प्राचीन इतिहासांतील विख्यात वीरांना लाजविण्यासारखा अतुल पराक्रम केला. वाय नदी व डीमर सरोवर यांच्यामधील अरुंद धक्क्यावर तरवार व ढाल यांसह उभें राहून या पुरुषानें शत्रूच्या एक हजार लोकांस या ठिकाणावरून मागें हटविलें. हें कृत्य चाललें असतां बंडवाल्यांनीं सुरक्षितपणें पळ काढला. नंतर त्यानें पाण्यांत उडी टाकिली व तरवारीचा अगर गोळीची एक चाटसुद्धां न लागतां तो सुरक्षितपणें शत्रूच्या तावडींतून निसटून गेला. या चकमकींत मॉन्समध्यें बंडवाल्यांचा प्रवेश होण्यास कारणीभूत झालेला चित्रकार ऑलिव्हर समाप्त झाला. त्याच्या मस्तकावर नांवाची चिठ्ठी मारून स्पॅनिश लोकांनीं मुंडकें हार्लेम शहरांत फेंकून दिलें. हजारों बंडवाले मारले गेले; जे शत्रूच्या हातीं सांपडले ते फांशीं गेले. हार्लेम शहरांतही स्पॅनिश कैद्यांस तीच गति

मिळत होती. परदेशी शत्रूच्या पशुतुल्य आचरणानें लोकांच्या अंगीं लांडग्याप्रमाणें त्वेष चढला होता. त्यामुळें या युद्धास वृकयुद्धाचें स्वरूप आलें होतें. तटाबाहेर युद्धप्रसंग सतत चालले होते. ता. २५ मार्च रोजीं वेढलेल्या हजार लोकांनीं मोठ्या शौर्यानें शहराबाहेर संचार केला; शत्रूच्या आघाडीचे सर्व चौकीदार पिटाळून लाविले; तीनशें तंबू जाळून फस्त केले; सात तोफा, नऊ निशाणें व कित्येक गाड्या सामान हस्तगत करून शहरांत आणिलें. तीस हजार नामांकित सैन्याच्या जबड्यांतून अशा प्रकारें सामुग्री मिळवून, हार्लेमच्या लढवय्यांनीं आठशें शत्रू ठार केले; बंडवाल्यांपैकीं फक्त चार इसम या चकमकींत प्राणास मुकले. अर्धचंद्राकृति तटावर एक मातीचा उंचवटा रचून त्याच्यावर झोंबडून आणिलेलीं निशाणें व तोफा शत्रूच्या नजरेसमोर बंडवाल्यांनीं उभ्या केल्या. या उंचवट्यावर "हार्लेम हें स्पॅनिश लोकांची स्मशानभूमि आहे" अशीं मोठीं अक्षरें खोदलीं होतीं. आल्व्हानें राजास लिहिलें, "माझ्या साठ वर्षांच्या संग्रामानुभवांत पृथ्वीच्या कोणत्याही भागांत असलें युद्ध मीं पाहिलें नाहीं व ऐकिलेंही नाहीं." हार्लेमचा चिवटपणा व धैर्य अमानुष होतें. फ्रेडरिकचा आठ दिवसांत हार्लेम घेण्याचा प्रलाप शुष्क होता. या प्रसंगावरून परकीय जुलमाचा प्रतिकार करण्याची इच्छा उत्पन्न होण्यास उत्तेजक हवा अगर रमणीय सृष्टिसौंदर्याचीच अवश्यकता नसून नेदर्लंडसारख्या सपाट मैदानावर व धुकट थंडींत सुद्धां स्वातंत्र्यप्रियता व स्वदेशप्रीति प्रबल असूं शकते हें निर्विवाद सिद्ध होतें.

इकडे मेंडोझा स्पेनमध्यें जाऊन द्रव्याची कुमक घेऊन आला. राजानें मिलनचा सुभेदार रेकिसन्स यास तीन स्पॅनिश पलटणें हॉलंड-कडे पाठविण्यास हुकूम केला. तलावांत सरकारची आरमारसंख्या शंभरापर्यंत गेली. राजपुत्र ऑरेंजनेंही तलावांत निरनिराळ्या आकाराचीं सुमार दीडशें जहाजें तयार केलीं. सर्व तलाव नौकांनीं गजबजून गेला. पाण्यावर आतां उभय पक्षांच्या वारंवार झटापटी होऊं लागल्या. या तलावाच्या स्वामित्वावर हार्लेमचें नशीब यावेळीं अवलंबून होतें. ता. २८ मे रोजीं दोन्ही आरमारांचा घनघोर संग्राम झाला, जहाजें एकास एक भिडलीं. बॅटेन्बर्ग देशभक्तांचा सेनाधीश होता. हजारों देशभक्त

बळी पडून स्पॅनिश लोकांची सरशी झाली. राजपुत्राचीं वीस जलयानें शत्रूच्या हातीं सांपडलीं व बाकीचीं शत्रूंनीं चारही दिशेनें पिटाळून लाविलीं. बॉसूनें सर्व तलावाचें आक्रमण केलें; तलावाच्या तीरावरील देशभक्तांचे किल्ले स्पॅनिश लोकांनीं घेतले; हार्लेमचे लोक व त्यांचे साथीदार यांची तलावांतून हकालपट्टी झाली. आतां मात्र शेवट जवळ येऊन पोंहोचला. शहरचे लोक निराश होत चालले. पुष्कळ दिवसपर्यंत पुरुषास अर्धा शेर व बायकोस पाव शेर अन्नावर देहयात्रा कंठावी लागत होती; असा क्रम यापुढें फार झालें तर तीन आठवडे चालेल असें पक्कें अनुमान होतें. राजपुत्र ऑरेंजला त्यांनीं आपली स्थिति कळवून आपणास कांहीं मदत करण्याविषयीं विनंति केली. त्यानें त्यांस दम देऊन लौकरच अन्नाचा पुरवठा करण्याचें आश्वासन दिलें. जून महिन्यांत हार्लेमच्या लोकांची क्षुत्पीडा दुःसह झाली. नेहमींच्या प्रचारांतील अन्न अगदीं दुर्मिळ झालें; जवस, करडी वगैरे जिनसांवर लोक उपजीविका करूं लागले व तें संपल्यावर कुत्रीं, मांजरें, उंदीर, घुशी यांच्यावर प्राणयात्रा सुरु झाली; त्यांचा संहार झाल्यावर घोड्यांचीं, बैलांचीं कातडीं शिजवून त्या रस्यावर क्षुद्बाधा शांत करण्याचा त्यांनीं क्रम चालविला; शेवटीं बुटाचे तळवे खाण्यापर्यंत पाळी येऊन पोंहोचली. अखेर ऑरेंजकडून येऊं घातलेली अन्नसामुग्री येईतोंपर्यंत प्राण वांचविण्याकरितां स्मशानांतील गवत, कांटेरीं झाडें व शेवाळ यांचाही उपयोग करण्यांत आला. अन्नावांचून हजारों स्त्रीपुरुष व अर्भकें जिकडे तिकडे मरून पडलेलीं दृष्टी पडत होतीं. त्यांच्या और्ध्वदेहिक क्रिया करण्यास कोणास सामर्थ्य राहिलें नव्हतें. जिवंत राहिलेले लोक अस्थिपंजर होऊन, मेलेले सुखी, असें ह्मणत पिशाचाप्रमाणें गल्लोगल्लीं हिंडत होते. जुलै महिन्यांत दोन तीन वेळ हार्लेमच्या लोकांनीं तहाचें बोलणें करण्याकरितां मुखत्यार पाठविले. डॉन फ्रेडरिक कोणत्याच अटी कबूल करीना. शेवटीं रक्तानें लिहिलेली अखेरची चिठ्ठी हार्लेमकरांनीं ऑरेंजला पाठविली व देवळाच्या शिखरावर निराशेचें काळें निशाण लाविलें. इतक्यांत कुमक येत आहे, त्याची दोनच दिवस वाट पहा अशी राजपुत्राची सूचना आली. ऑरेंजनें आपल्याकडून शक्य तितकी तजवीज चालविली

होती. त्यानें डेल्फच्या बाजारांत लोक जमवून सैन्य मिळाल्यास हार्लेमच्या रक्षणार्थ स्वतः जाण्याचा आपला विचार त्यांस कळविला. हॉलंडच्या सर्व शहरांतून हार्लेमबद्दल पूर्ण सहानुभूति होती; परंतु युद्धकला जाणणारे लोक कोणत्याही ठिकाणीं विशेष नव्हते. डेल्फच्या पुरुषमंडळींतून चार हजार स्वयंसेवक व सहाशें घोडेस्वार हार्लेमला कुमक करण्यास सिद्ध झाले. ऑरेंजनें स्वतः आपला मूल्यवान् जीव या कामीं धोक्यांत घालण्यास कोणी संमति देईना. सर्व शहरांतून राजपुत्रानें या सैन्याबरोबर जाऊं नये असे निरोप आले. त्यामुळें ता. ८ जुलै रोजीं चारशें अन्नसामुग्रीचे गाडे व सात तोफा यांसह हें सैन्य बॅटेन्बरच्या हाताखालीं देऊन ऑरेंज-नें हार्लेमकडे रवाना केलें. हार्लेमच्या दक्षिणेस जंगलांत हें सैन्य मध्यरात्रीपर्यंत तळ देऊन राहिलें. जिकडे तिकडे सामसुम झालें, त्यावरून शत्रु गैरसावध आहे अशी बॅटेन्बराची समजूत झाली. हार्लेममधील लोकांस बाहेर चाल करून येण्याविषयीं सूचनार्थ पूर्वसंकेताप्रमाणें या लोकांनीं चुडे पेटविले. परंतु स्पॅनिश सेनानी पूर्ण सावध होते. बॅटेन्बराचे चुडे पेटतांच स्पॅनिश सैन्यानें तटाबाहेर आगी पेटविल्या; व चोहोंबाजूनें दबा धरून बसलेल्या टोळ्यांनीं बंडवाल्यांवर एकदम छापा घातला. हार्लेमच्या लोकांस आपणास फसवून बाहेर काढण्याकरितां शत्रूंनीं हे जाळ केले असावे असें वाटून ते बाहेर पडले नाहींत. बॅटेन्बरच्या सैन्याची वाताहत झाली; खुद्द बॅटेन्बर या प्रसंगांत प्राणास मुकला. स्पॅनिश लोकांनीं एका कैद्याचे काननाक कापून त्यांस ही बातमी सांगण्याकरितां शहरांत पाठविलें व कांहीं मुंडकींही शहरांत फेंकून दिलीं. आतां प्रयत्नांची अखेर झाली. तलाव व त्यावरील किल्ले शत्रूंच्या ताब्यांत गेले. ऑरेंजनें शहरवासी लोकांस मिळतील त्या अटींवर शत्रूस शरण जाण्याविषयीं आतां निरोप पाठविला. ही निराशेची बातमी समजतांच शहरांत हाहाकार उडाला. सरसकट कत्तल अगर उपासमार याशिवाय तिसरी गति आतां उरली नाहीं. शिबंदी शिपायांनीं व युद्धक्षम पुरुषांनीं बाहेर धारातीर्थांत देह ठेवण्याचा निश्चय केला; शहरांतील अनाथ, वृद्ध व रुग्ण मनुष्यांस व बायकापोरांस आपण निराश्रित होणार असें समजतांच त्यांनीं रडून एकच आकान्त मांडिला. त्यावरून लढाऊ

लोकांनीं आपला एक चौक करून व सर्व दुर्बल लोक मध्यभागीं ठेवून शत्रूंच्या गराड्यांतून लढत निघून जावें असा विचार केला. डॉन फ्रेडरिकला ही कल्पना हार्लेमचे लोक खरी करून दाखवितील, किंवा शहरास आग लावून जळलेल्या शहराची राख आपल्या हातीं देतील अशी भीति वाटून त्यानें कप्तान ओव्हर्स्टीनच्या सहीचें एक अभयपत्र शहरांत पाठविलें. त्यांत 'हार्लेमकरांनीं निःशंकपणें शस्त्रें खालीं ठेवावीं; त्यांस मागतील त्या सवलती मिळतील व शहरचे अधिकारी व मुखत्यार ठरवितील त्या लोकांसच शिक्षा करण्यांत येईल.' असें सुचविलें होतें. हें पत्र प्रमाण धरून ता. १२ जुलै रोजीं हार्लेमशहर शत्रूस शरण गेलें. शहरची मोठी घंटा वाजूं लागली, लोक झीलच्या मठांत जमले, हत्यारेंपात्यारें शहरच्या सार्वजनिक सभागृहांत रचून ठेविलीं. त्याच दिवशीं डॉन फ्रेडरिक व बॉस्यू मोठ्या लवाजम्यासह शहरांत घोड्यावरून आले. जिकडे तिकडे जळलेलीं व मोडलेलीं घरें, देवळें व कोटाच्या भिंती, फुटलेले फरस, मोडून पडलेले झाडाचे बुंधे, भंगलेल्या मूर्ति व तटाच्या दुरुस्तीकरितां जमविलेलें इतर सामान, खाऊन कुजत पडलेल्या जनावरांचे मांसहीन सापळे, सार्वजनिक रस्त्यांत प्रेतसंस्कार न मिळाल्यामुळें कुजत पडलेलीं स्त्रीपुरुषांचीं प्रेतें, व विशेषतः मृत्यूच्या सपाट्यांतून वांचलेल्या लोकांच्या अस्थिचर्मशेष, काळवटलेल्या व भयोत्पादक आकृति दृष्टीपुढें येत होत्या. झालेली प्राणहानि व वित्तहानि पाखंडमतास जबर शिक्षा होती; परंतु स्पॅनिश लोकांचा सूड अयाप राहिलाच होता. प्रथम सर्व शिबंदीचे लोक तुरुंगांत गेले. त्यांपैकीं कित्येकांस पुढील भविष्य समजून त्यांनीं आपल्या हातून आपल्या प्राणाचा शेवट लाविला. कप्तान बॉर्डेट नामक फ्रेंच वीरानें आपल्या नोकराकरवीं तरवार धरवून त्याच्यावर आपली मान टाकून दिली. पीटर हेसलर समजून त्याच्या एका पुतण्यास पकडलें असतां त्या गृहस्थानें आपण पुढें येऊन आपल्या बांधवाची सुटका केली. क्लीफच्या छावणींत फांशीच्या शिक्षेस सुरुवात झाली. प्रसिद्ध देशभक्त रिपर्डा प्रथम बळी पडला व त्याच्या मागून शिबंदी फौजेचे दुसरे अंमलदार प्राणांस मुकले. शहरच्या फौजेपैकीं केवळ अठराशें लोक शिल्लक होते. त्यांपैकीं सहाशें जर्मन सैनिक

सोडून बाकी सर्वांची कत्तल उडाली. याशिवाय सुमार इतकेच गांवचे लोक पहिल्या हप्त्यास फांशीं गेले. पुढें क्रमाक्रमानें नामांकित, श्रीमान नव्या मताचे लोक कांहींना कांहीं आरोपावरून तीच गति पावले. शेवटीं स्पॅनिश लोक कंटाळून त्यांनीं अवशिष्ट राहिलेल्या तीनशें लोकांस जोडीजोडीनें पाठीस पाठ बांधून हार्लेमच्या तलावांत फेंकून दिलें. याप्रमाणें हजारों लोक लढाईंत अगर उपासमारामुळें खपलेल्या या शहरांत तेवीसशें लोकांचा बुद्धिपुरःसर खून करून नंतर माफी प्रसिद्ध करण्याचा फार्स झाला. त्यांतही पुष्कळ अपवाद होतेच. हा वेढा सात महिन्यांवर चालला होता. तितक्या मुदतींत दहा हजार दोनशें छप्पन्न गोळे शहरच्या तटावर पडले; एकंदर बारा हजार स्पॅनिश लोक हार्लेमला बळी पडले. स्पॅनिश लोकांनीं या जयाचा महोत्सव केला व यूट्रेक्ट येथें ऑरेंजची प्रतिमा करून जाळली. परंतु असले जास्त जय स्पॅनिश राज्याला पचले नसते. तीस हजार नामांकित व निवडक सैन्याला एक लहान शहर काबीज करण्यास सात महिने झटावें लागलें व बारा हजार लोक बळी द्यावे लागले, यावरून सर्व हॉलंड प्रांत काबीज करण्यास किती काल व किती लोक लागले असते ? कारण, नार्डेनचा खाटिकवाडा झाल्यापासून शत्रूशीं सामना देऊन मरण्याचा हॉलंडमधील सर्व शहरांचा निर्धार झाला होता. गेल्या पांच वर्षांत नेदर्लंडांत लढाई-चा खर्च अडीचशें लक्ष फ्लोरिन झाला होता; शिवाय जप्तीचा सर्व माल खपला होता; नव्या करांच्या मोबदल्यांत मिळालेली सत्तर लक्षांची खंडणीही खर्ची पडली; खजिन्यांत एक पै शिलक उरली नाहीं; व पगाराची बाकी थकल्यामुळें सैन्य बेलगामी होत चाललें होतें. तथापि फिलिपचा आत्मा ही बातमी ऐकून एकदम शांत झाला. ऑरेंज मात्र त्यामुळें हतवीर्य अगर निराश झाला नाहीं. त्यानें लुईला लिहिलें, "मला तुह्मास निराळ्या प्रकारची बातमी पाठवितां येईल अशी उमेद होती; परंतु ईश्वरी लीला अगाध आहे...वाल्चरन् बेटापैकीं रामिकेन्सचा किल्ला झीलंड-च्या लोकांनीं काबीज केला आहे; त्यामुळें शत्रूचा गर्व परिहार होईल व आम्हास सबंध गिळून टाकतां येईल अशी त्यांची कल्पना थोडी जिरेल. मला अशी खात्री वाटते कीं, थोड्या दिवसांत त्यांना वाटतः

आहे त्यापेक्षां निराळ्या प्रकारची कामगिरी त्यांच्या गळ्यांत पडेल." आल्व्हाला आपली स्थिति चमत्कारिक भासूं लागली. इकडे त्याजविषयीं लोकांचा द्वेषभाव कळसास जाऊन पोंहोचला असतां, त्याच्या कारकीर्दीच्या आरंभीं जी व्हिग्लियस, आर्शो प्रभृति मंडळी तो ह्मणेल त्या गोष्टीस मोठ्यानें मान वांकवून रुकार देत होती तीही त्याच्याविरुद्ध फिरली. शिवाय मेडीना सीली हें एक त्याला शल्य होऊन बसलें होतें. हा विश्वासूक मानलेला साथीदार त्याचा विश्वासभंग, त्याच्या बोलण्याची थट्टा व अधिकाराचा उपहास करून उलट आपलाच उपमर्द झाला अशी नेहमीं तकरार करीत असे. उभयतांचीं भांडणें होऊन शेवटीं मेडीना सीली नोव्हेंबर महिन्यांत देशीं परत गेला. हार्लेमच्या मोहिमेवरून हॉलंड काबीज करण्यास किती दीर्घ प्रयत्न पडेल याचा आल्व्हास बरोबर अंदाज होईना. त्यामुळें ता. २६ रोजीं त्यानें युट्रेक्ट शहरांत एक जाहिरहुकूम प्रसिद्ध केला व त्याच्या प्रती इतर शहरीं पाठविल्या. हा लेख परस्परविरुद्ध विकारांच्या मिश्रणानें अगदीं विलक्षण स्वरूपाचा झाला होता. "तुमच्या हातून असंख्य पातकें झालीं आहेत; तथापि तुह्मास आपल्या आश्रयाखालीं घेण्याची महाराजांची अपाप इच्छा आहे. करितां सरकारची नेदर्लंडच्या प्रजेस अशी ताकीद आहे कीं, त्यांनीं वेळींच राजाश्रयाचा फायदा घ्यावा; व त्यांचा क्रोध, घोर शासन, आघात, व सैन्य हे येण्याची वाट पाहूं नये. ...... परंतु तुह्मी जर या प्रसादास विमुख होऊन स्वैर वर्तन कराल, तर तुमच्यावर क्रूर व सक्तीचे उपाय चालविले जातील, तुमचा देश उध्वस्त केला जाईल, तुह्मास अन्न अन्न करून मरावें लागेल, तुह्मांवर तरवार चालविली जाईल, व सध्यां जें वस्तुस्वरूप आहे त्याचा मागमूसही राहणार नाहीं. सरकार सर्व देश विजन व उजाड करून या ठिकाणीं विदेशी लोकांची वसाहत करवितील; त्याशिवाय परमेश्वर व सरकार यांची इच्छा तृप्त होणार नाहीं." अर्थातच या हुकुमापासून प्रजेच्या रागद्वेषांत कांहीं फरक पडला नाहीं. यानंतर पुढचें हल्ल्याचें ठिकाण आल्कमार शहर होतें. हें शहर उत्तर हॉलंडच्या वरील टोंकाजवळ आहे. राजपुत्र ऑरेंजनें या ठिकाणीं थोडी शिबंदी

पूर्वीच नेऊन ठेविली होती. जुलैच्या दुसऱ्या पंधरवड्यांत सुभेदाराच्या वतीनें आल्कामारला शरण जाण्याविषयीं हुकूम गेला व त्यास साफ नकाराचा जबाबही ताबडतोब मिळाला. पुढें स्पॅनिश सैन्य कांहीं आठवडे-पर्यंत हार्लेमच्या कामगिरींत गुंतले होतें. हार्लेममध्यें ठाणें देऊन बस-लेल्या सैन्यांत उत्पन्न झालेली बंडाळी मोडण्यांत आगष्ट महिना गेला. या सैन्याचा पगार पुष्कळच थकला असल्यामुळें चाळीस हजार गिल्डर (=फ्लोरिन) घेऊन हार्लेम शहर ऑरेंजच्या ताब्यांत देण्याचा विचार करून त्यांनीं त्याजकडे आपले मुखत्यार गुप्तपणें पाठविले. ऑरेंजला एवढी लहान रक्कमसुद्धां आयत्यावेळीं न मिळाल्यामुळें या मुखत्यारांस विमुख परत जावें लागलें. स्पॅनिश सैन्य चोहोंकडे अगदीं दुःशास्य होऊन गांवोगांव लोकांवर नानाप्रकारचे जुलूम करूं लागलें. त्यांना बाकीबद्दल व चालू महिन्याच्या पगाराबद्दल माणशीं थोडथोडी रक्कम देऊन आल्व्हानें त्यांची समजी केली. हें काम आटोपल्यावर राजसत्तेशीं झगडणाऱ्या स्वातंत्र्यतेजाकडे पूर्णपणें लक्ष पोंहोचविण्यास त्यास अवकाश मिळाला. स्पॅनिश सैन्यानें प्रथम जवळचें एग्मॉन शहर जाळून फस्त केलें व ता. २१ आगष्ट रोजीं सोळा हजार निवडक शिपायांसह डॉन फ्रेडरिकनें आल्कामारला वेढा दिला. शहरांत आठशें शिपाई व तेराशें शस्त्र धारण करण्यास लायख पुरुष इतकें मनुष्यसामर्थ्य होतें. बाकीची संख्या फरारी लोक, बायकापोरें यांची होती. आल्कामारवर आपला पुरा सूड उगवण्याचा त्याचा निश्चय होता. फिलिपच्या पत्रांत त्यानें लिहिलें, " आल्कामार हस्तगत झाल्यावर त्या ठिकाणीं एक प्राणीं जिवंत सोडणार नाहीं, प्रत्येक इसमाच्या नरड्यावर सुरी ठेवीन; हार्लेम येथें दाखविलेल्या दयाभूतपणाचा कांहीं उपयोग झाला नाहीं; क्रूरपणानें वागूनच बाकीचीं शहरें शुद्धीवर आणलीं पाहिजेत. " माद्रीद् येथील शांततानुवादक पक्षाचा दुरून झालेला समज व्यर्थ आहे; ते नेदर्लंडमध्यें असते तर त्यांच्या मतांत पालट पडला असता, असें त्याचें ह्मणणें होतें. क्षमा व दया यांचा लोकांवर कांहीं परिणाम होत नाहीं असें त्याच्या मतें सप्रमाण सिद्ध झालें होतें.

सानॉयच्या अधिकारांत हा प्रदेश होता. दक्षिणेकडून हें वर पसरत

चाललेलें वादळ व आपल्याजवळ सैन्याची उणीव पाहून सानॉयचें मन अस्वस्थ झालें. त्यानें ऑरेंजला एक आज्ञापत्र लिहिलें. कारण ऑरेंजच्या बुद्धिमत्तेवर व धैर्यावर या राष्ट्राची सर्व भिस्त होती. ऑरेंजनें एखाद्या परदेशस्थ राजाशीं सख्य करून आपणास मदत मिळविण्याची कांहीं तजवीज केली असेल अशी सर्व देशभक्तांची आशा होती; त्यासंबंधानें सानॉयनें आपल्या वरिष्ठास असें सुचविलें कीं, तशी कांहीं योजना झाली असल्यास हॉलंडच्या सर्व शहरांस ती समजणें जरूर आहे; कारण त्याच्या योगानें लोकांस धीर येऊन लोकांची बाहेरदेशीं जाण्याची प्रवृत्ति बंद होईल. त्याला राजपुत्रानें जबाब लिहिला," आह्मीं यत्न केला असतांही ईश्वरानें हार्लेमचा आपल्या इच्छेनुरूप निकाल लावला; ह्मणून त्याचा शब्द खोटा धरून आपणास त्याच्या सच्छास्त्राचा उपहास करतां येईल काय? ईश्वराची शक्ति कमी झाली आहे काय? त्याच्या भक्तांचा धर्म निर्वीर्य झाला काय? तुह्मी मला विचारतां कीं मीं परदेशस्थ राजाशीं गुप्त सख्य संपादन केलें आहे काय? होय. जुलुमाच्या चाकीखालीं सांपडलेल्या ख्रिस्तीलोकांचा पक्ष स्वीकारण्यापूर्वीं मीं राजराजेश्वरापाशीं एक विचार केला होता. व माझी अशी पक्की खात्री आहे कीं, त्याच्यावर भरंवसा टाकून राहणाऱ्या लोकांचें तो आपल्या सर्व शक्तिमान् विभूतींनीं संरक्षण करीलच करील! सर्व सैन्यांचा नेता आमच्याकरितां सैन्य तयार करील व आमचे व आपले शत्रू यांच्याशीं झगडून त्यांचें निर्दलन करील." शेवटीं त्यानें समुद्राच्या व खुष्कीच्या बाजूनें शत्रूवर हल्ला करण्याचे आपले बेत आपल्या विश्वासूक साथीदारांस कळवून शत्रूचा निर्भयपणें प्रतिकार करण्याविषयीं उत्तर हॉलंडच्या लोकांस उत्तेजन दिलें होतें. आल्कामारची सर्व आशा समुद्राच्या पाण्यावर होती. झिप नामक पाण्याचे निकाल उघडून व समुद्राचे धक्के कांहीं ठिकाणीं फोडून सर्व आसपासचा प्रदेश जलमय करतां येण्यासारखा होता. हे निकाल शहरापासून एक मैलावर होते. परंतु हा जलप्रलय केल्यापासून सर्व मुलुखभर पिकांची खराबी होऊन लोकांचें फार नुकसान होणार असल्यामुळें हें कृत्य करण्यास सर्व आसपासच्या गांवांची परवानगी जरूर होती. ती मिळविण्याकरितां सानॉय, ऑरेंज व निरनिराळ्या

शहरचे अधिकारी य.स आल्कामारचीं पत्रें एका पोकळ काठींत बंद करून घेऊन पीटर व्हॅान्डर्म नामक शहरचा एक सुतार एकटा शत्रूच्या वेढ्यांतून निसटून जाण्याचा निश्चय करून निघाला !

तटाबाहेर उभय पक्षांच्या चकमकी प्रत्यहीं चालल्या होत्या. ता. १८ रोजीं बारा तास तोफांचा भडिमार करून दोनप्रहरीं शहरच्या फ्रीजियन वेशीवर व उलट बाजूनें तांबड्या बुरुजावर चाल करून जाण्याविषयीं डॉन फ्रेडरिकनें आपल्या सैन्यास हुकूम केला. लॉबर्डीच्या पलटणींनीं मोठ्या आवेशानें व जयघोष करीत तटावर हल्ला केला. हार्लेमपेक्षांही जास्त निश्चयी व धाडशी लोक या समयीं स्पॅनिश सैन्यास प्रतिरोध करण्यास जमले होते. ते असंख्य व युद्धकलानिपुण असावेत असें हल्ला करणारांस वाटूं लागलें. प्रत्येक जिवंत मनुष्य तटावर उभा होता. हल्ला करणाऱ्या टोळ्यांवर तोफांचा, बंदुकांचा, पिस्तुलांचा मारा व कढलेलें पाणी, डांबर व तेल, अटलेलें कथिल, भाजलेल्या चुन्याच्या कळ्या यांचा वर्षाव सारखा चालला होता. शेंकडों डांबरानें फांसलेले व पेटविलेले वर्तुलाकृति चुडे स्पॅनिश सैनिकांच्या गळ्यांत नेमके येऊन पडत; शिवाय एखाद्या इसमाचा पाय तटावर लागल्यास शहरवासी लोक तरवार व कट्यार यांचा प्रयोग करून त्यास खालीं खंदकांत ढकलून देत होते. तीन वेळ मोठ्या नेटानें फेरफेरून स्पॅनिश लोकांनीं तटावर चाल केली ! तिन्ही वेळ आल्कामारच्या रहिवाशांनीं हल्ले मागें फिरविले. चार तास हें कदन चाललें होतें. इतक्या मुदतीपर्यंत मृत्यु आल्याखेरीज कोणीही इसम तटावरून एक पाऊलभर हलला नाहीं. बायका पोरें जिकडे तिकडे उडत असलेल्या गोळ्यांस अगर तटावर चाललेल्या घोरयुद्धास न भितां शस्त्रागारांतून दारुगोळा आणून आपले नवरे, बाप, भाऊ, यांस तटावर पुरवीत होतीं. सरतेशेवटीं काट्टोख पडला. कर्णा वाजून स्पॅनिश सैन्यास परतण्याची सूचना मिळाली; सुमार एक हजार बांधव खंदकांत मेलेले टाकून स्पॅनिश शिपाई आपल्या गोटांत माघारे गेले. इकडे आल्कामारच्या नागरिकांपैकीं तेरा व शिबंदीपैकीं वीस इसम प्राणास मुकले. तटांवर क्षणभर जाऊन जिवंत परत आलेला एक स्पॅनिश सैनिक सांगूं लागलाः—" शहरांत कोणाच्या डोक्यावर शिरस्त्राण अगर

अंगावर चिलखत माझ्या दृष्टीस पडलें नाहीं. मासे धरणाऱ्या कोळ्याप्रमाणें लोक साधे दिसत होत. अशा लोकांनीं निवडक, निरढलेल्या स्पॅनिश सैन्याचा गर्व परिहार केला. आल्कामारच्या लोकांस थोडी उमेद आली; शिवाय एका स्पॅनिश कैद्यानें शत्रूच्या छावणींतील इत्थंभूत माहिती त्यांस समजाविली. शरमेची गोष्ट एवढीच कीं, वचन दिल्याप्रमाणें शहरवासी लोकांनीं या माणसास जीवदान दिलें नाहीं. दुसरे दिवशीं पुन्हां तोफांची सरबत्ती सुरू करून शहरावर हल्ला करण्यास डॉन फ्रेडरिकनें हुकूम सोडला. सैन्यानें पूर्ण दहशत खाल्ली होती. कित्येकांस तरवारीनें तोडून काढिलें, तथापि स्पॅनिश शिपाई तटाकडे तोंड घेईनात. इकडे सुभेदार सानॉयनें कित्येक धक्के फोडल्यामुळें छावणीच्या आसपास दलदल माजत चालली. पाण्याचा पूर अद्याप आला नव्हता. शिपाईलोक फार अस्वस्थ व बेहुकमी होत चालले. आल्कामार शहरचा दूत सानॉयकडे ऑरेंजचीं पत्रें घेऊन आला. त्यांत आल्कामार शत्रूच्या हातीं न जाऊं देण्यासाठीं धक्के फोडून सर्व मुलुखभर जलप्रलय करण्याची त्यांस परवानगी दिली होती; पिकाची खराबी न व्हावी ह्मणून शेतकरी लोक रात्रौ निकाल बंद करतील; सबब त्या ठिकाणीं रात्रंदिवस सक्तीचा पहारा ठेवावा असेंही ऑरेंजनें सुचविलें होतें. निकाल मोकळे करण्याच्या कामास एकदम सुरवात झाली, व वायव्येकडून सोसाट्याचा वारा सुटल्यामुळें समुद्राचें पाणी जमिनीवर लांबवर पसरत चाललें. दोन धक्के फोडावयाचें काम पुढें आणीबाणीच्या प्रसंगाकरितां राखून ठेविलें होतें. ते फोडतांच सर्व सभोंवारचा प्रदेश पाण्यानें भरून पिकाची व मालमत्तेची अतोनात नुकसानी झाली असती व एक स्पॅनिश शिपाई जिवंत परत गेला नसता. ही बाहेरची कामगिरी करून व्हान्डर्मे शहरांत मोठ्या कष्टानें परत आला. त्याची काठी व त्यांतील पत्रें शत्रूच्या हातीं सांपडलीं. त्यानें ऑरेंजचे व सानॉयचे बेत आल्कामारच्या लोकांस तोंडीं कळविले. ऑरेंजचा दीर्घ प्रयत्न डॉन फ्रेडरिकला समजतांच दृढनिश्चयी सेनापति व जिवावर उदार झालेले लोक यांच्याशीं प्रसंग आहे असें त्यास कळून चुकलें. आधींच त्याच्या सैन्यानें दहशत खाल्ली होती; समुद्राच्या पाण्यांत बुडून मरण्याची पाळी येणार हें समजतांच ते जीव घेऊन पळत सुटतील असें फ्रेडरिकला

वाटूं लागलें. स्पॅनिश छावणींत अंमलदार लोकांचा विचार होऊन सर्वानुमतें वेढा उठवून कुच करावें असें ठरलें. ता. ८ आक्टोबर रोजीं सात आठवडे-पर्यंत चाललेला हा वेढा उठवून स्पॅनिश लोक निघून गेले.

लुई नॅसा हा स्वभावतः फार उदारबुद्धीचा व मोकळ्या मनाचा पुरुष असल्यामुळें लोकांचा त्याच्यावर तात्काळ विश्वास बसत असे. शिवाय तो फार कुशाग्रबुद्धि व परेंगितज्ञ होता. त्यामुळें रणशूर असूनही परराष्ट्रांशीं वकीली करण्यांत तो फार वाकबगार असे. त्यानें फ्रान्सच्या दरबारांत अंतस्थ सूत्रें बांधण्याचें काम सतत चालविलें होतें; त्याची आल्व्हास मोठी भीति वाटत होती. फ्रान्सविषयीं आल्व्हाच्या मनांत फार दीर्घ-संशय होते. लुईला फिलिपच्या नोकरींत गुंतविण्याचा आपला इरादा आहे असें फ्रान्सच्या राजाचें ह्मणणें होतें. परंतु पूर्वी नवव्या चार्लसनें अशींच आश्वासनें देऊन मॉन्समध्यें बंड उपस्थित केलें होतें. इकडे आल्व्हानें फिलिपच्या मार्फत इंग्लंडशीं गुप्तव्यवहार सुरु केला होता. रिडोल्फी प्रकरणावर विरजण पडून ता. १ मे १५७३ रोजीं नेदर्लंड-संबंधानें स्पेन व इग्लंड यांच्या दरम्यान एक तह ठरला. आल्व्हानें राजास यानंतर असेंही सुचविलें कीं, लॉर्ड बर्लेच्या हातांत इंग्लंडचीं राज्यसूत्रें आहेत; त्यास आपलासा करून ठेवावा ह्मणजे राजकारण पुढें सुरळित चालेल. उलट पक्षीं ऑरेंजचें इंग्लिश दरबाराशीं अद्याप वळण जुळेना. पैशाची जमवाजमव न झाल्यामुळें युद्धाचें काम पुढें चालवि-ण्यासही अडचण पडूं लागली. त्याचा मुख्य उद्देश आपल्या देशबांधवांस राजकीय व धर्मविषयक स्वातंत्र्य प्राप्त व्हावें हा होता; व या कामाकरितां त्यानें आपला सर्व काल, आपलें सर्व ऐश्वर्य व जीवित यांचा व्यय चालविला होता. मात्र धर्मसहिष्णुतेचें तत्त्व अमलांत आणण्याच्या कामीं त्यानें सर्व पक्षांची अप्रियता संपादन केली. त्याच्या हुकुमाचा अतिक्रम करून डीलामार्कप्रभृति मंडळींनीं कॅथोलिक लोकांवर चाल-विलेले अत्याचार त्याचेच माथीं लादले जात होते. डीलामार्कनें परमपूज्य कॉर्नेलियस म्युशिअस नामक बहात्तर वर्षांचा वयोवृद्ध कॅथोलिक धर्मगुरू यमयातना करून ठार मारला; त्यापासून ऑरेंजला अत्यंत संताप व दुःख झालें. हॉलंडच्या लोकसभेस या गोष्टीचा तिरस्कार उत्पन्न झाला. परंतु

डीलामार्कची लोकपक्षाची सेवा, त्याचा राष्ट्रांतील मोठमोठ्या लोकांशीं आप्तसंबंध, व त्याचा दंगेखोर स्वभाव लक्षांत घेऊन सभेनें फक्त त्याचा अधिकार काढून घेतला व त्यास मुकाट्यानें नेदर्लंडदेश सोडून जाण्याचा हुकूम केला. त्यावर त्यानें नेदर्लंडच्या निरनिराळ्या भागांत बंडें उपस्थित केलीं. सन १५७४ च्या अखेर ही ब्याद राष्ट्रांतून बाहेर घालवावी लागली. डीलामार्क पुढें कांहीं दिवसांनीं पिसाळलेल्या कुत्र्याच्या दंशानें मेला. याप्रमाणें उन्नत मनोवृत्तींच्या प्रेरणेनें ऑरेंज चालला असतां कार्डिनल ग्रँन्व्हिल आदिकरून त्याचे शत्रू तो आत्महितार्थ झटत होता अशी कल्पना करून दैव फिरलेलें पाहून त्याचा उपहास करूं लागले. ग्रँन्व्हिलचा त्यानें उपदेश ऐकला असता तर कीर्तिमंदिरांतील एक नंदादीप कमी झाला असता.

ऑरेंजची या वेळीं सर्व भिस्त लुईनें फ्रान्सच्या राजाशीं चालविलेल्या गुप्त कारस्थानावर होती. स्वतः त्याला रक्तानें ओथंबलेल्या या दरबाराशीं संबंध ठेवण्यास मन धेईना. फ्रान्सच्या राजनीतीचें येथवर मुख्य धोरण स्पॅनिश राजसत्तेचा महिमा कमी करणें, फ्रान्सचा राजपुत्र ड्यूक ॲलेन्सन याचा इंग्लंडच्या इलिजाबेथ राणीशीं शरीरसंबंध जुळवून आणणें, जर्मनीच्या संस्थानिकांवर सहजरीत्या वर्चस्व स्थापन करणें, फ्रान्सचा दुसरा राजपुत्र अँजू यास पोलंडची गादी प्राप्त करून देणें, व जमल्यास फ्रान्सच्या राजघराण्यास जर्मनीचा बादशाही मुगुट संपादन करणें, हें होतें. बार्थोलोम्यूची कत्तल व त्यापासून फ्रान्सविषयीं सुधारक राष्ट्रांत उत्पन्न झालेला तिरस्कार यामुळें हे सर्व बेत रसातळास गेले होते. चार्लस व त्याची कारस्थानी आई यांना ही गोष्ट तेव्हांच लक्षांत आली. फिलिप व आल्व्हा यांस या दुष्ट कृत्यांपासून जितका आनंद झाला, तितकाच तें करणारांचा झालेला अपकर्ष पाहूनही झाला. चार्लसचा जर्मनींतील हुषार व संभावित मुखत्यार शाँबर यानें या प्रॉटेस्टंट लोकांच्या नाहक संहारापासून फ्रान्सच्या एकंदर राजकारणावर व विशेषें- करून जर्मनी व पोलंडच्या राज्यप्राप्तिविषयक खटपटीवर झालेले दुष्परिणाम आपल्या मालकास पत्रद्वारा लिहून कळविले. जर्मनीचा मुगुट मॅक्सिमीलियन बादशहाचे वंशज असत तोंपर्यंत चार्लस अगर

फिलिप या दोघांपैकीं कोणासही मिळणें शक्य नव्हतें. तथापि या प्रसंगीं फिलिपनें आपणास जर्मनीचा बादशाही मुगुट प्राप्त झाल्यास नेदर्लंडमधून स्पॅनिश सैन्य परत बोलावण्याचें, त्या देशांत नवीन धर्म चालविण्याचें, नेदर्लंडचें जर्मनीशीं ऐक्य कबूल करण्याचें, व त्या राष्ट्रास पॅसूच्या तहावरून धर्मस्वातंत्र्य देण्याचें, व राजकुमार ऑरेंज व त्याचे साथीदार यांस त्यांच्या जहागिरी, मानपान व पदव्या पूर्ववत् देण्याचें व जर्मनींतील धर्मस्वातंत्र्यविषयक सर्व कायदे व हुकूम पाळण्याचें जर्मन संस्थानिकांशीं कबूल केल्याचें आढळून येतें. यावरून फिलिप केवळ धर्माग्रहावरून जुलूम करीत होता असें ह्मणतां येणार नाहीं. फ्रान्सच्या राजानेंही आपण केलेल्या गुन्ह्याबद्दल फुषारकी मिरविण्याचें सोडून, झालेल्या दोषांवर पांघरूण घालण्याचा व त्याबद्दल अनुताप दर्शविण्याचा क्रम सुरू केला. हें नाटक या संधीस फार अवश्य होतें. कारण जर्मन बादशाहीची आशा जरी दुरधिगम्य होती; तथापि पोलंड संस्थानची गादी सध्यां रिकामी होती; व तिला बादशहाचा मुलगा, ड्यूक अँजू, व राजपुत्र ऑरेंज हे तिघे हक्कदार होते. पुष्कळ बड्या जर्मन गृहस्थांच्या मनांतून राजपुत्र ऑरेंजला ही गादी मिळावी असें होतें. परंतु ऑरेंज नेदर्लंडच्या कामगिरींत गुंतला असल्यामुळें तो या राज्यपदाकडे ढुंकूनसुद्धां पाहीना. अँजूपक्षाचे लोक त्याच्या शिफारसीचा व वजनाचा उपयोग करून घेण्याकरितां खटपट करूं लागले.

ज्याच्या अघोर कृत्यापासून फ्रान्सदेश उध्वस्त झाला व ऑरेंजनें नेदर्लंडच्या मुक्ततेविषयीं मोठ्या चातुर्यानें कल्पिलेले बेत ऐन फलप्राप्तीच्या वेळीं विफल झाले त्या राजकुलोत्पन्न पुरुषाशीं व्यवहार करणें ऑरेंजला फार अश्लाघ्य वाटत होतें; परंतु हे हिंस्रलोक अनुताप दर्शविण्यास तयार झाले होते; व फ्रान्स व स्पेन यांचें पिढीजाद् वैर होतें. चार्लसची विनंति मान्य करून अँजूच्या हक्कास मदत केल्यास ह्यूजेनॉट लोकांना धर्मस्वातंत्र्य मिळून फ्रान्ससारख्या बलिष्ठ राष्ट्राच्या सहाय्यानें नेदर्लंडला डोकें वर काढण्यास संधि मिळेल असा भरंवसा होता. हें जाणून शॉंबरशीं या गोष्टींसंबंधानें पत्रव्यवहार सुरू करण्याविषयीं ऑरेंजनें लुईस लिहून पाठविलें; व पत्रासोबत आपल्या मागण्यांचा एक मसुदाही

करून पाठविला. त्याचा सारांशः—" फ्रान्सच्या राजानें आपल्या प्रजेची समजूत करून त्यांचें प्रेम संपादन करावें. धर्माच्या बाबतींत कोणताही निर्बंध असूं नये. ही गोष्ट अमलांत आणल्याबद्दल राष्ट्रांतील सर्व राजकीय संस्थांची मान्यता घेऊन ती जर्मनींत प्रसिद्ध करावी. नेदर्लंडच्या विमोचनार्थ प्रत्यक्ष लढाई करण्याची इच्छा नसल्यास एक लक्ष काऊन प्रथम व मागाहून तीन तीन महिन्यांनीं एकेक लक्षाचा हप्ता, याप्रमाणें रक्कम ऑरेंजकडे रवाना करावी; शिवाय फ्रान्समध्यें एक हजार घोडदळ व सात हजार पायदळ फौज जमविण्याची ऑरेंजला परवानगी असावी. हॉलंड व झीलंडखेरीज कोणत्याही नेदर्लंडच्या भागांत काबीज केलेलें शहर अगर गांव फ्रान्सच्या राजाच्या स्वाधीन केलें जाईल; हॉलंड व झीलंड प्रांत फक्त त्याच्या आश्रयाखालीं राहतील. तेथील राज्यव्यवस्था तद्देशीय लोक चालवितील. धर्मस्वातंत्र्य, जुने हक्क, कायदे व सनदा यथावत् चालवाव्या. फ्रेंच राजानें दिलेल्या कर्जाऊ रकमा परत करण्याची जोखीम राजपुत्र ऑरेंज व हॉलंडची प्रांतिकसभा यांजवर राहील." अशा आशयाचीं टिपणें देऊन त्यानें वकील पारिसकडेही पाठविलें.

शाँबरच्या मध्यस्थीचा अखेर परिणाम झाला. ता. २३ मार्च १५७३ रोजीं शाँबर व लुई यांची सात आठ तास वाटाघाट झाली. ऑरेंजनें घालून दिलेल्या ओळीबरहुकूम उभयतांचे करारमदार ठरले. पुढें दहा दिवसांनीं लुई आपल्या घराण्याचें वजन अँजूतर्फे खर्च करण्यास तयार असल्याचें शाँबरनें चार्लसला लिहून कळविलें. या वेळीं लुईनें एक तपशीलवार व मार्मिक पत्र स्वतः चार्लसला पाठविलें. यांत फ्रान्सला स. १५७२ च्या उन्हाळ्यापासून प्राप्त झालेली अधमस्थिति स्पष्टपणें वर्णन केली होती. सन १५७२ च्या उन्हाळ्याच्या पूर्वीं इलिजाबेथ फ्रान्सच्या राजघराण्याशीं संबंध करण्यास तयार होती; जर्मन संस्थानिक चार्लसला बादशाही तक्तावर बसविण्यास राजी होते; व नेदर्लंडचे लोक त्याचें स्वामित्व कबूल करीत होते. तेंच कॉलिनीचा चार्लसनें विश्वासघात करून खून केल्यापासून फ्रान्सचें पारडें खालीं बसून स्पेनचें महत्व विशेष वाढलें होतें. या पत्राच्या शेवटच्या भागांत " धर्मबीज हें मनुष्यमात्राच्या हृदयांत फार खोल रुजलेलें असतें; त्याचें उन्मूलन शस्त्रानें होणें अशक्य

आहे. " वगैरे धर्मविषयक विचार फार जोरदार भाषेनें प्रतिपादिले होते.

ऑरेंजचें ठाणें डेल्फ येथें असे. मागील कथानकावरून त्याच्यावर लोकांचा केवढा भरंवसा व भार होता, व त्यानें आपणास वस्तुस्थितीवरून सहज प्राप्त झालेला धुरीणपणा कितपत खरा करून दाखविला हें बरेंच स्पष्ट झालें आहे. त्याजवर येऊन पडलेल्या जोखमेच्या मानानें त्याची सत्ता व साधनें मात्र फारच संकुचित होतीं. तो या वेळीं लिहितो, " आमचे व्यापार ठीक चालले आहेत; मात्र तासातासांत जमाबंदीचीं, लष्करी व राजकीय कामें उद्भवतात त्यांची एकट्यानें वासलात लावणें मुष्किलीचें झालें आहे...मला एक मनुष्यसुद्धां मदतीस मिळत नाहीं; त्यामुळें काय त्रास होतो तें सांगतां पुरवत नाहीं. " त्याचा युरोपच्या सर्व राष्ट्रांशीं पत्रव्यवहार चालला होता. शिवाय आल्व्हानें युद्धासाठीं पैशाची मागणी करण्याकरितां सप्टेंबर महिन्यांत नेदर्लंडची राष्ट्रसभा भरविण्याचें ठरविलें होतें. त्यावेळीं सर्व राष्ट्राचा देशाभिमान जागृत करण्याकरितां ऑरेंजनें मुद्दाम एक जाहीर विनंतीपत्र तयार केलें; व तें हॉलंडच्या सभेच्या व आपल्या सहीनें राष्ट्रसभेकडे पाठविलें. त्यांत येथवर झालेल्या प्रसंगांचें जोरदार व त्रोटक वर्णन देऊन, पुढें सर्व राष्ट्रानें या सर्वसामान्य शत्रूपासून आपलें संरक्षण करण्याकरितां एक विचार करावा अशाबद्दल सयुक्तिक कारणें सुचविलीं होतीं. " या वेळीं एकोपा न झाल्यास धर्मसंशोधन कायम होणार; आतां आल्व्हाचा जुलूम, प्राणहानि व वित्तहानि लोकांनीं कोठवर सोसावी? फ्लँडर्स, ब्राबंट, बर्गंडी, हॉलंड वगैरे प्रांतांच्या संस्थानिकांनीं लोकांच्या संमतीवांचून पूर्वी कधींही सामभेद केला नाहीं, नाणीं पाडलीं नाहींत, किंवा लोकांपासून एक दमडी वसूल केली नाहीं; आतां त्या गोष्टी या राष्ट्रास कशा कबूल होतात ? आम्स्टर्डम् व मिडलबर्ग लोकपक्षास सोडून वागलीं नसतीं तर सर्व उत्तरेकडील प्रदेशानें शत्रूस दाद दिली नसती. नेदर्लंडच्याच सहाय्यानें नेदर्लंड चिरडलें जात आहे ! आल्व्हाला अमानुष सामर्थ्य कोठून प्राप्त झालें आहे ? तुमच्याचकडून ! जहाजें, दाणावैरण, पैसा व शिपाई कोठून मिळत आहेत ? नेदर्लंडच्या लोकांकडून ! परराष्ट्राचा जुलूम सहन न करण्याचें राष्ट्राचें वीर्य कोठें गेलें आहे ? आमचे पूर्वज

राष्ट्रांतील हुद्यांचीं कामेंसुद्धां परदेशस्थांस देत नव्हते. जर हॉलंडला एकट्याला शत्रूंस नाचविण्याचें सामर्थ्य आहे, तर सर्व प्रांत एकवटल्यावर आपणास काय करतां येणार नाहीं ? " या वेळींच त्यानें एक पत्र स्पेनच्या राजाला पाठविलें. यांत राष्ट्रावर होत असलेला जुलूम व लोकांस भोगावीं लागत असलेलीं दुःखें यांचें राजनिष्ठापूर्वक थोडक्यांत दिग्दर्शन करून, लोकांचा या गोष्टींत बिलकुल दोष नाहीं असें स्थापन केलें होतें; व लोकांच्या वतीनें या पत्रांत राजास अशी प्रार्थना केली होती कीं, राष्ट्राचे हक्क पालन करावे व आल्व्हास कामावरून दूर करावा. " आम्हीं आल्व्हा व त्याचे सेवक यांच्या हिंसक दाढेंतून आपणास सोडविण्याकरितां शस्त्र धारण केलें आहे......आमच्या सर्व शहरांचा असा संकल्प ठरला आहे कीं, या क्रूर नियंत्याचे हुकूम मान्य करण्यापेक्षां प्रत्येक वेढ्यांत सामना द्यावा, होईल तितकें साहस करावें, शक्य तितके हाल भोगावे; व तसाच प्रसंग आल्यास आपल्या घरादारांस आग लावून त्यांत शत्रू व आपण एकदम प्राणास मुकावें. " ऑरेंजनें हीं अक्षरें शब्दशः खरीं करून दाखविलीं. त्यास इतकें धैर्य व दृढ निश्चय प्राप्त होण्यास राजकीय हक्कांपेक्षां धर्मस्वातंत्र्याची कल्पना विशेष कारणीभूत झाली. त्याचें मुख्य तत्त्व असें होतें कीं, सर्व ख्रिस्तीपंथांनीं एकमेकांच्या मतांबद्दल पूज्यभाव ठेवून ख्रिस्ती समाजांत एकोपा राखावा. आक्टोबर महिन्यांत त्यानें प्रसिद्धपणें कॉल्व्हिन् पंथ स्वीकारला.

आल्कामारचा वेढा उठल्यानंतर तीन दिवसांनीं बंडवाल्यांस आणखी एक जय मिळाला. आक्टोबरच्या प्रारंभीं बॉसू कांहीं जहाजें गोळा करून झूडरझीच्या आखातांत शिरला. देशभक्तांनीं या अवधींत पंचवीस जहाजें तयार केलीं होतीं. त्यांचा आरमाराधिपति डर्कझून बॉसूच्या मागोमाग झूडरझींत शिरला. उभयपक्षांच्या बऱ्याच झटापटी झाल्या. बॉसूचीं जहाजें अवजड असून त्यांच्यावर जड तोफा असल्यामुळें देशभक्तांस बॉसू लगट करूं देईना. ता. ११ आक्टोबर रोजीं बॉसूचें आरमार हॉर्न व एंकुझेन या ठिकाणीं असतां देशभक्तांचीं जहाजें वादळाच्या जोरानें त्यांच्यावर येऊन आदळलीं. कांहीं वेळ मोठा संग्राम झाल्यावर बॉसूचीं जहाजें माघारी फिरलीं; देशभक्तांच्या जहाजांनीं

त्यांचा पाठलाग केला. बॉसूचीं पांच जहाजें डचलोकांच्या हातीं सांपडलीं. खुद्द बॉसूच्या " धर्मसंशोधन " नामक जहाजावर चार डच् जहाजांनीं हल्ला केला. पैकीं एक जहाज लौकरच हतवीर्य झालें. बाकीच्या तीन जहाजांची " धर्मसंशोधना " च्या निरनिराळ्या भागांशीं गुंतागुंत होऊन हें चतुष्क वाऱ्याच्या व भरतीच्या जोरानें वाहूं लागलें. डचलोक " धर्मसंशोधनां " वर चढण्याचा यत्न करीत होते. उभयपक्षांचें मोठें भयंकर युद्ध ता. ११ रोजीं दोनप्रहरीं व सर्व रात्रभर चाललें होतें. दुसरे दिवशीं प्रातः डीमर डाइकच्या धक्क्यावरील भीमकर्मा जॉन हेरिंग " धर्मसंशोधना " वर चढला, व त्यानें स्पॅनिश निशाण खालीं पाडलें. त्या कृत्याबद्दल या वीरास आपले प्राण खर्ची घालावे लागले. इतक्यांत हीं जहाजें देशभक्तांच्या हद्दींत वाळवंटावर जाऊन अडकलीं. हें पाहून बॉसू व तीनशें स्पॅनिशलोक डचलोकांस शरण गेले. त्यांस त्यांनीं कैदी करून हॉलंडांत आणिलें. बॉसू हॉलंडच्या हातीं सांपडल्यामुळें आल्डेगोंड व हार्लेमचे कैदी शत्रूच्या कैदेंत होते त्यांची सुटका झाली. आल्व्हाचा दरारा दिवसेंदिवस कमी होत चालला होता. खुद्द कौन्सिलच्या लोकां-बरोबर त्याचें बनेनासें झालें. त्यानें अलीकडे आपलें ठाणें आम्स्टर्डम शहरांतच ठेवलें होतें. ब्रुसेल्समध्यें त्याचे पूर्वीं देव्हारे माजले होते, तेथेंही लोक त्याचा द्वेष करूं लागले. तथापि त्याचा दुष्ट स्वभाव तिळमात्र बदलला नाहीं. त्यानें या सुमारास युटेन्हुव्ह नामक सरदारास दोरीनें खांबास बांधून सभोंवतीं जाळ करून दिला. या गृहस्थावर ब्रिलच्या मोहिमेंत सामील असल्याचा केवळ संशय होता. यानंतर लीडनचा मामला डॉन फ्रान्सीस नामक सरदारावर सोंपवून आल्व्हा ब्रुसेल्सला परत आला. या ठिकाणीं आपल्या सर्व सावकारांस आपापल्या येण्याचा हिशेब घेऊन हजर राहण्याविषयीं नोवेंबर महिन्यांत त्यानें जाहिरनामा प्रसिद्ध केला. व ठरलेल्या दिवसाच्या आधल्या रात्रीं तो सर्व सामानसुमान बांधून ब्रुसेल्स-मधून निघून गेला ! ता. १७ नोवेंबर रोजीं डॉन लुई डी रेकिसन्स वाय क्यूनिगा ऊर्फ बडे सेनासाहेब हे आल्व्हाच्या कामाचा चार्ज घेण्यासाठीं ब्रुसेल्स येथें आले. ता. २९ रोजीं नवीन सुभेदारांनीं सुभेदार व सेनापति पदांच्या शपथा आर्शो, बर्लेमॉन, प्रेसिडेंट वगैरे अधिकाऱ्यांच्या समक्ष

घेतल्या. ता. १८ रोजीं ड्यूक आल्व्हानें नेदर्लंडला रामराम ठोकला. शेवटीं कांहीं आठवडे तो आपली खोली धरूनच होता; या गोष्टीस संधिवाताचा विकार, आपला अपकर्ष, व देणेदारांचे तगादे हे सर्व थोड्या-बहुत अंशानें कारणीभूत झाले. तो फ्रान्समधून स्वदेशीं परत जाण्यास भीत होता; कारण कोठेंतरी वाटेंत एखाद्या खिडकींतून गोळ्यांचे बार आपणावर झडतील असें त्यास वाटत होतें. स्वदेशीं परत गेल्यावर तो अशी फुषारकी मारूं लागला कीं, आपण आपल्या कारकीर्दींत अठरा हजार सहाशें लोकांस देहांत शासन केलें. लढाया, वेढे, कत्तल, उपासमार यांनीं मेलेल्या लोकांची गणतीच नाहीं. स्पेनमध्यें प्रथम राजानें त्याचा चांगला सत्कार केला. कांहीं कालानंतर डॉन फ्रेडरिकनें अंतःपुरांतील एका दासीशीं कांहीं अश्लाघ्य कर्म केल्यामुळें बापलेकांस हद्दपारीची शिक्षा भोगावी लागली. आल्व्हा ता. १२ दिसेंबर १५८२ रोजीं मरण पावला.

आल्व्हा हा नामांकित व युद्धविशारद वीर होता. परंतु नेदर्लंडच्या संग्रामापासून त्याच्या कीर्तींत विशेष भर पडली नाहीं. जेमिंगेनच्या मोहिमेंत त्यानें बरेंच बुद्धिचातुर्य दाखविलें; तसेंच सन १५७२ च्या मोहिमेंत त्यानें बरेंच धैर्य व प्रसंगावधान दाखविलें; परंतु फ्रान्सच्या राजानें अवसानघातकी वर्तन केलें नसतें, तर मॉन्स येथें आल्व्हाच्या कीर्तीस बराच धक्का बसला असता. त्यानें देशभक्तांचा पुष्कळ वेळ पराभव केला, परंतु त्यांचें स्वातंत्र्यतेज अजिंक्य होतें. आल्व्हाच्या सैन्याचा अगर युद्धचातुर्याचा या नंग्या बटेव्हियन वीरापुढें कांहीं उपयोग झाला नाहीं. फडणिशी कारभारांत अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वेंही त्यास माहीत नव्हतीं असें दिसून आलें. त्याची मुख्य वसुलाची बाब लोकांच्या जप्त केलेल्या मिळकती ही होती. ती अर्थातच फार दिवस टिकली नाहीं. सरसकट लोकांची कत्तल करण्यास आरंभ करून त्यानें देशांतील व्यापार व उदीम धूळीस मिळविला होता. त्यानें शेवटीं शोधून काढलेल्या कराच्या बाबी राष्ट्रांतील अवशिष्ट व्यापारावर गदा होती. नेदर्लंडाचा वसूल व फिलिपनें पाठविलेले अडीच कोट रुपये खर्च होऊन, रेकिसन्स आल्या-वेळीं खजिन्यांत शिलक पूज्य होती; व एक दमडी वसूल करण्याइतकी लोकांत ऐपत राहिली नव्हती! दिवाणी व मुलकी कारभार त्यानें फार साध्या

कोष्टकांत आणिला होता. त्यानें उद्धट सनदा व प्रजेचे राजकीय हक्क हे एकदम पायाखालीं तुडवून जमीनदोस्त केले. व " यमासना "ची निर्मिति करून संस्थानिकांच्या समक्ष न्याय मागणारे एग्मॉन, हॉर्न प्रभृति बडे लोक, व राष्ट्रीय हक्काच्या जोरावर आल्व्हाच्या इच्छेनुरूप कर न देणारे सामान्य व्यापारी व इतर गरीबगुरीब या सर्वांची सारखी राळ उडविली. " यमासना "नें केलेल्या असंख्य अघोर कत्यांची जबाबदारी सर्वस्वी त्याच्याच शिरावर आहे. कदाचित् त्यानें केलेल्या कत्यांचा अंदाजनकाशा स्पेनमध्यें पूर्वीच तयार झाला असेल! परंतु त्यानें दाखविलेली दक्षता व हौस हीं फिलिपलाही मान खालीं घालावयास लावण्यासारखीं होतीं! मॉन्स, मेलिन, नार्डेम, हार्लेम वगैरे ठिकाणीं खाटिकवाडा केल्यावर दयेचा परिणाम होत नाहीं, करितां आल्कामारमध्यें एक जिवंत प्राणी शिल्लक राहतां कामा नये, असे निराशेचे उद्गार काढणाऱ्या आल्व्हाचें शिष्यत्वसुद्धां फिलिपला शोभलें नसतें! नेदर्लंड सोडतांना आल्व्हानें असें सुचविलें कीं, तेथील कांहीं शहरें खेरीज करून बाकीचीं जाळून टाकावीं; व बिन जाळलेल्या शहरांत सैन्याची वस्ती ठेवावी! आल्व्हाच्या कारकीर्दींत पुरुष, बायका, पोरें, वृद्ध, तरुण, सरदार, भिकारी, सावकार, दवाखान्यांतील रोगी, वेडे व प्रेतें या सर्वांस सुळावर अगर फांसावर चढण्याचे प्रसंग आले. कित्येकांस यमयातना भोगाव्या लागल्या; कित्येकांचा शिरच्छेद झाला; कित्येक गळ्यास फांस बांधून तर कित्येक पायांस फांस बांधून फांशीं देण्यांत आले; कित्येक मंदाग्नीवर जाळले गेले; कित्येक तापलेल्या चिमट्यांनीं भोसकण्यानें मेले; कित्येक चाकाखालीं तुडवण्यानें, उपासमारानें, किंवा जिवंत सोलण्यानें मृत्युमुखीं पडले; कित्येक बड्या गृहस्थांच्या बायकांस घटस्फोट करवून त्यांजबरोबर स्पॅनिश लोकांनीं मुहूर्त लाविले ; कित्येक गर्भिणी स्त्रियांच्या गर्भांतून मुलें ओढून काढण्यांत आलीं; कित्येक बायकापोरांवर बलात्कार झाले. अशा कारकीर्दींत दयेचें विशेष प्राधान्य झाल्यामुळें सर्व घोटाळा झाला असें आल्व्हाचा मुख्य सचिव व्हार्गस याचा अभिप्राय पडला. आल्व्हानें आपला पुतळा करून आपलें स्मारक केलें, हें मागें उल्लेखिलेंच आहे. शिवाय राजाची माफी फर्मावण्याकरितां आल्व्हाची स्वारी सुवर्ण सिंहासना-

रूढ झाल्याची हकीकत मागें आलीच आहे. आल्व्हासारखें पात्र एखाद्या कादंबरीकारानें कल्पिलें असतें तर त्यावर अतिशयोक्तीचे दोषारोप झाले असते. परंतु आल्व्हाचा इतिहास बहुतांशीं त्याच्याच मुखानें वर्णिलेला उपलब्ध आहे. तत्कालीन कवींनींही त्याच्या स्वभावाचीं व कृतींचीं निंदास्पद वर्णनें फार ठळक व त्वेषयुक्त भाषेनें करून ठेविलीं आहेत.

---

# भाग १० वा.

## बडे सेनासाहेब यांची कारकीर्द.

### इ. स. १५७३–७६.

रेकिसन्स--माफीचा बूट-बर्घेन येथील नौकायुद्ध-लुईची मोहिम-मूकर्हाडची लढाई. लुईचा अन्त-शिपायांचें बंड-लीडनचा दुसरा वेढा-धक्के फोडण्याची तयारी-बॉयसोची कुमक-लँडशीडिंग, भीनवे, कर्कवे वगैरे धक्क्यांचें आक्रमण-लीडनची मुक्तता-सलोख्याचीं बोलणीं-ऑरेंज व हॉलंडची सभा-देशभक्तांचे अत्याचार-डीव्हलंडची मोहीम-हॉलंडचा स्वातंत्र्योच्चार-इंग्लंडच्या राणीचा धोरपणा-रेकिसन्सचा मृत्यु.

आल्व्हाच्या कारकीर्दींतील घोरप्रसंगांमुळें डचेस मार्गारेटचा सौम्य व अशाश्वत जुलूम लोकांस बरा वाटूं लागला होता. त्याच कारणास्तव बडे सेनासाहेब यांच्या आगमनानें कांहीं काळ लोकांस आनंद वाटला व आशेचा अंधक उजेड दिसूं लागला. आल्व्हा एकदांचा गेला हीच समाधानाची गोष्ट होती; त्याच्या मागचा अधिकारी कितीही वाईट असला तथापि तो आल्व्हा इतका दीर्घ निश्चयाचा व उलट्या काळजाचा असणें संभवनीय नव्हतें. डॉन लुई डी रेकिसन्स व क्युनिगा हा सामान्यबुद्धीचा मनुष्य होता. परंतु लोकांत त्याचा नेमस्तपणा व दूरदर्शित्व यांविषयीं ख्याति होती. त्याचें युद्धचातुर्य विशेषतः लेपांटोच्या भयंकर परंतु पोषाकी लढाईतच प्रत्ययास आलें होतें. मिलनचा कारभार त्यानें नेमस्तपणानें व नेटानें केला असा लौकिक होता; मिलन येथें त्यानें लोकांवर जुलूम केल्यामुळें तेथील लोकांचा बराच द्वेषही संपादन केला होता. शिवाय

त्याचा कोणत्याही राजघराण्याशीं संबंध नव्हता ही एक त्याला उणीव होती. कोणीही सुभेदार झाला तरी फिलिपच्या हातांतील तो केवळ बाहुलेंच असे; कारण, फिलिपचा बाणा असा होता कीं, आपल्या अवाढव्य राज्यचक्राचें सर्व चालन आपण स्वतः करावयाचें; कारभाराच्या सर्व दोऱ्या आपल्या हातांत ठेवावयाच्या.

रेकिसन्स येतांच लोकांत असा प्रवाद सुरू झाला कीं, नव्या अमदानींत राज्यपद्धतीचें धोरण बदलणार. सर्व देश उध्वस्त केल्याशिवाय हे प्रांत पादाक्रांत करणें फार मुष्किलीचें काम होतें. करितां लोकांस कांहीं सवलती देऊन राजी करण्याचा प्रथम बूट निघाला. मात्र राजाची अनियंत्रित सत्ता व कॅथोलिकधर्माशिवाय इतर धर्मपंथास बहिष्कार हीं आधारतत्त्वें कोणत्याही तडजोडींत सोडावयाचीं नाहींत असा राजाचा आग्रह होता. सतत आठ वर्षें राजकीय व धर्मस्वातंत्र्याप्रीत्यर्थ रक्तपात व प्राणहानि सोसून आतां लोक त्या बाबतींत आपला निश्चय सोडतील हें संभवत नव्हतें. वस्तुतः नेदर्लंडमध्यें शांतता व्हावी अशाविषयीं लोक फार आतुर झाले होते खरे. कॅथोलिक लोक आपल्या नवीन पंथी बांधवांशीं मित्रभावानें वागूं लागले; कारण आल्व्हाच्या सत्रांत सर्व वर्गाच्या व धर्माच्या लोकांच्या सारख्याच आहुती पडल्या होत्या. सामान्य लोक व बडे लोक सारखेच युद्धास कंटाळून गेले होते. आर्शो व व्हिग्लियसच काय, परंतु न्वार्कार्मीज व बर्लेमॉन सुद्धां लढाई संपवून ऑरेंजला माफी द्यावी असें बोलूं लागले. खुद्द स्पॅनिश सेनानी सुद्धां रक्तपाताच्या व खुनाच्या नित्य क्रमास कंटाळून गेले. जूलियन रोमेरो व न्वार्कार्मीज यांनीं ऑरेंजशीं सामोपचाराचा पत्रव्यवहार सुरू केला व युद्धाचा शेवट होऊन राजपुत्राचा राजाशीं विरोध नाहींसा व्हावा अशी आशा प्रगट केली. कांहीं वेळ लढाई बंद ठेवणें रेकिसन्सला भाग पडलें. राज्यव्यवस्थेंत सर्व घोटाळा माजला होता. त्यामुळें बंडवाल्यांस शासन करण्याचा मार्गच खुंटला होता. आल्व्हाच्या कारकीर्दीच्या जमाखर्चाचा हिशेबसुद्धां मिळेना; खुद्द आल्व्हालाच तो माहीत होता किंवा नाहीं याचा संशय आहे. आल्व्हा स्वतः मात्र जातेवेळीं बराच पैका घेऊन गेला असें त्याच्या शत्रूंचें ह्मणणें आहे. द्रव्याच्या बाजूनें राजास हें युद्ध फार जड झालें होतें. आठ हजार स्पॅनिश सैन्य

व चोपन हजार जर्मन व वालून शिपाई इतकी सैन्याची संख्या वाढली होती. चार कोटि डोलर त्यांनीं खाऊन फस्त केले होते. दक्षिण अमेरिकेंतील सोन्याच्या खाणीचें सर्व उत्पन्न नेदर्लंडचा व्यापार बुडविण्याकडे व त्या ठिकाणीं धर्मच्छल करण्याकडे खर्च होत होतें. सैन्याच्या पगाराची बाकी सुमार पासष्ट लक्ष राहिलीच होती. नव्या बाबी वसूल होईनात; नाहक लोकांच्या मिळकती जप्त करतां करतां तीही उत्पन्नाची बाब अगदीं आटून गेली. लोकांत दीर्घ व व्यापक राष्ट्रीय उत्साहाची लाट उसळली ह्मणजे बंडापासून बंडवाल्यांपेक्षां जुलुमाचे पुरस्कर्तेच जास्त खर्चाच्या पेंचांत येतात.

अशा स्थितींत माफी व अनुनय या औषधी हितावह होतील अशी रेकिसन्सची कल्पना होती. त्यानें ऑरेंजला बाजूला ठेवून सर्व लोकसमुदायाचें प्रशमन करण्याचा उपक्रम चालविला. ऑरेंजचा व या राष्ट्राचा काय संबंध होता हें अयाप त्यास समजलें नव्हतें. बंडास धर्म हें मुख्य कारण नव्हे; एग्मॉन व हॉर्न हे मरतांना कॅथोलिक संस्कार श्रद्धापूर्वक घेऊन मेले; सन १५६९ च्या मोहिमेंत नेदर्लंडचे लोक ऑरेंजच्या आज्ञेप्रमाणें वागले नाहींत; केवळ कांहीं महत्वाकांक्षी बखेडेखोर लोक धर्माच्या मिषानें राजाची सत्ता बुडविण्याचा यत्न करीत आहेत, अशी बडे सेनासाहेब यांची कल्पना झाली. सन १५६८ सालीं नव्या धर्माचा अंकुर किती सूक्ष्म होता व त्याच्यावर सतत रक्ताचा वर्षाव झाल्यामुळें पुढील पांच चार वर्षांत तो किती पोसला गेला होता याची त्यानें बिलकुल अटकळ बांधिली नव्हती. हल्लीं राष्ट्रांत सरकारच्या गुप्त हेरांशिवाय कोणी कॅथोलिकधर्मी राहिला नव्हता. आपल्या कल्पनेस धरून रेकिसन्सला असें वाटलें कीं, माफीचें जाळें आणखी एकदां पसरलें कीं चोहोंकडे एकदम स्थिरस्थावर होणार. त्यानें राजास भीत भीत असें सुचविलें कीं, अनुताप झालेल्या पाखंडी लोकांस धर्ममातेनें पुनः पोटाशीं घ्यावें व ज्यांचा आग्रह कायम असेल त्यांस आपली मालमत्ता घेऊन विदेशीं जाण्यास परवानगी असावी. आल्व्हाला या प्रकरणाचें रहस्य नीट समजलें होतें. सर्व राष्ट्र उजाड केल्यावांचून नवी रचना करणें शक्य नाहीं असें त्यानें आपलें मत स्पष्ट दिलें. गोष्ट अगदीं निकरावर येईपर्यंत आल्व्हाचे

जालिम उपाय अमलांत आणूं नयेत अशी राजाची नव्या सुभेदारास आज्ञा होती. व्हिग्लियसला माफीचें स्वरूप पसंत नव्हतें; आर्शो, न्वार्कार्मीज प्रभृति मंडळींचें म्हणणें सर्वांचें सांत्वन करून जिकडे तिकडे शांतता करावी. रेकिसन्सच्या मनांतून अर्धवट माफी प्रसिद्ध करून लढाईची तयारी करण्यास थोडीशी फुरसत मिळवावयाची होती. धर्म-स्वातंत्र्य खऱ्या भावानें देणें, स्पॅनिश सैन्य परत पाठविणें, अगर राष्ट्र-सभा बोलावणें यांपैकीं कोणतीही गोष्ट करण्याचा त्याचा मानस नव्हता. लढाई पूर्ण वेगांत होती. ती या हिंवाळ्याच्या कडाक्यांत एकदम थांबविणें शक्य नव्हतें. वाल्चरन् बेटांत मिडलबर्ग शहरास बंडवाल्यांनीं वेढा दिला होता; या शहरांत स्पॅनिश सेनानी मॉड्रेगान, बराच मोठा खजिना व व्यापाराचा माल अडकला होता; त्यामुळें शहर बंडवाल्यांस सोडून देतां येईना; आंत लोकांची उपासमारामुळें उंदीर, घुशी, कुत्रीं, मांजरें खाण्यापर्यंत मजल येऊन पोंहोचली होती. इकडे देशभक्तांची स्थिति विशेष समाधानकारक नव्हती. हॉलंड व झीलंडचे लोक चांगले खलाशी असल्यामुळें समुद्रावर त्यांचें वर्चस्व कायम होतें. जमिनीवरील सैन्य मात्र बहुतेक भाडोत्री असल्यामुळें ऐन प्रसंगाच्या वेळीं पगाराकरितां अडून बसत असे. हार्लेम शत्रूच्या हातीं गेल्यामुळें व लीडनला वेढा पड-ल्यामुळें हॉलंडच्या उत्तरेकडील व दक्षिणेकडील भाग तुटक होऊन त्यांत दळणवळण बंद झालें. हॉलंडच्या प्रांतिक सभेनें ऑरेंजला पुष्कळ मदत केली; परंतु पैशाच्या कामांत तिनें त्यास बरेंच संतापून सोडिलें होतें. लुईनें फ्रान्सच्या राजाचे बंधू ड्यूक ॲलेन्सन व ड्यूक अँजू ( हा यावेळीं पोलंडचा राजा बनला होता. ) यांच्या भेटी घेण्याचा क्रम चालविला होता. ॲलेन्सननें त्याच्या कार्याविषयीं पूर्ण अभिमान दाखवून त्याला यावच्छक्य मदत करण्याचें आश्वासन दिलें; व त्यास तात्काल एक लाख लिव्हे रोख दिले. या रकमेच्या आधारावर हॉलंडला कुमक करण्याकरितां लुईनें जर्मनींत सैन्याची जमवाजमव चालविली होती. अशी स्थिति होती; तथापि राजानें फर्माविलेल्या माफीचा काय परिणाम होईल याची ऑरेंजला भीति वाटत होती. स्पॅनिश लोकांच्या घातक कैदेंत राहिल्यापासून विचारसंपन्न देशभक्त व ऑरेंजचा विश्वासुक मित्र

आल्डेगोंड सुद्धां देशभक्तांनीं राजाच्या इच्छेनुरूप देश सोडून जाण्याचें कबूल करावें असे निरोप पाठवूं लागला. ऑरेंजनें मात्र आपल्या कर्तव्याची सीमा पक्की ठरविली होती. परकीय सैन्य राष्ट्रांतून घालविणें, जुने हक्क स्थापन करणें व धर्मस्वातंत्र्य स्थापन करणें या गोष्टी साध्य झाल्यावांचून विश्रान्ति घ्यावयाची नाहीं असा त्याचा सिद्धान्त ठरला होता. आल्डेगोंडला कैदेंतून सोडविण्याचें साधनही त्याच्या हातांत सध्यां होतें. सेनासाहेब कामावर रुजू होतांच त्यास पहिलें निकडीचें काम मॉंड्रेगानची सुटका करण्याचें येऊन पोंहोचलें होतें. रेकिसन्सनें त्या कामाकरितां बर्धेन बंदरांत पाऊणशें जहाजें तयार केलीं. व त्यांजवर रोमेरो यास निदेशक नेमला शिवाय दुसरें एक तीस नौकांचें आरमार डव्हिलानें अँटवर्प येथें जमा केलें. या दोन्ही आरमारांनीं शेल्ड नदीच्या पूर्व व पाश्चिम मुखांतून जाऊन मिड-लबर्गला कुमक करावयाची असा संकेत ठरला. इकडे राजपुत्राच्या देखरेखीखालीं तांडिल बॉयसोनेंही फ्लशिंग येथें एक मजबूत आरमार तयार केलें होतें. सन १५७४ च्या जानेवारीअखेर डव्हीला आपलीं जहाजें घेऊन फ्लशिंगजवळ रोमेरोची वाट पाहत होता. या दोन्ही आरमारांची गांठ न पडूं द्यावी या हेतूनें बॉयसो बर्धेन बंदराच्या समोर टेहळणी करीत होता. ता० २० जानेवारी रोजीं राजपुत्र ऑरेंज आपल्या सैनिकांची लढाईच्या पूर्वीं भेट घेण्याकरितां आला. त्यानें आपल्या सैनिकांस थोड-क्यांत परंतु मोठ्या जोरदार भाषेनें आलेल्या प्रसंगाची ओळख करून दिली व त्यांची कर्तव्यबुद्धि जागृत केली. त्याच्या भाषणानें उत्साहभरित होऊन हॉलंडर लोकांनीं आपल्या शरीरांतील शेवटचा थेंब अटेपर्यंत राजपुत्राला व देशाला आपण पाठबळ देऊं व प्रसंग पडल्यास या कामांत आपल्या सर्व मालमत्तेचा व्यय करूं अशा मोठ्यानें गर्जना केल्या. ता. २० रोजीं रोमेरोचें आरमार तीन सारख्या तुकड्या करून बर्धेन बंदरांतून निघालें. धक्क्यावर बडे सेनासाहेब यांची स्वारी स्वतः रोमेरोच्या आरमाराला पोंहोचविण्याकरितां उभी होती. सुभेदारसाहेबांस जहाजांतून तोफांची सलामी झाली, त्यावेळीं एका जहाजावरील दारूसामानास आग लागून जहाज सर्वस्वी जळून खाक झालें. रोमेरोच्या पहिल्या तुकडीनें देशभक्तांचीं जहाजें टप्प्यांत येतांच तोफांचा भडिमार केला. त्यांत बरेच देशभक्त दगावले.

खुद्द तांडेल बॉयसोचा एक डोळा फुटला. यानंतर रोमेरोचीं जितकीं जहाजें शत्रूंच्या टापूंत आलीं तितकीं त्यांनीं या अरुंद आखातांत पूर्णपणें घेरलीं. रोमेरोच्या जहाजांशीं लगट करून त्यांच्यावर हल्ला करण्याचा देशभक्त यत्न करूं लागले. सैनिकांचें घनघोर द्वंद्व सुरु झालें. परशु, जहाजावर चढण्याचे आंकडे, पिस्तुल, कट्यारी या शस्त्रांचे दारुण प्रहार चालले होते. शरण आलेल्यांस हे क्रूर झीलंडचे लोक एकदम तोडून समुद्रांत फेकून देत. मेलेल्या इसमांच्या अंगावरील सोन्याच्या साखळ्यांची सुद्धां त्यांस आशा नव्हती. रोमेरोचीं पंधरा जहाजें व बाराशे शिपाई खराब झाल्यावर बाकीचीं जहाजें बर्घेनला परतलीं. रोमेरोनें आपलें जहाज जमिनींत रेंवलेलें पाहून तळमजल्यावरील एका भोंकांतून समुद्रांत उडी टाकून तो पोहत थेट सेनासाहेबाच्या चरणापाशीं येऊन पोंहोचला. बडे सेनासाहेब कोसळत्या पावसांत आपल्या आरमाराची कर्तबगारी पाहण्याकरितां सारखे धक्क्यावरच उभे होते. त्यांचा चरणसंयोग होतांच रोमेरो ह्मणाला, "सरकार, मीं आपणास पूर्वींच सांगितलें होतें कीं, मी जमिनीवरचा शिपाई, शंभर आरमारें दिलीं ह्मणून मी समुद्रावर काय प्रताप करणार ?" डव्हीलाला रोमेरोच्या आरमाराची हकीकत समजतांच तो अँटवर्पला परत गेला. रोमेरो व सेनासाहेब मॉंड्रेगानला नशीबाच्या हवाल्यावर सोडून ब्रुसेल्सला परत गेले. मॉंड्रेगानला आतां शत्रूंस शरण जाण्याची पाळी येऊन पोंहोचली. ता. १८ फेब्रुवारी रोजीं पांच कलमांचा तहनामा तयार झाला. त्यांतील ठरावः- मॉंड्रेगाननें आपलें सैन्य, दारुगोळा व चीजवस्त घेऊन मिडलबर्गमधून बिनहरकत निघून जावें; शहरवासी लोकांनीं ऑरेंज हा राजाचा सुभेदार समजून त्याचा हुकूम मान्य करण्याविषयीं शपथा घ्याव्या व तीन लक्ष फ्लोरिन रोख द्यावे. मॉंड्रेगाननें आल्डेगोंड व चार डच कैद्यांची मुक्तता करवावी; तें न झाल्यास दोन महिन्यांनीं पुनः ऑरेंजच्या स्वाधीन व्हावें; शहरांतील कॅथोलिक धर्माधिकाऱ्यांनीं आपल्या कपड्यालत्त्यांशिवाय कोणतीही चीजवस्त शहरांतून हलवूं नये. रेकिसन्सनें आल्डेगोंड व चार दुसरे कैदी यांची मुक्तताही केली नाहीं; किंवा मॉंड्रेगानही वचनाप्रमाणें परत कैदेंत आला नाहीं. ऑरेंजनें शहरांत प्रवेश केल्यावर मॅजिस्ट्रेट लोक नवे जुने केले,

लोकांच्या इमानाच्या शपथा घेतल्या; जुने हक्क पुनः उज्जीवित केले, व खंडणीपैकीं दोन-तृतीयांश रकम माफ केली. याप्रमाणें स्पॅनिश लोकांची वाल्चरन् बेटांतून हकालपट्टी झाली व सर्व समुद्रकिनारा हॉलंड व झीलंडच्या लोकांच्या ताब्यांत गेला.

आल्कामारचा वेढा उठविल्यापासून स्पॅनिश लोक हॉलंडच्या हद्दींतच ठाणें देऊन होते. लीडनला वेढा पडला होता, सर्व मुलुख वैराण झाला होता व निरनिराळ्या शहरांमधील दळणवळण बंद झालें होतें. हॉलंडचे लोक दर्यावर्दी असल्यामुळें ऑरेंजला आरमार व खलाशी लोकांचा संघ जमविण्यास अडचण पडत नसे. कणखर व सोशीक हॉलंडर लोक स्वसंरक्षणाचें कामीं जरी अप्रतिरथ होते, तथापि स्पेनच्या कसलेल्या सैनिकांशीं मैदानांत सामना करण्यास लागणारें शिक्षण व अनुभव त्यांस मिळाले नव्हते. लीडनचा वेढा उठविण्यास ऑरेंजची मुख्य भिस्त लुईवर होती. आल्व्हाच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं त्यानें आपल्या भावास पत्र पाठविलें होतें, त्यांत नेदर्लंडावर मोहिम करण्याविषयीं त्यांस आग्रहपूर्वक सुचवून सोबत एक माहितीकरितां अंदाजखर्डाही जोडला होता. त्यांत पुरेसें सैन्य जमल्यास मास्ट्रिचवर उतरावें; तसें न जमल्यास म्यूज नदी स्टॉकेमजवळ उतरून लुईनें डेल्फपाशीं आपल्या भावास येऊन मिळावें; व तेथून उभयतांनीं हार्लेम व लीडन यांच्या दरम्यान छावणी देऊन बसावें; ह्मणजे स्पॅनिश लोकांस युद्ध करण्यास बऱ्याच अडचणी येतील; प्रसंगीं देश सोडून जावा लागेल; असें भावी मोहिमेचें स्वरूप दाखविलें होतें. या बेतास अनुसरून लुई हिंवाळ्याच्या प्रारंभीं सैन्य व सामुग्री गोळा करण्याच्या उद्योगास लागला होता. फ्रान्सच्या राजपुरुषांनीं त्यास बरीच पैशाची मदत केली; त्यानें रेकिसन्सला नेदर्लंडमध्यें येतांना पकडण्याचा यत्न केला तो सफल झाला नाहीं. नंतर फ्रान्सच्या सरहद्दीवर जाऊन कॅथेराईन मेडिसी, ड्यूक अँजू वगैरेंच्या त्यानें भेटी घेतल्या; त्या वेळीं त्यास बराच द्रव्यलाभ होऊन सर्व बाजूनें मदतीचीं पूर्ण आश्वासनें मिळालीं. ॲलेन्सननेंही त्याच्या हातांत हात घालून प्रेमळ व खऱ्या अंतःकरणानें नेदर्लंडच्या नवीनपंथी लोकांस सहाय्य करण्याचें अभिवचन दिलें. फ्रान्स व इंग्लड यांचे

परस्पर मात्सर्य असल्यामुळें नेदर्लंडमध्यें प्रतिपक्षाची सरसी होईल या भीतीनें उभयतांनीं एकमेकांविरुद्ध वर्तन ठेविलें होतें त्यामुळें दोहोंपैकीं कोणत्याच राष्ट्राचा व्हावा तसा उपयोग नेदर्लंडवाल्यांना झाला नाहीं. जॉननें आगामी मोहिमेच्या खर्चीकरितां जर्मनींतील आपले आप्त व बांधव यांजकडून वर्गण्या गोळा करण्याचा क्रम चालविला होता; लुईनें ड्यूक अँजूला पोलंडमध्यें पोंहोचवून परत चाललेले दोन हजार स्वार व फ्रेंच व जर्मन घोडेस्वार आपल्या तैनातीस घेतले; व खेरीज एक हजार स्वार व सहाशें पायदळ जर्मनींत जमवून फेब्रुवारीच्या शेवटीं बर्फाच्या वादळांत त्यानें ऱ्हाईन नदी ओलांडिली; व तो मास्ट्रिचच्या रोखानें चालला. या सैन्यांत ऑरेंजचे तीनही भाऊ व एका जर्मन संस्थानिकांचा ख्रिस्तोफर नामक मुलगा अशी मंडळी होती. फेब्रुवारि संपण्यापूर्वीं हें सैन्य मास्ट्रिचपासून चार मैलांवर म्यूज नदीच्या समोरच्या तीरावर दाखल झालें. या शहरांत शिबंदी फार थोडी होती. लुईच्या आगमनाची बातमी समजतांच रेकिसन्सनें जर्मनींत आठ हजार घोडदळ व आठ हजार पायदळ तयार करण्याची तजवीज केली होती. ब्रेडा येथील रिसाला घेऊन मेंडोझा मास्ट्रिचला येऊन पोंहोचला. डॉन डव्हीलाकडे या मोहिमेचें सरसेनापत्य होतें. या सेनानीनें प्रथम प्रत्येक शहराच्या छावणींतून सांपडेल तितकें सैन्य जमा करून अँट्वर्प, घेंट, निम्वेगन, व्हॅलेन्सिनीज वगैरे ज्या ज्या शहरांत ऑरेंजचे पक्षाभिमानी लोक होते त्या त्या शहरांची योग्य मजबुती केली, व अवशिष्ट राहिलेल्या सैन्यासह तो लुईला ब्राबंटमध्यें न येऊं देण्याच्या व उभय बंधूंची गांठ न पडूं देण्याच्या प्रयत्नास लागला. त्यानें लीडनसभोंवतीं जमलेल्या सैन्यास इकडे बोलावण्याकरितां कासीद रवाना केला. इकडे राजपुत्र ऑरेंजनें बॉमेल बेटांत सहा हजार पायदळ गोळा केलें होतें. लुईचें सैन्य इतकें अल्प असलेलें ऐकून त्याला बरीच निराशा वाटली; तथापि मास्ट्रिच सर करून आपणास बॉमेल बेटांत येऊन मिळण्याविषयीं त्यानें लुईला निरोप पाठविला. लुईला या मोहिमेच्या आरंभापासून अपशकून होत चालले होते व त्यासंबंधानें लोकांनीं प्रथमपासून दुष्ट भाकितें चालविलीं होतीं. म्यूजपर्यंत येतांना वाटेंत त्याचे एक हजार लोक गळले. म्यूज नदीवर बर्फाचा पातळ थर असल्या-

मुळें धड नावा चालेनात, धड पायानें बर्फावरून निघून जातां येईना. मास्ट्रिचची तर आशा संपलीच होती; तथापि नदी आसपास उतरून भावाला मिळण्याचा बेत तर सिद्धीस नेणें जरूर होतें. ता. ३ मार्च रोजीं डव्हीला मोठें सैन्य घेऊन मास्ट्रिच येथें दाखल झाला. ता. १८ रोजीं मेंडोझानें रात्री नदी उतरून देशभक्तांवर छापा घातला व त्यांचे सातशें लोक यमसदनास पाठविले. या प्रसंगीं स्पॅनिश मृत्युसंख्या काय ती सातच होती. ता. २१ रोजीं त्यानें आपली छावणी मोडली व नदीच्या खालच्या बाजूस लिंबूर प्रांतांत फॉकेमान व ग्युल्पेन या किल्ल्याजवळ तळ दिला. ता. ३ एप्रिल रोजीं लीडनहून पंचवीस पायदळें व तीन घोडदळें मास्ट्रिच येथें येऊन पोंहोचलीं; व त्याच दिवशीं मॉंड्रेगान आपलीं सोळा दळें घेऊन समरभूमीवर दाखल झाला. जिकडून तिकडून या ठिकाणावर गोळा होणाऱ्या निवडक स्पॅनिश सैन्यास चुकवून आपल्या भावाची गांठ घेणेंही लुईला मुष्किलीचें होऊन बसलें. त्याचें सैन्य भाडोत्री, फार बखेडेखोर व बेहुकमी झालें होतें; ता. ८ एप्रिल रोजीं त्यानें आपला तळ पुनः हलविला, व म्यूज व ऱ्हाईन या नद्यांच्या मधील प्रदेशांतून तो निम्वेगनच्या रोखानें चालला. डव्हीला समोरच्या तीरानें त्याला प्रतिरोध करण्याकरितां समान्तर दिशेनें चालला होता. ता. १३ रोजीं त्यानें मूक खेडेगांवानजीक नदीकांठीं ठाणें दिलें. त्याच दिवशीं डव्हीला नावांच्या पुलावरून खालच्या बाजूस नदी उतरला; व तो लुईच्या अग्रभागीं सर्व सैन्यासह जाऊन एकाएकीं उभा राहिला. लुईला हा मोठा बिकट प्रसंग येऊन पोंहोचला. या दोन नद्यांच्या चिमट्यांत मदतीशिवाय एकदम लढण्याचा हा मोठा बिकट प्रसंग येऊन पोंहोचला. या ठिकाणीं जय तरी मिळवावा अगर हॉलंडच्या लोकांना सदैव निराशेच्या समुद्रांत लोटून यावें अशी ही आणीबाणीची वेळ होती. तथापि शत्रू पुढें येऊन उभा राहिल्यावर लुई डगमगणारा नव्हता. लुई असा शत्रूच्या कैचींत सांपडला असतां त्याच्या सैन्याची पगारासाठीं ओरड सुरू झाली होती.

ता. १४ रोजीं सूर्योदयापूर्वीं दोन्ही सैन्यें आपापल्या गोटांत नेमलेल्या जागा रोखून लढाईकरितां सज्ज उभीं होतीं. दोन्ही सैन्यांच्यामध्यें मूक

खेडें होतें. लुईचीं सूक गांवांत दहा पायदळें होतीं; त्यांच्या पृष्ठभागीं त्याच्या बाकी राहिलेल्या एकंदर पायदळाचा एक चतुष्कोन केला होता; उजव्या बाजूस घोडदळाचे चार भाग होते; स्थलसंकोचास्तव यांपैकीं कांहीं लोक मागील टेंकडीवर उभे केले होते. लुईनें आपल्या छावणी-पुढें खंदक खणला होता. स्पॅनिश सैन्याचे भालेवाले व बंदुकवाले मिळून चार फळ्या केल्या होत्या; त्यांच्या उजव्या बाजूस नदीचा प्रवाह व डाव्या बाजूस अर्धचन्द्राकृति घोडदळाचा जमाव होता; घोडदळांत अग्र-भागीं बंदुकवाले व मागें स्पॅनिश भालेवाले अशी रचना होती. भल्या पहाटेपासून दहा वाजेपर्यंत उभय सैन्यांच्या लहान लहान झटापटी चालल्या होत्या. लुई मोठी लढाई देण्यास उतावळा झाला; स्पॅनिश सैन्यही हातघाईवर आलें. इतक्यांत देशभक्तांस नवी कुमक येऊन पोंहोचली; व आणखी पांच हजार लोक येत आहेत अशी बातमी आली. खंदकाजवळ जोरानें चकमक सुरू झाली. कांहीं वेळ धुमश्चक्री चालल्यावर स्पॅनिश लोकांनीं खंदक सर केला व ते सूक गांवांत शिरले. लुईनें पायदळाची जास्त भरती गांवांत पाठवून त्यांस गांवांतून हांकून काढिलें. या सुमारास लढाई सार्वत्रिक झाली. देशभक्तांचें सर्व पायदळ हें स्थल संरक्षण करण्या-करितां पुढें सरसावलें व सर्व स्पॅनिश पायदळानें त्यांच्यावर हल्ला केला. कांहीं वेळ मोठ्या निकराचें युद्ध झाल्यावर स्पॅनिश लोकांनीं पुन्हा खंदक सर केला व देशभक्तांची दाणादाण झाली. त्यावर लुईनें आपला सर्व रिसाला पुढें बोलावून शत्रूंच्या घोडदळावर चाल केली. पहिल्या हल्ल्या-सरशीं बंदुकवाल्यांची फाटाफूट झाली व ते पळत सुटले. लुई त्यांना पुढें रेटीत चालला, त्या वेळीं ते इतके भयाभीत झाले कीं, नदींतून पोहून जाईपर्यंत अगर नदींत जलसमाधी मिळेपर्यंत ते बिलकुल थांबले नाहींत; जिवंत निसटलेल्या लोकांनीं गांवोगांव अशी बातमी पसरली कीं, राजपक्षाची वाताहत झाली. ही गोष्ट खरी नव्हती. देशभक्तांचे घोडेस्वार बंदुकी भरण्याकरितां फिरतांच स्पॅनिश भालेवाल्यांनीं व जर्मन काळ्या पलटणींनीं त्यांच्यावर जोराचा हल्ला केला. उभयतांचें घोर व समाकुल युद्ध झालें व देशभक्तांचा पूर्णपणें मोड झाला. लुईनें प्रसंग उलटलासें पाहून आपला भाऊ हेनरी, ख्रिस्टोफर, व आणखी कांहीं सैनिक एकत्र

करून शेवटचा निकराचा हल्ला केला. ते सर्व एकदम लढाईंत शिरले; पुढें त्यांचा पत्ता लागला नाहीं. जातिमात्सर्यमूलक या संग्रामाच्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें शेवटीं भयंकर कत्तल झाली; व देशभक्तपैकीं या अनर्थाची बातमी सांगण्यास सुद्धां कोणी शिलक राहिला नाहीं. रणांत पडलेले, नदींत, दलदलींत बुडून मेलेले, व शेतांतील छपरांस आगी लागून त्यांत मेलेले या सर्वांची मिळून मृत्युसंख्या या वेळीं चार हजारांवर गेली. स. लुई, त्याचा भाऊ व स्नेही यांस कोणत्या प्रकारचा मृत्यु आला हें गूढ कधींच उमगलें नाहीं. लढाईंत पडले असल्यास वस्त्रहीन होऊन घोड्यांच्या टांचाखालीं त्यांचीं शरीरें छिन्न भिन्न झालीं असावीं. पुष्कळांची अशी कल्पना होती कीं, ते नदींत बुडाले; कित्येकां-चें ह्मणणें ते जळून मेले असावेत. अशी एक संदिग्ध बातमी होती कीं प्रेतांच्या ढिगांतून खुरडत खुरडत आपल्या जखमा धुण्याकरितां लुई नदीतीरावर आला. त्या ठिकाणीं कांहीं रानवट लोकांनीं त्याच्यावर छापा घालून त्याला कापून काढिलें. या गोष्टीच्या सत्यासत्यतेबद्दल कांहीं पुरावा नाहीं.

लुईच्या सांप्रतच्या मोहिमेचा असा भयंकर व घातक परिणाम होणार असें पुष्कळांचें भाकित होतें. त्या मूढ विश्वासाच्या कालांत बादशहा व राजे लोक दररोज किमया, फलज्योतिष, सिद्धान्तज्योतिष वगैरे ग्रंथांतील बीजगणिताच्या कोष्टकांप्रमाणें प्रमाण मानलेल्या व भानगडीच्या कोष्टकां-वरून भविष्यशोधन करीत असत; व राजे लोकांपासून सामान्य लोकां-पर्यंत सर्व जनसमूहाची नैसर्गिक शुभाशुभचिन्हांवर व भविष्यकथनावर श्रद्धा असे; अशा कालांत मूकहींडच्या लढाईच्या पूर्वी कांहीं आठवडे आकाशांत कांहीं विलक्षण आकृती दिसल्यावरून त्या भावी अनर्थाच्या सूचक आहेत असें लोकांस वाटावें यांत आश्चर्य नव्हतें. फेब्रुवारीच्या प्रारंभीं युट्रेक्टच्या तटावर पांच शहरवासी लोक मध्यरात्रीं पाहरा करीत असतां त्यांस आकाशाच्या अरुंद पट्यांत वायव्येकडून एक व आग्नेय दिशेकडून एक अशीं दोन सैन्यें येऊन त्यांचा घनघोर संग्राम झाला असें स्पष्ट दिसलें. तोफांचा धूर व आवाज, लढवय्यांचा जयघोष अगर आक्रोश वगैरे त्यांस ऐकूं आले. वायव्येकडून आलेल्या सैन्यानें दुसऱ्या

सैन्यावर हल्ला केला; त्यासरशी आग्नेयेकडील सैन्य जमीनदोस्त झालें व आकाश रक्तानें आच्छादिल्याप्रमाणें दिसूं लागलें. ही बातमी दुसरे दिवशीं शहरांत समजल्यावर मॅजिस्ट्रेट लोकांनीं बरेच साक्षीदार बोलावून पुरावा घेतला; ज्योतिषशास्त्राचे व प्रारब्धशास्त्राचे ग्रंथ अवलोकन करविले; त्यावरून आग्नेय दिशेकडून येणाऱ्या लुईच्या सैन्याचा परिणाम या नभोयुद्धानें सुचविला असें ठरलें.

याप्रमाणें लुई नॅसाचें, आयुष्याच्या मध्यावस्थेंत व सामान्य मनुष्याच्या हातून शंभर वर्षांत न होणारीं कृत्यें करीत असतां देहावसान झालें. इतिहासांत त्याच्याप्रमाणें पराक्रमी, मोकळ्या स्वभावाचा व स्वामिनिष्ठ पुरुष सांपडणें कठिण आहे. त्याचें चरित्र फार उदात्त आहे; ओजस्विता व मनःप्रसाद या गुणांचें त्याच्या स्वभावांत असें अलौकिक मिश्रण झालें होतें कीं, त्याच्या स्वभावाचें आज तीनशें वर्षांनीं चिन्तन करीत असतां मनांत प्रेमाचा उमाळा आल्याशिवाय रहात नाहीं. त्याला कदाचित् महात्मा ह्मणतां येणार नाहीं; त्याच्या भावाची तैलबुद्धि, व्यापक व उन्नत विचारशक्ति त्याला नव्हती. तथापि मानवी प्राण्याच्या हातून झालेल्या नाटकांपैकीं या समाकुल व अद्भुत प्रसंगांत त्यानें आपली प्रधानभूमिका फार तारीफ करण्यासारखी करून दाखविली यांत संशय नाहीं. त्याचा सरळ, निर्भय व हिंमती स्वभाव शत्रु व मित्र यांच्या आदरास सारखाच पात्र झाला आहे. मुत्सद्दी, शिपाई व वकील या तिन्ही भूमिकेंत त्याची उद्योगशीलता, धाडस व खरेपणा हीं पूर्णपणें व्यक्त झालीं होतीं. ज्या गोष्टी कपटानें अगर कावेबाजपणानें प्राप्त करून घ्यावयाच्या अशी लोकांची समजूत असते त्या त्यानें सरळपणानें साध्य केल्या. मोठ्या चतुर व मतलबी राजेलोकांशीं व मुत्सद्यांशीं व्यवहार करण्यांत तो कोणाची खुशामत न करतां आपला मतलब सिद्ध करीत असे. आपल्या बारा "शिष्य मंडळी" सह मार्गरेट पार्माशीं शिष्टाई करण्यास गेल्या दिवसापासून राज्यक्रान्तीच्या निरनिराळ्या प्रसंगीं स्पॅनिश लोक, इतालियन लोक, ह्यूजेनॉट, बिथरलेले लोक, फ्लेमिश मन्त्री लोक, जर्मन संस्थानिक यांच्याशीं सल्लामसलत करतांना, धर्मस्वातंत्र्याचें स्थापन व राजकीय हक्कांचें उज्जीवन यांस अनुलक्षून त्याचे सर्व यत्न चालले होते. ह्रोली लायनची

लढाई व मॉन्स सर करणें हे त्याच्या हातून दोन मोठे पराक्रम झाले; परंतु या कृत्यांपासून कांहीं तादृश फलप्राप्ति झाली नाहीं. त्याचा तापटपणा व धाडस हे दुर्गुण समजले जात. शेवटची मोहिम ही त्याच्या अविचाराचें व उतावळेपणाचें फल होय अशी पुष्कळांची समजूत होती; परंतु ऑरेंजच्या विचारानें या मोहिमेचे बेत सात महिने चालले होते असें दिसून येईल. म्यूज नदी हिमाच्छादित झाली नसती व सैन्यांत पगारासाठीं बंडें उद्भवलीं नसतीं तर तो ऑरेंजला मिळून उभयता बंधूंनीं सर्व हॉलंड परकीयांपासून मोकळा केला असता व लीडनला वेढा खावा लागला नसता. परंतु ईश्वरी संकेत वेगळेच होते. हा राजपुत्राचा उजवा हातच तुटला व त्याच्या हृदयाचें विश्रामस्थान मृत्यूनें हरण केलें. लुई ठेंगणा होता, तथापि त्याचें स्वरूप भव्य व मर्दुमकीचें होतें. त्याचा चेहरा आनंदी व वागणूक सरळ व मनमिळाऊ होती. जे जे त्याला पहात ते त्याजवर प्रेम करीत; त्याच्या शूर भावांचा तो केवळ आराध्यदैवत होता. आईचा तो फार प्रियपुत्र होता. या वीरमातेला पुत्रशोकाची परंपरा नशिबीं लिहून ठेविली होती. हॉली लायनच्या लढाईंत आडोल्फस बळी पडला; हल्लींच्या प्रसंगीं लुई व हेनरी हे स्वातंत्र्यार्थ युद्ध करण्याचें कुटुंबव्रत आचरण करीत असतां नाहींसे झाले. स. जॉनही या मोहिमेंत होता, परंतु पगाराकरितां अडलेल्या आपल्या सैन्याची कांहीं तरतूद करण्याकरितां मागें राहिल्यामुळें तो बचावला. त्याच्या हातून राष्ट्रसेवा बरीच झाली होती; परंतु अद्याप पूर्वीपेक्षां जास्त सेवा होण्याची राहिली होती.

या प्रसंगासंबंधानें संदिग्ध बातम्या पसरल्या होत्या. लुईचा पराभव झाला यासंबंधानें वाद राहिला नाहीं; परंतु लुईप्रभृति मंडळींचा काय परिणाम झाला हें कोणास समजेना. ऑरेंज या भयंकर बातम्या ऐकून चिंतातुर झाला. त्याला त्या खऱ्या वाटेनात; व तो लुईचे डोळे मिटल्यानंतर त्याला वांचण्याकरितां वारंवार पत्रें लिहीत होता.

लढाईच्या दुसरे दिवशीं नेहमींच्या रिवाजाप्रमाणें स्पॅनिश सैन्यांत बंड उद्भवलें. सैन्याचा तीन सालचा पगार थकला होता; त्यामुळें हा क्रमिक प्रसंग उत्पन्न व्हावा यांत आश्चर्य नाहीं. स्पेनमधून लढाईकरितां रवाना आलेल्या पैशापैकीं एकचतुर्थांशसुद्धां शिपायांच्या खिशांत पडत नसे;

त्यामुळें असे प्रसंग सहजच वारंवार येत असत. हल्लीचें बंड फारच उग्र स्वरूपाचें होतें. ता. २६ एप्रिल रोजीं बंडवाले अँट्वर्प शहरांत शिरले व सुमार चार हजार लोकांनीं प्रथम चौकांत तळ दिला. रेकिसन्सनें त्यांस उद्देशून भाषण करण्यास सुरुवात केली असतां "डोलर पाहिजेत; भाषणें नकोत," असा त्यास जबाब मिळाला. नंतर या शिपायांनीं गांवांतील घरांतून ठाणीं दिलीं. तीन दिवसांनीं कोटांत असेच प्रकार सुरू झाले. मे महिन्याच्या अखेर सैन्याच्या जुलुमास कंटाळून ग्रामस्थांनीं त्यांच्या पगाराची रक्कम रोख देण्याचें कबूल केलें; त्याबद्दल रेकिसन्सनें त्यांस सरकारच्या स्थावर मिळकती गहाण लावून देऊन कागद करून दिला. पैसे हातीं पडतांच सैनिकांची मजलस सुरू झाली; खाणें, पिणें, जुगार यांची सीमा झाली. इकडे हा रंग चालला असतां तांडेल बॉयसोनें अँट्वर्प येथील सरकारच्या आरमारावर हल्ला केला. बावीस स्पॅनिश जहाजांपैकीं चवदा जहाजें जळून अगर बुडून नाश पावलीं. त्यांचा तांडेल हीमस्टीड हस्तगत झाला. देशभक्तांस पूर्ण जय मिळाला.

लुई नॅसाच्या स्वारीमुळें लीडनचा पहिला वेढा उठला होता. तो ३० आक्टोबर १५७३ पासून २१ मार्च १५७४ पर्यंत चालला होता. स्पॅनिश सैन्यास पूर्वेकडील सरहद्दीवर जाण्यास हुकूम होतांच शहरांत अन्नाचा व शिबंदीचा पुरवठा करून ठेवण्याविषयीं ऑरेंजनें शहरच्या लोकांस सुचविलें असतां त्यांनीं त्या गोष्टीकडे लक्ष पुरविलें नाहीं. लुई यशस्वी होऊन येणार अशा भरंवशावर ते बसले होते. मूकर्हीडची लढाई संपतांच पुन्हां या शहरास स्पॅनिश सैन्याची मिठी बसली. ता. २८ मे रोजीं व्हॅल्डेज या शहरापुढें आठ हजार वालून व जर्मन शिपाई घेऊन आला. लीडन शहर फार सुंदर होतें. विस्तीर्ण व सुपीक अशा प्रदेशाच्या मध्यभागीं तें वसलें होतें; व त्याच्या सभोंवतीं उल्लसित खेडीं, फुललेल्या पुष्पवाटिका व फलसंपन्न बागा दृष्टीस पडत होत्या. ऱ्हाईन नदीचे या प्रदेशांत असंख्य प्रवाह होऊन त्यांनीं हें शहर व्यापिलें होतें. या जल-मार्गांच्या दोहोंबाजूंनें निरनिराळ्या जातींचे उंच वृक्ष लागले होते. या जल-प्रवाहांवर शहरांत घडीव दगडाचे एकशेंपंचेचाळीस पूल होते; शहरांतील घरें सुबक, रस्ते व चौक विशाल व निर्मळ देवळें व सार्वजनिक इमारती

फार भव्य असल्यामुळें उद्योग, धनसंचय, सुखकर गृहस्थिती यांचें स्वरूप या शहरांत स्पष्ट दिसून येत होतें. शहराच्या मध्यभागीं एका कृत्रिम उंचवट्यावर फार जुन्या काळचा एक मोडकळीस आलेला मनोरा होता. शहरच्या पडक्या तटावरून आसपासचा प्रदेश स्पष्ट दिसत होता.

व्हॅल्डेझनें आसपासचीं ठिकाणें विलंब न लावतां ताब्यांत घेतलीं व सैन्याच्या शहराभोंवतीं बासष्ट चौक्या बसविल्या. शहरांत लुटारू लोकांची एक छोटी तुकडी व शहरच्या शिबंदीचीं पांच दळें येवढेंच कायतें सैन्य होतें. जॉन व्हान्डर्डो ऊर्फ नार्डिकचा सरंजामीदार या नांवाचा एक उच्चकुलोत्पन्न, विद्वान, कवित्वसंपन्न व शौर्यवान पुरुष शहरांत होता; त्यानें या सैन्याचें आधिपत्य पतकरलें. शहरचा मुख्य हवाला शहरवासी लोकांच्या धैर्यावर व वाक्संयमी वुइल्यमच्या अश्रान्त मेहेनतीवर होता. संधि मिळाली होती त्यावेळीं शहरचा बंदोबस्त न केल्याबद्दल ऑरेंज शहरवासी लोकांवर फार नाराज झाला होता. तथापि त्यानें प्रसंग आल्यावर त्यांस दम देऊन असें लिहून कळविलें कीं, सध्या येऊन पोंहोचलेल्या संग्रामाच्या निकालावर त्यांचें स्वतःचेंच काय परंतु सर्व देशाचें व हजारों अजात पिढ्यांचें हिताहित अवलंबून आहे; आपल्या राष्ट्राला, व राजकीय व धर्मस्वातंत्र्याला शोभण्यासारखें शौर्य लीडनच्या लोकांनीं गाजविल्यास त्यांचें नांव जगाच्या इतिहासांत अजरामर होईल; तीन महिनेपर्यंत त्यांनीं टिकाव धरल्यास तितक्या मुदतींत त्यांच्या मुक्ततेची योजना होईल. शहरवासी लोकांनीं मोठ्या धैर्यानें व विश्वासानें त्याचें सांगणें मान्य केलें. ऑरेंजचें मन वज्राप्रमाणें स्थिर व अभेद्य होतें. त्याला कोणी मदतनीस किंवा मसलतदार सुद्धां नसतां, व लुईच्या मरणानें त्याचा उजवा हात तुटल्याप्रमाणें झाला असतांही त्यानें हल्लीं अंगावर येऊन पडलेल्या कामास नेटानें सुरवात केली. फ्रान्समध्यें तिसरा हेनरी गादीवर येऊन दरबारांत नवीन कारस्थानें उद्भवल्यामुळें नेदर्लंडाला मदत करण्याचा विचार अगदींच मागें पडला. इंग्लिश सरकारला फ्रान्सची भीति संपल्यामुळें तें नेहमींपेक्षां जास्त उदासीन व बेफिकीर होऊन बसलें. रेकिसन्सनें ऑरेंजचा खून करण्याकरितां तयार केलेला एक इंग्लिश मारेकरी झीलंडमध्यें पकडला

गेला; त्यानें या कृत्यांत इलिजाबेथची संमति व अंग असल्याचें कबूल केलें. हॉलंड व झीलंडचे लोक एकनिष्ठ व इमानी होते खरे, परंतु त्यांचा प्रचंड स्पॅनिश साम्राज्यापुढें टिकाव लागणें कठिण होतें. शिवाय ता. ६ जून रोजीं राजाचें माफीपत्र प्रसिद्ध झालें. यांत कृतकर्माबद्दल लोकांनीं पश्चात्ताप दर्शवून राजास शरण गेल्यास त्यांस माफी मिळेल; परंतु त्यांनीं पुराण धर्ममतिच्या गोटांत सामील झालें पाहिजे अशी त्यांजवर जोखीम ठेवली होती. जरी हा माफीचा हुकूम बराच सौम्य व सवलतीचा होता, तथापि हॉलंड व झीलंड प्रांतांत जिकडे तिकडे नव्या धर्माचा प्रसार झाला असल्यामुळें लोकांनीं, राजपुत्राच्या मताप्रमाणें, देशांत एक प्राणी जिवंत असेतोंपर्यंत आपल्या धर्माकरितां व राष्ट्रीय हक्काकरितां आपल्या देहांच्या आहुति देण्याचा निश्चय केला. सात वर्षें-पर्यंत ज्या तत्त्वांसाठीं हे लोक शत्रूशीं रात्रंदिवस झगडत होते तीं तत्त्वें केवळ माफी या शब्दास भुलून ते एकदम सोडून देतील असा संभव नव्हता. हॉलंडच्या लोकांची 'राजा ईश्वरांश' आहे ही कल्पना अद्याप कायम होती व राजसत्तेबद्दल त्यांचा पूज्यभाव कमी झाला नव्हता. तथापि ज्या मनुष्यानें आपल्या सर्व इमानाच्या शपथा मोडल्या, नेदर्लंडचे राष्ट्रीय हक्क रसातळास पोंहोचविले, देशांतील शहरें जाळलीं व लुटलीं, व त्यांचे निर-पराधी बांधव फांशीं दिले, तोडले, जाळले व जिवंत पुरले, तो, डोक्यास भस्म व अंगांवर कफनी घालून माफी मागावयाची सोडून, डोक्यावर मुगुट व अंगावर राजवस्त्रें परिधान करून लोकांपुढें डौलानें माफी फर्मावण्यास आलेला पाहून लोकांस सहजच त्वेष उत्पन्न झाला. शिवाय त्याच्या मागील आचरणावरून या माफीच्या अटी राजा पाळील असा कोणास भरंवसा वाटेना. ऑरेंजला प्रथम या माफीपासून दुःखानें सतत पोळ-लेल्या लोकांच्या मनोवृत्तींत एकदम पालट होईल अशी भीति वाटत होती; परंतु सर्वत्र लोकांनीं या माफीविषयीं पूर्ण तिरस्कार दर्शविला. तसि कोणी भीक घातली नाहीं ! !

ऑरेंजनें सुचविल्याप्रमाणें लौकरच लीडनच्या लोकांनीं आपल्या अन्नसामुग्रीची व उपजीव्य प्राण्यांची मोजदाद केली. जून अखेर शहरांतील लोकांस नियमित अन्न मिळूं लागलें; सर्व धान्याची वगैरे

खेरदी गांव कामगार योग्य दर ठरवून स्वतः करूं लागले. जवान इसमास पावशेर रोटी व पावशेर मांस मिळत असे; बाकीच्यांस या प्रमाणानेंच अन्न देण्याचा क्रम चालू झाला. शहराशीं दळणवळण पारवे व कांहीं धीट व शीघ्रगामी जासूद यांच्या मार्फत चाललें होतें. शहराबाहेर हत्यारबंद टोळ्या नित्यशः जात व उभय पक्षांच्या चकमकी होत. शहरांत स्पॅनिश शिपायाचें मुंडकें तोडून आणणारास चांगलें बक्षीस लावलें होतें; हें बक्षीस देण्याचे प्रसंग बारंवार येऊं लागले. या खटपटींत शहरांतील लढाऊ लोकांची संख्या कमी होऊं नये ह्मणून लोकांस बाहेर जाण्याविषयीं मनाईचा हुकूम सक्त करावा लागला. राजपुत्राचें ठाणें डेल्फ् व रॉटर्डम या ठिकाणीं असे. या दोन शहरांच्या दरम्यानचा महत्वाचा किल्ला त्याच्या ताब्यांत राहिल्यामुळें येसेल व म्यूज या नद्यांच्या प्रवाहांमधील चतुष्कोनावर त्याचें स्वामित्व कायम राहिलें. ता. २९ जून रोजीं स्पॅनिश लोकांनीं हा किल्ला सर करण्याचा यत्न केला; परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. उलट या प्रयत्नांत त्यांचे सातशें लोक बळी पडले. हें ठिकाण ताब्यांत असेतोंपर्यंत राजपुत्राला लीडन सोडविण्याची आशा होती; कारण मूकर्हीडच्या लढाईनंतर जमिनीच्या बाजूनें लीडनकडे सैन्य पाठविण्याची आशा तूर्त संपली होती. लीडन समुद्रावर नव्हतें; तथापि समुद्राचे धक्के फोडून लीडनला समुद्र नेऊन भिडविल्याशिवाय लीडनची सुटका करण्यास दुसरा मार्ग राहिला नव्हता. स्पॅनिश लोक पश्चिमेकडील समुद्रकिनारा व्यापून बसले होते; परंतु म्यूज व येसेल यांच्या बाजूचे धक्के त्याच्या स्वाधीन होते. ते फोडण्याचा व रॉटर्डम, शीडम वगैरे ठिकाणचे निकाल मोकळे करण्याचा त्यानें निश्चय केला. याच्या योगानें जमिनी, गांवें व उभीं पिकें यांचें अतोनात नुकसान होणार होतें, परंतु लीडन व त्याबरोबर सर्व हॉलंडचा बचाव करण्यास एवढाच मार्ग होता. त्यानें या प्रकरणाचा केलेला खुलासा व त्याचें कळकळीचें भाषण यांच्या योगानें सर्वांची या गोष्टीच्या अवश्यकतेबद्दल खात्री झाली. जुलै महिन्यांत हॉलंडच्या प्रांतिकसभेनें या गोष्टीस अनुमोदन दिलें. "देश गमावण्यापेक्षां बुडविणें बरें," असे प्रतिनिधींचे उत्साहयुक्त उद्गार निघाले. प्राचीनकालीं समुद्राच्या तावडीं-

तून देश सोडविण्याकरितां केलेल्या खटपटीप्रमाणेंच आतां तो समुद्राच्या पाण्यानें बुडविण्याचें काम एखाद्या फायदेशीर व्यापाराप्रमाणें सुरू झालें. या कामाकरितां भांडवल गोळा करण्यांत आलें; त्यांत गांवोगांवच्या बायकांनींसुद्धां सोन्यारुप्याचीं भांडीं, जवाहीर, व मूल्यवान् सामान वर्गणीदाखल हजर केलें. प्रांतिकसभेनें या कामाकरितां कांहीं मासिक देणगी मंजूर केली. ता. ३० जुलै रोजीं व्हॅल्डेजनें शहरच्या लोकांनीं वेशी उघडून राजाची सत्ता मान्य केल्यास त्यांस पूर्ण माफी मिळेल असे आश्वासनपर निरोप शहरांत पाठविले. लोकांचे उपासमार चालले होते; राजपुत्रानें चालविलेल्या खटपटीची त्यांस माहिती मिळाली नव्हती; तथापि आपलें धैर्य व त्याचे यत्न यांजवर लोकांची भिस्त होती. स्पॅनिश सेनानीच्या गोड शब्दावर कितपत विश्वास ठेवतां येतो याची प्रतीति त्यांस हार्लेम व नॉर्डेन या ठिकाणीं आली होती. ता. ३ आगष्ट रोजीं राजपुत्र धक्के फोडण्याच्या कामावर नेमलेला मुख्य अधिकारी पॉल बाय यास बरोबर घेऊन येसेलच्या प्रवाहाच्या बाजूनें गेला; त्यानें सोळा जागीं धक्के फोडले; शीडम व रॉटर्डम येथील निकाल खुले करविले. समुद्राचें पाणी जमिनीवर भरूं लागलें. पाणी चढत असतां राजपुत्राच्या हुकुमावरून आसपासच्या शहरांतून धान्य व इतर निर्वाहाचे पदार्थ गोळा करण्याचा सपाटा सुरू झाला. शिवाय ऑरेंजनें या संधींत दोनशें लहान-मोठीं जहाजें रॉटर्डम, डेल्फ्शेव्हन वगैरे बंदरांत तयार करून ठेविलीं.

लीडनचे लोक उतावळे व निराश झाले होते. रोटी तर संपली होतीच, परंतु तिच्या ऐवजीं उपयोगांत आणिलेले पदार्थही संपत चालले होते. ता. १२ आगष्ट रोजीं त्यांना ऑरेंजची उत्तेजनपर चिठ्ठी आली; ता. २० रोजीं शहरांतून ऑरेंजला जवाब गेला; त्यांत ' दोन महिनें अर्धपोटी व एक महिना अन्नावांचून दिवस काढले, आणखी फार झाल्यास चार दिवस टिकाव धरतां येईल ' असें कळविलें होतें. त्याच दिवशीं ऑरेंज-कडून त्यांस अशी बातमी समजली कीं, सर्व धक्के फोडविले आहेत; समुद्राच्या लँडशीडींगनामक धक्क्यांवरून पाणी वाहूं लागलें आहे. हें पत्र ऑरेंजनें मोठा जबरदस्त ताप चढला असतां दुसऱ्या इसमाकडून पाठविलें होतें; परंतु त्यांत त्याच्या आजाराचा बिलकुल उल्लेख नव्हता.

ऑरेंजचें पत्र बाजारांत जाहिरपणें वाचण्यांत आलें व ग्रामाध्यक्ष व्हान्डवर्फिनें वाजंत्री लोकं वे गायक यांचे मेळे काढून शहर वाद्यगानानें दणाणून सोडलें; तोफांची सरबत्ती झाली; व कांहीं वेळपर्यंत शहरास महोत्सवाचें स्वरूप आलें. लीडनच्या भोंवतीं जिकडे तिकडे सुमार दहा इंच खोलीचें पाणी पसरलेलें पाहून व्हॅल्डेझ फार अस्वस्थ व चिन्तातुर झाला. समुद्राच्या लाटांत सांपडणें सामान्य संकट नव्हतें; व या लाटा मुग्ध डुइल्यमची आज्ञा निमुटपणें मान्य करीत होत्या असें दिसून आलें. व्हॅल्डेझच्या सल्लागारांनीं ऑरेंजचे बेत वेडगळ ठरविले. खुद्द शहरांत सुद्धां आशेचा पहिला झटका उतरल्यावर संशयाची शिथिलता प्राप्त झाली. ता. २७ रोजीं त्यांनीं प्रांतिकसभेस अगदीं निर्वाणीचें पत्र पाठविलें; त्यांत अशा निकराच्या प्रसंगीं लीडनकडे दुर्लक्ष केल्याबद्दल या सभेस दोष दिला होता. या पत्राला त्याच दिवशीं जबाब आला. त्यांत "आमची सर्व भूमि व मालमत्ता समुद्रांत बुडून गेली तरी बेहेत्तर, परंतु लीडन, तुला आह्मी सोडून देणार नाहीं! शिवाय आह्मांस हें पक्कें माहीत आहे कीं, लीडनचा शेवट झाला कीं सर्व हॉलंडचा शेवट झाला," असे उद्गार होते. ऑरेंजचा ताप विकोपास गेला होता. शरीर अगदीं क्षीण झालें. लीडन-च्याच काय परंतु सर्व राष्ट्राच्या उज्जीवनार्थ रचलेले बेत लयास जातात किंवा काय या विवंचनेंत तो बिछान्यावर रात्रंदिवस तळमळत पडला असे. मानसिक श्रम् व व्यथा यांपासून ताप आला होता; त्यास मनांतून सर्व दुःखकारक व घोटाळ्याचे विचार घालवून देणें याशिवाय दुसरा उपाय नाहीं असें वैद्य लोकांचें मत होतें. परंतु लीडन दुःखाकुल व निराश होऊन त्याच्या चरणावर पडलें होतें, व त्याचा आक्रोश चालला असतां कानावर हात ठेवून स्वस्थ बसणें शक्य नव्हतें; ह्मणून तो आपल्या बिछान्यावरूनच त्यांना उमेद आणणारीं पत्रें, बॉयसोला आर-मारासंबंधानें सूचना व बारीकसारीक माहिती लिहून पाठवीत होता. आगष्टअखेर अशी एक निराधार बातमी पसरली कीं, लीडन शत्रूंनीं सर केलें; ती ऐकून त्याचें मन भडकलें व ताप वाढला. परंतु हॉलंडच्या एका बड्या अधिकाऱ्यानें येऊन ती बातमी खोटी आहे असें खात्रीपूर्वक सांगतांच त्याचा ताप कमी झाला. त्या दिवसापासून त्याच्या दुखण्यास

उतरती कळा लागली. सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्यांत त्यानें भावास एक लांबलचक पत्र आपल्या हातानें लिहिलें; त्यांत आपल्या शरीर-प्रकृतीची सुस्थिति लिहून आपल्या शुभाशुभ कर्माचा हवाला सर्वस्वी ईश्वरावर टाकला होता.

लीडनच्या विमोचनाची तयारी त्यानें पुन्हां जोरानें सुरू केली. ता. १ सप्टेंबर रोजीं तांडेल बॉयसो झीलंडमधून कांहीं जहाजें व आठशें अस्सल दर्यावर्दी भणंग घेऊन बाहेर पडला. हे भणंग फार अडदांड व क्रूर होते. त्यांचें स्वरूप फार विचित्र व उग्र दिसे. वेळोवेळीं युद्धकर्मांत लागलेले व्रण, निशाण्या त्यांच्या शरीरावर जागोजाग दिसत होत्या; त्यांच्या टोप्यांवर अर्धचंद्राकृती पट्टे होते; त्यांत "तुर्की होणें बरें पण पोप धर्म नको" अशीं अक्षरें काढलीं होतीं; त्यांची क्रौर्य व नौकाक्रमणचातुर्य यांजबद्दल फार ख्याति असे. बॉयसोजवळ क्रमाक्रमानें दोनशांवर तारवें, दहा तोफा व पंचवीसशें नामांकित शिपाई इतकी सामुग्री तयार झाली. आतां कामास खरी सुरवात झाली. समुद्रकिनाऱ्यावरील अखेरचा धक्का लीडनपासून पंधरा मैलांवर होता. याच्यावरून पाणी आंत आलें होतें. हा ओलांडून बॉयसोचा नौकासमुदाय लँडशीडिंगनामक धक्क्यापर्यंत तात्काल येऊन पोंहोचला. हा धक्का शहरापासून पांच मैलांवर होता; याच्यापुढें अशा धक्क्याचे तट शहरापर्यंत मधून मधून बरेच होते; व दरम्यानच्या सपाट प्रदेशांत पुष्कळ खेडीं व बासष्ट लहान मोठ्या किल्ल्यांची सांखळी पसरली होती. हीं खेडीं व हे किल्ले शत्रूंनीं व्यापले होते. सारांश, या धक्क्यांवरून व जागजागीं वसलेल्या शत्रूंच्या फळींतून बॉयसोच्या आरमाराला लीडन गांठावयाचें होतें. ता. १० व ११ रोजीं रात्रौ देशभक्तांनीं शत्रूवर छापा घालून लँडशीडिंग धक्का सर केला. धक्क्यावरील स्पॅनिश लोकांस त्यांनीं कापून काढलें अगर पाण्यांत ढकलून दिलें, व त्यावर एक मनुष्यसुद्धां न गमावतां आपल्या चौक्या ठेवून मजबुती केली. दुसरे दिवशीं हें ठिकाण परत घेण्याकरितां स्पॅनिश लोकांनीं देशभक्तांवर मोठ्या निकराचा हल्ला केला; परंतु त्यांची बरीच खराबी होऊन त्यांस माघार खावी लागली. हा देशभक्तांच्या भीमकर्माचा पहिला हप्ता होता. या प्रसंगीं ज्या जातिद्वेषामुळें त्यांस इतकें अमानुष सामर्थ्य आलें होतें

त्याचेही कांहीं अपूर्व मासले त्यांनीं जगास दाखविले. एका झीलंडरनें एका स्पॅनिश शिपायाचें काळीज फाडून त्यास आपले दांत लावले; व शेवटीं तें फार कडू आहे असें ह्मणून कुत्र्यापुढें टाकिलें. तें तेथून काढून स्वातंत्र्ययज्ञाचें स्मारक ह्मणून पुष्कळ वर्षेपर्यंत राखून ठेविले होतें. यानंतर लँडशीडिंग धक्का ठिकठिकाणीं फोडून तारवें आंत गेलीं. याच्यापुढें पाऊण मैलावर "ग्रीनवे" नांवाचा धक्का होता; तोही बॉयसोच्या लोकांनीं हस्तगत केला व तो जागजागीं फोडून त्यांतून जहाजें आंत आणिलीं. या प्रदेशांत पाणी चोहोंकडे विस्तीर्ण प्रदेशावर फैलावल्यामुळें फार उथळ झालें. परंतु पुढें एक गोड्या पाण्याचा तलाव होता, त्यांत तारवें नेण्यास फक्त एक रुंद व खोल कालव्यांतून वाट होती. ही वाट स्पॅनिश लोकांनीं रोखली होती. स्पॅनिश लोकांची जागा फार मजबूत होती; त्यामुळें बॉयसोचा येथें इलाज चालेना. या ठिकाणीं त्याची आठ दिवस खोटी झाली. ओहटीमुळें पाणी जास्तच कमी होऊं लागलें. सर्व विपरीत चिन्हें भासूं लागलीं. इतक्यांत ता. १८ रोजीं वारा वायव्येकडून वाहूं लागला; समुद्रांत मोठें वादळ झालें; व भरतीचें पाणी जमिनीवर जोरानें येऊं लागलें. दुसरे दिवशीं तारवें तरंगूं लागलीं. या संधीस झूटमीर खेड्यांतील लोकांनीं आंत जाण्याची एक फेऱ्याची वाट बॉयसोला दाखविली. खेड्यांत संरक्षणाकरितां ठेवलेले स्पॅनिश लोक पाण्याच्या व भणंगांच्या भीतीनें पळून गेले व तिसऱ्या बांधाऱ्यावरून शत्रूंस पुढें रेटीत बॉयसोचें सैन्य वेढा पडलेल्या शहराजवळ येऊन पोंहोचलें. झूटमीर येथें येऊन पोंहोचल्यावर गांवच्या लोकांस निघून जाण्यास सवड देऊन तें व जवळचें दुसरें एक गांव जाळून बॉयसो नॉर्थ–आपर्यंत बिनहरकत जाऊन पोंहोचला. पुढें 'कर्कवे' नांवाचा धक्का होता. शत्रू नॉर्थ–आ सोडून झूटवूड नांवाच्या तटबंदी गांवांत जाऊन राहिले, लीडडॉर्प येथें व्हॅल्डेझचें ठाणें होतें; कर्नल बोर्जिया लॅमेनच्या मजबूत किल्ल्यांत तळ देऊन होता. पाणी उथळ झाल्यामुळें नॉर्थ–आ येथें आरमार [illegible]च दिवस अडकून पडलें. ऑरेंजला जरा बरें वाटतांच तो आरमारावर आला. त्याच्या आगमनानें सैन्यास हुरूप आली. आजूबाजूचा प्रदेश स्वतः डोळ्यांनीं पाहून त्यानें 'कर्कवे'

धक्का तावडतोब फोडण्याचा हुकूम सोडला. नंतर पुष्कळ वेळपर्यंत बॉयसोशीं वाटाघाट करून तो डेल्फला परत गेला.

इकडे वेढलेल्या शहरचे प्राण डोळ्यांत आले होते; आपल्या सुटके-करितां आरमार निघाल्याचें त्यांस समजलें होतें, परंतु वाटेंतील अडथळे त्यांस माहीत असल्यामुळें, तें वेळेवर येऊन पोंहोचण्यासंबंधानें त्यांचा भरंवसा उडत चालला. जळालेल्या खेड्यांच्या प्रकाशानें व नॉर्थ–आ येथें आरमार आल्यानंतर झालेल्या तोफांच्या सरबत्तीवरून त्यांस तें वाटेंत असल्याचें समजलें. पुढें त्याचा पत्ता कांहींच समजेना. लोक चिंताग्रस्त व संशयग्रस्त झाले. वारा पूर्वेकडे वाहूं लागल्यावर त्यांची आशाही खुंटत चालली. दररोज सूर्योदय होतांच ते मनोऱ्यावर नियमाप्रमाणें जाऊन दूरवर उत्सुकतेनें पहात; परंतु हें पहाणें व्यर्थ आहे असें त्यांचें त्यांसच वाटत होतें. इकडे लोकांचे शब्दशः उपासमार चालले होते. रोटी, पेंड, घोड्याचें मांस खलास झालें होतें; कुत्रीं, मांजरें, घुशीं व इतर कीटक हें पक्वान्न होऊन बसलें होतें. कांहीं गाई दुधाकरितां राखून ठेवल्या होत्या त्यांचाही निकाल होत चालला; खाटिकांच्या दुकानापुढें क्षुधार्त लोकांच्या झुंडी जमत. एखादा प्राणी कापतांच त्याच्या मांसाचा एखादा तुकडा मिळण्याकरितां प्रचंड युद्धें माजत; बहुतेक लोकांस फरशीवर वाहणारे रक्ताचे ओघळ चाटून समाधान मानावें लागत असे. कातडीं भाजीप्रमाणें चिरून तीं शिजवून बनलेला रस्सा मोठ्या हौसेनें लोक पीत होते. रस्त्यांतून व मोऱ्यांतून कसल्याही अन्नाचा घांस शोधीत फिरणारीं बायका व मुलें कांहीं जिन्नस दिसल्यास त्याच्यासाठीं कुत्र्याशीं झगडतांना दृष्टीस पडत. झाडाचा पाला व इतर वनस्पती यांचा अन्नाच्या ठिकाणीं उपयोग होऊं लागला. अन्नावांचून लहान मुलें, बाळंत बायका पटापट मरत होत्या. कित्येक घरांत सर्व कुटुंबच्या कुटुंब,–आई, बाप, मुलें–एके ठिकाणीं मरून पडलेले रखवालदार लोकांस सांपडत असे. अन्नाची महर्घता झाल्यामुळें लोकांच्या यातना संपुष्टांत आणण्याकरितां प्लेगचाही प्रादुर्भाव झाला! त्याच्या सपाट्यांत कोयत्यानें कापलेल्या गवताप्रमाणें लोक पटापट गळून पडूं लागले. या अनर्थांत सहापासून आठ हजारपर्यंत लोक दगावले. तथापि बायकामुलें विदेशी

शत्रूला थारा न देण्याविषयीं एकमेकांस उत्तेजन देत होतीं. व्हॅल्डेझनें शहरांत पत्रें पाठवून शपथांचा व आश्वासनांचा वर्षाव चालविला होता. परंतु लीडनचें मनोधैर्य लोकोत्तर होतें. कांहीं लोक निराश होऊन ग्रामाध्यक्षास दूषणें देऊं लागले. अशा समयीं शहरच्या चौकांत उभा राहून तो ओरडून ह्मणाला, "मित्रहो, तुमचें काय ह्मणणें; आपल्या शपथा मोडून मी शहर स्पॅनिश लोकांच्या स्वाधीन करावें? त्याचा परिणाम फार भयंकर होईल. मीं शहर शत्रूपासून रक्षण करण्याची शपथ घेतली आहे; ईश्वर माझा संकल्प पार पाडण्यास मला सामर्थ्य देईल. मी एकदाच मरणार आहें; मग तें मरण तुमच्या हातून असो, शत्रूच्या हातून असो, किंवा ईश्वराच्या हातून असो.......... शत्रूच्या हातीं सांपडून बीभत्स मरण येण्यापेक्षां अन्नावांचून मरणें बरें. तुमच्या धमकीला मी भीत नाहीं; माझे प्राण तुमच्या स्वाधीन आहेत. ही घ्या माझी तरवार; खुपसा माझ्या पोटांत आणि घ्या वांटून माझें मांस! आपली भूक भागविण्यासाठीं माझें शरीर घ्या, परंतु मी जिवंत असेपर्यंत शरण जाण्याची आशा करूं नका!" हे शब्द ऐकून लोकांस नवें धैर्य आलें. त्यांनीं मॅजिस्ट्रेटांच्या आज्ञा पाळण्याच्या शपथा पुनः एकदा घेतल्या, व पुनः मनोऱ्यावर जाऊन शहराकडे येणाऱ्या आरमाराची टेहळणी करूं लागले. तटावर चढून ते मोठ्यानें ओरडून शत्रूंस ह्मणाले. "तुम्ही आम्हांस घुसखाऊ, कुत्रींखाऊ, असें म्हणतां तें रास्त आहे. गांवांत कुत्र्याचें भोंकणें अगर मांजराचें ओरडणें ऐकूं येईपर्यंत शहर तुम्हांस शरण येत नाहीं. दुसरें अन्न संपल्यावर आम्ही आपले डावे हात भक्षण करूं व उजव्या हातानें आमच्या बायकांचें, स्वातंत्र्याचें व धर्माचें परदेशी शत्रूपासून रक्षण करूं. शेवटची निकराची वेळ येऊन पोंहोचतांच आम्ही आपल्या हातानें आपल्या घरादारांस आग लावून त्यांत बायका-पोरांसह एकदम मरूं; परंतु आमच्या बायका भ्रष्ट होऊं देणार नाहीं किंवा आपलें स्वातंत्र्य गमावणार नाहीं."

ता. २८ सप्टेंबर रोजीं शहरांत बॉयसोचा पारवा चिठी घेऊन आला. त्यांत नॉर्थ-आ येथें आरमार असून लौकरच शहरापर्यंत येऊन थडकेल असें आश्वासन होतें. हें पत्र जाहीररीतीनें वाचल्यावर आनंदानें घंटा

वाढूं लागल्या. तथापि दुसरे दिवशीं वाऱ्याची दिशा बदलून पाणी उतरूं लागलें व तांडेल बॉयसो निराशेनें अगदीं स्तब्ध झाला. त्यानें ऑरेंजला लिहिलें कीं, वसंतऋतूची भरती व वायव्येकडून वावटळ येऊन पाणी न चढल्यास आपला कांहीं इलाज चालणार नाहीं, व ही मोहीम सर्वस्वीं सोडून द्यावी लागेल. ता. १ व २ आक्टोबर रोजीं जबरदस्त वादळ होऊन दक्षिणेकडून व उत्तरेकडून समुद्राचें पाणी हॉलंडच्या किनाऱ्यावर आदळून जमिनीवर जोरानें वाहूं लागलें. चोविस तासांत नॉर्थ-आ येथें दोन फुटांपेक्षां जास्त पाणी झालें. कर्कवेच्या धक्क्यावरून पाणी सोसाट्यानें वाहूं लागलें. मध्यरात्रीं काळोखांत व वादळांत जहाजें पुढें चालू झालीं. दोन्ही आरमारांची मध्यरात्रीच्या काळोखांत मोठी लढाई झाली. पाण्यांत बुडालेले बगीचे व शेतांतील छपरें यांच्यामध्यें हें नौकायुद्ध फार अपूर्व होतें. झीलंडरांच्या तोफांनीं बॉयसोच्या आगमनाची बातमी झुटर्वूडपर्यंत पोंहोचविली. शत्रूंचीं जहाजें बुडालीं; त्यावरील लोक उच्छिन्न झाले. बॉयसोचें आरमार झुटर्वूडकडे तडख चाललें. देशभक्तांच्या वाटेंत लॅमेन व झुटर्वूड हे मजबूत गांव अद्याप होते. झुटर्वूड येथें सैन्याचा जमाव व दारूगोळाही भरपूर होता. परंतु इतर ठिकाणच्या चौकीदारांप्रमाणें येथील लोकही भीतीनें गारठले व हेगकडे पळूं लागले. वाटेंत समुद्राचें पाणी वाढलें असल्यामुळें पुष्कळ लोकांस जलसमाधि मिळाली. पुष्कळांवर या क्रूर भणंगांनीं हल्ला केला; व मासे धरण्याच्या गळांनीं व आकड्यांनीं त्यांस ओढओढून समुद्रांत लोटून दिलें; झुटर्वूडचा तट पाडून गांवास देशभक्तांनीं आग लावून दिली. वल्ह्यांचे कांहीं हात मारतांच लॅमेन येऊन पोंहोचलें. या किल्ल्यांतही शिपायांची व तोफांची गर्दी होती. बऱ्याच अंतरावर आपलीं जहाजें थांबवून बॉयसोनें या प्रदेशाची टेहळणी करविली. लॅमेन व उजव्या बाजूस व्हॅल्डेजचें ठिकाण लीडडॉप यांतून पुढें सरकणें देशभक्तांच्या सेनापतीस दुर्घट वाटूं लागलें. इकडे लीडनचे लोक अगदीं अधीर झाले होते. बॉयसोनें पारव्याच्या मार्फत त्यांना वस्तुस्थिति समजाविली. सायंकाळीं मनोऱ्यावरून लॅमेनकडे बोट दाखवून ग्रामाध्यक्ष ह्मणाला, “ पलीकडे, त्या किल्ल्यामागें रोटी, मांस, व हजारों बांधव आहेत; त्यांचा नाश स्पॅनिश लोकांच्या

तोफांनीं होऊन यावा, कां आह्मी त्यांच्या संरक्षणार्थ जावें ? " " आह्मी आपल्या नखांनीं व दातांनीं किल्ला फोडून काढूं, परंतु आलेलें अन्न गमावणार नाहीं, " असा त्यास जबाब मिळाला. सूर्योदयापूर्वी लॅमेन वर चाल करून जाण्याचा निश्चय ठरला. ही रात्र बॉयसोच्या आरमाराला, स्पॅनिश सैन्याला व लीडनला मोठी काळजींत गेली. रात्रीं दिव्यांची एक रांग किल्ल्यांतून समुद्राकडे गेल्यासारखी दिसली; काऊगेट व बर्गंडीचा बुरूज यांच्या दरम्यानचा तट धाडकिन् मोडून पडल्याचा आवाज झाला. अरुणोदय होतांच बॉयसोनें हल्ल्याची तयारी केली. किल्ल्यांत तर स्मशानभूमीप्रमाणें सामसूम भासूं लागलें. प्रथम त्यास स्पॅनिश लोकांनीं शहर रात्रींत सर केलें अशी कल्पना उत्पन्न होऊन फारच दुःख झालें. परंतु लौकरच पाण्यांतून त्याजकडे एक मनुष्य पोहत येतांना दृष्टी पडला; व तटावरून एक मुलगा टोपी उडवून त्यांस बोलावतांना दृष्टी पडला. ह्या मुलानें लीडनवरून शत्रू पळून जातांना पाहिलें होतें; त्याच्या बोलण्यावर कोणी भरंवसा ठेवीना, म्हणून तो एकदा लॅमेनच्या तटावर जाऊन उभा राहिला. स्वतः लीडर्डोप येथून भीतीनें व्हॅलेडज पळून गेला; व त्याच वेळीं त्यानें बोर्जियाला लॅमेनमधून पळून जाण्याविषयीं सूचना पाठविली होती; रात्रीं दिव्यांच्या रांगा दिसल्या ते पळून जाणाऱ्या स्पॅनिश सैन्याचे कंदील होते. लीडनच्या तटाचा भाग पडला; त्यामुळें स्पॅनिश लोकांस शहर सर करण्यास चांगली संधि होती; परंतु तेंच त्यांस भीति उत्पन्न करण्यास विशेष कारण झालें. ता. ३ आक्टोबर रोजीं बॉयसोचें आरमार शहरांत येऊन पोंहोचलें. लीडनची सुटका झाली.

शहरांतील कालव्यांत जहाजें येऊन पोंहोचल्यावर त्यांचें स्वागत करण्याकरितां सर्व शहरवासी जन दोहोंबाजूंच्या धक्क्यांवर उभे होते. सर्व जहाजांतून जमलेल्या लोकांस यथेच्छ रोटी वांटण्यांत आली. पुष्कळ लोक उपासानें हलुक झालेल्या पोटांत रोटी आकंठ भरून जागच्या जागीं मृत्यु पावले. कित्येक अधाशीपणानें खाऊन आजारी झाले. बॉयसो जहाजावरून उतरतांच गांवच्या अधिकाऱ्यांनीं त्याचें स्वागत केलें. नंतर सर्व मंडळी समारंभानें देवळाकडे गेली; तेथें सर्वांनीं तारस्वरानें ईश्वराची

प्रार्थना केली. पुष्कळांस दम उरकेना. भक्तिरसपर पद्यें चालली असतां ग्रामस्थ लोक घळघळा रडूं लागले. या वेळीं ऑरेंज डेल्फ येथें देवळांत प्रार्थनामंदिरांत होता. प्रार्थना पुरी झाल्यावर त्यानें धर्मोपदेशकाचे हातांत बॉयसोकडून आलेलें पत्र प्रसिद्धपणें वाचण्याकरितां दिलें. जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. दुसरे दिवशीं ऑरेंज लीडनला आला. या वेळीं लोकांस कांहीं दिवसांपूर्वीं त्यानें लिहिलेल्या शब्दांची सत्यता भासली. "जर आपला नाश व्हावा अशी ईश्वरी इच्छा असेल तर होवो; परंतु अशा बलिष्ठ शत्रूच्या दाढेंतून आपला छोटा देश कोणाच्या सहाय्यावांचून रक्षण केल्याबद्दल आपली कीर्ति तरी होईल. जर अत्रत्य अनाथ लोक दृढनिश्चयानें लढतील तर आपला शेवट करण्यास स्पेनला आपला निमा खजिना व निमे लोक खर्ची घालावे लागतील." लीडनच्या वेढ्यानंतर स्पॅनिश लोकांस हॉलंड जिंकण्याचें काम किंस्वरूप आहे हें कळून चुकलें. ता. ४ आक्टोबर रोजीं पुन्हा कांहीं अगम्य ईश्वरी संकेतानुरूप समुद्राचें पाणी ओसरलें. सर्व प्रदेश मोकळा झाला व धक्के बांधण्याचें काम सुरू झालें. लीडन येथें दहा दिवस जत्रा भरली; व या प्रसंगाचें स्मारक म्हणून या ठिकाणीं एक विद्यापीठ स्थापन करण्याचें ठरलें. या संस्थेस हॉलंडच्या सरकारानें बरेंच उत्पन्न तोडून दिलें. ता. ५ फेब्रुवारी १५७५ रोजीं या संस्थेच्या स्थापनेचा समारंभ झाला. त्या दिवशीं धर्मशास्त्र, न्यायशास्त्र, वैद्यशास्त्र, युद्धकला, सरस्वती वगैरेंच्या मूर्ति व त्यांच्याबरोबर त्या त्या शास्त्रांतील नामांकित पंडितांची भूमिका घेतलेले लोक असा मेळा गांवांत समारंभानें मिरवून विद्यापीठाकरितां कायम केलेल्या इमारतीजवळ आला. तेथें लॅटिन भाषेंत पद्यात्मक स्वागत झाल्यावर मंडळी प्रार्थनामंदिरांत गेली. तेथें धर्मशास्त्राचें निरूपण झाल्यावर बडी मेजवानी झाली व हा समारंभ समाप्त झाला.

'यमासन' अद्याप अस्तित्वांत होतेंच. तें बंद करण्याविषयीं रेकिसन्सनें राजास शिफारस केली. त्यावरून वाजवी दिसल्यास तें बंद करण्याविषयीं सुभेदारसाहेबांस ता. १० मार्च १५७४ रोजीं राजाची लेखी परवानगी आली. जून महिन्याच्या प्रारंभीं ब्रुसेल्स येथें प्रतिनिधींची सभा भरली; त्या वेळीं सरकार व लोकांचे मुखत्यार यांचे दरम्यान पत्रव्यवहार

शहरांकडून आल्व्हाला वर्षांतून जितका कर मिळण्याची मारामार पडत होती त्याच्यापेक्षां जास्त वसूल आतां दरमाहीं येऊं लागला. अर्थातच हा कर सोसणाऱ्या शहरांचें महत्व प्रांतिक राज्यव्यवस्थेंत बरेंच वाढलें. त्यामुळें ऑरेंजच्या कामांत जास्त ढवळाढवळ करण्याची त्यांस हाव उत्पन्न होऊन नेहमीच्या खर्चाच्या बाबतींत ऑरेंजचें स्वातंत्र्य बरेंच कमी झालें. हें शहरांचें वर्तन ऑरेंजला पसंत न वाटल्यामुळें आपले अधिकार चोख रीतीनें ठरवून घेण्याकरितां त्यानें हा सर्व प्रश्न तारीख २० आक्टोबर सन १५७४ रोजीं हॉलंडच्या प्रांतिक सभेपुढें मांडिला. सभेंत त्यानें असें प्रतिपादन केलें कीं, राज्यव्यवस्थेचें स्वरूप चमत्कारिक झाल्यामुळें कारभार पाहण्यास बऱ्याच अडचणी उत्पन्न झाल्या आहेत; सामान्य लोकांस सार्वजनिक पैसा आमच्या स्वतःच्या हिताकरितां खर्च होतो असें वाटूं लागलें आहे; अधिकारप्राप्तीसाठीं दुसऱ्या व्यक्तींमध्यें तंटा होऊं नये ह्मणून आह्मीं येथपर्यंत सर्व कारभाराची जोखीम आपले शिरावर घेऊन काम चालविलें होतें; सध्याचे स्थितींत आह्मीं राजीनामा दिल्यापासून राष्ट्राचें हित होत असल्यास राज्यकारभाराचीं सूत्रें सोडून देण्यास आमची कबुली आहे; मात्र कोणत्याही स्थितींत आमरणांत राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरितां झटण्याचा आमचा संकल्प ढळणार नाहीं. हें सरळ व कळकळीचें भाषण ऐकतांच सदस्यांच्या मनोवृत्ति सर्वस्वीं पालटल्या. ऑरेंजच्या स्वदेशप्रीतीबद्दल लोकांची बालंबाल खात्री झाली व हॉलंडच्या लोकसत्ताक राज्याचा तो केवळ प्राण आहे असें जाणून ता. ९ नोवेंबर १५७४ रोजीं भरलेल्या प्रांतिक सभेच्या बैठकींत त्याचे अधिकार कायम करण्यांत आले तेः–राजपुत्र ऑरेंजनें या प्रांतांवर पूर्ण मुखत्यारीनें राज्य करावें; सर्व आरमाराचें आधिपत्य त्याजकडे असावें; आरमाराचा खर्च त्यानें आपल्या मालकीनें करावा; खुष्कीवरही त्याचा पूर्ण अधिकार असावा; सर्व मॅजिस्ट्रेट, सैनिक, व्यापारी मंडळ्या, व सामाजिक संस्था यांनीं ऑरेंजच्या हुकुमाप्रमाणें कर देण्याघेण्याविषयीं व तो सांगेल त्याप्रमाणें शिबंदी ठेवण्याविषयीं शपथा घ्याव्या; मात्र नवे कर बसविण्याचे कामीं, व सरकारी पैसा खर्चाकरितां मागण्याचे कामीं, व राज्यव्यवस्थेंत फेर-फार करण्याचे बाबतींत राजपुत्रानें प्रांतिक सभेच्या विचारावांचून चालूं

नये; तसेंच वरिष्ठ न्यायासनाचे अधिकारी प्रांतिक सभेच्या संमतीवांचून बदलूं नयेत. या शर्तीवर ऑरेंजनें राज्यकारभार करण्याचें पतकरलें. याच बैठकींत सैन्याच्या व राज्याच्या चालू खर्चाकरितां त्यानें सभेकडून महिना पंचेचाळीस हजारांची देणगी मागितली. त्यासंबंधानें बरीच अश्लाघ्य घासघीस करून सरतेशेवटीं सभेनें रक्कम मंजूर केली.

इकडे भिक्षेकऱ्यांशीं तह न केल्यास जर्मनीचें स्वामित्व आपल्या घराण्यांत राहणार नाहीं असें जर्मन संस्थानिक बादशहास धमकी घालूं लागले. स्पेनचा राजा व देशभक्तांचे पुरस्कर्ते या उभय पक्षांच्या मनांतून शांतता व्हावी असें होतें; परंतु कोणताही पक्ष बादविषयक प्रश्नासंबंधीं आपला हट्ट सोडण्यास तयार होईना. तथापि आपल्या घराण्याचें महत्त्व कायम राखण्याकरितां मॅक्सिमीलियन बादशहास दोघांचे दरम्यान मध्यस्थी करणें जरूर पडलें. हॉलंडच्या सभेच्या वतीनें तहनाम्याविषयीं बाटाघाट करण्याकरितां दहा मुखत्यार नेमण्यांत आले; ते सर्व ऑरेंजचे स्नेही होते. स्पॅनिश सरकारचे वकील लिओनिनसप्रभृति चार गृहस्थ होते. ता. ३ मार्च १५७५ रोजीं ब्रेडा येथें वकिलांच्या कामास सुरुवात झाली. राजाच्या वकिलांनीं उलट पक्षाच्या मुखत्यारांस प्रथम त्यांचीं गाऱ्हाणीं काय आहेत तीं लेखी कळविण्याविषयीं सुचविलें. देशभक्तांच्या ठरीव मागण्यांचा मसुदा हॉलंडच्या वकिलांनीं पुढें केला; त्यांत विदेशी सैन्य राष्ट्रांतून काढून नेणें व राष्ट्रसभा बोलावणें या गोष्टी प्रमुखत्वेंकरून उल्लेखिल्या होत्या. सरकारच्या मुखत्यारांनीं, सभेच्या ताब्यांतील सर्व शहरें, किल्ले, कोट, व सर्व तोफखाना व आरमार राजाच्या ताब्यांत दिल्यास, व कॅथोलिक धर्म नेदर्लंडमध्यें कायमचा स्थापन होऊन इतर विधर्मी लोक कांहीं ठराव मुदतींत आपली मालमत्ता घेऊन निघून गेल्यास या मागण्यांचा राजाकडून विचार होईल असें कळविलें. सारांश, देशभक्तांनीं आपला देश व आपला धर्म यांचा त्याग करून परदेशीं निघून जावें असें त्यांचें ह्मणणें होतें. धर्माच्या प्रश्नाचा असा निकाल लागल्यावर राष्ट्रसभा भरविण्याचें प्रयोजनच उरलें नाहीं. सरकारच्या वकिलांनीं आणखी मोठ्या शिताफीनें असें प्रतिपादन केलें कीं, हालंडच्या सभेनें आपलें परदेशी

सैन्य कमी केल्यास सरकार आपलेंही सैन्य परत बोलावील. धर्मप्रश्नाचा कांहीं निकाल लागत नाहींसें पाहून बादशहाचा वकील श्वार्ट्‌झबर्ग स्वदेशीं निघून गेला. राष्ट्रसभा करील ते ठराव अमलांत येतील अशाबद्दल राजाच्या वकिलांनीं खात्री मागितली; उलटपक्षानें राजाविषयीं तोच प्रश्न विचारला. यासंबंधानें उभय पक्षांचीं बरींच अधिकोत्तरें होऊन व एकमेकांवर असमंजसपणा व दुराग्रह यांचा आरोप करून दोन्ही पक्षांचे मुखत्यार आपापल्या वाटेनें निघून गेले.

सन १५७५ च्या एप्रिल महिन्यांत हॉलंड, झीलंड प्रांतांचें एकीकरण करण्याविषयीं सूचना आल्यावरून त्याबद्दल एक वीस कलमांचा लेख तयार करण्यांत आला. त्याचा सारांशः-युद्ध चालू असतां ऑरेंजनें राष्ट्राच्या संरक्षणार्थ सर्व शिबंदीचें व आरमाराचें नियमन करावें; खर्चवेंच आपल्या मुखत्यारीनें करावा; पूर्वापार चालत आलेल्या रूढीप्रमाणें न्यायाधीश व मॅजिस्ट्रेट नेमावे; रयतेच्या वित्तजीवितांचें रक्षण करावें; नवीन धर्माचें रक्षण करावें; व कॅथोलिक धर्म होतां होईल तितका बंद करावा. या लेखावरून त्याला सल्लामसलत देण्याकरितां एक मंत्रीमंडळ असावें असेंही ठरविलें होतें; हें मंडळ केवळ नामरूप होतें. हा लेख दोन्ही प्रांतांच्या सभांनीं मान्य केला. ऑरेंजच्या मनांतून सर्व जनसमूहाची त्याला संमति मिळवावी असें होतें; परंतु व्यापारी मंडळ्या, व लष्करी व मुलकी अंमलदार तो आपला विशिष्ट हक्क आहे असें भांडूं लागल्यावरून ऑरेंजनें आपला विचार सोडून दिला. ता. ४ जून रोजीं हें पहिलें एकीकरण समारंभपूर्वक प्रसिद्ध करण्यांत आलें. ता. ११ जुलै रोजीं ऑरेंजनें राज्यसूत्रें कायद्याप्रमाणें हातीं घेतलीं, त्यापूर्वी त्यानें वरील यादींत कॅथोलिक धर्माचे ठिकाणीं असद्धर्म हे शब्द घालविले.

ऑरेंजची बायको ॲनी ही आपल्या नवऱ्याचा दीर्घद्वेष करूं लागली होती. तिनें आल्व्हाला पत्रें लिहून आपल्या नवऱ्यानें चालविलेल्या भिक्षेकरी युद्धाची थट्टा केली, व आपल्या पोटगीची कांहीं व्यवस्था व्हावी अशी त्याजपाशीं विनंति केली. पुढें तिला वेड लागलें; त्यामुळें ऑरेंजनें तिचा सशास्त्र त्याग केला. ता. १२ जून रोजीं बोर्बोन घराण्यांतील शार्लट नामक सुशील राजस्त्रीशीं त्याचें दुसरें लग्न झालें. या स्त्रीस तिच्या

कॅथोलिक मातापितरांनीं मठांत ठेविलें होतें. तिचा ओढा नवीन धर्माकडे असल्यामुळें ती तेथून पळून गेली. अशा स्थितींत हा लग्नाचा योग जुळून आला. जर्मनींतील संस्थानिक ॲनीशीं घटस्फोट केल्याबद्दल बरेच गरम झाले; व मठांतून पळून गेलेल्या राजकुमारीशीं लग्न करणें हेंही पुष्कळ लोकांच्या मतें फार अश्लाघ्य कर्म होतें. एकंदरींत या नूतन विवाहासंबंधानें लोकांत बराच गवगवा झाला. ऑरेंजला गृहसुखाची फार अवश्यकता होती; त्यामुळें त्यानें या प्रसंगीं लोकापवादास बिलकुल जुमानलें नाहीं.

हॉलंडच्या उत्तर भागांत यावेळीं दुसराच एक निंद्य प्रकार चालला होता. या प्रदेशाचा सुभेदार देशभक्त सानॉय याला सरकारच्या सैन्यास मदत करण्याकरितां हॉलंडच्या शहरांतून एक मोठा कट झाल्याची वार्ता समजली. सानॉयनें लागलींच यमासनाच्या धर्तीवर एक घोर न्यायासन तयार करून त्याजपुढें आठ उनाड लोक या कटाचे माहितगार ह्मणून आणविले; व त्यांस असह्य वेदना देऊन या प्रदेशांतील बड्या बड्या गृहस्थांचें या कटांत अंग असल्याबद्दल त्यांजकडून सानॉयच्या दूतांनीं कबुली घेतली. नंतर या निरपराधी कॅथोलिकधर्मी बड्या लोकांवर कायद्याचा अंमल सुरू झाला. त्यांची कबुली मिळविण्याकरितां त्यांस भोगाव्या लागलेल्या यमयातना शब्दांनीं यथासांग वर्णन होणें शक्य नाहीं. कॉर्नेलिस्झून नामक वृद्ध गृहस्थाचे दोन दिवस सुया, स्क्रू वगैरे बसविलेल्या माच्यावर व इतर प्रकारांनीं सारखे हाल झाल्यामुळें तो मयत झाला; त्यामुळें या यमदूतांस क्रोध येऊन त्यांनीं त्याच्या प्रेताचा शिरच्छेद केला. या गृहस्थाचा मुलगा बापाच्या वेदनास लागलींच वारस झाला. त्याचें शरीर नखशिखांत वांग्याप्रमाणें भाजून व त्याच्या पायावरील कातडें सोलून त्याला प्रथम सहा आठवडे त्यांनीं अंधारकोठडींत ठेवला; नंतर त्यास वेदनागृहांत पुनः आणून व तीक्ष्णप्रहारक माच्यावर निजवून, त्याच्या शरीरावर उंदीरघुशींनीं भरलेला रांजण पालथा ठेवून या यमदूतांनीं वर निखारे ठेवले. आंतील प्राणी अग्नीच्या धगींतून निसटण्याकरितां त्याचीं आंतडीं पोंखपोंखरून खाऊं लागले. त्यांनीं झालेल्या जखमांवर पुनः या राक्षसांनीं निखारे ठेवावे असा क्रम चालला होता. सरतेशेवटीं या हतभागी तरुणानें

या यमदूतांच्या ह्मणण्याप्रमाणें कबुली दिली. त्यानंतर त्याला फांशीं देण्यांत आलें. त्याचें हृदय जिवंतपणीं ओढून काढून त्याच्या तोंडावर फेंकावें, त्याच्या शरीराचे तुकडे करून ते आल्कामार वगैरे शहरांवर नेऊन लावावे असा सानॉयचा हुकूम होता; तो शब्दशः पाळण्यांत आला. बाकीच्या गुन्हेगारांस अटक करून कैदेंत ठेवण्यांत आलें. तेथून त्यांची कांहीं कालानें सुटका झाली. ऑरेंजला हे प्रकार समजतांच त्यानें त्यांचा योग्य बंदोबस्त केला. डीलामार्क, सानॉयप्रभृति विचार-शून्य शिपायांच्या कृत्यामुळें स्वातंत्र्ययज्ञाच्या उज्वल जोतीस दूषण देणें रास्त होणार नाहीं.

ता. १९ जुलै रोजीं ऊडर्वाटरला हीर्गिसनें एकाएकीं वेढा दिला. शहरानें अठरा दिवस झुंज खाल्ली. ता. ७ आगष्ट रोजीं शत्रूंनीं हल्ला करून शहरांत प्रवेश केला. शिबंदीची व शहरवासी लोकांची नेहमीच्या पद्धतीप्रमाणें राळ उडाली. तरवारीचा प्रयोग रक्तपाताचा वीट येईतों-पर्यंत झाल्यावर बायकांचा भर चवळ्यावर शिपाई लोकांत दोन पैशास चार पैशास लिलांव करण्यांत आला व बहुतेक घरांची होळी झाली. थोलन बेट अद्याप स्पॅनिश लोकांच्या ताब्यांत होतें. तेथून बाहेरच्या किनाऱ्यावरील डीव्हलंड व श्रुवेन वगैरे ठिकाणें हस्तगत करून घेण्याचा हीर्गिसनें बरेच दिवस विचार चालविला होता. त्यानें या कामा-करितां बरींच लहानमोठीं जहाजेंही तयार करविलीं होतीं. तो आतां या मोहिमेची रचना करण्याकरितां थोलन बेटावर आला. सकृद्दर्शनीं त्याला हें कर्म फार दुष्कर दिसूं लागलें. कारण या प्रदेशांतील खाड्या व आखातें झीलंडच्या नाकांनीं गजबजून गेलीं होतीं; व त्यांवरील खलाशी फार कुशल, धाडसी व नामांकित होते. परंतु झीलंडमधील कांहीं राष्ट्रशत्रु पुढें येऊन त्यांनीं आपल्या जन्मभूमीच्या हृदयावर घाव घालण्यास स्पॅनिश लोकांस युक्ति सुचवून दिली. या लोकांनीं रेकिसन्सला अशी माहिती दिली कीं, ‘ शेजारच्या फिलिप्सलंडनामक लहान बेटापासून डीव्हलंडपर्यंत उथळ पाण्याचा एक पट्टा आहे; त्यावरून ओहटीच्या वेळीं रात्रीच्या काळोखांत धाडसी लोकांस चालून जातां येईल; डीव्हलंडला पोंहोचल्यावर पुढें श्रुवेनपर्यंतची वाट निमी असून फार सुलभ आहे. ’

या वाटेबद्दल स्वतःची खात्री करून घेऊन रेकिसन्सनें या जलप्रवासाची तयारी केली. जर्मन, वाल्न व स्पॅनिश मिळून तीन हजार शिपाई थोलन येथें जमले. शिवाय दोनशें शिल्पी श्वेनला पोंहोचतांच तेथें तटबंदी करण्याकरितां बरोबर घेण्याचें ठरलें. पृष्ठभागाचें संरक्षण करण्याकरितां थोलन येथें कांहीं घोडेस्वार ठेवून व सुमार दीड हजार सैन्य मॉंड्रेगानच्या हाताखालीं जहाजांवर ठेवून, बाकीचे लोक युलोराच्या आधिपत्याखालीं कपडे काढून ता. २४ सप्टेंबर रोजीं मध्यरात्रीं चंद्रोदय होतांच खाडींत शिरले. प्रत्येक शिपायानें आपल्याबरोबर तीन दिवसांची पोटगी व कांहीं काडतुसें पाठीवर बांधून घेतलीं होतीं. निघते वेळीं रेकिसन्सनें या शूर सैनिकांस त्यांच्या ब्रीदाची आठवण करून देऊन थोडें उत्तेजनपर भाषण केलें. आकाश अभ्राच्छादित होतें व मधून मधून विजा होत होत्या. पाणी गळ्यापर्यंत लागत होतें; देशभक्तांचीं जहाजें वाटेंत पसरलीं होतीं; त्यावरून मधून मधून अंधारांत बंदुकांचे बार होत होते. पाण्यांत पाय चुकून, शत्रूंच्या गोळ्याखालीं व शत्रूंशीं द्वंद्व करण्यांत बरेच लोक दगावले. तथापि सुमार सहा तास चालून सूर्योदयाच्या वेळीं हे लोक व्यवस्थित रीतीनें डीव्हलंड बेटावर येऊन दाखल झाले. शिल्पीलोकांची टोळी निमी पाण्यांत बुडाली व निमी थोलनला परत गेली. डीव्हलंड येथें लोकपक्षाचीं दहा दळें फ्रेंच, स्कॉटिश, व इंग्लिश वगैरे जातींच्या शिपायांचीं होतीं. या शिपायांनीं लाच खाऊन ह्मणा किंवा अन्य कांहीं कारणास्तव ह्मणा, आपल्या सेनापतीचा स्वतःच वध करून व शत्रूच्या सैन्याची फार मोठी संख्या आहे असा पुकारा करून पळ काढला. डीव्हलंड बेट शत्रूच्या हातीं गेलें. थोड्याच अवकाशांत स्पॅनिश लोकांनीं श्वेनबेट काबीज केलें; तेथील प्रांतिक सभेचीं पांच दळें शत्रूची दृष्टादृष्ट होतांच राजधानीचें शहर झीरिक्झी यांजमध्यें लपून बसलीं. स्पॅनिश लोकांनीं या ठिकाणास वेढा दिला. हा वेढा पुढील सालच्या जूनपर्यंत चालला होता. डीव्हलंडच्या अपूर्व मोहिमेचा असा परिणाम झाला कीं, वाल्चरन व झीलंडचा बाकीचा भाग यांजमधील दळणवळण अगदीं बंद झालें. स्पेनला या ठिकाणीं टेकण्यास कांहीं कालपर्यंत जागा मिळाली. ऑरेंज व त्याचा देश अगदीं

निराश्रित झाले. परदेशस्थ राजाची मदत मिळविणें त्यास अवश्य वाटूं लागलें. फ्रान्सच्या नव्या राजानें नेदर्लंडच्या खर्चानें त्यास दोन तीन हजार फ्रेंच लोकांची कुमक देऊं केली. ही कोरडी मदत अर्थातच आभारपूर्वक नाकारावी लागली. तथापि तो ह्मणे, "सर्व जगानें आह्मास सोडलें किंबहुना सर्व जग आमच्या विरुद्ध झालें, तरी आमचें संरक्षण आह्मास केलें पाहिजे. आमचें भांडण न्याय्य आहे अशी आमची खात्री असल्यामुळें ईश्वराच्या कृपाळूपणावर आमचा सर्व भरंवसा आहे."

येथपर्यंत फिलिपच्या स्वामित्वाविषयीं बंडवाल्यांनीं कधींही आक्षेप घेतले नव्हते. आतां दुसरा कोणी बलिष्ठ व न्यायी शासक मिळाल्यास फिलिपची सत्ता झुगारून देणें जरूर भासूं लागलें. जर्मनीनें आपल्या सामंतचक्रांत या राष्ट्राचा अंतर्भाव केल्यास फ्रान्स अगर इंग्लंड येथील राजास नेदर्लंडचें राज्यपद स्वीकारण्याविषयीं विनंति करावयाची नाहीं असा देशभक्तांचा निश्चय होता. जुलै महिन्याच्या प्रारंभीं सरदार व दक्षिण हॉलंडचे मुखत्यार यांनीं राजा जुलमी असून आपल्या प्रजेचा नाश करीत आहे, सबब त्याची सत्ता अमान्य करून दुसरा कोणी नियंता पाहणें जरूर आहे असें ठरविलें. हा ठराव दोन्ही प्रांतांच्या प्रतिनिधि-मंडळास मान्य झाला नाहीं. बंडाची शेवटची पायरी चढण्यास लोक अद्याप तयार झाले नव्हते. वरील सभेनें या प्रश्नाचा विचार करण्याकरितां नऊ वकील ऑरेंजकडे पाठविले. ता. १ आक्टोबर रोजीं ऑरेंजनें स्वतः हा प्रश्न सभेपुढें काढला. या गोष्टीसंबंधानें गांवोगांवचे मतदार व सरदार लोक यांचें व्यक्तिशः मत घेण्याकरितां सभा कांहीं दिवस तहकूब राहिली. पुन्हा डेल्फ येथें सभा भरल्यावेळीं सर्वानुमतें असें ठरलें कीं, राजाचें स्वामित्व अमान्य करून परदेशीय राजाची मदत घ्यावी, या कामीं ऑरेंजनें प्रांतिकसभेच्या विचारानें योग्य दिसेल तो मार्ग स्वीकारावा. याप्रमाणें या दोन प्रांतांनीं आपल्या स्वातंत्र्याचा उच्चार केला. हा निश्चय घेते वेळीं त्यांना पुढील कर्तव्याविषयीं सर्व संशय व अंधार होता. परंतु या ठरावापासूनच पुढें एक नवीन व बलाढ्य लोकसत्ताक राज्य उदयास आलें. या समयीं या लोकांस एवढेंच वाटत होतें कीं, कोणत्या तरी दुसऱ्या राजाच्या आश्रयाखालीं गेल्याशिवाय आपला निभाव लागणार

नाहीं. जर्मनीपासून विशेष आशा दिसेना, फ्रान्समध्यें गृहकलहानें राज्य-व्यवस्थेंत नेहमीं अनिश्चितपणा राहत होता. परंतु इंग्लंडच्या दुटप्पी राणीपेक्षां ऑरेंजचा फ्रान्सकडे विशेष ओढा होता. तथापि इंग्लंडच्या राणीकडे प्रथम वकील पाठविण्याचें प्रांतिकसभेच्या विचारानें कायम ठरलें. फिलिपनें या राणीवर मारेकरी घातले होते, तथापि स्कॉटलंडच्या बाजूनें तिला फिलिपची भीति वाटत होती; व फ्रान्सच्या हातांत हॉलंड, झीलंड प्रांत जाऊं नयेत अशी तिची इच्छा होती. यामुळें तिनें हॉलंड-च्या वकिलांस चाळवण्या दाखविण्याचा क्रम स्वीकारला. प्रांतिकसभेचें मागणें तिला होय ह्मणवेना; तिला फिलिपला दुखविण्याचें धैर्य होईना; नेदर्लंडदेशाची आशा सुटेना. हॉलंडच्या वकिलांनीं कांहीं कर्जाची मागणी केली असतां तिनें उदार होऊन त्यांस आपल्या पैशानें कांहीं नियमित लोक व थोडें दारूसामान इंग्लंडमधून नेण्याची परवानगी दिली. बिनखर्चाचा व कोरडा शिष्टाचार व आपल्या खर्चानें आपल्या देशाचें संरक्षण करण्याची परवानगी घेऊन हॉलंडचे वकील हात हालवीत स्वदेशीं परत आले. नंतर फ्रान्सला पाठविण्याकरितां वकील नेमण्यांत आले.

पैशाच्या महर्घतेमुळें झीरिक्झीच्या वेढ्याचें काम दिरंगाईवर पडलें होतें. रेकिसन्सनें ब्रुसेल्सच्या राष्ट्रसभेपाशीं पैशाची मागणी केली. सभेनें शिपायांचें दुर्वर्तन त्याच्या नजरेस आणून दिलें. रेकिसन्स सभेवर बराच संतापला; परंतु उपाय चालेना. इकडे ऑरेंजही पैशावांचून अगदीं हतवीर्य झाला होता. त्यानें आपला भाऊ जॉन यास कसेंही करून थोडी-बहुत रकम जुळविण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंति केली. परंतु जॉनचाही हात चालेना. शेवटीं तो अगदीं निराश होऊन त्याच्या मनांत एक वेळ अशी सुद्धां कल्पना आली कीं, हॉलंड व झीलंडमधील सर्व बायका, पुरुष व मुलें जहाजांवर घालून कोठें तरी विजन प्रदेशांत वसाहत करण्याकरितां निघून जावें; व समुद्राचे धक्के फोडून आपला देश पुनश्च समुद्राच्या स्वाधीन करावा. रेकिसन्सच्या आकस्मिक मृत्यूनें हे सर्व विचार रहित झाले. झीरिक्झी शहर लौकरच हस्तगत होईल अशी रेकिसन्सला पूर्ण आशा होती. त्यानें स्पेनमधून या कामाकरितां पैशाची कुमक मागविली.

होती. इतक्यांत हार्लेममध्यें त्याच्या शिपायांचें बंड उद्भवलें; त्याचें शमन करण्याकरितां त्यानें शहरवासी लोकांस अयुधें दिलीं. बंडाचा उपशम झाला, परंतु बंडाच्या धास्तीनें ता. १ मार्च १५७६ रोजीं त्याला भयंकर ताप आला व ता. ५ रोजीं वयाचे एकावन्नावे वर्षीं तो मृत्यु पावला.

नेदर्लंडमध्यें येण्यापूर्वी त्यानें एक दोन प्रसंगीं बरेंच शौर्य दाखविलें होतें. तो विशेष नामांकित वीर नव्हता; तथापि नेदर्लंडमधील कांहीं प्रसंगांत त्यानें बरेंच धैर्य व चातुर्य दाखविलें असें ह्मणावें लागेल. हा सामान्य मुत्सद्दी होता. आल्व्हाप्रमाणेंच त्याचा धर्माविषयीं दुराग्रह होता; परंतु आल्व्हाच्या सप्तवार्षिक सत्रांत देश बराच जर्जर झाल्यामुळें रेकिसन्सला आपलें उग्र स्वरूप दाखविण्यास अवकाश मिळाला नाहीं. यमासन या कारकीर्दींत कायम होतेंच; व त्याचा अंमल मधून मधून चालला होता. बंडे सेनासाहिबांच्या मरणानें नेदर्लंडच्या कारभारास लागलेली ओहटी कांहीं कालपर्यंत बंद राहिली.

---

# भाग ११ वा.

## इ. स. १५७६.

नव्या नेमणुका—डेल्फचा संयोग—झीरिक्झी—स्पॅनिशसैन्याचें बंड—निरनिराळ्या प्रांतांचे राजकीय व धार्मिक बाबतींत विचार—ऑरेंजची खटपट—मन्त्रीमंडळास अटक—राष्ट्रपरिषद्—मास्ट्रिच येथील संग्राम—अँट्वर्पचा आणात—घेंटचा संयोग—उत्तरप्रदेश—हबशी गुलाम.

रेकिसन्सचा मृत्यु आकस्मिक झाल्यामुळें त्याला आपल्या मागील व्यवस्था करून ठेवण्यास अवकाश सांपडला नाहीं. राष्ट्राच्या पूर्वापार रूढीप्रमाणें या मृत्युमुळें सर्व राज्यव्यवस्था मंत्रीमंडळावर येऊन पडली. जुन्या सभासदांपैकीं आर्शो, बर्लेमॉन व व्हिग्लियस एवढीच मंडळी हल्लीं शिल्लक राहिली होती. या सभेंत तीन नेदर्लंडचे गृहस्थ व चौथा स्पॅनिश गृहस्थ रोडा यांच्या नेमणुका केल्याचा हुकूम स्पेनमधून ताबड-

तोब येऊन पोंहोचला. रोडावर इतर मंडळींचा कटाक्ष होता. बाकीचे सभासद कॅथोलिक धर्मी होते, तथापि नेदर्लंडच्या राजकीय हक्कांस अनुकूल होते. मॅन्स्फील्डची मुख्य सेनापतीच्या जागीं नेमणूक झाली व ब्रुसेल्स शहरची राज्यव्यवस्था त्याजकडेच सोंपविली होती; त्यामुळें अर्थातच स्पॅनिश सेनानींमध्यें मत्सर व द्वेषभाव उत्पन्न झाला.

रेकिसन्स असा भलत्याच वेळीं मेल्यामुळें राजाला त्याच्याविषयीं फार राग आला. त्याच्या मागून पाठवावयाचा अधिकारी अद्याप ठरला नव्हता. जागेला हक्कदार पुष्कळ होते व प्रत्येक उमेदवारासंबंधानें प्रधान-मंडळांत मतभेद बरेच होते. हॉपर या मतिमंद नेदर्लंडवासी गृहस्थाकडे तद्देशीय राज्यव्यवहाराचीं सूत्रें नांवाचीं होतीं; परंतु त्या व्यवहारासंबंधीं गोष्टींबद्दल त्याला यापूर्वी कधींही राजानें सल्ला विचारला नव्हता; किंवा त्याजकडून कांहीं कामही करून घेतलें नव्हतें. हल्लींच्या प्रसंगीं त्याचा सल्ला घेण्याची बुद्धि राजास झाली; व या विशालबुद्धीच्या गृहस्थानें देशांत सर्वत्र बंडाळी माजली असतां तूर्त सुभेदारीची जागा मोकळीच ठेवावी असा अपूर्व सल्ला दिला. इतर मंडळींनीं निरनिराळ्या गृहस्थांचीं नांवें सुचविलीं; बहुतेक वजनदार प्रधानांनीं ऑस्ट्रियाचा डॉन जॉन याचा नामनिर्देश केला. परंतु फिलिप कालापहरण करूं लागला. त्यावर व्हिग्लियस त्वेषानें ह्मणाला, "राजपुत्र ऑरेंज व त्याचे 'भिक्षेकरी' झोंप घेत नाहींत; या अव्यवस्थेच्या कालांत ते आह्मास कांहीं जबरदस्त धोका देण्याची तजवीज केल्याशिवाय राहणार नाहींत."

राजपुत्र ऑरेंज कधींच झोंप घेत नव्हता; त्यानें या संधीचा फायदा करून घेण्याची शक्य ती तजवीज चालविली होती. त्यानें ब्रुसेल्स व इतर नेदर्लंडमधील शहरें यांतील प्रमुख गृहस्थांशीं पत्रव्यवहार सुरू केला; हॉलंड व झीलंड प्रांतांनीं नवा धर्म स्वीकारिला होता व ते सर्वस्वीं राजपुत्रावर भार टाकून होते; बाकीचे पंधरा प्रांत राजनिष्ठ राहिले होते; व त्यांतील बरेच लोक पुनः कॅथोलिक धर्मांत शिरले. तथापि आल्व्हाचा घोर जुलूम, त्यानंतर रेकिसन्सचा सौम्य जुलूम व स्पॅनिश सैन्याचे अन-न्वित दुराचार यांमुळें सर्व राष्ट्र अगदीं गांजून गेलें होतें व सर्वांचा एकोपा करून तो जुलूम झुगारून देण्यासंबंधानें राष्ट्रांत विचार सुरू झाले होते.

हॉलंड व झीलंड प्रांतांनीं परकीयांस राष्ट्रांतून हांकलून देऊन आपले प्राचीन हक्क पुनः स्थापन केले होते. हॉलंड व झीलंड हा सव्वाशें मैल लांबीचा व चारपासून चाळीस मैलपर्यंत रुंदीचा पट्टा समुद्राच्या केवळ चिमट्यांत आहे. त्यांत एक पुरुष मूठभर शहरांच्या सहाय्यानें एशिया, आफ्रिका व अमेरिका या खंडांच्या बादशहाशीं नऊ वर्षें झगडत होता व शेवटीं त्याला त्यानें पूर्ण जेरीस आणिलें होतें. हॉलंडपैकीं हार्लेम शहर शत्रूच्या हातीं गेल्यामुळें ह्या प्रांताचे दोन तुकडे झाले होते; व राजधानीचें शहर आम्स्टर्डम तर प्रथमपासूनच सरकारच्या बाजूला होतें. समुद्राचे धक्के फोडल्यामुळें राष्ट्रांतील वहीत जमीन समुद्रार्पण होऊन देशाची फार दुःस्थिति झाली होती. हें बुडतें जहाज तारण्याकरितां पुनः या साहसी राष्ट्रानें भांडवल गोळा करण्याचा झपाटा सुरू केला. शेतकीचीं जनावरें नाहींशीं झालीं होतीं; त्यांची वृद्धि करण्याकरितां जनावरें मारण्याविरुद्ध सक्तीचे कायदे करण्यांत आले. ता. २५ एप्रिल १५७६ रोजीं हॉलंड व झीलंड या प्रांतांच्या सभा डेल्फ येथें भरल्या; त्यावेळीं या दोन प्रांतांचा अठरा कलमांचा एक नवा संयोगलेख झाला. या लेखाचा सारांश:—दोन्ही प्रांतांच्या मुखत्यारांनीं वेळोवेळीं एके ठिकाणीं जमावें; उभयतांच्या दरम्यानचे वादविषयक प्रश्न राजपुत्राकडे निर्णयाकरितां पाठवावे; दोन्ही प्रांतांत अव्याहत दळणवळण असावें; शत्रूशीं सामना करण्याच्या कामीं उभयतांनीं एकविचार राखावा; न्यायमनसुबा व कायद्याचा अंमल यथायोग्य चालविण्याविषयीं उभयतांनीं खबरदारी घ्यावी; समाईक खर्चाची वांटणी हिश्शाप्रमाणें करून घ्यावी; नऊ कमिशनर राजपुत्राला सल्ला देण्यासाठीं व कर गोळा करण्याकरितां नेमावे; या संयोगाची मुदत सहा महिन्यांची असावी; व दर सहा महिन्यांनीं उभयतांच्या कबुलीनें हा व्यवहार पुढें चालविण्याची सवड असावी. ऑरेंजला यावेळीं सर्व कारभाराची सत्ता देण्यांत आली. समुद्रावर व खुष्कीवर तो मुख्य सेनाधीश झाला; अंमलदार व सैनिक यांच्या नेमणुका, त्यांस पगार वांटण्याचें काम, शहरांतून शिबंदी ठेवणें व दरोबस्त मुलुखाचें रक्षण करणें वगैरे कामें त्याच्या शिरावर येऊन पडलीं. मुलकी व न्यायखात्यांत नेमणुका करणें, मॅजिस्ट्रेटांच्या वेळोवेळीं अदलाबदली

करणें व सदरहू खात्यांच्या कामावर देखरेख ठेवणें हेंही काम त्याज-कडेच सोंपविण्यांत आलें. धर्माच्या बाबतींत नवीन धर्म चालवून शास्त्र-विरुद्ध धर्मास प्रतिबंध करावा व कोणाच्या धर्ममताबद्दल चिकित्सा अथवा शासन करूं नये असा त्यास हुकूम होता. यावरून स्वराज्यप्रिय उत्तरेकडील शहरांच्या या संयुक्त राज्यव्यवस्थेची मांडणी जरी प्राचीन रिवाजाप्रमाणें प्रजासत्ताक होती, तथापि वस्तुस्थितीच्या दडपणा-मुळें या संधीस बरीच सत्ता राजपुत्रास मिळून तिला अंशतः अनियंत्रित राजसत्तेचें स्वरूप आलें होतें. राजपुत्राकडे या प्रसंगीं कायदे करण्याचा सुद्धां अधिकार बऱ्याच अंशानें आला होता. हे अधिकार त्यास हंगामी मिळाले होते; तथापि ते कायम करणें त्याच्या हातांत होतें; परंतु तो आपल्या कर्तव्यांतच निमग्न होता. राजा काय किंवा सुभेदार काय या शब्दभेदाकडे त्याचें लक्षच पोंहोचलें नाहीं; लोक त्याला "मायबाप हुईल्यम" म्हणत असत, तेवढ्यांतच त्याला पूर्ण समाधान वाटत होतें. राष्ट्राचे जुने राजकीय हक्क व धर्मस्वातंत्र्य हे स्थापन करण्याचा त्याचा संकल्प होता. धर्माच्या बाबतींत सहिष्णुता हें त्याचें मुख्य तत्त्व होतें; त्यामुळें त्याचेच अनुयायी त्याला धर्मभ्रष्ट म्हणूं लागले.

त्याला स्वार्थपर महत्वाकांक्षा बिलकुल नव्हती. त्यानें परमुलुखांतून नेदर्लंडला शासक आणविण्याची खटपट चालविली होती. नेदर्लंडमध्यें चाललेल्या धर्मयुद्धावर सर्व राष्ट्रांचें भावी सुखदुःख अवलंबून होतें; त्यामुळें त्याकडे सर्वांचे डोळे सारखे लागले होते. इंग्लंड व फ्रान्स हीं राष्ट्रें एकमेकांविषयीं मत्सरग्रस्त झालीं होतीं. इंग्लंडच्या प्राटेस्टंट राणीचा नेदर्लंडच्या आपन्न सुधारकांकडे ओढा होता; परंतु राजसत्तेच्या विरुद्ध बंडाला मदत करणें तिला अशास्त्र वाटत होतें; शिवाय नेदर्लंडच्या बंडवाल्यांची पैशाची मागणी येईल अशी तिला सदैव दहशत होती; आणि फ्रान्सचा नेदर्लंडशीं संबंध असणें हेंही तिला सहन होत नव्हतें. म्हणून नेहमीच्या पद्धतीप्रमाणें मानभावीपणाचें व धरसोडीचें वर्तन तिनें सध्याच्या प्रसंगींही ठेविलें. तिनें स्पेनचा राजा व नेदर्लंडमधील अधिकारी यांजकडे वकील पाठवून उभय पक्षांचा सलोखा करण्याची आपण खटपट करीत आहों; त्याचा निकाल लागेपर्यंत देशभक्तांनीं

इतर राष्ट्रांशीं बोलणें सुरू करूं नये असा निरोप पाठविला. ही अर्थांत चाळवणी होती. या सुमारास फ्रान्सच्या राजानें आपल्या नवीनपंथी प्रजेशीं नवा तह करून त्यांस पूर्ण स्वातंत्र्य व हक्क दिले; या तहांत राजपुत्र ऑरेंजचा गौरव करून त्याच्या फ्रान्समधील जहागिरी चालविण्याविषयीं त्यास आश्वासन दिलें होतें. यावरून फ्रान्सचा कल या वेळीं नेदर्लंडला अनुकूल दिसत होता. जर्मनींतील पुष्कळ संस्थानिकांनीं नवीन धर्मतत्त्वांचा आपला मोठेपणा वाढविण्याकडे दुरुपयोग केल्यामुळें, व नवीन मतांचे असंख्य पंथ निघून त्यांनीं एकमेकांचा छळ करण्याचा यत्न चालविल्यामुळें त्या राष्ट्रांत एकच गोंधळ माजला होता; धर्ममतांबद्दल तीव्र अभिमान वरिष्ठ दर्जाच्या लोकांत नाहींसा झाला होता; अर्थांतच नेदर्लंडमधील युद्धाविषयीं त्यांची कळकळ कमी होत चालली. सामान्य लोकांत मात्र उत्कट इच्छा, द्वेष, धर्माभिमान, खरा भाव व चळवळ दिसून येत होतीं; जर्मनीच्या दिशेकडे बंडवाल्यांस अंधारच दिसत होता.

ऑरेंजवर आतां कामाचें, चिन्तेचें व युद्धसंबंधीं खटपटीचें जबरदस्त ओझें येऊन पडलें. शहरांच्या अधिकाऱ्यांशीं पत्रव्यवहार, सर्व प्रांतांना आपल्या पक्षांत घेऊन त्यांस स्पॅनिश सत्तेविरुद्ध बंड करण्याविषयीं उत्तेजन देण्याची खटपट, परराष्ट्रांच्या दरबारांत उघड व गुप्त वकील पाठवून त्यांस वरचेवर माहिती पाठविणें व राष्ट्रांतील प्रमुख लोकांस स्वजनविरोधी पक्ष सोडण्याविषयीं वारंवार आग्रहपूर्वक पत्रें लिहिणें या व्यवसायांत व विवंचनेंत तो रात्रंदिवस निमग्न असे. सन १५७६ च्या उन्हाळ्यांत झीरिक्झी शहर शत्रूच्या कैचींतून सोडविण्याच्या कामांतही तो व्यग्र होता. ता. २५ मे रोजीं रणशूर तांडेल बॉयसोनें एक लहान आरमार बरोबर घेऊन या शहराच्या मुक्ततेचा शेवटचा निकराचा प्रयत्न केला. या खटपटींत देशभक्तांच्या आरमाराचा नाश होऊन खुद्द बॉयसोचा नाश झाला. स्वातंत्र्याच्या अव्वल झटापटींत उदयास आलेल्या नामांकित वीरांत बॉयसोची गणना आहे; हॉलंडच्या जगविख्यात तांडेलांच्या मालिकेंत त्यास अग्रस्थान मिळालें आहे. बॉयसोच्या कुमकेची अशी स्थिति झाल्यामुळें शहरास शरण जाण्यावांचून अन्य उपाय राहिला

नाहीं. मॅंड्रिगाननें शहरांतील शिबंदी फौजेस सामानसुमानासह बाहेर जाण्याची परवानगी दिली. शहरवासी लोकांनीं दोन लक्ष फ्लोरिनची खंडणी देऊन आपले जुने हक्क व सनदा कायम करून घेतल्या.

झीरिक्झी हस्तगत होतांच श्वेन येथील स्पॅनिश व वालून सैन्यांत पगाराच्या बाकीसाठीं भयंकर बंड उद्भवलें. या साहसी सैनिकांनीं राजसेवेंत कोणतेंही अचाट व अमानुष कृत्य करण्याचें बाकी ठेविलें नव्हतें; असें असून त्यांस त्याबद्दल योग्य वेळीं वेतन न मिळाल्यामुळें त्वेष येणें साहजिक होतें. ता. १५ जुलैच्या सुमारास सर्व श्वेन बेटावर हें बंड पसरलें. पोकळ वायदे व सेवाधर्माचा उपदेश यांचा कांहीं उपयोग होईना. बिथरलेल्या लोकांनीं आपलेच अधिकारी अटकेंत ठेविले. त्यांचा राजधानीसभोंवतीं घिरट्या घालून मंत्रीमंडळाकडून आपली बाकी वसूल करून घ्यावी अगर देशांतील एखादें संपत्तिमान् शहर लुटून आपला गुजारा करावा असा बेत होता. त्यांनीं फ्लँडर्झ प्रांतांतील एक शहर लुटून शहरांत बरीच कत्तल केली. ब्रुसेल्स शहरांत एकच गडबड उडाली. लोकांनीं आपल्या बचावाकरितां शस्त्रास्त्रें धारण केलीं; सरकारची फौज बेफाम झाली असल्यामुळें त्यांचा वध करणें बेकायदेशीर नाहीं असा जाहिरनामा अधिकाऱ्यांस प्रसिद्ध करणें भाग पडलें. बंडवाल्या सैन्यास अन्नपाणी सुद्धां मिळूं नये असे सक्तीचे हुकूम सुटले. शहरांतील स्पॅनिश सेनापतींस कोणत्याच पक्षांत थारा मिळेना. प्रधानमंडळाच्या हातून या बंडाचा कांहीं प्रतिकार न झाल्यामुळें त्यांचें तेज अगदीं मावळल्यासारखें झालें. अँट्वर्प शहरांत ग्रॅन्व्हिलचा भाऊ चँपेनी हा मुख्य अधिकारी होता. त्याचा कल प्रजापक्षाकडे होता. किल्ल्यांत डव्हीलाचा अंमल होता. तो उघडपणें बंडास मिळाला नव्हता, तथापि सैन्याविरुद्ध जाहिरनामा त्यानें प्रसिद्ध केला नाहीं. व त्याचेंच अनुकरण चँपेनीनें केलें. फ्लँडर्झ व ब्राबंट प्रांतांच्या बहुतेक शहरांतून हा जाहिरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. जुलै अखेर मार्किस हाव्रे हा वाचाळ व गैरभरंवशाचा सरदार दयाभूत व उदार फिलिप राजाचे खरे हेतू अमलांत आणण्याकरितां स्पेनमधून आला. या गृहस्थाबरोबर राजाची ब्राबंटच्या प्रांतिक सभेस, मंत्री-

मंडळास व इतर सार्वजनिक संस्थांस पत्रें आलीं; त्यांत माद्रिद येथें नेदर्लंडच्या व्याधीकरितां रसायनें तयार होत आहेत, लोकांनीं उतावळेपणा करूं नये असा मजकूर होता. सैन्य बिथरलें होतें; राष्ट्रांत परकीयांविषयीं द्वेष परमावधीस पोंहोचून, सर्व धर्मांचे, धंद्यांचे व दर्ज्यांचे लोक एकविचारानें त्याच्याशीं सामना करण्यास तयार झाले होते; प्रधानमंडळाची आज्ञा कोणी मानीनासे झाले होते; अशा स्थितींत मन्त्रीमंडळावर सर्व कारभार सोंपवून स्पेनमधून सावकाशीनें समाजव्याधीस रसायनें तयार करून पाठविण्याचीं आश्वासनें लिहून पाठविणें केवळ बाष्कळपणाचें द्योतक होतें. ब्राबंटच्या बहुजनसमाजास हें स्पॅनिश सैन्य शल्यच वाटत होतें. सध्याच्या अराजक स्थितींत सर्व लोकांनीं उचल केल्यास स्पॅनिश अंमल व त्याबरोबरच स्पॅनिश सैन्य या दोहोंचाही शेवट लावतां येईल असें या पक्षास वाटूं लागलें. इकडे स्पॅनिश सैन्य अगदीं तुफान झालें होतें; त्यास जर्मन सैन्य लौकरच सामील झालें; डव्हीला व इतर स्पॅनिश लष्करी अंमलदार यांची त्यांस आंतून बरीच सहानुभूति होती. यूरोपांतील व्यापाराचें आद्पीठ अँट्वर्प शहर संपत्ति व सर्व राष्ट्रांतील व्यापाराचा माल यांनीं ओतप्रोत भरलेलें त्यांच्या तावडींत सांपडलें होतें. ब्रुसेल्स शहरचे लोक अनावर होऊन त्यांनीं बिथरलेल्या सैन्यावर हात चालविण्यास सुरवात केली. सैन्यांतील बंडाचा प्रतिकार करण्याच्या मिषानें त्यांनीं स्वतःच सरकाराविरुद्ध बंड चालविलें आहे असा स्पॅनिश अधिकाऱ्यांचा समज होऊं लागला. त्यांनीं निरनिराळ्या जातींचें बरेंच सैन्य गोळा करण्याचा झपाटा चालविला होता. मन्त्रीमंडळापैकीं रोडा या स्पॅनिश गृहस्थानें ब्रुसेल्समधून पळ काढला; इतर सभासद बंडवाल्यांच्या कैचींत सांपडले. रोडानें अँट्वर्प किल्ल्याचा आश्रय घेऊन तेथून स्वतंत्र सुभेदार या नात्यानें आपला हुकूम चालविण्याची खटपट चालविली. सैन्याचें बंड चोहोंकडे पसरलें. डव्हीलानें अँट्वर्प किल्ला आपल्या ताब्यांत ठेवून बंडवाल्या सैन्याशीं उघडपणें व्यवहार सुरू केला. मन्त्रीमंडळानें त्याची कानउघाडणी केली; परंतु अँट्वर्प किल्ल्यांत त्याचा अंमल नीट बसला होता; व मन्त्रीमंडळ ब्रुसेल्स शहरांत अटकेंत होतें; त्यामुळें डव्हीला अगदीं

निर्भय झाला. व्हॅलेन्सिनीज, घेंट, युट्रेक्ट वगैरे ठिकाणच्या किल्ल्यांतून स्पॅनिश सैन्याची नीट स्थापना झाली होती. या सर्व प्रांतांचे अवयव स्पॅनिश सैन्याच्या शृंखलेनें बांधून टाकिले होते व त्याच्या मानेवर परकीयांचा पाय होता. ब्रुसेल्स शहर मात्र अद्याप मोकळें होतें, खेड्यापाड्यांतून व गांवोगांव स्पॅनिश सैन्यानें दंगेधोपे, रस्तेलूट व खून चालविले होते. शेतकरी, शहरवासी व विद्यार्थी यांच्या स्पॅनिश फौजेशीं वारंवार चकमकी होत; त्यांत अर्थातच स्पॅनिश सैन्यास यश मिळत असे. प्राणहिंसा त्या मानानेंच सारखी चालली होती. राष्ट्रांत परकीयांविषयीं तिरस्कार कळसास पोंहोचला, व ही मानेवरील धोंड फेंकून देण्यासंबंधानें सर्वांची एकवाक्यता झाली होती.

हें नवीन उपस्थित झालेलें वादळ पहात ऑरेंज मिडलबर्ग येथें बसला होता. यावेळीं नेदर्लंडपैकीं हॉलंड व झीलंड या प्रांतांची इतर पंधरा प्रांतांपेक्षां फार भिन्न स्थिति होती. या दोन प्रांतांत नवीन धर्म सर्वमान्य होऊन जुन्या धर्मासंबंधानें तिरस्कार उत्पन्न झाला होता. हा दुर्विकार कमी करून सहिष्णुतेचा धडा त्यांस शिकविण्याचे ऑरेंजचे यत्न चालले होते. राजकीय हक्कासंबंधानें या प्रांतांत फार तीव्र अभिमान व जागरूकता वास करीत होतीं. बाकीच्या पंधरा प्रांतांत कॅथोलिक धर्माचें प्राबल्य अद्याप कायम होतें. नवीन धर्माभिमान्यांचा एक बराच मोठा वर्ग झाला होता, परंतु बहुजनसमाज कॅथोलिकधर्मीच होता. ज्या उपायांनीं नवीन धर्माचा उच्छेद चालला होता, त्यांचाच प्रयोग नवीन धर्माची सरशी झाल्यास आपणावर उलट होईल अशी या लोकांस भीति वाटत होती. यांचा राजकीय हक्कासंबंधानें तीव्र अभिमान व सध्याची संधि साधून त्यांचें उज्जीवन करण्याची इच्छा हॉलंड, झीलंडप्रमाणेंच होती. मात्र फिलिपच्या सत्तेखालीं हे हक्क कायम राखणें शक्य नव्हतें हें या लोकांच्या अद्याप लक्षांत आलें नाहीं. या प्रांतांत कांहीं प्राचीन सरदारघराणीं होतीं त्यांस धर्म व राजसत्ता या दोहोंसंबंधानें कांहीं नवीन कल्पना काढणें अगदीं अब्रह्मण्य वाटत होतें. परंतु विजातीय सैन्यासंबंधानें सर्वांची एकच भावना होती. राजसत्तेवर राजकीय हक्कांचा दाब असावा असें मानणारांचा वर्ग बराच मोठा

होता. विजातीय सैन्याविषयीं या सर्वसामान्य द्वेषाचा आधार घेऊन, त्या सैन्यांत नवीन उद्भवलेल्या बंडाच्या साधनानें परकीय अंमल झुगारून देण्यास, परकीय सैन्य हांकलून लावण्यास, जुन्या हक्कांचें पुनरुज्जीवन करण्यास, राष्ट्रसभेच्या द्वारानें जुन्या राजशासनांस धरून सतरा प्रांतांचा संयोग करण्यास, व सर्वांवर एक सुभेदार नेमून राज्यकारभार चालविण्यास व धर्मस्वातंत्र्य स्थापन करण्यास ही संधि अमूल्य होती. तें काम ईश्वरप्रेषित समजून ऑरेंजनें त्याच्या सिद्ध्यर्थ आपले सर्व यत्न चालविले. कॅथोलिक धर्म व राजसत्ता यांविषयीं लोकांचा अभिमान बराच तीव्र होता; त्यास धक्का न लागावा ह्मणून धर्मव्यवस्थेंत अगर राज्यव्यवस्थेंत कोणतेही नवीन फेरफार करण्याचा आपला इरादा नाहीं असें राजपुत्रास वारंवार जाहिर करावें लागत असे. या संधीस त्यानें देशभर सार्वजनिक संस्थांस व निरनिराळ्या प्रमुख व्यक्तींस हजारों पत्रें पाठविलीं. त्यांत कोणाच्याही धर्मकल्पनेस अगर राजभक्तीस यत्किंचित् धक्का न लागूं देतां सध्याच्या प्रसंगीं लोकांच्या क्रोधाग्नींत तेल ओतण्याचा क्रम त्यानें जोरानें चालविला होता. हॉलंडच्या प्रांतिक सभेस त्यानें लिहिलें, "मानेवरून धर्मभ्रष्ट स्पॅनिश जुलुमाचें जूं फेंकून द्या, व स्वातंत्र्य व स्वदेश यांच्या संरक्षणार्थ झगडणारांस येऊन मिळा. आपल्या पूर्वजांनीं घालून दिलेल्या कित्याप्रमाणें आपले जुने कायदे, सांप्रदाय व हक्क कायम राखा. आपल्या मानेवर लुटारू स्पॅनिश लोकांचा व कांहीं राष्ट्रद्रोहकांचा पाय टिकूं देऊं नका; कारण तो तुम्हावर नेहमीचा कलंक राहील. गुरांच्या कळपाप्रमाणें अगर अनाथ झालेल्या गुलामांप्रमाणें आम्हांस आमच्याच जन्मभूमींतून हाकलून लावण्यास आपण या मदान्ध परकीयांस मदत करूं नका." शिवाय त्याचें लोकांस असें सांगणें होतें कीं, "तुम्ही पुरांत उडी टाकिली आहे; तुम्ही स्पॅनिश सैन्य कायद्यानें निषिद्ध ठरविलें आहे; सर्व लोकांस त्यांवर शस्त्र उचलण्यास उत्तेजन दिलें आहे; आतां या समाजयुद्धाच्या भयंकर लाटांतून तुह्मांस कसेंही निभावून गेलें पाहिजे. या वेळीं तुम्ही पाऊल मागें घ्याल तर तुमची अब्रू व प्राण यांचा सर्वस्वीं नाश होईल." या खवळलेल्या समुद्रांतून

पार पडण्यास साहस व ऐक्य हेचें उपाय होते. राष्ट्राचे जुने हक्क व पुरातन राज्यपद्धति कायम राखण्यास संहतीशिवाय दुसरा उपाय नव्हता; आपल्या पितृभूमीचा परकीयांच्या जुलुमापासून बचाव करण्यासाठीं नेदर्लंडच्या लोकांनीं सर्व मतभेद विसरून व एकविचार करून बंधुत्वाच्या नात्यानें वागणें जरूर होतें. हें राष्ट्रीय काम सिद्धीस नेण्यास व प्रथम हॉलंड, झीलंड व इतर प्रांत यांचा संयोग जुळविण्यास हॉलंड व झीलंडच्या वतीनें ऑरेंजनें आपली तत्परता प्रगट केली: "आपला एकमेकांविषयीं भेद व मत्सरभाव विसरून दृढनिश्चयानें व एकविचारानें परशत्रूपासून आपण या देशाचें विमोचन करूं. हातांत हात घालून आपण या राष्ट्रास न्याय व शांतता यांचा लाभ देऊं; या कामाकरितां मी आपला जीव व मालमत्ता तुमचे स्वाधीन करतों," असे त्याचे या वेळचे उद्गार होते. त्यानें वरील आशयाचीं विनंतिपत्रें प्रांतोप्रांतीच्या सभांस पाठविलीं; व हा हेतु साधण्याकरितां या सभांस आपल्या मुखत्यारांची एक स्वतंत्र परिषद् भरविण्याविषयीं सूचना पाठविल्या; सर्व प्रांतांचा संयोग झाल्यावर इतर किरकोळ विषयांचा विचार राष्ट्रसभा करील असें या लेखांत विशेष स्पष्टपणें सुचाविलें होतें. ऑरेंजचें वक्तृत्व व खटपट व्यर्थ गेलीं नाहींत. हिंवाळ्यांत बहुतेक प्रांतांनीं या मोठ्या परिषदेस पाठविण्याकरितां आपापले मुखत्यार नेमिले.

ऑस्ट्रियाचा डॉन जॉन याची सुभेदारीच्या जागीं नेमणूक होऊन तो नेदर्लंडला येण्याकरितां निघाला होता. कायद्यानें बहिष्कृत व तुफान झालेली स्पॅनिश फौज कांहीं गुप्त व दुष्ट हेतू मनांत धरून चोहोंबाजूनें गोळा होत होती. या बिकट प्रश्नाचा निकाल तावडतोब लागावा अशी सर्व नेदर्लंडवासी लोकांची फार उत्कट इच्छा होती. सर्व प्रतीचे व सर्व धंद्यांचे लोक, शिल्पकार व शेतकरी आपापले धंदे सोडून, डोक्यावर शिरस्त्राण व हातांत बंदुका घेऊन युद्धकला शिकण्यास उद्युक्त झाले. लोकांच्या स्पॅनिश फौजेबरोबर वारंवार चकमकी होऊं लागल्या. यांत प्रजापक्षास क्वचित्‌च यश येत असे; तथापि राजसत्तेस विरोध करण्याची बुद्धि दिवसेंदिवस प्रबल होत चालली होती हें यावरून स्पष्ट दिसून येत होतें. जनसमूहाच्या मनाची स्थिति अशी क्षुब्ध झाल्यामुळें निश्चेष्ट

घडामोडीचें ठिकाण होतें. येथील व्यापारी बादशहासारखे ऐषआराम व संपत्ति यांत लोळत होते. हें ख्रिस्ती राष्ट्रांतील सर्वांत संपत्तिमान् शहर यावेळीं नवीन बांधलेल्या मजबूत किल्ल्याच्या माऱ्यांत असून, किल्ल्यांत कायद्यानें बहिष्कृत, युद्धकलेंत तरबेज, द्रव्याच्या नदीमुळें बेफाम व ईश्वर, मनुष्य अगर सैतान यांपैकीं कोणासही न जुमानणाऱ्या अशा बदफैली लोकांची वस्ती होती. डव्हीला हा आतां उघडपणें बंडाचा पुरस्कर्ता झाला. नदीच्या पैलतीरावर एक गोट करून ज्यूलियन रोमेरो राहिला; इतर ठिकाणचें बिथरलेलें सैन्य त्यास येऊन मिळण्याच्या तयारींत होतें. शहरचे लोक मदतीकरितां ओरडत होते. शहरांतील जर्मन जातीच्या सैन्यास आपल्या पक्षास वळविण्याचा डव्हीलानें प्रयत्न चालविला. ता० २९ आक्टोबरच्या रात्रींत व्हान एन्ड व ऑबर्स्टीन या जर्मन सेनानींनीं मद्याच्या धुंदींत डव्हीलाशीं असे करार केले कीं, शहरवासी लोकांचीं शस्त्रें हरण करून, आपण शहरांत डव्हीलाच्या परवानगीवांचून कोणत्याही सैन्यास अवकाश देणार नाहीं. पुढें तीन दिवसांनीं वालून व जर्मन लोकांचें एक मोठें सैन्य ब्रुसेल्सहून अँट्वर्पला रवाना झालें. या सैन्याचा अधिपति हावे होता; सैन्याबरोबर इतरही पुष्कळ अल्पवयी व अविचारी सरदार लोक होते. आर्शोकडे सर्व लष्करी कारभारावर देखरेख करण्याचें काम होतें. हें सैन्य ता० २ नोवेंबरला अँट्वर्पच्या तटाजवळ दाखल झालें; सैन्य युद्धकलेंत निपुण, परंतु गैरभरंवशिक होतें. शहरचा सुभेदार चॅम्पेनी पक्का कॅथोलिक परंतु कट्टा स्पेनशत्रु होता. ही संधि साधून परकीय जुलमाची धोंड मानेवरून फेंकून देण्याचा त्याचा विचार होता; व त्या कार्याकरितां त्यानें ऑरेंजशीं आंतून सूत्र बांधिलें. शहरांत व्हान एन्ड व ऑबर्स्टीन यांच्या हाताखालील सैन्य डळमळत होतें. या सेनाधीशांनीं डव्हीलाशीं केलेले दुष्ट करार कबूल करून त्यांचें परिमार्जन आपल्या वागणुकीनें करण्याचें कबूल केलें; परंतु सैन्य केव्हां काय करील याचा त्यांस भरंवसा लागेना. यामुळें ब्रुसेल्समधून आलेलें जर्मन सैन्य शहरांत घेण्यास चॅम्पेनी पुढेंमागें करूं लागला; शिवाय शहरची बाहेरून नाकेबंदी करण्यांस या सैन्याची अवश्यकता होती. परंतु निरुपायामुळें ता० ३ रोजीं हें सैन्य शहरांत घ्यावें लागलें. नंतर शहरांतील लष्करी

अंमलदारांची मजलस होऊन तींत शहराचें संरक्षण करण्यासाठीं शहर व किल्ला यांचे दरम्यान एक भिंत रचून पलीकडे खंदक खणण्याचें ठरलें. शहरांतील स्त्रीपुरुषांनीं पायेव गैरे खणून एका शिल्पकाराच्या देखरेखीखालीं बांधकाम रचण्यास सुरवात केली. शहरच्या संरक्षणार्थ आलेलें सैन्य उद्धटपणानें श्रीमान् लोकांच्या वाड्यांत राहण्याकरितां जागा मागूं लागलें. त्यांचें धोरण ओळखून पुष्कळ विदेशीय व्यापारी कोटांत जाऊन राहिले. त्याच दिवशीं ऑबर्स्टीनला आपलें वचन पाळण्याबद्दल किल्ल्यांतून निरोप आला. त्याला वाटाण्याच्या अक्षता मिळतांच नवीन तयार होणाऱ्या तटावर तोफांचा भडिमार सुरू झाला. दोन्ही बाजूंस धनद्रव्यें ठेवून भिंतीचा बचाव होईना. त्याच्या आश्रयाखालीं प्राणाचाही बचाव होईना. बांधण्याचें काम अर्थातच बंद पडलें. शहरच्या संरक्षणाचें सर्व काम चँपेनीवर येऊन पडलें; तो रात्रभर या नवीन तटाच्या मागच्या पटांगणांत शहरांत असलेल्या चार तोफा रोखीत होता. ऑबर्स्टीननें चँपेनीस मदत करण्याचे कामीं फार कुचराई आरंभिली होती. या इतिहासप्रसिद्ध दिवशीं शहरावर व आसपास दाट धुकें पसरलें होतें; त्यांतून शत्रू किल्ल्यांत फौज व इतर सामुग्री सांठवीत होते. किल्ल्यांत रोमेरो, व्हार्गस, ऑलिव्हीरा, व्हॅल्डेझ वगैरेंचीं दळें दाखल झालीं. हॉवेनें नवीन तटामागें आपले सहा हजार सैनिक तयार ठेविले. शहराच्या दुसऱ्या बाजूस सहा हजार पायदळ व कांहीं घोडदळ सज्ज उभें होतें. शहरांत ठिकठिकाणीं सैन्याची योजना केली होती. चँपेनी सर्व व्यवस्था घोड्यावरून पाहून आला. किल्ल्याच्या बाजूस उभय पक्षांची एक चकमक उडाली, त्यांत शहरवासी लोकांस यश आलें. मोठ्या लढाईस लौकरच सुरवात व्हावी असा रंग दिसूं लागला. दोन प्रहरच्या पूर्वीं कोटांत हल्ल्याची सर्व तयारी झाली. किल्ल्याच्या बाहेरील पटांगणांत येऊन बंडवाल्यांनीं भाविक धर्मभिरू लोकांप्रमाणें गुढघे टेकून ईश्वराची प्रार्थना केली. तीन हजार स्पॅनिश फौजेनें एका रस्त्यानें व बाकीच्या लोकांनीं उलट बाजूनें शहरांत शिरावें असा संकेत होता. हें सैन्य शहराकडे निघतांच चँपेनीनें आपल्या बाळून सैनिकांस उत्तेजनपर दोन शब्द सांगितले. एका क्षणांत स्पॅनिश सैन्य

वज्राप्रमाणें नवीन तटावर येऊन पडलें. वालून सैन्यानें तें सामर्थ्य पाहतांच आपापल्या जागा सोडून वाट दिसेल तिकडे पळ काढला. चँम्पेनीनें जर्मन सैन्याच्या मदतीनें लढाईचा ओघ बदलण्याची खटपट केली, परंतु ती व्यर्थ गेली. शिवाय शहरवासी लोकांस आत्मसंरक्षणार्थ पुढें येण्याविषयीं उत्तेजन देत चँम्पेनी घोड्यावरून फिरत होता. शहरवासी लोकांनीं व जर्मन सैनिकांनीं पराकाष्ठा केली, परंतु बिघडली घडी पुनः सुधारेना; सैन्याची रचना मोडली; व्यवस्था, एकविचार, लढाईचें एक ठिकाण, अगर कोणाचा हुकूम यांपैकीं कांहीं एक राहिलें नाहीं. व्हान एन्ड आपल्या तुकडीसह शत्रूस जाऊन मिळाला. ऑबर्स्टीनचें सैन्य मात्र प्रसंगीं निमकहलाल राहिलें. लढाईच्या लाटा सर्व शहरभर आदळत होत्या. सराफा, बडा चौक वगैरे ठिकाणीं फरसावरून रक्ताचे पूर वाहूं लागले. शहराच्या दुसऱ्या बाजूस शहरचें घोडदळ होतें; त्याच्यावर स्पॅनिश रिसाल्यानें हल्ला केला. पदातियुद्धाची लाट तेथपर्यंत जाऊन पोंहोचतांच पळत सुटलेल्या वालून लोकांच्या भीतीनें या घोडेस्वारांसही ग्रासिलें; पळत सुटलेले व पाठलाग करणारे स्पॅनिश, वालून, जर्मन, व शहरवासी लोक धडपडत, ओरडत, हत्यार चालवीत, शिव्याशाप देत, इकडून तिकडे फिरत असल्यामुळें शहर खवळलेल्या समुद्राप्रमाणें भासूं लागलें; प्रजापक्षाच्या लोकांनीं भीतीनें नदीतीराकडे धांव घेतली; पुष्कळ लोक धारातीर्थीं मेले, पुष्कळांस घोड्यांच्या पायाखालीं मरण आलें; व बाकी राहिलेल्या लोकांस शत्रूंनीं नदींत रेटून दिलें. चँपेनी मोठ्या शिताफीनें निसटून ऑरेंजला जाऊन मिळाला. हाव्रेही या प्रसंगांतून प्राण घेऊन निसटला. ऑबर्स्टीन एका नावेवर उडी टाकतांना अवजड चिलखतासह पाण्यांत पडल्यामुळें बुडून मेला. शहराच्या मध्यभागीं ग्रामस्थ लोकांनीं घरांचीं दारें मजबूत रीतीनें बंद करून घेऊन खिडक्या वगैरेंतून गोळ्यांचा भडिमार सुरू केला; बंडवाल्यांनीं मशाली, ज्वालक द्रव्यें व आगलावे लोक बरोबर आणिले होतेच. त्यांनीं आपल्या कामास सुरुवात करतांच शहरच्या अतिशय संपत्तिमान व शोभिवंत भागांतील सुमार हजार वाडे, इमारती, व त्यांतील लोक जळून खाक झाले. शहरच्या सभागृहाच्या पिछाडीस बड्या अधिकाऱ्यां-

नीं कांहीं वेळ तरवारी गाजविली. या ठिकाणीं लढणाऱ्या सर्व लोकांचा संहार झाल्यावर विरोधाचा शेवट झाला. बायका, पोरें, वृद्ध व रुग्ण मिळून असंख्य लोक बळी पडले. एकंदर आठ हजार मनुष्यप्राणी या अघोर प्रसंगीं प्राणास मुकले असावेत.

स्पॅनिश लोकांनीं मानवी विकारांचा कांहीं आड पडदा न राखतां आतां केवळ दैत्यस्वरूप धारण केलें. हे सुवर्णप्राप्तीचा दुष्ट हेतु मनांत धरून या ठिकाणीं आले होते. रक्तपात, विषयवासना अगर सूड हे त्यांचे प्रधान उद्देश नव्हते. दंगेधोपे, बलात्कार व हिंसा हीं कामें त्यांनीं कांहीं वेळ तहकूब ठेविलीं. सोन्याकरितां असंख्य मुलें त्यांनीं आयांच्या मांडीवर चिरडून मारलीं; आईबाप मुलांच्या समक्ष सोन्यासाठीं ठार केले; कुमारिका सुवर्णाच्या मोहानें नवऱ्यांच्या डोळ्यां-देखत फटके मारून रक्तांनीं न्हाऊ घातल्या; व्यापारी लोकांच्या संदुका व दुकानांतील मूल्यवान् माल त्यांच्या हातास विशेष श्रम न करितां लागला. खाजगी लोकांची जिनगी हुडकून काढण्यास त्यांना अनेक अघोर कृत्यें करावीं लागलीं; कित्येक वेळ तळघरांत व लग्नमंडपांत शिरून त्यांनीं निरुपद्रवी स्त्रीपुरुषांवर केलेले बलात्कार साद्यन्त वर्णन करणें दुरापास्त आहे.

ता. ५ नोवेंबर रोजीं अँट्वर्प शहर अगदीं उजाड भासूं लागलें. जगांतील अद्भुत चमत्कारांत गणना झालेल्या शहरच्या संगमरवरी सभागृहाची आंतील सर्व मूल्यवान् वस्तूंसह राखरांगोळी झाली. पांचशें याच नमुन्याच्या भव्य इमारती अग्निमुखांत पडल्या. रस्त्यांतून असंख्य लहानमोठ्या माणसांचीं प्रेतें पडलीं होतीं; त्यांस सवडीप्रमाणें धर्मार्थ फंडांतून मूठमाती देण्यांत आली. लुटीचें काम संपल्यावर या यमदूतांनीं दुसरे अनेक अनाचार मनसोक्त चालविले. त्या वेळच्या इतिहासांत त्यांची साद्यंत हकीकत सांपडते; त्यांचा हिशेब ईश्वराच्या घरींच झाला पाहिजे. नेदर्लंडच्या भयोत्पादक इतिहासांत हा संरंभ विशेषच घोर झाला त्याला स्पॅनिश-आपात अशी संज्ञा पडली आहे. या प्रसंगापासून अँट्वर्प शहरचें सर्व वैभव नष्ट होऊन त्याला केवळ कसाईबाजाराचें स्वरूप आलें. सुमार साठ लक्षांच्या किमतीची मिळकत नाश पावली

व तितकीच बंडवाल्यांस मिळाली. पारिसमध्यें बार्थोलोम्यूजयंतीच्या दिवशीं झालेल्या प्राणनाशापेक्षां अधिक संहार यावेळीं अँट्वर्पमध्यें झाला. विदेशी व्यापारी, कॅथोलिक, विमतवादी, प्रॉटेस्टंट सगळे सारखेच रगडले गेले. या समयीं स्पॅनिश लोक फारच थोडे दगावले.

ह्या अनर्थाची बातमी चोहोंकडे पसरतांच सर्व राष्ट्रास कांपरें सुटल्या-सारखें झालें. हें कांपरें त्वेषाचें होतें, भीतीचें नव्हतें. या अघोर प्रसंगामुळें घेंटच्या परिषदेंत हॉलंड, झीलंड व इतर प्रांत यांचें ऐक्य करण्यासंबंधाच्या प्रश्नास विशेष जोर आला. ब्राबंटच्या प्रांतिकसभेनें राष्ट्रसभेस आपल्या दुःखांची काहणी कळवून, लौकरच या गोष्टीचा निर्णय व्हावा अशी विनंति केली. यावेळीं ऑरेंजनेंही राष्ट्रसभेला एक महत्वाचें पत्र पाठविलें. त्यांत "धर्माच्या प्रश्नाचा उल्लेख न करितां, ऐक्य, दृढनिश्चय व सावधगिरी राखण्याविषयीं सदस्यांस आग्रहपूर्वक विज्ञप्ति केली होती. नेदर्लंडमध्यें कटवाल्यांनीं सर्व गडबड उपस्थित केली अशी राजाची समजूत आहे; करितां नव्या व जुन्या पंथांचे धर्माधिकारी, सरदार, सभ्य गृहस्थ, ग्रामस्थ, शेतकरी वगैरे सर्व वर्गाच्या लोकांनीं एक-विचारानें, एका स्वरानें ओरड केली पाहिजे; असें झाल्यानें राजास सुद्धां आपल्या मागण्या नाकबूल करण्याचें धैर्य होणार नाहीं; व अन्य राष्ट्रांचे राजे आपल्याला अनुकूळ होतील," असा त्याच्या लेखाचा भावार्थ होता. यांतच शत्रूशीं व्यवहार करण्यांत सावधगिरी राखण्या-बद्दलही सूचना होत्या. शत्रु फार कावेबाज आहेत; बाहेरून जरी तोंडा-वरून हात फिरविण्याचे यत्न चालले होते, तथापि राजाच्या एकंदर कृतीवरून पुढील कारकीर्दीचें धोरण पूर्वीप्रमाणेंच राहणार असें त्यानें स्पष्ट दाखवून दिलें.

अँट्वर्प शहर सर झालें त्याच दिवशीं घेंटच्या सभेंत सर्व प्रांतांचा संयोग करण्याविषयीं मुखत्यारांचा तह ठरला. त्याचा सारांशः-गत-गोष्टी विसरून सर्व पक्षांच्या लोकांनीं पुढें मित्रभावानें रहावें. सर्वांनीं स्पॅनिश लोकांस देशांतून घालवून देण्यासंबंधानें बेलभंडार उचलले. राष्ट्रसभा ताबडतोब भरविण्याचें ठरलें. धर्मसंबंधाच्या प्रश्नाचा निकाल त्या सभेनें करावा असें ठरलें. नवीन धर्माविरुद्ध वटहुकूम रद्द करण्यांत

आले. हॉलंड व झीलंडमध्यें नवीन धर्म चालविण्याविषयीं ऑरेंज जामीन राहिला. या प्रांतांतील शहरांची व किल्ल्यांची व्यवस्था राष्ट्रसभेनें करावी असें ठरलें. लढाईत पकडलेले लोक सोडून देण्याचें ठरलें व जप्त केलेल्या मिळकती खुल्या झाल्या. धर्माधिकाऱ्यांचीं वतनें परघराण्यांत गेलीं नसल्यास त्यांस परत मिळावीं असें ठरलें. राजपुत्रास मागील दोन मोहिमांत झालेला खर्च भरून यावा किंवा नाहीं याचा निर्णय राष्ट्रसभेच्या विचारावर ठेविला होता. शेवटीं या संयोग-लेखावर सही केल्यावांचून कोणत्याही प्रांतास त्याचा फायदा मिळूं नये असा ठराव त्यांत नमूद केला होता. या लेखावर प्रतिनिधींच्या सह्या ता. ८ नोवेंबरला झाल्या. हा लेख राजपुत्राच्या कारस्थानाचा अपूर्व मासला होता. त्याच्या योगानें दोन प्रांतांत नवीन धर्म कायम झाला; व पंधरा प्रांतांत खाजगी रीतीनें त्या धर्माप्रमाणें आचरण करण्यास कायद्याची अनुज्ञा मिळाली. धर्मसंशोधन बंद झालें; परकीयांस घालवून देण्याचे कामीं सर्व राष्ट्राचें एकीकरण झालें. हा तह घेंटच्या सभेंत मंजूर झाला असें समजतांच या महापुरुषानें त्यास सर्व जनसमूहाची पसंती मिळवावी असें सुचविलें; ही पसंती आपोआप लोकांनीं या प्रसंगीं मोठे महोत्सव करून व्यक्त केली. याच संधीस स्पॅनिश लोकांनीं उत्तर प्रदेशांत सर केलेला मुलुख त्यांस बंडवाल्यांस सोडून द्यावा लागला. मॉंड्रेगानचे शिपाई त्यास सोडून गेल्यामुळें झीरिक्झी शत्रूच्या हातांत पडले; त्याबरोबरच सर्व शूवेनेवेट व थोलनशिवाय सर्व झीलंड प्रदेश राजपुत्राच्या नायब सेनापतींनें परत मिळविला. अँट्वर्पच्या कत्तलेच्या आधल्या दिवशीं एक शिलेदार बरोबर एक हबशी गुलाम घेऊन लुक्सेंबर येथें दाखल झाला. हा हबशी गुलाम नवा सुभेदार डॉन जॉन, बादशहाचा मुलगा, ग्रानाडाचा जेता, व लेपांटोच्या रणभूमीवर पराक्रम गाजविलेला महावीर होता.

---

# भाग १२ वा.

## इ. स. १५७६-७७.

### ऑस्ट्रियाचा डॉन जॉन (ज. १५४५ : मृ. १५७८)

पूर्ववृत्त-प्रथमची वाटाघाट-ब्रुसेल्स व युट्रेक्ट येथील संयोग-शाश्वतशासन-संधिक्रम-स्पॅनिशसैन्याची रवानगी-राजधानीप्रवेश-पुन्हा तहाचीं बोलणीं-नेमूर किल्ल्यांतील नाटक-जर्मन सैन्याशीं मसलती-राष्ट्रसभेस प्रोत्साहन-अँट्वर्प किल्ल्याची प्राप्ति-जर्मनसैन्याची व जॉनची फजिती व दैन्य.

डॉन जॉनचें वय हल्लीं बत्तीस वर्षांचें होतें. तो चार्लस बादशहास एका परटिणीपासून झाला होता; त्याची आई फार दुर्वृत्त व तामसी होती. तिला घेंट शहरीं आल्व्हाच्या नजरेखालीं ठेविलें होतें; परंतु राक्षसकर्म्या आल्व्हाचीसुद्धां तिच्यापुढें मात्रा चालेना. शेवटीं डॉन जॉन आल्यावर तिला त्यानें अन्य देशांत जाऊन राहण्यास भाग पाडलें. त्या रागाच्या धुंदींत तिनें डॉन जॉन बादशहाच्या पोटचा नव्हे असा ध्वनि काढला. या गोष्टीच्या सत्यासत्यतेबद्दल जास्त खात्रीलायख पुरावा आणणें शक्य नाहीं. वयाच्या चवदाव्या वर्षी त्याचें शिक्षण युवराज कॉर्लास व राज्ञी पार्माचा मुलगा अलेक्झँडर फार्नीज यांजबरोबर सुरू झालें. अलेक्झँडर याच्या बुद्धिमत्तेची तत्कालीन लेखांत तारीफ आहे; तथापि डॉन जॉनचें त्याच्याहीवर वर्चस्व असे असें दिसून येतें. त्यानें फिलिपची मर्जी संपादन करून वयाच्या तेविसाव्या वर्षी ग्रानाडाच्या मोहिमेंत स्पॅनिश सैन्याचें स्वामित्व मिळविलें. या युद्धांत त्यानें पराक्रम मोठा गाजविला परंतु हबशी लोकांस फार क्रूरपणानें वागविलें. पुढें वेनिस, स्पेन, रोम, या संयुक्त राजांच्या वतीनें महंमदी धर्माचा चांद खालीं पाडून ख्रिस्ती धर्माचें क्रूस स्थापन करण्याची कामगिरी त्याजकडे आली. लिपांटोच्या आखातांत त्यानें तुर्क लोकांचा पूर्ण पराभव करून त्यांचीं अडीचशें जहाजें बुडविलीं (स. १५७१); सुमार पंचवीस तीस हजार महंमदीय लोक या भूमीवर बळी पडले; व सुमार दहा हजार ख्रिस्ती लोक प्राणास मुकले. या जयामुळें पुष्कळ ख्रिस्ती लोकांची मुसलमानांच्या

कारागृहांतून मुक्तता झाली, व डॉन जॉनची दिगन्त कीर्ति झाली. डॉन जॉननें या लढाईनंतर ट्यूनिस येथें आपली स्वतंत्र गादी स्थापन करण्याचा घाट घातला. फिलिपला या कृत्यापासून भय उत्पन्न होऊन त्यानें डॉन जॉनचे बेत हाणून पाडले. नंतर या शिलेदारानें स्कॉटलंड-कडे आपली दृष्टि फेंकली. तेथें स्कॉटलंडची राज्ञी मेरी कारागृहांत झुरत पडली होती. तिची मुक्तता करून इंग्लंडच्या इलिजाबेथ राणीचें राज्य बळकावण्याच्या कल्पना त्याच्या डोक्यांत घोळूं लागल्या. इतक्यांत नेदर्लंडच्या सुभेदारीच्या जागेवर आपली नेमणूक झाल्याची वार्ता त्याला इतालींत असतांना समजली. नेदर्लंडांतील क्षुद्र बडबड बंद करून तेथील नामांकित स्पॅनिश सैन्यासह आपला इंग्लंडच्या गादी-विषयीचा बेत तडीस नेण्याचा त्यानें विचार केला. नंतर तो स्पेनमध्यें गेला; तेथें राजाची आज्ञा घेऊन तो गुलामाच्या वेषानें फ्रान्स ओलांडून नेदर्लंडच्या सरहद्दीवर दाखल झाला. ता. ३ नोव्हेंबर रोजीं लुक्सेंबर येथें येऊन पोंहोचल्यावर त्यानें आपलें सुंदर शरीर दरबारी पोषाकांत लोकांपुढें व्यक्त केलें. त्याचे अवयव सप्रमाण, डोळे नीलवर्ण व पाणीदार, व कुरळे केस गंडस्थळावर येऊन पडलेले अशी मोहक आकृति होती. ख्रिस्तीधर्माच्या कैवाऱ्यांपैकीं हा शेवटचा पुराणकालीन वीर होता. परंतु राज्यपदप्राप्तीच्या स्वार्थपर कल्पनांनीं त्याचें मन नेहमीं चंचल, विकारवश व अस्वस्थ असे. त्याचें बाह्यस्वरूप दिपविणारें होतें. परंतु ज्या खऱ्या दैदीप्यमान महापुरुषाशीं त्याचा आतां संबंध यावयाचा होता, त्याच्यापुढें हा सर्व बाह्य देखावा फिका होता. इुइल्यम शरीरानें कृश, चेहेऱ्यांत फिकट, पोषाकांत अगदीं साधा, काळजीनें टक्कल पडलेला असून वयाच्या त्रेचाळिसाव्या वर्षींच अगदीं म्हातारा दिसूं लागला होता. तथापि घरीं चालून आलेलें राज्यपद सोडून केवळ परमार्थबुद्धीनें आपल्या देशबांधवांच्या उद्धारार्थ गत्रंदिवस दीक्षा घेऊन बसलेल्या या महापुरुषापुढें एका नाटकी व पोषाकी शिपायाचें काय तेज पडणार? स्पेनमधून निघतेवेळीं राजानें त्यास उपदेश केला; त्याचें सार इतकेंच कीं लोकांची कोणतीही मागणी कबूल न करितां त्यांचें सांत्वन करावें. धर्मसंशोधन, राजाची अनियंत्रित सत्ता,

व कॅथोलिकधर्माशिवाय इतर धर्मांस बहिष्कार कायम ठेवून चार्लस बादशहाच्या वेळची लोकस्थिति घडवून आणावी. मूळ राष्ट्रांत स्थिर-स्थावर करण्यास सुभेदारीच्या जागीं या संधीस या नामांकित वीराची व विशेषतः दासीपुत्राची योजना फार विघातक होती. त्यांतून त्याला जे विरोधी हुकूम मिळाले होते त्यांच्यायोगानें ही गोष्ट घडवून आणणें असंभवनीय होतें. डॉन जॉनच्या मनांत आत्मविषयक निराळेच बेत घोळत होते. व ईश्वरी संकेत असा कीं याच सुमारास घेंटचा तह सर्वानुमतें पसंत ठरला होता.

डॉन जॉनच्या आगमनानें राजपुत्राच्या व्यवसायास बऱ्याच अंशानें अडथळा येण्याचा संभव होता. राष्ट्रांतील कॅथोलिक अधिकारी, अर्धवट पुढारी व राजानुग्रहलुब्ध मंडळी उलट खातील, व घेंट येथें ठरलेल्या तहास आपल्या हातानें हरताळ लावतील, अशी ऑरेंजला भीति वाटत होती. धर्मच्छल बंद करण्याचा यत्न निष्फल होऊन धर्मस्वातंत्र्याचें बीं पुन्हा खणून निघण्याचा संभव होता. परंतु या विजयश्रीनें फुगलेल्या सुभेदारास खेळवून, आपल्याच हातानें विणलेल्या जाळ्यांत धरून त्याचा नाश करण्याचें खोल कारस्थान नेदर्लंडच्या रक्षणकर्त्यानें वेळींच सुरू केलें होतें. राजपुत्रानें प्रस्तुत प्रसंगीं राष्ट्रसभेस पुढील धोरणासंबंधानें एक जरूरीची यादी लिहिली. राजानें जबरदस्तीनें आपला हेतु सिद्धीस जात नाहीं असें पाहून तो कपटानें शेवटास नेण्याकरितां नवीन सुभेदाराची योजना केली आहे; नवा सुभेदार लुक्सेंबर येथें दाखल होतांच हत्यारें खालीं ठेवावीं किंवा आपल्या सुरक्षितपणाबद्दल ओलीस पाठवावे अशी उद्धट व मायावीपणाची मागणी करीत आहे: डॉन जॉनच्या मोहक स्वरूपास भुलून त्याच्यावर आपण विश्वास ठेवला तर तोच पुढें आपल्या मानेवर सुरा चढवील; साधल्यास आपणच डॉन जॉनला पकडून कैदेंत ठेवावें, म्हणजे त्याला सोडविण्याकरितां राजा आपले हक्क कबूल करील; वगैरे धाडसी परंतु पोक्त मजकूर या लेखांत होता. शिवाय सभेस अँट्वर्प येथें घडलेल्या प्रकारांची आठवण करून देऊन, सर्वांची या अमदानींत तीच गति आहे; लहान मुलांप्रमाणें पारधी ज्या पक्ष्यावर डोळा असेल त्यास शीळ घालून चुचकारतात; करितां आपलें सैन्

कायम राखून डॉन जॉनला प्रथम विदेशी सैन्य देशांतून बाहेर पाठवि-ण्यास भाग पाडलें पाहिजे; राष्ट्राचे जुने हक्क कायम राखण्याविषयीं त्याजकडून शपथा घेतल्या पाहिजेत; सर्व कारभार राष्ट्रसभेच्या हुकुमानें चालला पाहिजे, वगैरे सूचना यांत स्पष्टपणें केल्या होत्या. सर्वांत महत्वाची गोष्ट ह्मणजे घेंटचा तह चालविणें ही होती. यासंबंधानें सर्वांची एक-वाक्यता झाली होतीच.

राष्ट्रसभेच्या मागण्या कबूल केल्याशिवाय नेमूर शहरांत प्रवेश करण्या-स सुभेदारसाहेबांस परवानगी मिळेना. या मागण्यांची समक्ष सुनावणी करण्याकरितां राष्ट्रसभेचे मुखत्यार लुक्सेंबर येथें येऊन पोंहोचले. या मुखत्यारांच्या भाषणांत स्पॅनिश राज्यासंबंधीं व खुद्द राजासंबंधीं अनादर-बुद्धि व तिरस्कार यांचा प्रथमपासून आविर्भाव होऊं लागल्यामुळें डॉन जॉन रागानें त्यांच्यावर चवताळून गेला. जवळच्या लोकांनीं मध्यस्थ होऊन ही कलागत मिटविली. ता. ६ दिसेंबर रोजीं या मुखत्यारांनीं आपल्या मागण्यांचा एक आठ कलमांचा खर्डा सुभेदारापुढें हजर केला. त्यांत खुष्कीनें किंवा जलमार्गानें सैन्याची रवानगी स्पेनला करावी; कैद्यांची मुक्तता करावी; घेंटचा तह मान्य करावा; सरसकट माफीचा हुकूम प्रसिद्ध करावा; राष्ट्रसभा भरवावी; व जुन्या सनदा व कायदे चालविण्याविषयीं डॉन जॉननें शपथ घ्यावी वगैरे मागण्या केल्या होत्या. या मागण्या कबूल झाल्यास राष्ट्रसभेनें सुभेदाराची सत्ता चाल-विण्याचें, कॅथोलिकधर्म व राजाची आज्ञा पाळण्याचें व आपलें विदेशी सैन्य घालवून राजाच्या तैनातीस नेदर्लंडवासी लोकांची पलटण देण्याचें आश्वासन दिलें. ह्या खर्ड्याची वाटाघाट करण्याकरितां त्यांत शेवटीं पंधरा दिवसांची मुदत मागितली होती.

सैन्याची रवानगी व घेंटचा तह या मागण्या प्रधान होत्या. प्रजापक्षाचें विदेशी सैन्य परत गेल्यावांचून स्पॅनिश सैन्य परत पाठविण्यास डॉन जॉन कबूल नव्हता. घेंटच्या तहासंबंधीं त्याचें असें ह्मणणें पडलें कीं, कॅथोलिकधर्म व राजसत्ता कायम राखण्याबद्दल आपणास खात्री पट-ल्यास सर्व प्रांतांचा समावेश होईल असा सामान्य तह करण्यास आपली हरकत राहणार नाहीं. या दोन प्रश्नांचा निकाल लागल्यावर

बाकीच्या मागण्या कबूल करण्याचा सुभेदाराचा कल दिसला. सैन्य समुद्रमार्गानें पाठविण्याविषयीं डॉन जॉनचा हट्ट दिसल्यामुळें त्या गोष्टीचा प्रजापक्षास संशय येऊन त्यांनीं तें खुष्कीच्या मार्गानेंच पाठविण्याविषयीं विशेष आग्रह धरला. डिसेंबर महिन्यांत लुव्हेनच्या विद्यापीठांतील धर्मशास्त्रज्ञांकडून घेंटचा तह कॅथोलिकधर्माला कोणत्याही प्रकारें प्रतिकूल नाहीं असा अभिप्राय राष्ट्रसभेनें आणवून ठेविला. मध्यंतरीं सन १५७७ च्या जानेवारी महिन्यांत ब्रुसेल्सचा संयोगलेख अस्तित्वांत आल्यामुळें घेंटच्या तहनाम्यास बरेंच पुष्टीकरण मिळालें. त्याचें मुख्य धोरण असें होतें कीं, स्पॅनिश लोकांस देशांतून हाकलून लावून घेंटचा तह अमलांत आणावा, कॅथोलिकधर्म व राजसत्ता चालवावी, व राष्ट्राचें व त्यांतील पुरातन राज्यव्यवस्थेचें संस्थापन करावें. प्रथम या लेखावर गर्ट्रूडचा मठाधीश, लालेन, बॉसु, चँपेनी वगैरे आठ बड्या लोकांच्या सह्या पडल्या; परंतु या कागदावर जनसमूहाच्या सह्या घेण्याचें ठरल्यावरून राष्ट्रांतील सर्व श्रीमान् व सभ्य लोकांची नामावली या लेखाखालीं नमूद झाली. लुक्सेंबरशिवाय इतर सर्व ठिकाणीं या दस्तावर व त्याच्या नकलेवर अगणित दुहेरी सह्या पडल्या. नकल दप्तरांत दाखल्याकरितां ठेवावयाची होती. याप्रमाणें या लेखास सर्व राष्ट्राची व्यक्तिशः मंजुरी मिळाली. फ्रीजलंड, ग्रोनिंजन वगैरे ठिकाणीं क्रांति होऊन हे प्रांत राष्ट्रपक्षास मिळाले होते; व त्यावर स. डी व्हिलीची योजना झाली होती. या व इतर उत्तरेकडील नवीनधर्मी प्रांतांत व त्याचप्रमाणें दक्षिणेकडील कॅथोलिक प्रांतांत लोकांनीं या नवीन संयोगाचा स्वीकार केला. सध्यां सर्व प्रांतांची एकी दाखवून सुभेदारास भेवडावण्याचा कार्यभाग या लेखानें झाला; परंतु कॅथोलिक धर्मास फाजील महत्व देणारा हा लेख लौकरच रद्द होऊन यूट्रेक्ट येथें नवा तह झाला. या लेखावरून प्रॉटेस्टंट व स्वराज्यप्रिय प्रांत, कॅथोलिक व बादशाही सत्तेखालच्या प्रांतांपासून कायमचे तुटक झाले. या नव्या संयोगाचा मुख्य हेतु परकीयांच्या पायाचा विटाळ आपल्या देशास न लागूं देण्यापुरताच होता. नव्या सुभेदाराशीं पुन्हा हाय येथें बोलणीं सुरू झालीं. ब्रुसेल्स-संयोगाचे बरेच उत्पादक या ठिकाणीं राष्ट्रसभेचे मुख

त्यार होऊन आले होते. त्यांचें वर्तन फार उद्धटपणाचें व दुराग्रहाचें दिसल्यामुळें उभय पक्षांत प्रारंभापासून शुष्क शब्दवाद व कलह वारंवार होऊं लागले. घेंटचा तह मान्य करणें व सैन्याची खुष्कीच्या मार्गानें रवानगी करणें हेच पुन्हा वादाचे प्रश्न होते. यासंबंधानें जॉननें एक सत्तावीस कलमांचा खर्डा त्यांच्यापुढें मांडिला. त्यांत वादाच्या मुख्य विषयासंबंधानें धर्मशास्त्रज्ञांच्या मतांवर हवाला देऊन इतर विषयांवर उगीच भाकड शब्दविस्तार केला होता. अखेर डॉन जॉनला घेंटच्या तहाविषयीं स्पष्टपणें नकार उच्चारावा लागला; तसेंच व्हान ब्यूरेनला बंधमुक्त करतां येत नाहीं असें त्यानें साफ बोलून दाखविलें. त्यावरून या बैठकींत मोठा भयंकर वाद सुरू झाला. जॉन धमकीच्या व शासन करण्याच्या गोष्टी बोलूं लागला. त्यावरून दोन्ही बाजूचे लोक हातघाईवर आले. अशा व्यापारांत दिवस गुदरला. रात्रौ सुभेदारसाहेबांकडून वकिलांस मुद्दाम चिठ्ठी आली; त्यांतील मजकूर असाच संदिग्ध व त्रास उत्पन्न करण्यासारखा होता. प्रातःकाळीं प्रजेचे वकील घोड्यावर बसून ब्रुसेल्सला निघण्याच्या वेळीं जॉनचा पुन्हा निरोप आला; त्यावरून घेंटचा तह मान्य करण्याचा त्याचा अभिप्राय दिसून आला; नंतर हे वकील त्याला भेटण्याकरितां गेले. या भेटींत डॉन जॉनची वागणूक फार सौम्य व प्रेमळ होती. मात्र सैन्याची जलमार्गानें रवानगी करण्याचा आग्रह तो कांहीं केल्या सोडीना. इतक्यांत जर्मनीच्या नवीन बादशहाचे वकील या शिष्टाईच्या सर्व प्रसंगीं हजर होते, त्यांनीं डॉन जॉनची समजूत काढिली; व ता. १२ व १७ फेब्रुवारी रोजीं अनुक्रमें मार्च एन फॅमिन व ब्रुसेल्स येथें शाश्वतशासन नामक तहनाम्यावर सह्या पडल्या. हा लेख राजाच्या नांवानें प्रसिद्ध झाला. त्यावरून धर्मशास्त्री व लुव्हेनच्या विद्यापीठांतील पंडित यांनीं घेंटच्या तहांत कॅथोलिकधर्म अगर राजसत्ता यांस बाधक करार नाहींत असा स्पष्ट अभिप्राय दिल्यावरून तो लेख मान्य करण्यांत आला; स्पॅनिश सैन्याची चाळीस दिवसांत स्थलमार्गानें पाठवणी करण्याचें अभिवचन मिळालें; जर्मन सैन्याच्या पगाराची तजवीज होतांच त्यांचीही बोळवण करण्याचा संकेत ठरला; कैद्यांची सरसकट मुक्तता झाली; मात्र राष्ट्र-

सभेच्या ठरावांअन्वयें राजपुत्र ऑरेंज वागूं लागेपर्यंत त्याचा मुलगा व्हान ब्यूरेन याची मुक्तता होणार नाहीं असें कळविण्यांत आलें. नेदर्लंडचे सर्व हक्क, संस्था, व राज्यपद्धती पाळण्याचें आश्वासन मिळालें. या लेखावरून राष्ट्रसभेस कॅथोलिकधर्माचा प्रतिपाल करण्याची शपथ घ्यावी लागली व आपल्या सैन्यास फाटा देण्याचा करार करावा लागला. सरकारच्या विदेशी सैन्याची रवानगी होतांच डॉन जॉनचा हुकूम चालविण्याचें प्रजेच्या मुखत्यारांनीं कबूल केलें. हें शासन राजानें कांहीं दिवसांनीं नेदर्लंडास खलिता पाठवून व माद्रिद येथें त्याच भावार्थाचा जाहिरनामा प्रगट करून कायम केलें. याप्रमाणें क्रमाक्रमानें प्रजेच्या सर्व मागण्या डॉन जॉनला कबूल कराव्या लागल्या. घेंटचा तह कॅथोलिकधर्म स्वतंत्रपणें चालण्यास व अनियन्त्रित राजसत्तेस अनुकूल आहे असा पंडितांनीं अभिप्राय दिला होता खरा; परंतु इतर धर्मपंथांविरुद्ध मागील व या कारकीर्दींत प्रसिद्ध झालेले हुकूम रद्द करून व राजपुत्राला हॉलंड, झीलंड प्रांतांचा सुभेदार कायम करून या दोन गोष्टी कशा साध्य होणार याबद्दल जॉनला मोठा संशय होता.

या भराभर एकामागून एक दिलेल्या सवलती पाहून राजपुत्र अगदीं गोंधळून गेला. डॉन जॉनची इतकी तयारी त्याला समजली असती, तर त्यानें मागण्याच्या पारड्यांत जास्ती जड पदार्थ घातले असते. शाश्वत शासनाच्या अस्सल मसुद्यावर सह्या करण्यापूर्वींच ऑरेंजच्या मुखत्यारांनीं अगोदर त्याचा अभिप्राय मागविला. इतर वकिलांनीं मात्र त्याला मागें ठेवून प्रथमपासून आपल्या मनाप्रमाणें हा करार घडवून आणण्याबद्दल गडबड चालविली होती. ऑरेंजला डॉन जॉन हा आल्वा व फिलिपप्रमाणेंच दुष्ट, कपटी, मानभावी व भोंदू आहे असें कळून चुकलें होतें; त्यांतून राजा, नवीन सुभेदार व रोडा यांचीं एकंदर पंचवीस पत्रें पकडून त्यांचें पूर्ण मनन व पृथक्करण केल्यापासून त्याची डॉन जॉनच्या मायावीपणाबद्दल खात्री झाली होती. याच संधीस व्हार्गस वगैरे प्रमुख लोकांचींही पत्रें सांपडलीं; त्यावरून देशांतील किल्ले व मजबूत ठाणीं हस्तगत करून सर्व राष्ट्रास दीन करून सोडण्याचा विचार चालल्याचें दिसून येत होतें. त्यामुळें तो वारंवार राष्ट्रसभेस सावध राहण्याविषयीं

लिहीत असे. हा नवीन करार करण्यांत त्याच्या मुखत्यारांची घाई त्यास पसंत वाटली नाहीं. शिवाय घेंटच्या तहाअन्वयें राष्ट्रसभेनें कोणत्याही लेखांत राजपुत्राच्या विचारावांचून गुंतणें गैरविश्वासाचें काम होतें. राष्ट्रांतील मजबूत ठाणीं जुलमी सत्तेच्या हातांत देणें त्यास आपली मान वाघाच्या जबड्यांत देण्याप्रमाणें वाटूं लागलें. घेंटचा तह कॅथोलिक-धर्म व अनियंत्रित राजसत्ता यांस अनुकूल आहे अशा समजुती-वर मान्य करण्यांत आला होता; परंतु तो दोन्हीस पर्यायानें प्रतिकूल आहे असें अनुभवानें समजल्यावर पंडितांच्या मतास कितपत मान मिळेल याबद्दल संशय होता. एवंच स्वराज्य व धर्मस्वातंत्र्य यांच्या स्थापनार्थ राजपुत्रानें घेंट येथें केलेलें एकीकरण बहुतेक लयास गेलें.

डॉन जॉनविषयीं ऑरेंजच्या मनांत पक्का संशय आला होता; राजा-विषयीं त्याच्या मनांत पूर्ण तिरस्कार बाणला होता; नेदर्लंडच्या सरदारा-विषयीं त्याला बिलकुल भरंवसा नव्हता; हा नवीन तह त्याच्या विचारा-वांचून झाला होता; व लोकांविषयीं त्याला पूर्ण कळकळ वाटत होती; त्यामुळें त्यानें हें शाश्वतशासन मान्य करावयाचें नाहीं असें आपलें धोरण ठेवलें. त्यानें तें हॉलंड व झीलंड प्रांतांत प्रसिद्ध केलें नाहीं; व लोकांच्या मनाचा अंदाज घेण्याकरितां या प्रांतांच्या सभेपुढें कांहीं प्रश्न मांडले. त्यांपैकीं एका प्रश्नांत मार्मिकपणानें असें विचारलें होतें कीं, "आपल्या दुसऱ्या सर्व मागण्या कबूल झाल्या, तर केवळ धर्मस्वातंत्र्या-करितां तुम्ही आपले जीव हातावर घेऊन लढाल किंवा नाहीं ?" त्यावर बराच मौजेचा वाद होऊन सभेचें या प्रश्नास अनुकूल उत्तर मिळालें. राष्ट्रसभेनें नवीन तहासंबंधीं ऑरेंजचा अभिप्राय व त्याची त्याला मंजुरी मागितल्यावरून ऑरेंजनें हॉलंड, झीलंडच्या वतीनें तीस एक लांबलचक जबाब पाठविला. त्यांत या नव्या कराराविरुद्ध फार जबरदस्त आक्षेप घेतले होते. राष्ट्रसभेचा पाहिजेल तेव्हां भरण्याचा पुरातन हक्क व व्हान ब्यूरेनला निष्कारण अद्याप अटकेंत ठेवल्यामुळें राष्ट्राचे इतर हक्क नष्ट झाले आहेत; घेंटच्या तहासंबंधीं जॉनची मान्यता सरळ व बिनअटीची नाहीं. जॉन विदेशी सैन्याचा खर्च मागत आहे, परंतु त्यांनीं अघोर पातकें करून संपादन केलेलें द्रव्य ते बरोबर घेऊन

निघाले आहेत वगैरे गोष्टींचा उल्लेख करून शेवटीं स्पॅनिश सैन्य ठरल्या मुदतींत परत न गेल्यास त्याला शस्त्रप्रयोग करून घालविण्याचें व त्यानंतर डॉन जॉनशीं कोणताही संबंध न ठेवण्याचें आश्वासन राष्ट्रसभेनें दिल्यास आपण आपल्या दोन प्रांतांच्या वतीनें या आज्ञापत्रावर मान्यता घालूं असें त्यानें लिहून पाठविलें.

ऑरेंज अनुकूल झाल्यावांचून हॉलंड, झीलंड प्रांत वशवर्ती होणें व तेथें जुलमी राजसत्ता व धर्मशासन स्थापन करणें शक्य नाहीं हें डॉन जॉनला पुरतेपणीं समजलें. त्यामुळें व्हॉन ब्यूरेनला बुइल्यमच्या सर्व जहागिरी व मानपान देऊन ऑरेंजला जर्मनींत जावयास सांगावें, असा राजाच्या सल्ल्यानें नव्या सुभेदारसाहेबांनीं बूट काढला. परंतु राष्ट्राचा पिता व स्वातंत्र्यरक्षक या पदाची अदलाबदल होऊं शकत नाहीं हें ज्ञान त्यास लौकरच प्राप्त झालें. नंतर आर्शोच्या सल्ल्यावरून राजपुत्राकडे गुप्त वकील पाठविण्याचें ठरलें. पंडित लिओनिनस यांची या कामीं योजना झाली. नवीन तह व दुसरे करार सुभेदार शब्दशः पाळतील; राजपुत्रानें आपला दुराग्रह सोडल्यास त्यास पूर्ववत् राजाश्रय मिळून त्याचा पूर्ण फायदा होईल; डॉन जॉनशीं त्याचें पूर्ण सख्य जमेल; आत्महितार्थ राजपुत्रानें शस्त्रधारण केलें असल्यास त्याला ही संधी अमूल्य आहे; वगैरे गोष्टींचा पाठ लिओनिनसला शिष्टाईला निघण्यापूर्वीं मिळाला होता. डॉन जॉनची सर्व आशा या शिष्टाईवर अवलंबून होती. 'देशभक्त' या वस्तूच्या स्वरूपाची त्याला अद्याप कल्पनाही नव्हती; राजपुत्राकडे वारंवार वकील पाठवून त्याला ती पुढें कांहीं काळानें आली. लिओनिनसनें राजपुत्रापाशीं ठरलेला पाढा वाचला; राष्ट्रांत बंड माजविणाऱ्या प्राचीन इतिहासविश्रुत पुरुषांचा काय परिणाम झाला याची त्याला आठवण करून दिली; व एकंदर गोष्टींचा पोक्तपणें विचार करण्याविषयीं त्यास आग्रहपूर्वक विनंति केली. दुसरे दिवशीं त्यानें, आपण रात्रभर विचार करून ईश्वराची या संकटसमयीं आज्ञा मागितली असतां प्रांतिकसभेच्या विचारावांचून आपण कांहीं करूं नये अशी ईश्वरी प्रेरणा झाल्याचें वकिलास कळविलें. एग्मॉन व हॉर्न यांचा झालेला अंत, कटवाल्यांशीं पार्माचा वचनभंग, फ्रान्सच्या राजानें केलेला कॉलिनीचा

शेवट यांचें आपणास विस्मरण होत नाहीं; आपणावर व हॉलंड, झीलंड-वर तुटून पडण्याची गुप्त मसलत चालू असल्याबद्दल आपणास स्पेन, फ्रान्स व इतालीकडून बातमी समजली आहे; हल्लीं या मसलतीच्या संबंधांत पोपचा मुखत्यार या देशांत आला आहे; जॉनशीं तह करण्यांत राष्ट्रसभेनें घाई केली; नवा तह घेंटच्या तहास विरुद्ध आहे; हॉलंडच्या सभेच्या संमतीवांचून कोणताही विचार केल्यास आपली वडवाघळा-प्रमाणें स्थिति होईल; वगैरे गोष्टी त्यानें स्पष्टपणें या वकिलास निर-निराळ्या भेटींत कळविल्या. शेवटीं लिओनिनसच्या विनवणीवरून डोर्ट येथील सभेंत हजर राहण्याची ऑरेंजनें त्यास परवानगी दिली.

जॉनची येवढ्यानें निराशा झाली नाहीं. राजपुत्राचा शब्द दोन प्रांतांत श्रुतिप्रमाण मानला जात असे; इतर प्रांतांत कांहीं बडे लोक त्याच्या-विरुद्ध खटपटी करीत होते; परंतु एकंदरींत सर्व दर्जाच्या लोकांवर त्याचें जबरदस्त वजन व त्याचा पूर्ण वचक होता. राजपुत्राला माफी, बढती, व अधिकार देऊं करण्यास राजाची परवानगी होती; विरुद्ध पक्षास चिकटून राहिल्यापासून बहिष्कार, हद्दपारीची शिक्षा, मानहानि, सर्वस्वीं नाश, अपमृत्यु हींच बक्षिसें वाढून ठेविलीं होतीं. ऑरेंजला देऊं केलेले लाभ प्राप्त करून घेण्यास फक्त आपले जन्मादारभ्य ठरलेले विचारच सोडून द्यावयाचे होते ! त्यामुळें समक्ष भेटींत राजपुत्राच्या मनांतील किंतू काढून टाकतां येईल असा त्यास भरंवसा होता. डॉन जॉन लूव्हॅनपर्यंत एकटाच आला; नवीन तहाच्या अटीप्रमाणें स्पॅनिश सैन्याची रवानगी होईपर्यंत त्याचा सुभेदार ह्मणून हुकूम चालावयाचा नव्हता. तथापि त्याच्याभोंवतीं दरबारी, खुषमस्करे, नोकरी मागणारे वगैरे लोकांचा घोळका जमला. डॉन जॉननें केवळ कर्णाचा अवतार धारण केला होता, व त्याची वागणूक फार आनंदी व मनमिळाऊ असल्यामुळें लोक त्याला दिपून गेले. लोकांस सुखाचा काल समीप आला असें वाटूं लागलें. त्यानें बोलण्यांत अमूप साखर पेरण्याचा क्रम चालविला; तथापि आपल्यावर ऑरेंजचा डोळा आहे हें तो पक्केपणीं ओळखून होता. डॉन जॉनचा चिटणीस सैन्याची बोळवण करण्या-करितां पैशाची जमवाजमव करण्यांत गुंतला होता. राजाची पत

सराफ्यांत बिलकुल राहिली नव्हती. महाप्रयासानें अवश्य लागणारी रक्कम एस्कोव्हेडोनें कष्टाकष्टी गोळा केली. अखेर मॅन्स्फील्डच्या आधिपत्या-खालीं एप्रिलच्या दुसऱ्या पंधरवड्यांत सैन्याचा मुक्काम हलला. त्याचें प्रयाणकुतूहल पाहण्याकरितां हजारों लोक जमले; व तें पाहून त्यांच्या डोळ्यांचें पारणें फिटलें. तथापि दहा हजार जर्मन सैन्य अद्याप राष्ट्रांत होतेंच; वाटेस लागलेलें स्पॅनिश सैन्य सुद्धां सरहद्दीवर थबकून ठेवावें अशा राजास वारंवार सूचना जात होत्या. अँट्वर्पच्या किल्ल्याचा आर्शो हा नवीन रखवालदार झाला. आर्शो हा काळ व कल संभाळून वागणारा गृहस्थ होता. प्रथम हा जॉनच्या परवानगीवांचून ऑरेंजची भेट सुद्धां घेत नव्हता; तोच राजपुत्राकडे सुभेदाराचे वकिलावर वकील जाऊं लागल्यावर त्याच्या भेटीची प्रार्थना करूं लागला. डॉन जॉनशीं फेब्रुवारी महिन्यांत त्याचें वर्तन फार उद्धटपणाचें होतें. मार्चमध्यें तो त्याच्या चरणीं लीन झाला. त्यानें सर्वांत किफायतीची जागा संपादन केली व नंतर लबाड लोक आपणावर स्वार्थसाधूपणाचा खोटा आरोप करतात म्हणून मंत्रीमंडळांत त्रागा केला. सर्व पक्षांचा तो मित्र होता व सर्वांत मिसळत असे. त्यामुळें कोणाचाच त्याच्यावर विश्वास पटेना. आर्शोनें नवा किल्ला राजाच्या हुकुमानें रक्षण करण्याची शपथ घेतल्या-वर आंतील कैद्यांची मुक्तता झाली व स्पॅनिश लोक बाहेर निघून गेले.

स्पॅनिश सैन्य रवाना झाल्यावर ता. १ मे रोजीं डॉन जॉननें मोठ्या थाटानें ब्रुसेल्सशहरांत प्रवेश केला. या वेळीं त्याचें स्वागत करण्या-करितां सर्व शहर गजबजून गेलें होतें. सुस्वर वाद्यें, स्तुतिपर पदें व मुखकमलांनीं व्याप्त सौध व गवाक्ष यांतून सतत चाललेली पुष्पवृष्टि यांच्यायोगानें या समारंभास शक्य तितकी शोभा व रमणीयता आली होती. नेहमीच्या रिवाजाप्रमाणें प्रार्थनामंदिरांत प्रथम प्रार्थना होऊन या समारंभाचा मेजवानींत शेवट झाला. पुढें तीन दिवसांनीं शहरच्या सभागृहांत नव्या सुभेदारसाहेबांच्या शपथा झाल्या; व कांहीं कालपर्यंत जिकडे तिकडे आनंद व शांतता भासूं लागली. परंतु या बेगडी चित्राची दुसरी बाजू फार काळीबेरी व भयंकर होती.

डॉन जॉनचा मुख्य उद्देश स्कॉटलंडची राणी मेरी इला मुक्त

करून साधल्यास इंग्लंडचें राज्यपद मिळविण्याचा होता. हा प्रधान हेतु मनांत धरून तत्सिद्ध्यर्थ कांहीं साधनें मिळविण्याकरितां जॉननें नेदर्लंडची कामगिरी पतकरली होती. त्याच्या खाजगी पत्रांत नेदर्लंडास "नरकभूमि" "मद्यपी व पाजी लोकांनीं व्यापलेला देश" वगैरे नामाभिधान केल्याचें पावलोंपावलीं आढळून येतें; त्यावरून त्याचें या राष्ट्रावर किती प्रेम होतें याचें सहज अनुमान होईल. सुभेदारीच्या कामावर रुजू होतांच त्यानें आपल्या मुख्य हेतूसंबंधानें कारस्थान सुरू केलें. या कामांत त्याचा विश्वासूक चिटणीस एस्कोव्हेडो हा मुख्य मदतनीस होता. या उभयतांनीं राजाचा स्पेनमधील प्रधानचिटणीस अँटनी पेरेझ यास स्ववश करून घेण्याच्या इरायानें त्याच्याशीं या गोष्टीसंबंधानें पत्रव्यवहार सुरू केला. अर्थातच या पत्रांची भाषा संदिग्ध व सूचक असे. इकडे पेरेझनें आपली राजनिष्ठा व्यक्त करण्याकरितां हीं दरोबस्त पत्रें राजापुढें मांडण्याचा क्रम चालविला. जॉनची राजास राजरोस पत्रें निराळीं येत होतीं. त्यांत राजपुत्र ऑरेंज हा वास्तविक सुभेदार असून त्याच्या हातांत राष्ट्राचीं सर्व सूत्रें आहेत, त्याच्याशींच लोकांचे सर्व व्यवहार चालतात व त्याच्या मतानुरूप सर्व व्यवस्था चालत असते; लोकांच्या कांहीं मागण्या कबूल झाल्यामुळें ते ज्या त्या गोष्टींत उद्धटपणानें आपलें घोडें पुढें ढकलतात; सरकारच्या खजिन्यांत पैसा नाहीं व सैन्याच्या पगाराची बाकी बरीच थकली आहे असा लोकांत बोभाटा झाल्यामुळें सरकारच्या सामर्थ्याचा लोकांस अंदाज समजला आहे; या लोकांची हड्डी नरम करण्यास आपणास बंडवाल्यांइतकें सैन्य तरी अवश्य आहे; नेदर्लंडच्या लोकांस घोर युद्ध करूनच जिंकलें पाहिजे, वगैरे मजकूर असे. परराष्ट्राशीं चाललेल्या व्यवहारासंबंधानें त्यानें राजास कळविलें कीं आपले इंग्लंडच्या राणीविरुद्ध कांहीं प्रतिकूल बेत चालले आहेत असा गवगवा आहे तो निराधार आहे; इलिजाबेथ राणीचा आपणाशीं पूर्ण स्नेहसंबंध आहे, व कदाचित् आपण कधीं शांततेचा भंग करण्यास प्रवृत्त झालोंच तर फिलिपच्या वर्तनेंच करूं असें तिचें आश्वासन आहे; शिवाय महाराजांनीं फ्रान्सच्या राजघराण्याशीं शरीरसंबंध करण्याची पोकळ बोलवा करून फ्रेंच दरबार

आप्रणास अनुकूल राहील अशी तजवीज ठेवावी. नेदर्लंडमध्यें पाऊल ठेवल्यावर एका महिन्यांनीं जॉन व त्याचा चिटणीस या उभयतांच्या लेखांचें स्वरूप सर्वांशीं पालटत चाललें. सैन्य खुष्कीच्या मार्गानें जावयाचें ठरतांच डॉन जॉनची पूर्ण निराशा झाली. इंग्लंडच्या राजपदा-संबंधीं त्याचे बेत एकदम लयास गेले; व नेदर्लंडच्या सुभेदाराची परावलंबी स्थिति त्यास कंगाळवाणी वाटूं लागली. मार्गारेट पार्मा अगर एखाद्या उच्चकुलीन अन्य स्त्रीची या ठिकाणीं योजना होऊन, आपली त्या जागेपासून कोणत्या तरी रीतीनें मुक्तता व्हावी अशी तो पेरेझमार्फत राजास विनवणी करूं लागला; इकडे एस्कोव्हेडोनें आपल्या पत्रांत विशेष असें सुचविलें कीं, परत जाणाऱ्या स्पॅनिशसैन्याचें आधिपत्य डॉन जॉनला देऊन फ्रान्समधील पाखंडी लोकांचा समाचार घेण्याची कामगिरी तरी त्याजकडे सोपविण्याची योजना व्हावी; तसें न जमल्यास निदान जॉनला हुजूर दरबारांत बोलावून घेऊन तेथील प्रधानमंडळांत त्याची स्थापना व्हावी. जॉनला सध्यां स्पेनला परत येण्याची सवड मिळणार नाहीं; क्रमाक्रमानें स्पेनच्या दरबारचीं सर्व राज्यसूत्रें त्याच्या हातीं येतील असा पेरेझचा अभिप्राय होता. सुभेदारसाहेबांचा इंग्लंड-विषयींचा बेत पोपच्या वकीलाच्या मार्फत हुजुरांस युक्तीनें कळविला असून त्यास फिलिपची पूर्ण संमति आहे वगैरे मजकूर पेरेझच्या पत्रांत होता; व शेवटीं राजपुत्र ऑरेंजला जगांतून नाहींसा करण्याचा विचार नेहमीं मनांत बागवावा असें सुचविलें होतें. हीं पेरेझचीं पत्रें राजाच्या नजरेखालून गेल्यावर नेदर्लंडांत येत होतीं.

ऑरेंजचा निकाल लावण्याविषयीं यत्न चालले आहेत. परंतु सध्यां प्रांतिकसभांच्या हुकुमाबरहुकूम वागण्याचा प्रसंग असल्यामुळें एखाद्या वृद्ध बायकोच्या हातून सुभेदारीचें काम ठीक चालेल; जॉनला मारेकरी घालण्याचे बेत चालले आहेत त्यांत ऑरेंजचें अंग असावें असा पक्का संशय आहे; जॉनसंबंधानें लोकांच्या मनांत फार दुष्ट कल्पना वसत आहेत; धर्मस्वातंत्र्य व राजपुत्र ऑरेंज यांजविषयीं लोकांचा तीव्र अभिमान नाहींसा करण्यास शस्त्रावांचून दुसरा उपाय नाहीं; त्या कामीं लागणाऱ्या खर्चाची मदत सरकाराकडून वक्तशीर झाली पाहिजे; गुप्त

हेरांची संख्या वाढवून जुन्या नव्या मतांच्या लोकांत फूट पाडण्यास द्रव्याची फार अपेक्षा आहे, वगैरे मजकूर यावेळीं एस्कोव्हेडोच्या द्वारें स्पेनमध्यें लिहून जात असे. सर्व हॉलंड व झीलंड प्रांत राजपुत्र ऑरेंजच्या अर्ध्या वचनांत होता. इंग्लंडच्या राणीचें या बंडाच्या नायकास आंतून पूर्ण सहाय्य होतें. जॉनला नेद-र्लंडांत आपला जीवसुद्धां धोक्यांत आहे असें वाटून तो सरहद्दीवरील एखाद्या बंदोबस्ताच्या ठिकाणीं सुरक्षितपणें जाऊन राहण्याचा विचार करूं लागला व आपली या राष्ट्रांतून लवकर सुटका न झाल्यास आपण-च आपल्या जिवास कांहीं अपाय करून घेऊं असे त्याचे उद्गार निघूं लागले. इकडे राजपुत्र आपल्या राष्ट्रास योग्य दिशा दाखवून त्यांत स्वातंत्र्याची प्रेरणा करीत असतां, सद्धर्म व मतस्वातंत्र्य यांच्याकरितां लढाई चालविण्याविषयीं खुद्द त्याच्या आईचें त्याला प्रोत्साहन मिळालें. त्याच्या मुलाचें स्पेनमध्यें वनवास चाललें होतें. त्याचा भाऊ जॉन रणयज्ञांत आपल्या सर्वस्वाची आहुति घातल्यामुळें अगदीं पराधीन होऊन हॉलंड प्रांताकडून कांहीं प्रत्युपकाराची आशा करीत बसला होता. अशा स्थितींत राजपुत्र आपल्या सर्व कुटुंबीय माणसांचें समाधान करून आपल्या प्रजेसही धीर देत होता.

डॉन जॉन हा ब्रुसेल्स येथें स्थानापन्न होतांच त्यानें पुन्हा एकवार राजपुत्र ऑरेंजची समजूत करण्याचा यत्न केला. जॉनची अशी समजूत होती कीं, ऑरेंजसारख्या चतुर पुरुषास आपल्या खऱ्या हिताची ओळख पटल्यास त्याचें धर्मवेड मावळण्यास उशीर लागणार नाहीं; ऑरेंज आपल्या प्रतिपक्षास मूर्तिमंत जुलमाचा पुतळा समजत होता. जॉनच्या मनांत बंडवाल्यांशीं संधि व्हावा असा हेतू होता; ऑरेंजला संधि झाल्यापासून राष्ट्रांत भयंकर दुही व यादवी माजेल हें पूर्णपणें समजलें होतें. त्यानें प्राटेस्टंटधर्मी हॉलंड व झीलंड व कॅथोलिक-धर्मी इतर पंधरा प्रांत यांस सहिष्णुता धर्माचें आदितत्त्व शिकवून घट्टच्या तहरूपी रज्जूनें एकत्र केलें होतें. हें कायद्याचें बंधन जॉननें नेदर्लंडांत पाय ठेवतांच तोडून टाकलें होतें. प्राटेस्टंट व कॅथोलिक वर्गांत परस्परांविषयीं सहानुभूति अद्याप बिलकुल उत्पन्न

झाली नव्हती. खुद्द हॉलंडप्रांतांत सुद्धां पुनःसंस्कारवादी ह्मणविणाऱ्या विशिष्ट सुधारक वर्गास राजकीय हक्क देणें वाजवी नाहीं असा ऑरेंजच्या जिवलग मित्रांपैकीं आल्डेगोंडप्रभृति मंडळींचा अभिप्राय होता; व त्यांच्या विरुद्ध मताचा अनुवाद केल्याबद्दल राजपुत्राविषयीं सुधारकचमूंत मोठा गवगवा माजला होता. लोकमताची अशी असमाधानकारक स्थिति असतां राष्ट्रांत शांतता उत्पन्न झाल्यास संख्येनें श्रेष्ठ अशा कॅथोलिक समाजास राजसत्तेचा दुजोरा मिळून तो चिमुकल्या प्रोटेस्टंट धर्मी हॉलंड प्रांतावर तुटून पडेल अशी बलवत्तर चिन्हें दिसत होतीं. घेंटचा तह करण्यांत इतर प्रांतांनीं हॉलंड व झीलंडशीं एकोपा करून फिलिपवर पडावें असा त्याचा हेतू होता; फिलिपचा इतर प्रांतांशीं सलोखा होऊन त्यांनीं हॉलंड-झीलंडला चिरडावें असा त्याचा उद्देश नव्हता. यामुळें होतां होईल तोंपर्यंत जॉनशीं समेट होऊं द्यावयाचा नाहीं असा त्याचा निश्चय ठरला. मे महिन्याच्या प्रारंभीं विद्वद्वर्य लिओनिनस, शेझ वगैरे मुखत्यार राष्ट्रसभेच्या वतीनें मिडलबर्ग येथें ऑरेंजकडे आले. या मुखत्यारांची वाटाघाट चालू असतां जॉनचे वकील आर्शो, ह्वीर्गीस, मीट्रकर्क वगैरेही तेथें येऊन पोंहोचले. व्हिग्लियस नुकताच मरण पावला होता; त्यामुळें लिओनिनसची या वकिलांतही योजना झाली. राजपुत्र व त्याचे चार मसलतदार व ब्रुसेल्स दरबारचे सात कैवारी यांच्या बैठकी होऊन बराच कडाक्याचा वाद जुंपला.

मीट्रकर्कनें प्रथम भाषणास सुरवात केली; त्याच्या बोलण्याचा आशय असा कीं, सुभेदारसाहेबांनीं येथवर आपलीं सर्व वचनें पाळून आपले शुभ हेतु व्यक्त केले आहेत; व त्यांची श्रीयुत ऑरेंज व हॉलंड, झीलंड प्रांत यांस अशी प्रार्थना आहे कीं, त्यांनीं इतर प्रांतांच्या लोकांशीं एकविचार करून राजाज्ञा शिरसा मान्य करावी. मीट्रकर्कचें भाषण संपतांच ऑरेंजनें त्यांतील मुद्यांचें लेखी टिपण मागितलें. लेख गुंतविण्यासंबंधानें बरेच आढेवेढे घेऊन सरतेशेवटीं सरकारतर्फे अशी सूचना पुढें आली कीं, राजपुत्रानें प्रथम आपलीं गाऱ्हाणीं काय आहेत व सरकाराकडून आपणास काय काय अभिवचनें पाहिजेत याचें थोडक्यांत दिग्दर्शन करावें. त्यावर ऑरेंज रागानें ह्मणाला,

"अभिवचनांचा उपयोग काय? घेंट येथें शपथपूर्वक मिळालेल्या अभिवचनांचा काय उपयोग झाला?" त्यावर शेज्ञ ह्मणाला, "घेंटच्या तहाविरुद्ध सरकारतर्फे कोणतें गैरवर्तन झालें?" हे शब्द ऐकतांच ऑरेंजला रागाचें भरतें येऊन त्यानें आपलीं गाऱ्हाणीं सांगण्यास सुरवात केली. "आमचा मुलगा अद्याप स्पेनमध्यें कैदेंत आहेच. आमच्या व इतर हजारों लोकांच्या मिळकती अद्याप जप्तींत आहेत. जर्मन शिबंदी सैन्य अद्याप जागच्या जागीं कायमच आहे. धर्मशासनांचा अंमल कडाक्यानें चाललाच आहे. राष्ट्राचे पुरातन राजकीय हक्क निजधामास गेले आहेत. शिवाय ठिकठिकाणचे किल्ले व तट पाडण्याचें काम अद्याप उरलेंच आहे. यावरून शांतता होण्याबद्दल तुमची तुम्हासच किती आशा आहे, त्याचें सहज अनुमान होतें." त्यावर एक सरकारचा वकील ह्मणाला, "तें असूं द्या; परंतु आपलें स्वतःचें काय दुःख आहे; आपणास स्वतःस काय पाहिजे; आपलें स्वतःचें समाधान करण्यास सरकारांनीं काय केलें पाहिजे, हें तर एकदा कळूं द्या!" "घेंटच्या तहाची बजावणी होण्यापलीकडे मला कांहीं नको. या राष्ट्राच्या कल्याणाशिवाय मी दुसऱ्या गोष्टी बोलण्यास येथें आलों नाहीं. ती गोष्ट सोडून इतर विषयासंबंधानें या ठिकाणीं उपक्रम करणें असल्यास मला या शिष्टाईचा शेवट केला पाहिजे." शेवटीं ऑरेंजनें असेंही कळविलें कीं, राष्ट्रसभा भरल्यानंतर उभय पक्षांनीं एकमेकांच्या खरेपणाबद्दल वाटेल त्या रीतीचे जामीनकतबे घ्यावे. त्यावर जबाब देतांना लिओनिनस ह्मणाला, "राष्ट्रसभा भरविल्यापासून मोठा गोंधळ उत्पन्न होईल व कदाचित् मोठा अनर्थही माजण्याचा संभव आहे; सबब तसें करणें मोठ्या धोक्याचें काम आहे. सध्यां एक लहानशी मंडळी जमवून त्यांत सर्व प्रकृत महत्वाच्या राजकीय प्रश्नांची मित्रभावानें वाटाघाट करावी व हल्लीं उपस्थित झालेल्या द्वैतभावाचा शेवट लावावा." त्यावर ऑरेंज ह्मणाला, "घेंट येथें ठरल्याप्रमाणें राष्ट्रसभा भरवून तिच्या नियमानें पुढील राज्यव्यवस्थेचें स्वरूप ठरलें पाहिजे व तें ठरेपर्यंत घेंट येथें ठरलेले करार सरकारांनीं पाळले पाहिजेत. घेंटचा तह पाळणें अगर मोडणें यांतच सरकारला आवडनिवड करावयाची आहे; तह पाळावया-

संशोधनपद्धति अमलांत आली आहे; हल्लींच्या कायद्यावरून पाहिजेल त्या इसमाची चौकशी करण्यास सवड झाली आहे. राजपुत्राकडे यानंतर पुनः जॉननें वकील पाठविले नाहींत. या प्रतिपक्ष्यांस एकमेकांच्या सामर्थ्याची आतां चांगली अटकळ लागली. जॉननें लागलीच युद्धार्थ कंबर बांधली; व प्रथम परिस्थितीचें पूर्ण निरीक्षण करून कॅथोलिक-धर्माच्या पुष्टीकरणार्थ वेळोवेळीं प्रसिद्ध झालेले ठराव पुनः अमलांत आणिले. प्रथम मेलीन येथील एका गरीब शिंप्यास नवीन धर्माप्रमाणें प्रार्थना चालली असतां त्या ठिकाणीं हजर राहिल्याबद्दल देहान्त शासन मिळालें. हा फाशीचा समारंभ साजरा करण्याकरितां खुद्द जॉनसुद्धां हजर राहिला. यावेळींच ऑरेंज, हॉलंड-झीलंड प्रांतांत सर्व धर्मांच्या लोकांस सारखे हक्क देण्याची खटपट करीत होता.

या सुमारास राष्ट्रांत तीन मोठे पक्ष झाले होते, जॉनपक्ष, सरदारपक्ष, व लोकपक्ष. लोकपक्ष हा मध्यम प्रतीच्या, सुखवस्तु व बुद्धीमान् लोकांचा एक स्वतंत्र वर्ग राजपुत्रानें निर्माण केला होता व तो सर्वस्वीं त्याच्या पाठीशीं होता. बहुतेक सरदार लोक दोन्ही डगरीवर हात ठेवून होते; प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागण्याचा त्यांचा कल होता. घेंटच्या तहाविषयीं त्यांस विशेष अभिमान असेल असें ऑरेंजला वाटलें नाहीं. आर्शो व त्याचे आप्त यांचें दुटप्पी वर्तन होतें. प्रांतिकसभा जर्मन सैन्याची बाकी चुकती करून त्यांस देशांतून बाहेर पोंहोचविण्याचा विचार करीत होत्या. डॉन जॉन हा त्यांच्या मनांत भलत्याच कल्पना भरवून देऊन देशांतील किल्ले व मजबूत ठाणीं हस्तगत करून घेण्याविषयीं त्यांस गुप्तपणें उत्तेजन देत होता. जॉनला आपल्या जीवासंबंधीं रात्रंदिवस काळजी वाटत होती. त्याला पकडण्याबद्दल गुप्तबेत चालल्याची बातमी त्यास निरनिराळ्या बाजूनें समजूं लागली. आर्शोनें घोड्यावरून फिरत असतां अशा एका बेताची इत्थंभूत खरी ह्मणा अगर काल्पनिक ह्मणा, बातमी त्यास एके दिवशीं कळविली; व त्या गुप्त बेतासंबंधीं ऑरेंजच्या हातचें ह्मणून एक पत्र त्यानें त्यास दाखविलें. या संधीस आर्शो राजपुत्राच्या शत्रूंचीं पत्रें पकडून तीं त्याजकडे पाठवून ऑरेंजचीही प्रीति संपादन करण्याची खटपट करीत होता. आर्शोनें जॉनला या कटांत सर्व राष्ट्रसभेचे सदस्य

आहेत असें कळविलें. ही हकीकत ऐकतांच जॉननें आपलें सर्व सामान-सुमान विकून मेलीन येथून स्थलांतर करण्याचा विचार केला.

हें स्थलांतर करण्यास लौकरच एक सुसंधि येऊन पोंहोचली. फ्रान्सची राजपुत्री मार्गरेट व्हाल्वा ही या सुमारास फ्रान्सची सरहद्द ओलांडून नेमूर शहराकडे आली. हिचा मुख्य उद्देश नेदर्लंडच्या बंडवाल्यांशीं कारस्थान करून साधल्यास आपला भाऊ ड्यूक आलन्सन यास नेद-र्लंडचें राजपद प्राप्त करून यावें असा होता. ऑरेंज व आलन्सन यांचा या विषयासंबंधाचा पत्रव्यवहार अद्याप चाललाच होता. मात्र मार्गरेट व्हाल्वाच्या लग्नदिवशींच पारिस शहरांत असंख्य नवीनधर्मी लोकांची कत्तल उडाली होती. सौंदर्यानें केवळ उर्वशी व बोलण्यांत केवळ सरस्वती अशी जिची ख्याति, त्या अनुपम राजस्त्रीचें स्वतः स्वागत करण्याकरितां थोड्या लवाजम्यासह सुभेदारसाहेब नेमूर येथें आले. मार्गरेटनें आपला अंतस्थ हेतू साधण्याकरितां आपल्या मोहिनी अस्त्रांचा प्रथम कॅंब्रेच्या धर्माध्यक्षावर प्रयोग केला; परंतु तेथें त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कॅंब्रेचा किल्लेदार मात्र तिच्या जाळ्यांत सांपडून त्यानें किल्ला तिच्या हुकुमांत ठेवण्याचें आश्वासन दिलें. मॉन्स येथें हेनो प्रांताचा सुभेदार स. लालेन व त्याची बायको मार्गरेटला पूर्णपणें वश झाले. हेनो व फ्लॅंडर्स हे प्रांत फ्रान्सच्या राज्यांत सामील करण्याचा या दोन स्त्रियांचा बेत ठरला; व लालेननें आलन्सनच्या आज्ञेप्रमाणें चालण्याचें अभिवचन दिलें. तेथून नेमूरकडे निघाल्यावर वाटेंत जॉनची भेट होऊन त्यानें मार्गरेटचें मोठ्या थाटानें स्वागत केलें. या मार्गरेट व्हाल्वानें जॉन व त्याचे दरबारी लोक यांच्याशीं फार प्रेमाचें व सलगीचें वर्तन ठेविलें. नेमूर शहरांतही मार्गरेटच्या स्वागताची व राहण्याची व्यवस्था केवळ बादशाही थाटाची केली होती. नाच, तमाशे व उपवनविहार यांची परंपरा कांहीं दिवस चालली. जॉन मार्गरेटच्या सहवासांत असतां तिच्या सौंदर्याला अगदीं मोहून गेला, व तिचा नेदर्लंड-मधील सरकारी अधिकारी वश करून घेऊन त्याची सत्ता डळमळीत करण्याचा बेत त्यास बिलकुल समजला नाहीं. या संधींत मार्गरेटला लीजकडे पोंहोचवून तो कांहीं विश्वासू नोकरांसह तडख नेमूर

किल्ल्याकडे निघाला. त्यानें आपल्यापुढेंच राजनिष्ठ बर्लेमॉन व त्याचे चार राजनिष्ठ मुलगे किल्ल्याकडे पाठविले होते; व आसपासच्या जंगलांत व झुडपांत कांहीं हत्यारबंद लोक लपवून ठेवले होते. जॉनची स्वारी किल्ल्याच्या वेशीपाशीं येतांच किल्लेदार फ्रॉय मॉन त्यास सामोरा आला व वाड्यांत उपहाराकरितां घेऊन गेला. मंडळी आपापल्या ठिकाणीं बसतांच जॉनला जंगलांत लपून बसलेले हत्यारबंद लोक वाड्याप्रयंत येऊन पोंहोचल्याचा इषारा मिळाला. त्याबरोबर जॉननें तरवार उपसली व बर्लेमॉनप्रभृति मंडळींनीं पिस्तुलें काढलीं. जॉन ह्मणाला, "आज मी खरा सत्ताधीश होणार;" व त्यानें किल्लेदारास शरण येण्याविषयीं आज्ञा केली. फ्रॉय मॉन जॉनच्याच आज्ञेवरून किल्ल्याची रखवाल करीत होता. त्यास हें किल्ला हस्तगत करून घेण्याचें नाटक पाहून आश्चर्य वाटलें. नंतर फ्रॉय मॉन व इतर ह्मांतारेकोतारे वतनदार रखवालदार घालवून देऊन त्यांच्या ठिकाणीं नवीन आलेल्या शिपायांची योजना झाली. बंडवाल्यांशीं साम करणें अशक्य झालें होतें; दण्ड करण्यास साधनांची अनुकूलता नव्हती; अशा स्थितींत आपली मोडकळीस आलेली सत्ता संस्थित करण्यास देशांतील मजबूत किल्ले युक्तिप्रयुक्तींनें आपल्या ताब्यांत घेण्यापलीकडे जॉनला दुसरा उपाय सुचेना. त्या दिशेनें हा पहिला प्रयत्न होता.

हा किल्ला शत्रूच्या हातीं गेल्यापासून किती नुकसान आहे हें ऑरेंजच्या लक्षांत कित्येक महिन्यांपूर्वीं येऊन चुकलें होतें; व तसें न होऊं देण्याबद्दल त्यानें बॉसूला वारंवार सूचना पाठविल्या होत्या. त्याचप्रमाणें देशांतील सर्व मजबूत किल्ले हीं जुलमी सत्तेचीं घरटीं आहेत, असें समजून तीं जमीनदोस्त करण्याबद्दल त्याची सतत खटपट चालली होती. परंतु त्याच्या हाताखालील अंमलदारांच्या गाफिलपणामुळें हीं ठाणीं शत्रूस सुलभ वाटूं लागलीं होतीं. नेमूरची शिकार साधतांच जॉननें अँट्वर्प किल्ल्याकडे दृष्टि वळविली. अँट्वर्पचा किल्ला आर्शोच्या ताब्यांत होता; परंतु आर्शोवर जॉनचा पक्का विश्वास नसल्यामुळें तो त्याजकडून काढून एखाद्या आत्मीय मनुष्याच्या ताब्यांत यावा, असा जॉनचा उद्योग चालला होता. प्रथम त्यानें मार्गरेटकडे भेटीस जातेवेळीं

आर्शो, त्याचा भाऊ व मुलगा यांस बरोबर घेतले; व त्यांच्या गैरहजिरींत किल्ला अस्सल राजभक्त ड्रेस्लॉंग याच्या स्वाधीन केला. तसेंच अँट्वर्पच्या लुटीच्या प्रसंगीं प्रसिद्धीस आलेला सरदार व्हॅान एंड यास त्यानें अँट्वर्पला जाऊन तेथें तळ देऊन बसलेल्या जर्मन सैन्यावरील अंमलदारांस गुप्त रीतीनें वश करून घेण्याविषयीं निरोप पाठविला. याशिवाय या अधिकाऱ्यांशीं जॉनचा निराळा पत्रव्यवहार चाललाच होता. इकडे राष्ट्रसभेशीं जर्मन सैन्याचा पगार देऊन त्यांस घालविण्याबद्दल वाटाघाट सुरू ठेवून आंतून तो त्या सैन्याच्या मदतीनें अँट्वर्पचा किल्ला काबीज करण्याचें गुप्त कारस्थान करीत होता. परंतु त्याचीं एस्कोव्हेडो व जर्मन लष्करी अंमलदार यांस गेलेलीं पत्रें ऑरेंजच्या हातांत सांपडल्यामुळें व नेमूर येथें त्याच्या प्रयत्नाचें स्वरूप निदर्शनास आल्यामुळें हा त्याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं. याच संधीस आपल्या यजमानाचे बेत शेवटास नेण्यासाठीं साधनें जमविण्याकरितां एस्कोव्हेडो स्पेनला गेला. तेथें राजाचा मुख्य चिटणीस पेरेझ यानें जॉन व त्याचा चिटणीस एस्कोव्हेडो यांची स्पेनची सत्ता नाहींशी करून आपली स्वतंत्र सत्ता स्थापन करण्याचा उद्योग चालू आहे असें राजास भासविण्याचा क्रम बरेच दिवस चालविला होता. ह्या गोष्टीची वार्ता या दुकलेस बिलकुल नव्हती. एस्कोव्हेडो स्पेनमध्यें येतांच त्यानें पेरेझची आराधना सुरू केली. या खटपटींत त्याला पेरेझचा राजाच्या अंतःपुराशीं कांहीं अश्लाघ्य संबंध असल्याचें समजून तो त्या गोष्टीचा विशेष बोभाटा करूं लागला. ही बातमी पेरेझ यास समजतांच एस्कोव्हेडोला पक्का राजद्रोही ठरवून त्यानें त्याला राजाच्या हुकमानें मारेकरी घालून मारविलें. मात्र जॉनच्या पत्रांतून राजद्रोहाचें विष शोधून काढण्याचा राजाचा यत्न पेरेझचे कृत्रिम उपनेत्र लावून सुद्धां सफल झाला नाहीं. जॉनच्या पत्रांत केवळ पैशाची मागणी तेवढी वरचेवर येत होती.

या वेळचा नेदर्लंडच्या धर्मस्वातंत्र्याचा व स्वराज्याचा इतिहास राजपुत्र ऑरेंजच्या कृतींत व शब्दांत प्रतिबिंबित झाला आहे. त्यांतील अतिस्वल्प भाग जॉन व राष्ट्रसभा यांच्या दरम्यान मधून मधून झालेल्या वाग्युद्धांत अंतर्भूत झाला आहे. जॉनच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं

मिळालेल्या शांततेच्या अल्प अवसरांत हॉलंड-झीलंडचे लोक पूर्वीच्या युद्धांत फुटलेले समुद्राचे धक्के दुरुस्त करण्यांत गुंतले होते; व राजपुत्र ऑरेंज गांवोगांव फिरून लोकांस उत्तेजन व धीर देत होता. यावेळीं लोकांकडून त्याचें झालेलें स्वागत फार साधें व हृदयद्रावक होतें. कमानीदार दरवाजे, रणवाद्यें, गुड्यातोरणें, अगर तमाशे व मिरवणुकी यांपैकीं या समयास कांहीं एक दिसून आलीं नाहींत. ज्या ज्या ठिकाणीं तो गेला त्या त्या ठिकाणीं "मायबाप बुईल्यम आला, मायबाप बुईल्यम आला," अशी सुस्वर गर्जना कित्येक वेळपर्यंत चालत असे. कोणाही मनुष्यास बुईल्यमची भेट घेण्यास प्रतिबंध नसे. स्त्री असो, पुरुष असो, वा मूल असो, त्यास प्रेमानें ग्रहण करण्यास त्याचा हात सदैव तत्पर होता. त्यानें आपलें राजवैभव व अपार संपत्ती आपल्या राष्ट्राच्या विमोचनार्थ खर्च करून दारिद्य पदरीं घेतलें होतें, व राजाचें वैर संपादन केलें होतें ही गोष्ट आबालवृद्धांस महशूर होती. त्यानें हॉलंडच्या लोकांकरितां आपल्या सर्व जहागिरी गहाण टाकल्या होत्या; आपलें सर्व जवाहीर व सामानसुमान फडशा केलें होतें; फार तर काय? आपणास अन्नवस्त्रास सुद्धां महाग करून घेतलें होतें. त्याच्याच यत्ना-मुळें हॉलंड प्रांतांतून विदेशी लोकांची हकालपट्टी होऊन त्यांत धर्मच्छल बंद झाला होता. या स्वागताच्या गर्दीतच राजपुत्र राष्ट्रसभेस पुढील कर्तव्याची दिशा दाखवीत होता. त्यानें हार्लेम येथून ता. २० जून रोजीं या सभेस एक यादी पाठविली; त्यांत, आह्मी व आमचे भाऊ यांनीं आपलें सर्व आयुष्य, वित्त व कांहींनीं प्राण सुद्धां खर्ची घालून राष्ट्रास घेंटचा तहरूपी ऐक्यबंधन निर्माण केलें आहे; त्याचें दृढ अवलंबन करावें; त्याला मुकल्यास सर्व राष्ट्राचा नाश झाल्यावांचून राहणार नाहीं; डॉन जॉनचें वर्तन फार बेभरंवशाचें आहे; घेंटचा तह पाळल्यासारखें करून तो आंतून पूर्वीची सर्व जुलमी राज्यपद्धति अंमलांत आणण्याची खटपट करीत आहे, वगैरे गोष्टींचा उल्लेख होता. नेमूर किल्ला जॉननें घेतल्यावर व ऑरेंजवर निराधार दोषारोप केल्यावर, राजपुत्रानें टॅफिन व आल्डेगोंड हे वकील मुद्दाम राष्ट्रसभेकडे पाठविले; व त्यांजबरोबर एक विनंतिपत्र सदर सभेस पाठविलें. त्याचा सारांश, "आह्मी शांततेचा

भंग केला; जॉनच्या प्राणास आह्मी अपाय करण्याचा यत्न करीत आहों व हॉलंड, झीलंड व इतर प्रांत यांच्या दरम्यान युद्धप्रसंग चालविण्याची आमची खटपट आहे असे जॉननें आह्मावर दोषारोप केले आहेत. आतां आमच्या वागणुकीचें धोरण ज्यांनीं लक्षपूर्वक पाहिलें असेल त्यांस असें दिसून येईल कीं, सर्व प्रांतांचें ऐक्य राहण्यापासून या राष्ट्राचें व त्यांतील दरोबस्त व्यक्तींचें हित आहे अशी आमची पक्की समजूत आहे; तसेंच आमचे सर्व जुने राजकीय हक्क पूर्ववत् चालले पाहिजेत, हीच सर्व खऱ्या देशभक्तांची इच्छा असली पाहिजे; व त्या दिशेनेंच आमचे सर्व प्रयत्न चालले आहेत. तेंच जॉनचें वर्तन पहा. युद्ध चालविल्याशिवाय त्याचा मोठेपणा वाढण्यास त्याला दुसरा मार्गच दिसत नाहीं; व त्या दिशेनेंच त्यानें मार्च एन्फॅमिनच्या करारापूर्वीं व नंतर, देशाच्या अंतःस्थ व्यवहारांत व परराष्ट्राच्या व्यवहारांत आपल्या राजनीतीचें धोरण ठेविलें आहे. त्याच्या शब्दानें फसूं नका. आपल्या दुष्ट हेतूंवर पांघरूण घालून राष्ट्रांत दुही व रण माजविण्याकरितां लबाडीनें ते शब्द वापरले आहेत हें जॉनची कृति व आचरण यांवरून निर्विवाद ठरत आहे. आमच्या वकिलांचें भाषण व जॉनचीं कृत्यें यांचें विचारपूर्वक मनन करून राष्ट्राचे धुरंधर, व लोकांचे निवडक व ईश्वरप्रेषित प्रतिनिधि या तुमच्या उच्च व जोखमीच्या अधिकारास शोभेल असा आपण या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल करा. विचारशक्तीस मलीनता आणणारे सर्व विकार मनांतून घालवून द्या; तुमचीं बायकामुलें व पुढील पिढ्या यांचें स्वातंत्र्य व सौख्य यांजकडे पूर्ण लक्ष द्या. तुमच्याकडे डोळे लावून बसलेल्या गरीब रयतेचा नाश न होईल अशी तजवीज ठेवा. त्यांना परकीयांच्या तृष्णेपासून व दास्यत्वाच्या शृंखलेपासून सोडवा! आपल्या पूर्वजांनीं मोठ्या कष्टानें संपादन केलेले मूल्यवान् हक्क आह्मीं गमावले व विदेशी जुलमाचें जड जूं त्यांच्या मानेवर ठेविलें असा पुढील पिढ्यांचा अपवाद घेऊं नका! शेवटीं आमची आपणास एवढीच विनंति आहे कीं, आह्मी आपल्या व या राष्ट्राच्या सेवेस शिर हातावर घेऊन सदैव तत्पर आहों, त्याचा आपणास योग्य वाटेल त्याप्रमाणें आपण उपयोग करून घ्यावा." इकडे जॉननें चालवि-

लेलीं बाष्कळ कृत्यें लोकांच्या नजरेस आणून त्यांपासून साधेल तितका फायदा राजपुत्र करून घेत होता. त्याला यूट्रेक्ट शहरचा अधिकार देण्याचें वचन सरकारपक्षानें पुरें केलें नव्हतें; तथापि तेथील लोकांच्या आग्रहावरून तो त्या शहरीं गेला. लोकांनीं त्याच्या सन्मानार्थ मोठे महोत्सव व मेजवान्या केल्या. तेथें असतांना त्यानें सर्व पंथांच्या लोकांनीं एकमेकांशीं स्नेहभावानें वागावें अशा आशयाचें एक करारपत्र तयार केलें.

मध्यंतरीं डॉन जॉन व ब्रुसेल्स येथील सभा यांचे दरम्यान निरर्थक लांबलचक पत्रव्यवहार चालला होता. उभय पक्षांचे एकमेकांकडे वकिलावर वकील जात होते. जॉनचें ह्मणणें आपल्या प्राणास अपाय होणार अशाबद्दल आपणास निनांवीं पत्रें येतात; व आपणास पकडण्याकरितां लोक जागोजाग दबा धरून बसतात असा आपणास पक्का संशय आल्यामुळें आपण नेमूर किल्ल्याचा आश्रय करून राहण्याचा विचार केला आहे. त्यावर सभेनें त्यास असें कळविलें कीं, कांहीं विवक्षित व्यक्तीसंबंधानें सुभेदारसाहेबांस संशय आला असल्यास त्यांच्यावर त्यांनीं उघडपणें दोषारोप करावे, ह्मणजे कायद्याप्रमाणें त्यांची व्यवस्था लावण्याची सभेकडून तजवीज होईल. जॉन राष्ट्रसभेच्या वकिलांशीं मधून मधून धमकीच्याही गोष्टी बोलत असे; त्यानें पुन्हा सभेस पत्रानें असें कळविलें कीं, ऑरेंज आम्स्टर्डम, यूट्रेक्ट वगैरे शहरें बेकायदेशीरपणानें हस्तगत करून घेण्याची खटपट करीत आहे; हॉलंड, झीलंडच्या लोकांचा कॅथोलिकधर्माचा उच्छेद करण्याचा विचार आहे; राजपुत्रानें धर्माच्या बाबतींत राष्ट्रसभेचे हुकूम पाळण्याचें स्पष्टपणें नाकबूल केलें आहे; सभेनें सभासदांची याद आपल्याकडे पाठविल्यास त्यांतील नालायख लोकांचीं नांवें आपण रद्द करूं; राजपुत्र ऑरेंज घेंटच्या तहाविरुद्ध वर्तन करीत असल्यामुळें त्याच्याशीं सभेनें कोणताही व्यवहार करूं नये; व सभेनें आपल्या तैनातीस एक गार्दी पलटण ठेवावी. सभेनें तीनशें तिरंदाज तावडतोब जॉनच्या तैनातीस दिले; परंतु सभेच्या सभासदांत फेरफार करण्याचा अधिकार सुभेदारास कायद्यानें दिला नाहीं असें त्यांनीं जॉनला कळविलें; त्यांनीं राजपुत्राकडून घेंटच्या तहानुरूप वर्तन

करविण्याचें आश्वासन दिलें; परंतु जॉननें नेमूरचा किल्ला सोडावा व गुप्त व प्रजाद्रोही कृत्यें करूं नयेत असें त्यास कळविलें. जॉनचा सर्व रोख ऑरेंजवर होता; ऑरेंज पाखंड मताचा व राजद्रोहाचा प्रसार करीत आहे एवढेंच त्याचे शेवटीं वारंवार मोघम जबाब येऊं लागले. सभेच्या वकिलांनीं जर्मन सैन्यास फाटा देऊन राष्ट्रसभेस पाचारण करावें व तिच्या विचारानें चालावें असा जॉनला अखेरचा निरोप पाठविला.

या अवकाशांत अँट्वर्प किल्ल्यासंबंधीं जॉनचा बेत उलट त्याच्याच गळ्यांत आला. व्हॉन एँडच्या तुकडीस अँट्वर्प शहरांत शिरकाव होईना. त्याचा दुष्ट हेतु मॅजिस्ट्रेट लोकांस समजतांच त्यांनीं चॅम्पेनीच्या पुतण्यास सैन्य देऊन त्याजवर पाठविलें; राष्ट्रभक्तांनीं व्हॅन एँडच्या तुकडीची पुष्कळ खराबी करून तीस पिटाळून लाविलें. इकडे डी बूर्सनामक किल्ल्यांतील लष्करी अंमलदारानें शहरांतील कांहीं ऑरेंजपक्षीय सरदारांच्या सहाय्यानें किल्ला सभेच्या वतीनें सर करण्याचा घाट घातला. त्याला शहरांतील सर्व प्रमुख व्यापाऱ्यांकडून हां हां ह्मणतां मुबलक पैशाची मदत मिळाली. पैशाच्या सहाय्यानें डी बूर्सनें एका तुकडीशिवाय इतर सर्व शिबंदी पलटण वश करून घेतली. ता. १ आगष्ट रोजीं उभयपक्षांची थोडी झटापट झाली; डीबूर्स विजयी झाला; किल्ला भिक्षेकऱ्यांनीं सर केला. ही बातमी पसरतांच सर्व अधिकारी, प्रमुख रहिवाशी, व व्यापारी किल्ल्यांत गेले. परंतु शहरांत जर्मन सैन्याची वस्ती असल्यामुळें शहरची काय अवस्था होईल याबद्दल सर्वांस मोठी चिंता उत्पन्न झाली. थोडा वेळ मोठ्या आतुरतेनें या विषयाची वाटाघाट होऊन असें ठरलें कीं, व्यापारी लोकांनीं तीन लक्ष क्राऊन देऊं करून जर्मन सैन्याची धोंड कायमची शहरांतून काढून टाकावी. हा विचार कायम ठरतांच सोन्याच्या थैल्या बरोबर घेऊन शहरचे वकील सैन्याच्या गोटाकडे निघाले. या सैन्यानें सुरक्षितपणाकरितां आपला तळ शेल्डनदीच्या पैलतीरावरील नवीन वस्तींत दिला होता. शहरचे वकील नदीवरील पुलावर थैल्या पुढें करून उभे होते. सैन्याचे मुखत्यार येऊन रक्कम कमीअधिक करण्याविषयीं रदबदली चालली असतां दिवस गुदरला. सायंकाळच्या सुमारास शेल्डनदींत ऑरेंजनें पाठविलेल्या आरमाराचीं रणवाद्यें वाजूं लागलीं.

दर्यावर्दी भिक्षेकरी आल्याची बातमी पसरतांच जर्मन सैन्याची पळापळ सुरू झाली. भीतीनें अगदीं गांगरून जाऊन लांडग्यापुढें शेळ्यांप्रमाणें ते वाट फुटेल तिकडे पळूं लागले. इकडे जॉनचा एक गुप्त हेर या सैन्याच्या अंमलदारास दोन महिने टिकाव धरावा ह्मणजे तितक्या अवकाशांत कुमक येऊन पोंहोचेल असें गुप्त भाषेंत पत्र घेऊन चालला असतां शत्रूच्या हातीं सांपडला. त्या पत्राच्या ऐवजीं, " मी शत्रूच्या हातीं सांपडलों आहें, आपण शत्रूस शरण जावें, " अशा अर्थाचें पत्र त्या इसमापाशीं देऊन व त्यास भरपूर लांच देऊन राष्ट्रभक्तांनीं जर्मन अंमलदारांकडे पाठविलें. तें पत्र पाहतांच जमाव करून राहिलेलें सैन्य अंमलदारांसह देशभक्तांस शरण आलें. ही वार्ता ऐकून जॉनच्या क्रोधाचा व निराशेचा अतिरेक झाला. तथापि या उन्मत्त बंडखोरांस एखादे दिवशीं प्रायश्चित्त मिळेल असें त्याचें ह्मणणें होतें !

यानंतर त्यानें सभेस असें लिहून कळविलें कीं, सर्व सैन्याचें आधिपत्य आपणाकडे असावें ! फ्रीजलंड प्रांतांत आपल्यावतीनें नवा सुभेदार नेमावा ! ब्राबंट व फ्लँडर्स प्रांतांत पाखंडी लोक शोधून काढून त्यांस योग्य शासन करण्याची लोकांनीं तजवीज करावी ! आल्डेगोंड व थेरन या प्रमुख बंडवाल्यांस देशांत थारा मिळूं नये ! ब्रुसेल्सच्या लोकांचीं हत्यारें काढून घ्यावीं ! व राजपुत्र ऑरेंज कराराप्रमाणें वर्तन न करील तर त्याचें सभेनें पारिपत्य करावें ! अँट्वर्पचा किल्ला आपले स्वाधीन करावा ! ! जॉनचीं कारस्थानें सभेस पूर्णपणें माहीत असतां जॉननें अशा हास्यास्पद मागण्या सभेस कराव्या यावरून त्याची बुद्धि किती भ्रष्ट झाली होती हें सहज दिसून येईल. पेरेझच्या दगलबाज व धरसोडीच्या लेखांनीं व कृतींनीं त्याचें मन बरेंच भांबाऊन गेलें होतें. त्याला नवें राजपद प्राप्त करून घेण्याची आशा दिवसेंदिवस पळत्या पिशाचाप्रमाणें भासूं लागली. नेदर्लंडमध्यें शांतता स्थापन करून तेथील सैन्याच्या मदतीनें इंग्लंडच्या तक्तावर उड्डाण करण्याचा त्याचा बेत ! परंतु नेदर्लंडचे लोक कसले खमंग ! त्यांना डॉन जॉनही आवडेना, व स्पेनची सत्ताही प्रिय वाटेना ! ते स्वातंत्र्य, स्वधर्म, व स्वराज्य यांच्या आशेनें दुष्ट व घातकी ऑरेंजच्या मागूनच चालले होते ! व दयाभूत

फिलिप राजाला ते केवळ शत्रू समजत होते! सात वर्षांची आल्हाची चिरस्मरणीय कारकीर्द, यमासनाची अविश्रांत खटपट, नार्डेन, झुट्फन, हार्लेम, लीडन, अँट्वर्प वगैरे ठिकाणचे महत्वाचे प्रसंग या सर्वांचा अनुभव घेऊन लोकांनीं राजाविषयीं असली कृतघ्नता दाखवावी हें केवळ त्यांचेंच दुर्दैव होतें! नेमूर किल्ल्यांत बसून या बहकलेल्या लोकांस वाटेवर आणण्याचा जॉन विचार करीत होता!! मात्र त्याची शोचनीय स्थिति पाहून त्याचेच साथीदार त्यास हळू हळू सोडून जाऊं लागले होते.

किल्ले सर करण्याची कल्पना किती घातक होती हें डॉन जॉनच्या नजरेस येत चाललें. देशभक्तांशीं सलोखा करण्याच्या खटपटींत त्यानें लढाईच ओढून आणिली होती. राजपुत्र या कारस्थानांत पूर्ण यशस्वी झाला; सुभेदारसाहेब पक्के सापळ्यांत सांपडले होते. आपणच लावलेल्या जाळ्यांत आपण सांपडून शत्रूच्या तावडींत गेल्यावर जॉनचा क्रोध अनावर झाला. त्याचें पहिलें नारसिंह स्वरूप बदललें; तो आतां नेदर्लंडच्या सभांची, धर्माध्यक्षांची, प्रतिनिधींची व लोकांची विनवणी करूं लागला. राष्ट्रांत स्वस्थता करण्यापलीकडे आमचा कांहीं हेतू नाहीं; आह्मी स्पॅनिश सैन्य परत पाठविलें, किल्ले लोकपक्षाच्या स्वाधीन केले, राष्ट्राचे सर्व हक्क कबूल केले, व असंख्य अडचणी व अपमान सोसले; असें असून लोकांचें समाधान होत नाहीं. करितां त्यांच्या आणखी मागण्या तरी काय आहेत तें समजावें; सभेनें आपले मुखत्यार पाठवून घेंट-च्या तहासंबंधीं नवे करार करून घ्यावे व जरूर वाटल्यास उभयपक्षांनीं एकमेकांकडे ओलीस पाठवावे; असा जॉनचा लोकांस निरोप आला! सभेचें उत्तर ठरलेंच होतें; स्पॅनिश सैन्य गेलें खरें, परंतु जर्मन सैन्याची क्रीडा अयाप चाललीच होती; शिवाय स्पॅनिश सैन्य परत बोलावण्याचा व नवें बाजारबुणगें सैन्य ठेवण्याचा जॉनचा विचार चालला आहे असा लोकांत बोभाटा होता. मिलन, जिनोआ येथील अधिकाऱ्यांस व अलेक्झँडर फार्नीज यांस सैन्य तयार ठेवण्याबद्दल जॉनचीं पत्रें गेलीं होतीं. किल्ले परत आपल्या ताब्यांत घेण्याचे त्याचे यत्न चालले होते. त्याची गुप्त डाक राजपुत्राच्या हातांत सांपडली होती. एकंदर वस्तुस्थितीवरून ब्राबंटच्या सभेस यावेळीं विशेष प्रौढी आली

होती, त्यामुळें त्यांच्या लेखांत एकप्रकारची उद्दामपणाची झाक दिसूं लागली. सभेनें जॉनचा हुकुम चालविण्यास शर्ती कळविल्या, त्या अशाः जॉननें आपल्या तैनातींतील सर्व सैन्यास रजा द्यावी; जर्मनसैन्य देशाबाहेर घालवावें; परदेशस्थांस सर्व सरकारी कामावरून दूर करावें; कोणताही गुप्त तह करूं नये; मन्त्रीमंडळाच्या विचारावांचून राज्यकारभारांत एक पाऊल पुढें टाकूं नये; राष्ट्रसभेंत सर्व लोकमताचा समावेश करून त्या सभेनें नेमलेल्या दरबारीमंडळाच्या द्वारानें सर्व राज्यकारभार चालवा; व त्यावर वंशपरंपरागत राजछत्राची सावली-करडा अंमल नव्हे-असावी. ही राजपुत्र ऑरेंजची नेदर्लंडच्या राज्यव्यवस्थेसंबंधानें कल्पना होती अर्थांतच ही व्यवस्था डॉन जॉनला रुचण्यासारखी नव्हती. शेवटीं सभेनें इतर राष्ट्रांच्या दरबारांत सभेची व्यर्थ नालस्ति न करण्याबद्दल जॉनला शिफारस केली होती. हा जबाब पाहतांच जॉनला बगळ्यानें खोकडास दिलेल्या मेजवानीची आठवण झाली. नेमूर किल्ल्यासंबंधीं त्याचा यत्न, जर्मन सैन्याच्या अधिकाऱ्यांशीं झालेला गुप्त व्यवहार व त्याचा गुप्त पत्रव्यवहार या तिन्ही गोष्टींसंबंधीं त्याला कांहीं एक समाधानकारक उत्तर देतां येईना. आत्मसंरक्षण, लोकांचे आपल्या विरुद्ध गुप्त बेत, ऑरेंजचे खोल व दुष्ट हेतु, पत्रांच्या अगोदरच्या तारखा वगैरे सबबींच्या आड लपून बसण्याचा हास्यास्पद यत्न तो करूं लागला. शेवटीं त्यानें पुन्हा वकिलांच्या विद्यमानें उभयपक्षांत वाढलेला गैरसमज दूर करण्याचा यत्न करावा अशी सभेस विनंति केली.

नेमूर व ब्रुसेल्स यांच्या दरम्यान वरील पत्रव्यवहार चालला असतां ऑरेंजच्या सुचनेवरून अँट्वर्पच्या अधिकाऱ्यांनीं किल्ला शहरच्या बाजूनें पाडून टाकण्याचा ठराव केला. ही कल्पना निघतांच दहा हजार शहर-वासीलोक-बायका, पुरुष, मुलें, श्रीमान् लोक व गरीबगुरीब-एकदम कामास लागले. इतके लोक रात्रंदिवस कामावर लागल्यामुळें किल्ल्याची शहरची बाजू थोडक्याच वेळांत जमिनदोस्त झाली. किल्ल्याच्या एका भागांत आल्व्हाचा एक पुतळा सांपडला; त्याचे लोकांनीं घणांनीं हजारों तुकडे केले; व एकेक तुकडा स्मारक म्हणून प्रत्येकानें घरीं नेला. हीच स्थिति इतर किल्ल्यांची झाली. अँट्वर्पप्रमाणेंच घेंटचा किल्ला जमिनदोस्त करण्यांत लोकांचा विशेष उत्साह दिसला.

# भाग १३ वा.

## इ. स. १५७७–७८.

राजपुत्राची ब्रुसेल्सला भेट—नव्या मागण्या—मॅथिअस—आवंटचा रूवर्ड (पेशवा)—घेंट येथील डाव—जॉनचा निषेध—ब्रुसेल्सचा दुसरा संयोग—गॅब्लुरची लढाई—राजाचा निरोप—आम्स्टर्डेम येथील क्रान्ति—कॅसिमीर—आलन्सनबरोबर करार—धर्मविषयक ऊहापोह—जानचा अंत.

इकडे हे प्रकार चालले असतां राष्ट्रसभेनें एक निराळाच महत्वाचा डाव आरंभिला होता. या सभेनें राजपुत्र ऑरेंजला ब्रुसेल्स येथें येऊन आपल्या सल्लामसलतीचा फायदा सभेस देण्याविषयीं सरकारीरीतीनें व मोठ्या आग्रहपूर्वक विनंति केली. आल्व्हाच्या सैन्याचीं शिंगें, तुताऱ्या दुरून ऐकूं येतांच एग्मॉनप्रभृति आपल्या मित्रमंडळींस भयाची सूचना करून त्यानें ब्रुसेल्सला राम राम ठोकल्यास सुमार अकरा वर्षें होत आलीं होतीं. तथापि या अवधींत त्याच्यापश्चात् या राजधानीच्या शहरांत त्याचा बुद्धिप्रभाव वेळोवेळीं दिसून येत होता; या अवकाशांत वस्तुस्थिति सर्वस्वीं पालटली होती. ऑरेंजकडे सर्व राष्ट्राचें धुरीणत्व आलें होतें; चार्लस बादशहाचा मुलगा, फिलिपचा भाऊ त्याच्या केवळ तावडींत सांपडला होता; व या राजपुरुषानें त्याच्या पुढें गुढघे टेकून मिळतील त्या अटीवर त्याचें सख्य संपादन करण्याची खटपट चालविली होती. कॅथोलिकधर्मी सरदारमंडळीसुद्धां लोकमताच्या धोरणानें या कॅल्व्हिनपंथी राजपुत्राच्या शब्दास मान देऊं लागले होते; आणि यावेळीं मूर्धाभिषिक्त फिलिपच्या विरुद्ध उभारलेल्या बंडाचा तो नायक ठरला होता. चॅम्पेनी, लिओनिनस वगैरे राष्ट्रसभेचे वकील यांनीं सभेचा असा निरोप आणिला कीं आपल्या दूरदृष्टीचा, अनुभवाचा व देशभक्तीचा फायदा ऑरेंजनें ब्रुसेल्स येथें येऊन सभेस द्यावा; व त्यानें बादशाही सत्ता व जुना धर्म नाहींसा करण्याची खटपट चालविली आहे असा लोकांचा झालेला गैरसमज दूर करावा; हॉलंड, झीलंड प्रांतांत कॅथोलिक धर्मास प्रतिबंध नाहींसा करावा; व इतर प्रांतांत नवीन धर्माची स्थापना करण्याचा आपला विचार नाहीं असें लोकांस आश्वासन द्यावें.

घेंटच्या तहांत शब्दांनीं मात्र नव्या धर्माचा निषेध केला होता. परंतु धर्मशासनांचें व धर्मसंशोधनाचें दडपण उत्तरोत्तर कमी झाल्यामुळें नवीन धर्मी लोकांच्या झुंडी स्वदेशीं परत येऊं लागल्या होत्या, व त्या धर्मांचे भक्त व उपदेशक प्रसिद्धपणें समाजांत वावरूं लागले होते. अशा स्थितींत सभेचा वरील निरोप हा एक प्रकारचा पेचच होता. राजपुत्र आपली जन्मभूमि पाहण्यास व तेथें आपले बांधव व मित्र यांच्या समागमांत कांहीं काल घालविण्यास फार उत्कंठ झाला होता. परंतु हॉलंड, झीलंड येथील सभांच्या परवानगीवांचून त्यानें ब्रुसेल्सला जाण्याची गोष्ट कबूल केली नाहीं. व हॉलंड, झीलंडमध्यें कॅथोलिक धर्मास थारा देण्याचा अधिकार तेथील प्रांतिक सभांचा आहे; व ह्या गोष्टीचा व नवीन धर्म इतर प्रांतांत चालविणें अगर न चालविणें या प्रश्नाचा निकाल राष्ट्रसभा भरल्यावांचून होणार नाहीं असें त्यानें सभेच्या वाकिलांस कळविलें. ऑरेंजला हॉलंड-झीलंडच्या सभांची ब्रुसेल्सला जाण्यास मोठ्या कष्टानें परवानगी मिळाली. तो तिकडे निघाल्यावेळीं त्याची बायको भयानें व चिन्तेनें फार कष्टी झाली; त्याच्यापश्चात् हॉलंड, झीलंड प्रांतांतील प्रत्येक देवालयांत त्याच्या अभीष्ट चिन्तनार्थ प्रत्यही प्रार्थना चालविण्या-विषयीं प्रांतिकसभांचे हुकूम सुटले. ता. १७ सप्टेंबर रोजीं तो अँट्वर्प येथें आला. या भव्य व सुंदर शहराची स्पॅनिश-आपातांत झालेली स्थिति पाहून त्याचें मन फार उद्विग्न झालें. ता. २३ रोजीं दोनप्रहरीं सर्व ब्रुसेल्स शहर त्याचें स्वागत करण्याकरितां नदीकडे लोटलें. हा राज-पुत्राच्या आयुष्यांतील मोठा भाग्याचा दिवस होता. या दिवशीं सर्व राष्ट्राचे भिन्न विचाराचे व मताचे पुढारी लोकमताच्या लाटेनें एकचित्त होऊन विश्वास, आदर व प्रेमनिर्भर अंतःकरणानें राजपुत्राचें स्वागत करण्या-करितां जमले होते. तो या वेळीं लोकमताचा व धर्मस्वातंत्र्याचा मूर्तिमंत विजयध्वज होता. अशा प्रसंगीं लोकांचे हक्क वाढवून राष्ट्रसभेस जास्त बळकटी आणावी; दरबारीमंडळ या सभेकडून नेमवून त्याच्या द्वारें सर्व राज्यकारभार चालवावा; व सर्व राज्यव्यवस्थेवर फिलिप किंवा आपण यांशिवाय कोणी अन्य राजपुत्र शासक नेमावा असा त्याचा हेतु होता.

इकडे राष्ट्रसभेच्या वतीनें दोन वकील डॉन जॉनकडे जाऊन त्यांनीं

नव्या तहाच्या अटी ठरविल्या होत्या; व त्या सभेस पसंत पडून उभय-पक्षांत सख्य होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. अशा स्थितींत राजपुत्र ब्रुसेल्स येथें येऊन पोंहोचतांच त्यानें राष्ट्रसभेच्या मागण्या फुगवून तहाचें बोलणें अगदीं बंद केलें. डॉनजॉनशीं व्यवहार बंद करणें हा त्याचा पहिला मुख्य हेतु होता. त्याच्या उपदेशामुळें आतां सुभेदाराकडे नव्या मागण्या गेल्या त्याः—घेंटचा तह व शाश्वतशासन हे दोन्ही करार जॉननें निरंतर चालवावे; नेमूरच्या किल्ल्याचा आश्रय सोडावा व जर्मन सैन्यास फाटा द्यावा; इतर किल्ले व मजबूत ठाणीं सभेच्या स्वाधीन करावीं व आपल्या तैनातींतील सैन्यास रजा द्यावी; परदेशी सैन्याची भरती न करण्या-विषयीं प्रांतोप्रांतीच्या सुभेदारांस हुकूम पाठवावे; लोकपक्षाचे कैदी बंधमुक्त करावे; जप्त केलेली मिळकत खुली करावी; व कामावरून दूर केलेले अधिकारी स्थानापन्न करावे; काऊंट ब्यूरेनला दोन महिन्यांत मुक्त करण्याविषयीं हमी घ्यावी व नव्या सुभेदाराची नेमणूक होईपर्यंत लक्झेंबुर शहरीं राहून दरबारी-मंडळाच्या सल्ल्यानें कारभार चालवावा! या मागण्यांचा जबाब तीन दिवसांत पाठवावा किंवा लढाईस तयार रहावें असें सभेचें शेवटचें मागणें होतें. हा निरोप ह्मणजे सर्व राज्यसूत्रें आमचे स्वाधीन करून आपण जपमाळ घेऊन स्वस्थ बसा असें सांगण्या-पैकींच होता. तो ऐकून जॉन रागानें अगदीं गोंधळून गेला. तरवारीचा उपयोग केल्यावांचून नेदर्लंडांत आपला पाय टिकत नाहीं अशी त्याची खात्री झाली. राजसत्ता व कॅथोलिकधर्म या दोन्हीविरुद्ध लोकांची उचल आहे असें त्यास स्पष्टपणें कळून चुकलें. त्यानें प्रतिपक्षाचा डाव ओळखून त्यांनीं केलेलें युद्धार्थ निमंत्रण कबूल केलें. यानंतर राष्ट्रसभेच्या हुकमानें एक हस्तपत्रक नेदर्लंडच्या सात भाषांत छापून गांवोगांव वांटण्यांत आलें. यांत सुभेदार व सभा यांच्या दरम्यान झालेल्या व्यवहाराचा गोषवारा व जॉनची एस्कोव्हेडो, राजा, पेरेझ, जर्मन लष्करी अंमलदार व जर्मन बादशाहीण यांच्या नांवचीं पकडलेलीं पत्रें छापलीं होतीं. याबर जबाबादाखल एक लेख जॉननें प्रसिद्ध केला; त्यांत झालेला व्यवहार आपल्या दृष्टीनें लोकांपुढें मांडून राष्ट्रसभेवर दोषारोप केले होते.

मध्यंतरीं या घोटाळ्याच्या खेळांत तिसऱ्यापक्षानें एक दुसराच महत्वाचा

डाव आरंभिला होता. नेदर्लंडमधील कांहीं बड्या लोकांनीं जर्मन बादशाहा रुडोल्फ याचा अल्पवयी भाऊ बडेसाहेब मॅथिअस यांजकडे खाजगी रीतीनें ब्रुसेल्सला येण्याविषयीं गुप्तपणें वकील पाठविला. राजपुत्राविषयीं सरदार लोकांत उत्पन्न झालेला मत्सरभाव हाच या कृत्यास मुख्य कारण होता; व या कृत्यांत कॅथोलिकधर्मी सरदार हे अग्रेसर होते. तथापि ऑरेंजच्या अर्धवट मित्रपैकीं कांहीं गृहस्थही या खटपटींत सामील होते. ऑरेंजला ही गोष्ट मॅथिअस नेदर्लंडांत दाखल होण्यापूर्वीं कळली. इंग्लंडच्या राणीचा व नेदर्लंडच्या जनसमूहाचा ओढा राजपुत्राकडे होता. इलिजाबेथ राणी त्याच्या बायकोस वारंवार मूल्यवान् देणग्या पाठवीत होती; व ब्रुसेल्सचे लोक त्याला अपाय होऊं नये म्हणून रात्रंदिवस त्याच्या वाड्याभोंवतीं आपखुषीनें पहारा करीत होते. सरदारांचा वकील व्हाएना येथें जाऊन त्यानें मॅथिअसचें डोकें नेदर्लंडच्या राजपदाच्या कल्पनेनें पूर्णपणें भारलें. वास्तविक जगांतील तत्कालीन अद्वितीय मुत्सद्याविरुद्ध पोकळ खलबतें, एका नामांकित योद्ध्याबरोबर घातक संग्राम व जगांतील अतिबलिष्ठ व घातकी राजाशीं दीर्घ वैर असे तीन प्रसंग नेदर्लंडच्या सरदारांनीं त्याच्यापुढें वाढून ठेविले होते. ता. ३ आक्टोबर रोजीं रात्रौ हुजऱ्याचा पोषाक करून मॅथिअस व्हाएनांमधून निघाला व कोलोन येथें दाखल झाला. जॉनला ही बातमी समजतांच तो रागानें लाल झाला. इंग्लंडच्या राणीला या गोष्टीपासून बराच त्वेष आला. परंतु राजपुत्राच्या विरुद्ध हा डाव असून त्याचें मन मात्र बिलकुल क्षुब्ध झालें नाहीं.

सरदार लोकांचा विचार असा होता कीं, मॅथिअसला प्रथम सुभेदारीचीं वस्त्रें यावीं; नेदर्लंडच्या रहिवाश्यांपैकीं लायख गृहस्थांचें एक प्रधानमंडळ नेमावें; व त्याच्या विचारानें राज्यकारभार चालवावा. ही गोष्ट प्रथम राजपुत्रास कळली त्या वेळीं मॅथिअसला बोलावल्यानंतर त्याचा व त्याच्या घराण्याचा अपमान करणें फार अहितकारक होईल असा त्याचा अभिप्राय पडला. या नवीन खटपटींसंबंधानें इलिजाबेथच्या सल्लागारांनीं या उत्पथगामी सरदारांची कानउघाडणी केली. यावेळीं ऑरेंजनें स्वीकारलेली वृत्ति त्याच्या मुत्सद्दिरीची पूर्ण साक्ष देते. तो सुमार दोन

हजार घोडेस्वार व शहरवासी लोकांचा जमाव घेऊन मॅथिअसचें स्वागत करण्याकरितां अँट्वर्पकडे निघाला. त्यानें मॅथिअसशीं विरोध केला असता, तर बडेसाहेब फजीत पावून व्हाएनाला परत गेले असते; परंतु त्याच्यायोगानें बादशहा व सर्व जर्मन राष्ट्र ऑरेंज व त्यानें हातीं घेतलेलें काम यांच्या विरुद्ध उलटलें असतें. त्यानें आपण स्वतः या आखाड्यांतून पाय काढला असता तर सर्व सूत्रें त्याच्या शत्रूच्या हातीं गेलीं असतीं. मॅथिअसला आपल्या हातांत घेऊन त्यानें आपल्या शत्रूंची नांगीच तोडून टाकिली. अशा प्रकारच्या अनुपम बुद्धिचातुर्यानें त्यानें त्यास गिळून टाकण्याकरितां उसळलेल्या लाटांचा जोर घेऊन आपलें तारूं पुढें हाकारलें. मॅथिअसच्या आगमनामुळें ऑरेंजला ब्राबंट प्रांताच्या रूवर्ड (पेशवे) पदाची प्राप्ति झाली. ब्राबंट प्रांतांत राजाचा मुख्य सर-सुभेदार राहण्याची जागा असल्यामुळें तेथें अलीकडे निराळा प्रांतिक सुभेदार नेमण्याचा परिपाठ बंद पडला होता. प्राचीन कालीं राजाच्या वतीनें रूवर्ड नामक पूर्ण सत्ताधारी अधिकारी या प्रांतांत अधिकारापन्न असे. रूवर्ड हा बहुतकरून राजघराण्यापैकींच पुरुष असून त्याचा अधिकार वंशपरंपरेनें चालत असे. हल्लींच्या प्रसंगीं सरसुभेदार नेमूरच्या किल्ल्यांत आत्मसंरक्षणार्थ जाऊन बसल्यामुळें ब्राबंट प्रांतांत राजाचा अंमल चालविण्यास कोणीच पुरुष राहिला नव्हता. अशी संधि पाहून ब्राबंट-च्या सदस्यांनीं व अँट्वर्पच्या निरनिराळ्या राजकीय मंडळ्यांनीं प्रांतिक सभेस ऑरेंजची रूवर्डच्या स्थानीं नेमणूक करण्याविषयीं अर्ज पाठविले. सभेनें ती गोष्ट मान्य करून ऑरेंजला त्या अधिकाराचीं वस्त्रें दिलीं. ही नेमणूक राष्ट्रसभेकडून कायम होतांच ब्राबंट प्रांतांतील सर्व लहानमोठ्या शहरांत महोत्सव झाले. फ्लँडर्स प्रांताच्या सभेनें सुभेदारीच्या जागेकरितां त्याची चार वेळ निवडणूक केली होती. सदरहू अधिकाराचीं वस्त्रें धारण करणें सर्वस्वीं त्याच्या इच्छेवर अवलंबून होतें. हॉलंड, झीलंड प्रांत त्याच्या अर्ध्या वचनांत होते. त्याच्या शत्रूंनीं आरंभि-लेल्या खटपटीचा सद्यःपरिणाम एवढाच कायतो झालेला दिसत होता. राजमुकुट धारण करून नेदर्लंडमधील बड्या लोकांस बेसण घालण्यास ही संधि अमूल्य होती. परंतु ऑरेंजला स्वराष्ट्राची एकनिष्ठपणें सेवा करणें

हाच आपल्या शत्रूंचा प्रतिकार करण्याचा राजमार्ग दिसत होता. तो हे "बडे बापके बेटे," समुद्राच्या लाटांप्रमाणें चंचलवृत्तीचे व बेभरंवशाचे आहेत असें आपल्या अनुभवावरून ओळखून होता. तो ह्मणे, "ह्या लोकांनीं आल्व्हा, बडे सेनासाहेब यांची खिजमतगारांप्रमाणें सेवा केली; माझ्याशीं निकराचा संग्राम केला; पुढें तेच माझे दोस्त बनले; स्पॅनिश लोकांचा द्वेष करूं लागले; डॉन जॉन येतांच त्याचा त्यांनीं कासोटा धरला; त्याचा तुरा खालीं पडतांच यांनीं त्यास सोडिलें व माझा पक्ष स्वीकारला. मी येथें दाखल होतांच यांनीं मॅथिअसला पाचारण केलें."

घेंट येथें या वेळीं निराळीच घडामोड चालली होती. दरबारी-मंडळानें आर्शोची सुभेदारीच्या जागीं नेमणूक केली; व तो वीस पायदळें व तीनशें घोडेस्वार यांसह २० आक्टोबर रोजीं घेंट शहरांत दाखल झाला. अँटवर्प येथें लोकपक्षाची सरशी झाल्या दिवसापासून आर्शो हा पुन्हा ऑरेंजचा स्नेहांकित बंधु झाला होता; तथापि आर्शोची नेमणूक करून डॉन जॉनची सत्ता व कॅथोलिकधर्माचें वर्चस्व वाढविण्याची अंतःस्थ खटपट चालली आहे ही गोष्ट लोकांच्या नजरेस तत्क्षणींच येऊन चुकली. ही नेमणूक अर्थातच लोकांस फार नापसंत होती. फिलिपच्या अघोर जुलुमामुळें घेंट शहरचें पहिलें वैभव नष्ट झालें होतें; तथापि व्यापाराच्या व संख्येच्या मानानें हें शहर अद्याप मोठें बलिष्ठ व साहसी गणलें जात असे. नव्या धर्माचें या ठिकाणीं प्राबल्य विशेष व या शहरच्या धाडशी व जोमदार पुरुषसंख्येंत अद्याप वीस हजार जवानांनीं कांहीं विशिष्ट नवीनधर्मी पुढाऱ्यांचा इषारा होतांच हत्यारें उचलण्याविषयीं शपथा घेतल्या होत्या. आर्शोवर घेंट येथील कोणत्याच पक्षाचा विश्वास नव्हता. एक पक्ष त्याला आपमतलबी व दगलबाज समजत होता व दुसरा मूर्ख व अविचारी लोकांत त्याची गणना करीत असे! ऑरेंजनें ब्रुसेल्स येथें मांडलेल्या डावाच्या उलट डाव घेंट येथें चालवून मॅथिअसला त्या नास्तिकशिरोमणीच्या तावडींतून सोडवून काढण्याचा आर्शोप्रभृति मंडळींचा विचार आहे असें लोकपक्षाच्या नायकांस पूर्णपणें कळून चुकलें.

घेंट येथील लोकपक्षाच्या पुढाऱ्यांत इंबाईझ व रायहो या तरुण स-

दारांचें वजन या वेळीं विशेष होतें. हे दोन्ही गृहस्थ नामांकित घराण्यांपैकीं असून नष्टवैभव झाले होते; दोघेही पक्के ऑरेंजभक्त असून कॅथोलिकधर्म व स्पेन यांचे कट्टे शत्रु होते. धर्मसुधारणेच्या बाबतींत यांची गति सर्वांत पुढें होती; व ग्रीस व रोम येथील लोकसत्ताक राज्याच्या कल्पनेनें दोघांचींही माथीं भणाणून गेलीं होतीं; प्रजासत्ताक राज्याच्याच गोष्टी ते रात्रंदिवस बोलत असत व नेदर्लंडच्या सतरा परगण्यांचें एक सुंदर लोकसत्ताक राज्य होईल असे त्यांचे आपल्या इष्टमित्रांपाशीं उद्गार निघूं लागले. कांहीं लोक त्यांना मनोराज्य करणारे समजत; कांहीं बदफैली समजत. कावेबाजपणा व साहस यांची त्यांना मोठी हौस असे. लोकांना त्यांच्या कर्तबगारीबद्दल अगर नीतिमत्तेबद्दल विशेष खात्री नव्हती. ऑरेंजनें या माणसांचें वळण ओळखून त्याच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें एखाद्या साहसाच्या कामीं त्यांचा उपयोग होईल असा अंदाज करून ठेविला होता.

आर्शो घेंट येथें आल्यावर प्रांतिकसभेच्या लागोपाठ बऱ्याच कडाक्याच्या बैठकी झाल्या. ता. २७ रोजीं चॅम्पेनीनें नवा सुभेदार नेमल्याबद्दल दरबारीमंडळाचा हुकूम वाचून दाखविला. या वेळीं लोकांचे बहुतेक प्रतिनिधि हजरच नव्हते. जमलेले धर्माधिकारी व सरदार यांचीं लोकपक्षाच्या मागण्यांविरुद्ध फार आवेशयुक्त भाषणें झालीं. घेंट येथें कारस्थान आरंभिलेल्या सरदार लोकांच्या विचारांची दिशा या वेळीं स्पष्टपणें दिसून आली. या संधीस यमासनाच्या सत्रांत डुलकी घेत घेत "फांसावर चढवा" असें नेहमीं सांगण्याबद्दल प्रसिद्धीस आलेला न्यायमूर्ति हेसेल घेंट येथें राज्यकारभार पहात होता. त्यानें फ्लँडर्झच्या माजी सुभेदारास पाठविलेलें एक पत्र पकडण्यांत आलें. त्याचा आशयः—फ्लँडर्झ प्रांतांतील बहुतेक प्रमुख मॅजिस्ट्रेट जॉनच्या पक्षास वळविले आहेत. आर्शोची सुभेदारीच्या जागीं नेमणूक झाल्यावर सरकारचे सर्व हेतु पूर्ण करण्याची आम्ही खटपट करूं; व त्या धर्मभ्रष्टाची यथासांग खोड मोडण्याची तजवीज होईल." हें पत्र खरें असल्यास या धर्मभ्रष्टास आपल्या बचावाचा उपाय योजणें जरूर होतें; खोटें असल्यास लोकपक्षास उत्तेजन देण्याचें काम त्याच्या योगानें बेमालुम झालें असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

बंडवाल्यांचा पक्ष राष्ट्रसभेंत संख्येच्या मानानें फार कोता व दुर्बल होता; ह्मणून त्यांनीं हल्लींच्या प्रसंगीं उद्भवलेल्या बादळापुढें मान बांकविण्याचा निश्चय केला. त्यामुळें विरुद्ध पक्षाचे लोक जास्तच फुगले व ते घेंटच्या लोकांस चार्लस बादशहानें केलेल्या शासनाची आठवण देऊं लागले. 'जुन्या धुरकटलेल्या सनदांचा लौकरच निकाल लागेल व घेंटच्या ग्रामस्थांच्या गळ्यांत फांस येऊन पडतील' असें ते उघडपणें बोलूं लागले. प्रांतिकसभेंत हा वाद चालला असतां रायहो टूर्नेला जाण्याच्या मिषानें बाहेर निघाला; व त्यानें अँट्वर्प येथें राजपुत्राची गांठ घेतली. सद्यःस्थितीचें भयप्रद चित्र ऑरेंजपुढें मांडून त्यानें आर्शोप्रभृति मंडळीस लौकर लगाम न घातल्यास मोठें अनर्थ ओढवतील असें प्रतिपादन केलें. त्यावर राजपुत्रानें संथपणानें विचारिलें, "मग आपला काय विचार ?" "श्रीमंतांकडून कांहीं मदत न मिळाल्यास मी लोकसमूहास आपल्या स्वातंत्र्याकरितां तरवारी उपसण्यास उत्तेजन देऊन त्यांच्याकडून हा कार्यभाग करविणार." राजपुत्राला हा बेत फार अव्यवस्थित वाटून त्यानें या अविचारी तरुण कटवाल्यांशीं संबंध ठेवून आपणास गौणपणा आणून घ्यावयाचा नाहीं असा विचार केला. दुसरे दिवशीं रायहोला राजपुत्रानें विचारिलें, "तुह्मास कांहीं विशिष्ट लोकांचें पाठबळ आहे काय ?" रायहो या प्रश्नावर बराच वेळ बोलत होता व राजपुत्र आपल्याच विचारांत निमग्न होता. राजपुत्राचें लक्ष आपल्या बोलण्याकडे नाहींसें पाहून रायहो मध्येंच निघून गेला. त्याच्या मागोमाग राजपुत्रानें आल्डेगोंडला त्याजकडे पाठविलें. आल्डेगोंडच्या भाषणावरून रायहोला येवढेंच कळून आलें कीं, राजपुत्र या खटपटींत स्वतः उघडपणें पडण्यास तयार नाहीं; परंतु त्यांत यश आल्यास त्यास वाईट वाटणार नाहीं. बाहेरून तटस्थवृत्ति ठेवून आंतून आपले हेतु साधण्याकरितां त्यानें वेळोवेळीं लढविलेल्या युक्त्यांपैकीं हें एक ठळक उदाहरण आहे.

घेंटशहरांत धामधूम व दंगे सुरू झाले होते. एके दिवशीं इंबाईझनें भर रस्त्यांत आर्शोला विचारिलें कीं, जुन्या सनदा पाळण्याचें आपण आपलें वचन पुरे कधीं करणार ? आर्शोनें त्याकडे दुर्लक्ष केलें; परंतु इंबाईझ आपला आग्रह सोडीत नाहींसें पाहून तो रागानें म्हणाला, "सनदा !

सनदा! तुमच्या गळ्य.त फांस घालून तुमचीं तोंडें बंद करण्याचीं साधनें आह्मापाशीं आहेत. तुमचा शिकारी कुत्रा ऑरेंज तुमचें रक्षण कोठवर करतो तें पाहूं." हे शब्द ऐकतांच इंबाईझ आपल्या साथीदार मंडळींकडे तडख गेला; व त्यानें झालेली हकीकत कळवून त्यांस कंबरा बांधण्यास प्रोत्साहन दिलें. हे कटवाले तयारीच करून बसले होते. शहरांत लोक ठिकठिकाणीं जमाव करूं लागले. दोनप्रहरीं रायहो परत येतांच त्यानें आगींत तेल ओतण्यास प्रारंभ केला. "पाहतां काय! उठा; आणि ही गुलामगिरी व धर्मसंशोधन एकदाचें निकालास लावा." असें बोलून तो शहरांत लोकांस बाहेर काढूं लागला. बहुतेक सर्व युद्धक्षम लोक चिलखतें चढवून व शस्त्रें घेऊन पूर्वरात्रीं शहरच्या मोठ्या चौकांत जमले. हा मोठा जमाव प्रथम आर्शोच्या वाड्याकडे निघाला. जनसमूह पाहतांच रखवालदारांनीं लगबगीनें वाड्याचा दरवाजा बंद केला. आंत प्रवेश होण्याचा मार्ग बंद झालेला पाहून लोकांनीं वाड्यास बाहेरून आग लावण्याची तयारी चालविली. हा दुर्धर प्रसंग पाहून आर्शोनें पोक्त विचार केला व तो बंडवाल्यांचे स्वाधीन झाला. बंडवाल्यांनीं त्या रात्रीं शहरांत फिरून दरोबस्त सरकारपक्षीय सरदारांस व धर्माधिकाऱ्यांस कैद केलें. चॅम्पेनीला मात्र त्यांनीं पळून जाण्यास प्रतिबंध केला नाहीं. याप्रमाणें बिंदुमात्र रक्तपात न होतां फ्लँडर्स प्रांतांत धर्मक्रांतीचें काम उरकलें. असे अनेक प्रसंग यापुढें या प्रांतांत घडून आले. घेंट शहरांत एक हंगामी राज्यव्यवस्था स्थापन करण्यांत आली; या व्यवस्थेंत मुख्य अधिकार अर्थातच रायहोला मिळाला. राष्ट्रसभा व ऑरेंज यांनीं कायमची व्यवस्था करीपर्यंत रायहोचा हुकूम चालविण्याविषयीं लोकांनीं शपथा घेतल्या. ता० ९ नोव्हेंबर रोजीं घेंटचे सरदार, सामान्य लोक, जनसमूह यांच्या तर्फे एक जाहिरनामा प्रसिद्ध झाला. त्यांत आर्शो व तत्पक्षीय लोक जॉनशीं गुप्त मसलत करून स्पॅनिशसत्ता स्थापन करणार असल्यामुळें, व ऑरेंज व नवा धर्म यांच्या विरुद्ध त्यांचा रोख असल्या-मुळें ही क्रांति करणें व कॅथोलिकधर्मी बड्या लोकांस अटक करणें जरूर झालें असें प्रतिपादन केलें होतें.

या क्रांतीचा सर्व देशभर मोठा जबरदस्त परिणाम झाला. हे विलक्षण

व दांडगाईचे प्रकार राष्ट्रसभेच्या बहुतेक सदस्यांस अर्थातच पसंत पडले नाहींत. चॅम्पनीनें ते बंद करण्याविषयीं राजपुत्रास विनंति केली. आल्डेगोंडनेंही बंडवाल्यांची कानउघाडणी करण्यासाठीं व पकडलेल्या लोकांची मुक्तता करण्यासाठीं एक वकील घेंटकडे रवाना केला. बंडवाल्यांनीं ता. १४ नोव्हेंबर रोजीं गतगोष्टी विसरण्याबद्दल त्याजकडून शपथ घेऊन फक्त आर्शोस बंधमुक्त केलें. यानंतर कांहीं आठवड्यांनीं खुद्द राजपुत्र प्रांतिकसभेच्या आग्रहावरून घेंट येथें आला. या प्रसंगीं त्याच्या सन्मानार्थ केलेल्या तयारींत साहित्यप्रयोगी मंडळ्यांचा विशेष सुळसुळाट झाला होता. या मंडळ्यांच्या प्रयोगांत एकीकडे धृति, देशभक्ति, स्वातंत्र्य, दया, दक्षता व दुसऱ्या बाजूस खून, दरवडे, राष्ट्रद्रोह वगैरे पात्रांची एकमेकांविरुद्ध भाषणें व पदें ऐकतां ऐकतां कित्येक तास लोटले. शेवटीं घेंटच्या तहांत ठरलेल्या सहिष्णुतादि धर्मांचे देखावे व प्रयोग होऊन हा स्वागतसमारंभ पुरा होण्यास बरीच रात्र झाली. ता. ७ दिसेंबर रोजीं प्रांतिकसभेनें डॉन जॉन हा राष्ट्रशत्रु व शांतता भंग करणारा असल्यामुळें त्यास सुभेदारी व इतर लष्करी अधिकार यांवरून दूर केला आहे; राष्ट्रांतील कोणीही इसमानें त्याचा हुकूम मानल्यास अगर त्यास मदत केल्यास तो राजद्रोही समजला जाईल व त्याची मिळकत सरकारांत जप्त होईल; वगैरे मजकुराचा जाहिरनामा प्रसिद्ध केला. लढाईचा प्रसंग आतां जवळच येऊन पोंहोचला. "मळमळित तहापेक्षां झळझळीत लढाई बरी" असें ऑरेंजचें अव्वलपासून तत्त्व होतें तें त्यानें या प्रसंगीं पूर्ण अमलांत आणिलें.

ता. १० दिसेंबर रोजीं ब्रुसेल्स येथें कॅथोलिक व नूतनधर्मी लोकांनीं एका नवीन संयोगलेखावर आपल्या सह्या ठोकल्या. या लेखांत उभय पक्षांनीं एकमेकांच्या धर्मतत्त्वांस मान देऊन उभयतांच्या समाईक शत्रूपासून एकमेकांचें रक्षण करावें असे करार केले होते. हा ब्रुसेल्सचा नवा किंवा दुसरा संयोग होता. सन १५७७ च्या जानेवारी महिन्यांत ब्रुसेल्स येथील पहिला संयोग झाला; व त्यावरून नवीन धर्मास उपसर्ग न व्हावा म्हणून घेंटच्या तहांत केलेली योजना रद्द झाली होती. पोपधर्माचें प्राधान्य वाढून नवीनधर्मीयांचा पूर्ववत् छळ होऊं

लागला होता. शाश्वतशासनावरून ही वस्तुस्थिति कायम झाली; व हॉलंड, झीलंडपासून इतर पंधरा प्रांत विभक्त झाले. डॉन जॉननें लोकपक्षाशीं उघडपणें विरोध आरंभिल्यानंतर सर्व प्रांतांतील विविधधर्मी लोकांस पुन्हा राष्ट्रीय ऐक्याची अवश्यकता भासूं लागली. यानंतर ब्राबंटच्या लोकांनीं राजपुत्रास ब्रुसेल्सला पाचारण केलें. तेथें असतां सहिष्णुतातत्त्वाच्या साधनानें पुन्हा सर्व राष्ट्राचें ऐक्य करण्याकरितां त्यानें हा नवा करार ठरविला. या करारास सरकारच्या लष्करांत जाऊन बसलेल्या कॅथोलिकधर्मी सरदारांची सुद्धां मान्यता मिळाली. दुराग्रहाच्या कालांत केवळ जन्मभूमीच्या कल्याणाकडे लक्ष देऊन सर्व पंथांच्या लोकांनीं या नवीन लेखास मान्यता दिली; हें पाहून ऑरेंजच्या मनांत स्वराष्ट्राच्या भावी विकासासंबंधीं कांहीं अचाट कल्पना येऊं लागल्या यांत नवल नाहीं. सर्व प्रांतांचा हा शेवटचा ऐक्यप्रसंग होता. यानंतर कांहीं कालानें नेदर्लंडचे सात प्रांत इतर प्रांतांपासून कायमचे तुटक झाले व त्यांनीं आपला स्वतंत्र संयोग करून एका बलाढ्य लोकसत्ताक राज्याची स्थापना केली. बाकीचे प्रांत बरींच वर्षें इकडे तिकडे लोंबकळून शेवटीं या शतकांत स्वतंत्रसंयुक्तसंस्थानांच्या दर्जास पोंहोचले.

ता. ७ जानेवारी १५७८ रोजीं लंडनशहरांत नेदर्लंडच्या वकिलानें इंग्लंडच्या दरबाराशीं एक तहनामा ठरविला. या तहांत असें ठरलें कीं, नेदर्लंडच्या राष्ट्रसभेनें दहा लक्ष रुपयांपर्यंत कर्ज कोठेंही काढल्यास त्याबद्दल इंग्लंडच्या राज्ञीनें जामीन रहावें; इंग्लंडच्या राणीनें नेदर्लंडास पांच हजार पायदळ व एक हजार घोडदळाची कुमक करावी; या सैन्याचा खर्च नेदर्लंडनें सोसावा; मात्र या उपकृतीबद्दल नेदर्लंडच्या मन्त्रीमंडळांत इंग्लंडचा एक प्रतिनिधि असावा. इंग्लंडला परचक्राचें निवारण करण्याचा प्रसंग आल्यास नेदर्लंडनें इतकीच मदत करावी; व नौकायुद्धाचा प्रसंग आल्यास चाळीस तारवांची कुमक करावी. राजपुत्रास मॅथिअसचा नायबसुभा नेमावें. हा तह दोन्ही पक्षांस मान्य होतांच ब्रुसेल्सच्या संयोगासंबंधानें राष्ट्रसभेंत एकवाक्यता झाली. या लेखावरून मॅथिअस सरसुभेदार झाला; परंतु त्याच्या हातांत सत्ता मात्र काडीइतकी राहिली नाहीं. ऑरेंजकडे रूवर्डपद कायम झालें. लोकांत मॅथिअस हा

ऑरेंजचा कारकून असें म्हणण्याचा प्रघात पडला होता. मॅथिअसला सुभेदारपद देतांना त्याच्याकडून कबूल करून घेतलेले करार येणेंप्रमाणें होते. मॅथिअसनें दरबारीमंडळाच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालवावा; हें प्रधानमंडळ राष्ट्रसभेनें नेमावें; त्यांतील सभासद अस्सल नेदर्लंडवासी, खरे देशभक्त असावेत; ते महत्वाकांक्षी अगर स्वार्थसाधु नसावेत. मन्त्रीमंडळापुढें येणाऱ्या प्रश्नांचा निकाल बहुमतानें व्हावा; राष्ट्रासंबंधीं खर्चाच्या पैशाची मागणी, कर्जाची उभारणी, परराष्ट्रांशीं तह, लढाया, सख्य अथवा कट वगैरे गोष्टी सुभेदारानें राष्ट्रसभेच्या संमतीवांचून करूं नयेत; सभेच्या विचारावांचून त्यानें कोणताही बटहुकूम सोडूं नये अगर कायदा प्रसिद्ध करूं नये. मन्त्रीमंडळापैकीं एखाद्या सभासदानें सर्व सरकारी ठराव व खलितें यांचे मसुदे करावे. राष्ट्रसभेस पाहिजे तेव्हां व पाहिजे तितके वेळ भरण्यास मोकळीक असावी; कोणत्याही एका प्रांताच्या प्रतिनिधींच्या विनंतीवरून राष्ट्रसभा भरेल; त्यास सुभेदाराच्या मंजुरीची अवश्यकता नाहीं; प्रांतोप्रांतीच्या सभा आपल्या मर्जीनुरूप वाटेल त्यावेळीं व वाटेल तितके वेळ भरतील; सर्व लहानमोठ्या लष्करी अंमलदारांच्या नेमणुका करणें, फौज ठेवणें, किल्ल्यांतून शिबंदी ठेवणें वगैरे अधिकार राष्ट्रसभेकडे असावेत; लढाईच्या प्रसंगीं सर्व व्यवस्था मन्त्रीमंडळाच्या विचारानें सुभेदारानें पहावी; प्रांतिक सुभेदारांच्या नेमणुका सरसुभेदारांनीं आपल्या प्रधानांच्या सल्ल्यानें कराव्या; नवे कर बसविणें, सरकारी वसुलाचा बेवारा करणें वगैरे गोष्टी सुभेदारानें मन्त्रीमंडळाच्या सल्ल्यानें कराव्या. या राज्यव्यवस्थेस मॅथिअसची ता. १७ दिसेंबर रोजीं मान्यता मिळाली; व ता० १८ जानेवारी १५७८ रोजीं मॅथिअसचा सुभेदारपदारोहण समारंभ झाला. गेल्या नऊ महिन्यांत ब्रुसेल्सशहरांत हा तिसरा व सर्वांत मोठा समारंभ झाला. या वेळीं प्रयोगी मंडळ्यांनीं नभोमंडळांतील चमत्कारांचे प्रयोग करून त्यांत सर्वांत श्रेष्ठ ताऱ्याचें स्वरूप मॅथिअसला दिलें होतें; याशिवाय अनेक समयोचित स्वदेशी व विदेशी ऐतिहासिक प्रसंगांचे प्रयोग मंडळ्यांनीं या समयीं करून दाखविले. गांवांत नृत्यवाद्यांचा अहोरात्र गजर चालला होता; व सर्व शहर मेजवान्या व मजलसी यांत निमग्न

झालें होतें. दुसरे दिवशीं नवीन राज्यव्यवस्था चालविण्याबद्दल मॅथिअस-च्या शपथा झाल्या; व त्यानंतर बडा खाना झाला.

इकडे डॉन जॉन नेमूरच्या किल्ल्यांत पिंजऱ्यांत कोंडलेल्या सिंहाप्रमाणें रागानें हातपाय आपटीत बसला होता. बंडवाल्यांनीं त्याला पूर्णपणें घेरलें होतें; व जुन्या धर्माची धूळधाण केली होती. जर्मन बादशहाच्या भावास हाताखालीं कारकुनाप्रमाणें घेऊन राजपुत्र ऑरेंज ब्रुसेल्स येथें खुशाल राज्यकारभार करीत होता. अशा प्रसंगीं लढाईचा प्रसंग समीप येऊन पोंहोचल्यामुळें जॉनचें मन बरेंच प्रफुल्लित झालें. लुक्सेंबूर येथें एक लहान पण कसलेलें सैन्य झपाट्यानें गोळा होत होतें; मॅन्स्फील्डनें फ्रान्समध्यें सैन्याची भरती चालविली होती; व अॅलेक्झँडर पार्मा इताली व स्पेन-पैकीं कांहीं नामांकित पलटणें घेऊन दाखल झाला होता. अलेक्झँडर हा जॉनचा शाळेंतील सोबती व खेळगडी होता. जॉनचें कृश झालेलें शरीर व फिकट चेहेरा पाहून त्यास अत्यंत दुःख झालें. वारंवार अप-मान व दुःख सोसून जॉनची अशी स्थिति झाली होती. तथापि रण-दुंदुभि कानीं पडतांच तो अगदीं ताजातवाना झाला होता. ता. २५ जानेवारी रोजीं जॉननें फ्रेंच, जर्मन व फ्लेमिश भाषेंत एक जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्यांत, आपण नेदर्लंड देशास दास्यत्व देण्यास आलों नाहीं, नेदर्लंडचें संरक्षण करण्याकरितां आलों आहों; आपला राजाची सत्ता व कॅथोलिकधर्म स्थापन करण्याचा हेतु आहे; त्या कामीं सर्व राजनिष्ठ लोकांनीं सरकारास मदत करावी; तसें केल्यास गतगोष्टीबद्दल त्यांस पूर्ण माफी मिळेल, असा मजकूर होता. जॉनच्या सैन्याची संख्या वीस हजारांपर्यंत जाऊन पोंहोचली. त्यावर जॉन, अलेक्झँडर, मॅन्स्फिल्ड, मेंडोझा वगैरे नामांकित सेनापति होते. राष्ट्रपक्षाच्या फौजेची या वेळीं फारच गैरव्यवस्था होती. त्यांचीही सैन्यसंख्या सुमार वीस हजार झाली. परंतु त्यावरील अंमलदार बहुतेक जुन्या धर्माचे सरदार असून त्यांच्यांत परस्परांविषयीं अविश्वास व ऑरेंजबद्दल अतिशय तीव्र मत्सर-भाव दिसून येत होता. लालेन, ईगँड, ला मॉट वगैरे गृहस्थांनीं पूर्वीं जॉनच्या हाताखालीं कामें केलीं होतीं; व ते या प्रसंगीं अजीबात गैर-

हजर राहिले. बाकीचे सेनापति अल्पवयी व अनुभवशून्य होते. या वेळीं जॉनला दुजोरा देण्याकरितां पोपनें एक आज्ञापत्र प्रसिद्ध केलें. त्यांत झीलंडच्या लोकांनीं पूर्वी एक वेळ महंमदी धर्माचा चांद प्रतिपक्षाचा उपहास करण्याकरितां आपल्या डोक्यावर धारण केला होता; त्या गोष्टीवर विशेष जोर देऊन सर्व नेदर्लंडराष्ट्र धर्मभ्रष्ट व नास्तिक ठरविलें होतें; व या लोकांस शासन करण्याकरितां जॉननें नेदर्लंडांतील मठांच्या व धर्माधिकाऱ्यांच्या मिळकती खुशाल उपयोगांत आणाव्या अशी त्यास अनुज्ञा दिली होती. राष्ट्रपक्षाच्या सैन्याचे तीन भाग केले होते. स्वदेशी पायदळ डीहेझ व मॉंटिनी यांच्या हाताखालीं अग्रभागीं होतें; मध्यभागीं विदेशी पलटणें असून त्यांच्यावर बॉघ्(हा आतां देशभक्तांस येऊन मिळाला होता) व चॅंम्पेनी हे अधिपती होते, पश्चाद्भागीं सर्व घोडदळ तरुण एग्मॉन व लुमे यांच्या सेनापत्याखालीं होतें. हाने व मुख्य सेनानी डीग्वायनीज सर्व सैन्यावर देखरेख करीत होते. डॉन जॉनच्या सैन्यांत सर्व घोडदळ अग्रभागीं होतें; स्पॅनिश व जर्मन पायदळाचे दोन चौक मध्यें होते; व मागें सामानसुमान व दारूगोळा यांचें रक्षण करण्याकरितां वालून शिपायांचा एक चौक ठेविला होता. जॉन व पार्मा हे मध्यभागीं, अग्रभागीं गॉंझॅगो व मागें मॅन्स्फील्ड अशी सेनापतींची योजना होती. जॉननें घोडेस्वारांच्या लहान लहान टोळ्या पुढें पाठविल्या होत्या; त्यांनीं रस्त्याची टेहळणी करून कांहीं दबा धरून बसलेल्या शत्रूंच्या टोळ्या पकडून आणिल्या. या लोकांकडून शत्रूंचे बेत समजले. राष्ट्रपक्षाचें सैन्य एका भयंकर दलदलीच्या बाजूनें गॅब्लूरकडे चाललेलें दुरून दिसतांच जॉननें गॉंझॅगो व मॉंड्रेगान यांस त्यांची पिछाडी मारण्याविषयीं हुकूम केला. पार्मानें दलदलींत शिरून बाजूनें वळून शत्रूच्या पृष्ठभागीं असलेल्या घोडदळावर एकदम हल्ला केला; त्याबरोबर विस्मय व भीति यानें गर्भगळित होऊन राष्ट्रसभेचा रिसाला सैरावैरा पळूं लागला. नंतर पार्मानें शत्रूच्या मध्यभागावर हल्ला केला. परंतु राष्ट्रपक्षाच्या रिसाल्यानें पळतांना तुडवून पुढील भागांची बहुतेक वाताहत केली होती; व ते लोकही भीतीनें पळूं लागले होते. अशा स्थितींत पुढें आलेल्या सहाशें स्पॅनिश स्वारांनीं डीड

तासांत राष्ट्रभक्तांची सरसकट कत्तल उडविली. स्पॅनिश सैन्यापैकीं दहा पांच लोक तरी या प्रसंगीं जखमी झाले किंवा नाहीं याबद्दल नेदर्लंडस्थ इतिहासकारांस सुद्धां संशय आहे. राष्ट्रभक्तांपैकीं रणभूमीवरून निसटून गेलेले कांहीं लोक पुढें असह्य यातना भोगून डॉन जॉनच्या क्रोधाग्नीस बळी पडले. जॉनला यासमयीं शत्रूचा सर्व खजिना, दारूगोळा व तोफा वगैरे सामान प्राप्त झालें. या जयाचें सर्व यश पार्माचें होतें. या लोकोत्तर जयामुळें नेदर्लंडच्या लोकांस सुद्धां स्पॅनिश लोकांचें शौर्य व युद्धचातुर्य यांजबद्दल आश्चर्य वाटावें हें साहजिक होतें. राष्ट्रपक्षाचे सेनापती चॅम्पेनी व बॉसु हे अर्धवट देशभक्त होते; हेस व एग्मॉन हे अल्लड होते; व बाकीचे अंमलदार कांहीं गृहकार्याच्या मिषानें गैरहजर राहिले होते. सैन्य बोलून चालून भाडोत्री, या कारणामुळें गेंब्लूरच्या लढाईचा असा परिणाम व्हावा हें स्वाभाविक होतें. गेंब्लूरच्या अपजयास कॅथोलिक सरदारांचें आत्मघातकी वर्तन हें मुख्य कारण होतें अशी लोकांची खात्री झाली; त्यामुळें त्यांचा सूड घेण्याची ब्रुसेल्समध्यें लोकांत उचल दिसूं लागली. हा समय पाहून राजपुत्रानें बरोबर जाऊन लोकांचें सांत्वन केलें व सरदार लोकांवर आलेला प्रसंग टाळला. या अपजयामुळें लोकांस ऐक्याची जास्त जरूर भासूं लागली; ऑरेंजचें वजन जबरदस्त वाढलें; व नवें सैन्य जमवून राष्ट्रपक्षाची बाजू सावरण्याच्या कामीं त्याच्या सूचना बिनहरकत अमलांत येऊं लागल्या.

घेंटच्या तहापासून हॉलंड प्रांताचें राजधानीचें शहर आम्स्टर्डम हें सरकारच्या तावडींतून सोडविण्याचा ऑरेंजचा विशेष मनोदय होता. सर्व हॉलंड प्रांत अव्वलपासून निश्चयानें व शौर्यानें धर्मस्वातंत्र्याकरितां जुलुमाशीं झगडत असतां त्याचें मुख्य शहर अद्याप शत्रूच्या छायेखालीं रहावें हें स्वभावविरुद्ध होतें. ऑरेंजप्रमाणेंच सर्व खऱ्या देशभक्तांची आम्स्टर्डॅम प्रजापक्षास मिळवून घेण्याची इच्छा होती. परंतु या शहरांत कॅथोलिकधर्मीय अधिकारी व धर्मगुरू यांचें वजन फार असल्यामुळें नवीनधर्मी जनसमूहाचा त्यांच्यापुढें कांहीं इलाज चालेना. हे लोक कोणत्याच अटीस कबूल होईनात. त्यावर हॉलंड-झीलंडचे लोक सक्ती-च्या उपायांचा प्रस्ताव करूं लागले व तदनुरूप त्यांचे मधून मधून यत्न-

ही होऊं लागले. परंतु सक्तीच्या उपायांचें अवलंबन करूं नये असें राजपुत्राचें हॉलंडच्या सभेस वारंवार आग्रहपूर्वक लिहून जात होतें. उलटपक्षीं आम्स्टर्डममधील राजभक्त व डॉन जॉन यांचे आम्स्टर्डमच्या जोरावर हॉलंडवर घाव घालण्याचे बेत चालले होते. सन १५७८ च्या फेब्रुवारी महिन्यांत युट्रेक्ट येथें ठरलेली तडजोड आम्स्टर्डम शहरच्या लोकांनीं मान्य केली. नव्या व जुन्या धर्माच्या लोकांनीं तोडून दिलेल्या ठिकाणीं प्रार्थना करावी; उभयतांनीं एकमेकांस उपसर्ग देऊं नये; नवीनपंथी लोकांस आपलीं प्रेतें गांवच्या मसणवटांत पुरण्यास हरकत होऊं नये, वगैरे करार उभयपक्षीं पसंत ठरले.

मध्यंतरीं न्वार्कार्मीजचा भाऊ स. डी सिली हा स्पेनमधून राजाचा ब्रुसेल्सच्या सभेस जबाब घेऊन आला. या खलित्याची भाषा राजाच्या ठरीव पद्धतीप्रमाणें मधुर व प्रेमळ होती; मात्र त्यांतील मजकुरावरून ऑरेंजनें स्वीकारलेला वर्तनक्रम सर्वस्वीं न्याय्य होता असें ठरत होतें. डॉन जॉनच्या मनांत साम करण्याचें असलें तरी ती गोष्ट त्याला घडवून आणितां येणार नाहीं असें ऑरेंजला पक्कें समजलें होतें. धर्मच्छल व धर्मस्वातंत्र्य यांची टक्कर कायमची जुंपली होती; राजाचा ईश्वरदत्त हक्क व ईश्वराचीं खरीं तत्त्वें यांच्यामधील द्वंद्वाच्या निकालावर पुढील असंख्य पिढ्यांचें सुखदुःख अवलंबून होतें; व त्याचा अखेरचा निकाल सर्व ख्रिस्ती राष्ट्राच्या समक्ष नेदर्लंडच्या रणभूमीवर लागावयाचा होता हें राजपुत्राशिवाय कोणाच्याही लक्षांत या वेळीं आलें नव्हतें. डी सिलीनें आणिलेल्या खलित्यांत राजसत्ता व कॅथोलिकधर्म पांचव्या चार्लस बादशहाच्या वेळीं चालल्याप्रमाणें अबाध चालविण्याविषयीं आज्ञा केली होती. दहा वर्षांच्या धर्मच्छलरूपी सन्निपातानें जर्जर झालेल्या नेदर्लंडराष्ट्राचा ज्वरोपशम करण्यास राजानें या दोन साध्या औषधींची योजना कल्पिली होती. राजपुत्रानें व सभेनें या सूचनांचा धिक्कार केला व युद्धार्थ कंबरा बांधल्या. राजाचें ह्मणणें स्पष्टपणें लोकांस कळविण्याकरितां जॉननें जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्यांत कॅथोलिकधर्म निर्वेध चालविण्याविषयीं सभेनें पूर्वीं दिलेलें वचन पाळावें असें खोडेंच विधान केलें होतें. त्यावर सभेनें उलट एक लेख प्रसिद्ध करून हें विधान खोटें व मायावीपणाचें

आहे असें जाहीर केलें. त्यानंतर सभेनें मॅथिअसच्या सहीचें एक पत्र राजास पाठविलें; व त्यांत जॉनला परत बोलावून घेंटचा करार अमलांत आणावा अशी विनंति केली होती. डॉ. सिलीनें त्यावर सभेस एक खरमरीत पत्र पाठवून राजाज्ञा मान्य करण्याविषयीं नेदर्लंडच्या लोकांस सक्तीचा हुकूम केला; व राजपुत्रानें जॉनच्या स्वाधीन व्हावें असें सुचविलें. सभेनें आपल्या जबाबांत धर्माच्या बाबतींत जुलुमाचे हुकूम यापुढें चालणार नाहींत, परराष्ट्राच्या मदतीनें नेदर्लंडावर स्वारी करण्याचा बेत सफल होणार नाहीं, बादशहा व आल्व्हा यांच्या धोरणावर राज्य करण्याचा प्रयत्न आतां व्यर्थ आहे, वगैरे मजकूर लिहून पाठविला. उभयपक्षांत बरेंच वाग्युद्ध माजलें; फार उत्तेजक व मार्मिक हस्तपत्रकें व लेख या प्रसंगांत बरेच प्रसिद्ध होऊं लागले. राजपुत्रानें इंग्लंडमध्यें पैशाची व सैन्याची कुमक तयार करून ठेविली; अँट्वर्प शहरांत कांहीं रकम वर्गणीनें गोळा झाली; व कांहीं नव्या बाबी युद्धाच्या खर्चाकरितां बसविण्याचें ठरलें. सैन्याची जमवाजमव सुरू झाली; व त्यावर आर्शो, चॅम्पेनी, बॉद्व, एग्मॉन वगैरे सरदारांच्या पूर्वीप्रमाणेंच अविचारानें योजना होऊं लागल्या. जॉननें वारंवार राजापाशीं कुमकेची मागणी चालविली होती; दुटप्पी वर्तन ठेवून आतां निभाव लागणार नाहीं; ऑरेंजच्या हातीं सर्व राजसत्ता जात चालली आहे; युद्ध केल्या-वांचून नेदर्लंडांत सरकारचा व कॅथोलिकधर्माचा पाय टिकत नाहीं अशीं भयप्रद पत्रें जॉननें लिहिल्यावरून दहा लक्ष डोलरची रसद एकदम पाठवून व आणखी दोन लाख डोलर दरमहा पाठविण्याचें आश्वासन देऊन राजानें तीस हजार पायदळ, सोळा हजार घोडेस्वार व तीस तोफा तयार करण्याविषयीं हुकूम पाठविला; शिवाय वेळोवेळीं लागेल तितकी पैशाची मदत देण्याचें वचन देऊन सैन्याच्या जोरावर सक्तीच्या उपायानें बंड मोडावें; व प्रसंग पाहून स्थानिक अधिकारी व प्रमुख लोक यांजवर पैशाचा प्रयोग करावा असें लिहून पाठविलें. या कुमकेबरोबरच स्पेनमधून तयार होऊन आलेला एक जाहिरलेख जॉननें आतां ताबडतोब प्रसिद्ध केला. या लेखांत राष्ट्रसभेस व स्थानिक सभांस राजाच्या परवानगीवांचून भरण्याची मनाई केली होती; सर्व

सनदी मुलकी व लष्करी अधिकाऱ्यांचे अधिकार रद्द करून त्यांचा हुकूम कोणी मान्य करूं नये, अगर त्यांस कर वगैरे देऊं नये असें जाहीर केलें होतें. हा लेख अर्थांतच कोणी जुमानला नाहीं.

या सुमारास जर्मनीची राष्ट्रसभा वर्म्स येथें भरली होती; त्यांत ऑरेंजनें आपला मुखत्यार आल्डेगोंड व जॉननेंही आपले कांहीं मुखत्यार पाठविले होते. उभयपक्षाच्या शिष्टाईचा कांहीं उपयोग झाला नाहीं. या कामगिरीवर असतां आल्डेगोंडला जॉननें कांहीं विदेशी जहाजें मागवून आम्स्टर्डम शहरावर मोहिम करण्याचा विचार चालविला आहे अशी बातमी समजली. ती त्यानें नेदर्लंडमधील आपल्या स्नेहीमंडळीस कळविली; व तेथील कॅथोलिक अधिकारी व धर्मोपदेशक लोकांवर पूर्ण नजर ठेवण्याविषयीं सूचना पाठविली. या वर्गाचा उच्छेद करण्याचा आम्स्टर्डम येथील बार्डेझ नामक एका उच्चकुलीन ऑरेंजभक्तानें यापूर्वीच निश्चय केला होता. शहरच्या रखवालीच्या कामीं आपल्या धर्मबंधूंची योग्य प्रमाणानें योजना होत नाहींसें पाहून कॅल्व्हिन वगैरे नवीन पंथी लोक बरेच असंतुष्ट झाले होते; व ते शहरच्या मॅजिस्ट्रेटांचें उद्वासन करण्याच्या विवंचनेंतच होते. बार्डेझनें सुभेदार सानॉयकडून कांहीं शिपाई मिळवून, ते व आपले हत्यारबंद अनुयायी आम्स्टर्डममध्यें कटवाल्यांच्या घरांतून तयार करून ठेविले. ता. २४ मे रोजीं बार्डेझनें आपली सर्व तयारी झाल्याचें सानॉयला पत्रानें कळविलें; सानॉयकडून उत्तेजनपर उत्तर आलें. ता. २८ रोजीं बार्डेझ आपले चार सोबती घेऊन ग्रामसभेंत नेहमीच्या वादविषयक प्रश्नांची वाटाघाट करण्याकरितां गेला. दोनप्रहरच्या सुमारास एक कटवाला कचेरीच्या सार्वजनिक चौकाच्या बाजूकडील सज्जांत आला; तेथें त्यानें आपली टोपी मोठ्या गंभीर मुद्रेनें काढून पुन्हा डोक्यावर घातली. ही खूण पोंहोचतांच एक खलाशी दोन्ही हातांत निशाणें घेऊन चौकांत आला; व " राजपुत्रावर ज्यांचें प्रेम असेल त्यांनीं छाती करून माझ्या मागून यावें" असें मोठ्यानें ओरडून ह्मणाला. शिपाई व हत्यारबंद शहरवासी भुईंतून एकदम निघाल्याप्रमाणें चौकांत जमले. बार्डेझनें एक टोळी सभेच्या दिवाणखान्यांत नेऊन सर्व मॅजिस्ट्रेट लोक कैद केले. या वेळींच गांवांतील

सर्व कॅथोलिक पाद्री पकडण्यांत आले. पाद्री व मॅजिस्ट्रेट यांची एक टोळी करून बंदरांत एक जहाज तयार ठेविलें होतें त्याच्यावर त्यांस नेऊन पोंहोचविलें. हा मेळा रस्त्यानें चालला असतां "सुळावर न्या, सुळावर न्या" अशा लोकांच्या गर्जना चालल्या होत्या. पकडलेल्या लोकांस जहाजाकडे जातांना आपणास जलसमाधि मिळणार अशी खात्री वाटूं लागली. परंतु जहाज कांहीं अंतरावर गेल्यावर त्यांस एका समुद्राच्या धक्क्या-वर सोडून दिलें व त्यांनीं पुन्हा कधींही आम्स्टर्डम शहरांत जाऊं नये अशी त्यांस ताकीद मिळाली. या विनोदपर व मौजेच्या पद्धतीनें आम्स्टर्डम शहरांत अधिकारक्रान्ति झाली. नंतर शहरांत नवीन मॅजिस्ट्रेटमंडळ नेमण्यांत आलें. **बार्डेझ** यास सहजच या व्यवस्थेंत महत्वाचें पद प्राप्त झालें. प्रथम कॅथोलिकधर्मीयांची देवळांतून सर्वस्वी हकालपट्टी करण्यांत आली; परंतु कांहीं कालानें ऑरेंजच्या सूचनेवरून दोन्ही वर्गांस सारखे प्रार्थनेचे हक्क मिळाले. दुसरे दिवशीं हार्लेम शहरांत अशीच नवीन धर्माची सरशी झाली. **हॉलंड, झीलंडमध्यें** नवीन धर्माचा पूर्ण विजय झाला; व इतर प्रांतांतून धर्ममतांचें पाऊल झपाट्यानें पुढें पडूं लागलें. अँट्वर्पशहरांत एके रविवारीं पंधरा निरनिराळ्या पंथांचे उपदेशक एकाच वेळीं आपापल्या धर्मतत्त्वांप्रमाणें व्याख्यानें देतांना दृष्टीस पडूं लागले. राजपुत्र ऑरेंज सर्वांस सहिष्णुतातत्त्व शिकवीत होता.

इकडे जॉनच्या व सभेच्या सैन्यांच्या वारंवार चकमकी होऊं लागल्या; रिज्मेमांटनजीक आठ तास झटापट होऊन राष्ट्रपक्षाची सरशी झाली, सरकारचे एक हजार सैनिक रणांत पडले. या प्रसंगीं इलिजाबेथच्या वर्तनें **जॉन कॅसिमीर** दहा हजार जर्मन सैन्य घेऊन येण्याचें ठरलें असतां वेळेवर आला नाहीं; त्यामुळें मोठी लढाई टाळून **जॉन**ला आपल्या गोटाचा आश्रय घ्यावा लागला. कॅसिमीर आपल्या बारा हजार सैनिकांसह मेलिनजवळ **बॉसू**ला येऊन मिळेपर्यंत आगष्टची २६ तारीख गुदरली. नेदर्लंडला इंग्लंडची पैशाची व फौजेची कुमक पोंहोचविण्याची कामगिरी इलिजाबेथनें या गृहस्थाकडे सोंपविली होती. वास्तविक **फ्रेंच** राजपुत्र अलन्सन नेदर्लंड-वर स्वारी करण्याच्या तयारींत असल्याची बातमी इलिजाबेथला

समजल्यावरून त्याच्यावर तिनें हा मोहरा सोडला होता. ऑरेंजवर तिचा पूर्ण भरंवसा होता; तथापि त्याला मदतनीस ह्मणून तिनें या गृहस्थाची योजना केली. कॅसिमीर या धांदलींत आपला स्वतःचा कांहीं डाव साधण्याच्या विचारांत होता. तो आपणास ऑरेंजच्या बरोबरीचा मुत्सद्दी व त्याचा विश्वासुक स्नेही समजत असे. वस्तुतः त्याची योग्यता सर्व प्रकारें फार कमी होती. त्याचे स्नेही त्याला नेदर्लंडच्या भोंवऱ्यांत न पडण्याविषयीं सुचवीत होते. ऑरेंजला त्याच्याविषयीं तिरस्कार वाटत होता. त्याच्या येण्यानें नेदर्लंडच्या घडामोडींत फारच घोटाळा उत्पन्न झाला.

मॅथिअसची शिकार हातांतून गेल्यावर ऑरेंजच्या उत्कर्षामुळें अगदीं वेडावलेल्या कॅथोलिक सरदारांनीं अलन्सनला हातीं धरला. प्रसंग पडल्यास इंग्लिश राणीचा राजकीय व्यवहारांतील करनखरा मोडण्यास अलन्सनचा उपयोग करावा असें ऑरेंजनेंहीं पुष्कळ दिवस योजून ठेविलें होतें. येथवर इलिजाबेथ गोड बोलून व अघळपघळ आश्वासनें देऊन नेदर्लंडची भयंकर स्थिति हात जोडून मुकाट्यानें पहात बसली होती. फ्रेंच दरबारच्या वतीनें अलन्सन नेदर्लंडकडे निघतांच इंग्लंडची राणी व तिचे सल्लागार यांस नेदर्लंडच्या दुःखांबद्दल पाझर फुटला; व नेदर्लंडला जुलुमांतून सोडविण्यासाठीं धैर्यानें पुढें सर-सावलें पाहिजे असें इंग्लिश मुत्सद्यांनीं ठरविलें. अलन्सन हा मेडिसी घराण्यास शोभण्यासारखा विश्वासघातकी, दुष्ट, वेळ पडेल त्याप्रमाणें वागणारा, धर्मलंड पुरुष होता; व आपले अलौकिक गुण त्यानें वेळोवेळीं निरनिराळ्या पक्षांस मिळून आपला स्वार्थ साधण्याकरितां केलेल्या अघोर कृत्यांवरून लोकांच्या पूर्ण नजरेस आले होते. त्या कालच्या राजनीतीचें धोरण ओळखुन ऑरेंजनें अलन्सनच्या दुर्गुणांकडे कानाडोळा केला नसता, तर त्याला यूरोपच्या पुष्कळ राष्ट्रांचें शत्रुत्व संपादन करण्याचा प्रसंग आला असता. नेदर्लंडच्या कॅथोलिक सरदारांनीं अलन्सनचा परामर्श केला नसता तर आपण होऊन नेदर्लंडच्या धामधुमींत मुंडी खुपसण्याचा त्याचा विचार होता, व प्रसंग जुळून आल्यास नेदर्लंडपैकीं कांहीं प्रांत फोडून आपल्या आश्रयाखालीं घेण्याच्या कल्पना त्याच्या मनांत घोळत होत्या. अलन्सन ऑरेंजाविषयीं स्नेहभाव दर्शवीत होता.

व त्याला नेदर्लंडमध्यें येण्यास प्रतिबंध करणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत त्याला मॅथिअसप्रमाणेंच आपल्या लगामाखालीं घेणें एवढाच उपाय ऑरेंजला उरला होता. अलन्सन स्वारी करण्याकरितां सैन्य घेऊन नेदर्लंडमध्यें आल्याची बातमी समजतांच इलिजाबेथ रागानें अगदीं फणफणूं लागली. तिनें देऊं केलेल्या पैशानें तीन हजार पदाती व दोन हजार घोडेस्वार तयार करून ते कॅसिमीरच्या जर्मन सैन्यास जाऊन मिळण्याकरितां पाठवून दिले. या कुमारीव्रतस्थ राणीच्या औदार्याची मजल याच्यापलीकडे जाण्याची मात्र बिलकुल आशा नव्हती.

दुसरा कांहीं इलाज नाहींसें पाहून ऑरेंजनें अलन्सन बरोबर एक करार ठरविला. त्याचा सारांशः--स्पॅनिश लोकांच्या असह्य जुलुमापासून व डॉन जॉननें नाहक नेदर्लंडच्या लोकांवर शस्त्र धारण केलें आहे त्यापासून आपला बचाव करून घेण्यास अलन्सननें नेदर्लंड राष्ट्रास मदत करावी. दहा हजार पायदळ व दोन हजार घोडदळ त्यानें दोन महिने रणांत आणावें, पुढें या सैन्याची संख्या बरीच कमी केल्यास चालेल. राष्ट्रसभेनें अलन्सनला, " नेदर्लंडचा स्वातंत्र्यरक्षक व स्पॅनिश जुलुमापासून सोडविणारा " अशी पदवी द्यावी. अलन्सननें इलिजाबेथविरुद्ध कोणतीही खटपट करूं नये; राष्ट्राची अंतस्थ राज्यव्यवस्था पूर्ववत् चालेल; तिला योग्य मान देऊन अलन्सननें चालावें; राष्ट्रांतील स्थानिक राज्यसंस्था अगर अधिकारी यांजबरोबर त्यानें कांहीं विशेष करार स्वतंत्रपणें करूं नयेत; नेदर्लंडचें राजपद एखाद्या विदेशी राजपुत्रास देण्याचें ठरल्यास अलन्सनचा हक्क श्रेष्ठ समजला जाईल; राष्ट्रांतील सर्व शहरांवर राष्ट्रसभेचा अधिकार राहील; फ्रेंच सैन्याशिवाय इतर जातीचें सैन्य अलन्सननें चाकरीस ठेवूं नये; आगष्ट महिना संपेपर्यंत डॉन जॉनशीं कांहीं तडजोड ठरल्यास करावी. या करारांत एक बडी पदवी देऊन अलन्सनला ऑरेंजनें आपला अंकित करून सोडिलें होतें असें दिसून येईल.

आगष्टच्या दुसऱ्या पंधरवड्यांत जॉनशीं तडजोड करण्याची वाटाघाट सुरू झाली. राष्ट्रसभेनें तयार केलेला खर्डा जॉनपुढें मांडण्यांत आला. या वेळीं इलिजाबेथचे वकील कॉबॅम व वाल्सिंगम हेही हजर होतेच. त्यांनीं नव्या व जुन्या धर्माची कांहीं तडजोड ठरवावी अशाबद्दल

बरीच खटपट केली; ती निष्फळ झाली. कोणत्याही प्रकारें तडजोड होत नाहींसें पाहून राष्ट्रसभेचे व इलिजाबेथचे वकील निरोप घेऊन निघाले असतां जॉननें 'राष्ट्रसभेच्या मागण्या आपल्या मतें कितपत रास्त आहेत ?' असें इंग्लिश वकिलांस विचारलें. "त्या फार जबर आहेत, तडजोडीची अगर विचार करण्याची वेळ राहिली नाहीं" असें या वकिलांस कबूल करावें लागलें ! इकडे जॉनचें वर्तन फार अन्यायाचें व दिरंगाईचें आहे असें राष्ट्रसभेस पत्रानें कळवून, कॉबॅम व वाल्सिंगम हे इंग्लंडला चालते झाले ! नंतर जर्मन बादशहाच्या वतीनें श्वार्झबर जॉनकडे आला त्यानें राष्ट्राच्या जुन्या राजकीय संस्थांच्या द्वारें नेदर्लंडचा राज्यकारभार चालावा; राजाची सत्ता पूर्ण नियन्त्रित असावी; जॉननें सर्व किल्ले व ठाणीं राष्ट्रसभेच्या ताब्यांत देऊन सैन्य व अनुयायीवर्ग यांसह नेदर्लंडमधून निघून जावें; मॅथिअसनें ठरलेल्या कराराप्रमाणें नेदर्लंडच्या सुभेदारीचें काम चालवावें; धर्माचा प्रश्न राष्ट्रसभेच्या निकालावार सोपवावा; सर्व कैदी व जप्त केलेल्या मिळकती खुल्या कराव्या; देशाच्या बाहेर गेलेले लोक परत बोलवावे मॅथिअसनंतर दुसऱ्या सुभेदाराची नेमणूक राष्ट्रसभेनें करावी. श्वार्झबर हीं कलमें जॉनपुढें मांडण्याकरितां आला त्यावेळीं आजार, निराशा व भीति यांच्या योगानें जॉनची फार दीन स्थिति झाली होती. राजाची व कॅथोलिकधर्माची महती कायम राखण्यास त्याच्याजवळ कांहीं साधनें नव्हतीं. युद्ध चालविण्यास स्पेनमधून वेळेवर पैसा येईना. एस्कोव्हेडोचा स्पेनमध्यें राजाच्या हुकुमानें गुप्त रीतीनें खून झाल्याचें ऐकून त्यास फारच दहशत उत्पन्न झाली होती. त्यानें श्वार्झबरशीं वाटाघाट करण्याचेंच टाळलें. श्वार्झबरला त्यानें असें कळविलें कीं, फिलिपनें नेदर्लंडमधील सर्व प्रश्नांचा निकाल जर्मनबादशहावरच सोंपविला आहे.

मध्यंतरीं जून महिन्यांत सर्व नवीन पंथांची डोर्ट येथें धर्मसभा भरली होती. त्यांत त्यांनीं नवीन पंथांच्या धर्मव्यवस्थेसंबंधानें एक एकशेंएक कलमांचें शासन तयार केलें होतें; याच महिन्यांत नेदर्लंडांत धर्मस्वास्थ्य करण्याकरितां नवीन पंथांच्या पुढाऱ्यांनीं एक अर्ज मॅथिअसकडे पाठविला. ही संधि साधून राजपुत्र ऑरेंजनें धर्मसहिष्णुतेचें मुदतीचें

एक शासन तयार करून त्याच्यावर मॅथिअसची सही घेतली. हा शूर, शांत व एकांतवासी पुरुष या खवळलेल्या समुद्रामधून धर्मस्वातंत्र्याच्या ध्रुवाकडे निश्चयानें चालला होता; त्याच्या एकट्याच्या विवेकदीपाचा अंधुक उजेड त्या कालच्या घन अज्ञानतिमिरांत लुप्तप्राय होत असे. सर्व धर्मांचे लोक त्याला आपला शत्रू समजूं लागले. वरील अर्ज राष्ट्र-सभेपुढें येतांच ऑरेंजनें सर्व वर्गांच्या प्रतिनिधींस विचारपूर्वक ठरलेलीं आपापलीं मतें स्पष्टपणें कळविण्यास आव्हान केलें. या वेळीं सर्वांच्या जिभा बंद झाल्या; सर्वांनीं या बाबतींत त्याचाच अभिप्राय कळण्याविषयीं इच्छा प्रगट केली. अशी संधि पाहून त्यानें आपलें धर्मस्वातंत्र्याचें शासन पुढें केलें. हें शासन कायमचें अमलांत आलें असतें तर या प्रश्नाचा अखेरचा निकाल लागला असता. परंतु तें पुष्कळ प्रांतांत पसंत पडलें नाहीं. त्यांत भाषेचे व मजकुराचे बरेच फेरफार करण्याविषयीं सूचना सभेपुढें आल्या. अँट्वर्प शहरांत या लेखावरून पांच मंदिरें नव्या पंथांस तोडून दिलीं होतीं; व निरनिराळ्या पंथांनीं एकमेकांची आगळीक करूं नये असें ठरविलें होतें. नव्या धर्माचें वर्चस्व झालेलें पाहून चॅम्पेनी-प्रभृति कॅथोलिकधर्मी बड्या गृहस्थांस वैषम्य वाटून त्यांनीं सुभेदार मॅथिअस, राजपुत्र ऑरेंज, दरबारी-मंडळ, व राष्ट्रसभा यांच्या नांवचा एक महत्वाचा अर्ज तयार केला. त्यांत नवीन धर्मतत्त्वांप्रमाणें उपासना करण्यास कायद्यानें मोकळीक दिल्यास लोकांत नास्तिकपणा वाढून नेदर्लंड राष्ट्राची सर्व राष्ट्रांत छी थू होईल; नवीन पंथांस फ्रान्सच्या मोठमोठ्या शहरांत व विशेषतः पारिसमध्यें थारा न मिळाल्यामुळें हा ठिकाणीं लोक सुखी व संपन्न झाले आहेत; वगैरे विधानें केलीं होतीं. हा अर्ज चॅम्पेनी व त्याचे साथीदार यांनीं मोठ्या थाटानें स्वतः नेऊन ब्रुसेल्सच्या मॅजिस्ट्रेटांपाशीं दिला. तेथें त्यासंबंधानें बरीच चर्चा होऊन अर्जदार व अधिकारी भांडत रस्त्यांत आले. तेथें "अर्ज वाचा," "अर्ज वाचा" असा जमलेल्या लोकांनीं घोष सुरू केल्यावरून वाचनास सुरवात झाली. पारिसचें नांव येतांच बार्थोलोम्यूच्या सणाच्या दिवशीं नवीनधर्मी लोकांची झालेली कत्तल लोकांस आठवून, तसाच कांहीं गुप्त बेत ब्रुसेल्समध्यें चालू असावा असा त्यांस संशय आला.

वास्तविक या संशयास आधार कांहींच नव्हता. चॅम्पेनी हा ग्रॅन्व्हिलचा भाऊ असल्यामुळें त्याच्याविषयीं लोकांत विनाकारण गवगवा झाला. या काल्पनिक शंकेनें लोकांची मनें बिथरून त्यांनीं सर्व कॅथोलिक सरदारांस तेथल्या तेथें बिड्या ठोकल्या व तुरुंगांत पाठविलें. या संकटांतून चॅम्पेनी तेवढा निसटून गेला. या सुमारास ऑरेंजचा भाऊ स. जॉन यास हॉलंडच्या सभेनें आपला सुभेदार पसंत केला.

हे प्रकार अँट्वर्प व ब्रुसेल्समध्यें चालले असतां दोन्ही सैन्यें एकमेकांकडे टकमक पहात बसलीं होतीं. द्रव्याभावामुळें दोन्ही पक्षांच्या नाड्या गारठल्या होत्या. अलन्सननें मॉन्स येथें बसून जॉनविरुद्ध एक आवेशयुक्त जाहिरनामा प्रसिद्ध केला. डॉन जॉन ब्रूजी येथें मानसिक व शारीरिक तापानें विव्हल होऊन पडला होता. राजाच्या केवळ शब्दांच्या खाणींतून सोनें निष्पन्न होऊन आतां लढाई चालावयाची होती; एस्कोव्हेडोचा वृत्तांत समजल्यापासून त्याला आपला जीव सुरक्षित वाटेना; नेदर्लंडचे लोक त्याला पाण्यांत पाहत होते; व नेदर्लंडच्या अद्वितीय मुत्सद्यानें जेथें तेथें त्याला फसवून व त्याची मानहानि करून त्याला भ्रमिष्ट करून सोडिलें होतें. लढाईवांचून डेरे हलवीत फिरणें व प्रधानमंडळावांचून नेहमीं राजकीय प्रश्नांचा विचार करणें या व्यवसायांमुळें तो अगदीं थकून गेला. राजपुत्र ऑरेंजला आपल्या कारकीर्दीच्या प्रारंभीं क्षमा करून आपल्या आश्रयाखालीं घेऊं पाहणाऱ्या या तरुण वीराची अशी शोचनीय स्थिति झाली होती. तो यांतून आपली सोडवणूक कशी होईल या विवंचनेंत होता. त्यानें शेवटीं राजास एक हृदयद्रावक पत्र अंथरुणावरून लिहिलें. "मी तापानें भाजत आहें; हल्लींचा प्रसंग जिवावरचा आहे; मला कांहीं सुचत नाहीं; मी या वेळीं जाऊं कोठें व काय करूं याबद्दल महाराजांकडून मला खुलासेवार सूचना याव्या; हें जिवावरील संकट प्राप्त झालें आहे; यांत निदान अब्रूचा बचाव झाल्यास आह्मी धन्यता मानूं." हें पत्र लिहिल्यावर दहा दिवसांनीं लिपांटोच्या वीरानें एका झोंपडींत देहावसान केलें. त्यानें मरणापूर्वीं अलेक्झँडर पार्मास आपले सर्व अधिकार अर्पण केले. त्याला विषप्रयोग झाला असावा असा लोकांत संशय होता; परंतु त्यास कांहीं एक खात्रीलायख पुरावा

नाहीं. त्याची शेवटची इच्छा अशी होती कीं, आपला देह स्पेनमध्यें आपल्या बापाच्या कबरस्थानाजवळ पुरण्यांत यावा. ती इच्छा होईल तितक्या थोडक्या खर्चानें पुरी करण्याकरितां त्याच्या शरीराचे तीन तुकडे करून व ते पोत्यांत भरून फिलिपनें शिपायांच्या डोक्यांवरून स्पेनमध्यें आणविले; व तेथें ठरलेल्या ठिकाणीं सन्मानपूर्वक त्यानें त्यास माती दिली.

मरणाचे वेळीं डॉन जॉनचें वय तेहेतीस वर्षांचें होतें. त्यानें पूर्ववयांत मोठमोठे युद्धप्रसंग करून शौर्याबद्दल बराच लौकिक संपादन केला होता. नेदर्लंडमध्यें त्याच्या या गुणास अवकाशच मिळाला नाहीं. तो फार देखणा होता; व एखाद्या महत्वाकांक्षी शिलेदाराप्रमाणें राज्य संपादन करून ऐश्वर्य, सत्ता व प्रपंचसुख मिळविण्याची त्याला हाव होती. इजिप्त व ब्रिटन येथील राज्यें मिळविण्याच्या त्याच्या कल्पना कशा विलयास गेल्या हें वाचकांस माहित झालेंच आहे. नेदर्लंडमध्यें ज्या महत्त्वासंबंधानें युद्ध चाललें होतें त्याचें महत्व अगर पर्यवसान त्याला बिलकुल समजलें नव्हतें. वुइल्यम ऑरेंजनें त्याला वेळोवेळीं दिलेले शह लक्षांत घेतले असतां त्याच्या मुत्सद्दिरीचीही बरोबर कल्पना करितां येईल.

---

# भाग १४ वा.

## इ. स. १५७८-८१.

### अॅलेक्झँडर पार्मा

पूर्ववृत्तान्त-घेंटमधील बंड-कॅसिमीर व अँजु यांचें प्रयाण-राष्ट्रद्रोह-आरास येथील क्रान्ति व प्रतिक्रान्ति-यूट्रेक्टचा संयोग-मास्ट्रिचला वेढा-राष्ट्रैक्य-खटपट-पार्माशीं वालूनप्रांतांचा तह-फिलिप एग्मॉन-मास्ट्रिचचा शेवट-कोलोन येथील संधिक्रम-डीवूर्ष-राजपद-ऑरेंजचे विचार-रेनेबर-ग्रॉनिंजेन व इतर ठिकाणीं युद्ध-जॉन नॅसॉचें प्रयाण-बहिष्कार-आत्मसमर्थन-रेनेबरचा अंत.

अलेक्झँडर पार्मा हा पांचव्या चार्लसचा विश्वासुक हस्तक ऑटोव्हिओ फार्नीज याचा मुलगा होता. मार्गरेट पार्मा ही त्याची आई होय. हल्लीं त्याचें वय तेहेतीस वर्षांचें होतें. जन्मकालींच त्याच्या आजानें त्याच्या मस्तकावर हात ठेवून तो मोठा नामांकित वीर होईल

असें भविष्य सांगितलें होतें. तें खरें करण्याची त्याची प्रवृत्ति लहानपणापासूनच दिसून येऊं लागली. त्याला फिलिपनें आपल्या ताब्यांत घेऊन जॉन कार्लास व डॉन जॉन यांजबरोबर शिक्षणाकरितां आल्काला, माद्रीद वगैरे ठिकाणीं ठेविलें. तेथें शिकार व घोड्याचे खेळ यांत त्यानें डॉन जॉनवर ताण केली. त्याचें लग्न ब्रुसेल्समध्यें स. १५६५ सालीं झालें. पुढें आपलें जहागिरीचें ठिकाण पार्मा येथें युद्धप्रसंगाची वाट पाहत व दांडपट्टा, बोथाटी वगैरे मर्दानी खेळांत त्याला कांहीं काल घालवावा लागला. सरतेशेवटीं रोम, स्पेन व व्हेनिस हीं खिस्ती राष्ट्रें एक होऊन त्यांनीं जेव्हां तुर्क लोकांशीं शेवटचें धर्मयुद्ध आरंभिलें त्यावेळीं याला आपली कर्तबगारी दाखविण्याची संधि येऊन पोंहोचली. लिपांटोच्या लढाईंत त्याचें साहस व शौर्य याबद्दल त्यानें सर्वांची पूर्ण खात्री करून दिली. त्यानंतर डॉन जॉन संत्रस्त होऊन हताश झाल्याची बातमी फिलिपला समजतांच त्यानें जॉनच्या मदतीस अलेक्झँडरला पाठविण्याचें ठरविलें. मार्गरेटला ही योजना मान्य नव्हती; परंतु युद्धप्रसंगाचे चित्ताकर्षक आघात दुरून कानीं पडतांच तो १८ डिसेंबरला सैन्यासह लुक्झेंबुर येथें दाखल झाला. गेंब्लूरच्या लढाईंत सरकारचें सैन्य विजयी होण्यास तोच कारणीभूत झाला. डॉन जॉनच्या मरणसमयीं तो त्याच्या बिछान्याजवळ राहून त्याची शुश्रूषा करीत होता. त्याच्या पश्चात् नेदर्लंडचीं सर्व राज्यसूत्रें त्याचे हातीं आलीं. त्याची उंची मध्यम, शरीर भरलेलें व बांधेसूद, चालचलणूक व पोषाक सरदारी होतीं. पैलवानांप्रमाणें त्याचें डोकें वाटोळें, भरदार व टणक होतें; व मान नेहमीं चंचल असे; केस राठ व काळे, चेहेरा सुबक, नाक सरळ, डोळे विशाल, काळे, पाणीदार व थोडे तिरवे होते; हनुवटी व गालाचा अधोभाग झुपकेदार दाढीनें आच्छादिला होता. रणभूमीवर आपण स्वतः संकटसमयीं पुढें उडी घेऊन तो सैनिकांत उत्साह, साहसशक्ति व आपल्याविषयीं पूज्यभाव उत्पन्न करीत असे. त्याचें शौर्य व युद्धचातुर्य दिसून येण्यास खरा प्रसंग आतांच आला होता. तो या गुणांत लिपांटोचा महावीर डॉन जॉन याच्यापेक्षां खचित श्रेष्ठ होता. शिवाय राजकारणांत व कारस्थानांत त्याच्या बुद्धीची व्यापकता असामान्य होती. तो शिष्टाचारसंपन्न व शांतवृत्तीचा असून समर-

भूमीवरच क्रोधवश होत असे. हा पुरुष पोकळ बेत अगर कल्पनेचे व्यूह रचित बसणारा नव्हता. त्याचा स्वभाव एकनिष्ठ, निश्चयी, शांत, निर्भीड, निर्भय, कल्पक व धाडसी होता. सापाप्रमाणें नागमोडी चालीनें न कळत जाऊन एकदम घाव घालण्याची व प्राणघातक लचका घेण्याची कला त्याला चांगली अवगत होती. त्याचा चुलता निराशेनें ज्या डावास बळी पडला त्यांत शत्रूला घुलवून जेरीस आणण्याची विद्या त्याला पूर्ण माहीत होती. नेदर्लंडच्या लोकांस समरांगणांत व राजकारणांत एकदम तुडविण्यास तो समर्थ होता. त्याच्याहीपेक्षां एक सावध व दूरदर्शी मुत्सद्दी या राष्ट्रांत नसता, तर दाक्षिणात्य प्रांतांप्रमाणेंच एकंदर नेदर्लंड राष्ट्राची दशा झाली असती. अलेक्झँडर हा पक्का कॅथोलिक होता. धर्माचरणाचें सर्व काम त्यानें आपच्या बायकोवर सोंपविलें होतें; तथापि नवीनपंथी लोकांस जाळणें, पोळणें, तोडणें, फांशीं देणें हें तो आपलें मुख्य धर्मकृत्य समजत असे. त्याची राहणी निर्व्यसनी, मित व नियमित असे.

अलेक्झँडर हा नेदर्लंडांत पूर्वीं कांहीं दिवस राहिला असल्यामुळें तेथील लोकस्थिति त्याला पक्की माहीत होती. मॉंटिनी, लामॉट, एग्मॉन, आर्शो, हाव्रे प्रभृति बड्या कॅथोलिक सरदारांचा मॅथिअस व अलन्सन यांच्या संबंधांत डाव सपशेल फसल्यामुळें राजसत्ता व कॅथोलिक धर्म यांचा ते पुन्हा एकदम आश्रय करण्याचा विचार करीत होते. त्यांच्या बिथरलेल्या अनुयायांनीं हेनो प्रांतांत दंगेधोपे सुरू केले. अलेक्झँडरला ही संधि नामी होती. घेंटचा तह व ब्रुसेल्सचे करार नामशेष राहिले होते. धर्मद्वेषाच्या ज्वाला पुन्हा चोहोंकडे पसरूं लागल्या. समाजांत व कुटुंबांत धर्माच्या बाबतींत पुन्हा सर्वत्र दुही माजली. सुधारक लोकांचा वालून प्रांतांत ( हेनो, नेमूर, लीज, लुक्सेंबूर व ब्राबंटचा कांहीं भाग: या प्रांतांत राहणाऱ्या रोमन जातीच्या लोकांस वालून अशीच संज्ञा आहे ) या बेदिल झालेल्या लोकांकडून फार छल होऊं लागला; उत्तरेकडील प्रांतांत राजाचे अधिकारी त्यांच्यावर करडा अंमल चालवूं लागले. एका पक्षाकडून आगळिक सुरू झाल्यावर दुसऱ्या पक्षांतही क्रोधाग्नि संचरला.

या रागाच्या झपाट्यांत धर्मस्वातंत्र्य व राष्ट्रस्वातंत्र्य यांच्या नांवाखालीं नवीनधर्मीयांनीं अनन्वित कृत्यें केलीं.

जॉन कॅसिमीर या वेळीं घेंटमध्यें ठाणें देऊन होता. त्याचा फ्लँडर्स प्रांतांत आपला स्वतंत्र अधिकार स्थापन करण्याचा विचार चालला असून तो सैन्याच्या खर्चाकरितां वरचेवर शहरांतून पैसे गोळा करीत होता. अँजूचाही तशाच प्रकारचा हेतु असल्यामुळें त्यानें तेथील विरुद्ध पक्षांत मध्यस्थी करण्याचा घाट घातला होता; परंतु कॅसिमीरच्या गड-बडीमुळें आपलें कांहीं चालत नाहींसें पाहून सैन्यास रजा देऊन तो फ्रान्सला परत जाण्याची तयारी करूं लागला. हें मोकळें झालेलें सैन्य बेदिल लोकांस सामील होऊन त्यांनीं सर्व फ्लँडर्स प्रांतांत बेबंदशाही मांडली. वाल्लून, जर्मन, बर्गंडियन, इंग्लिश, स्कॉटिश वगैरे जातीच्या या उधळलेल्या सैनिकांनीं मुलूखभर लोकांवर असंख्य जुलूम चालविले. या भांडणाचें पर्यवसान घेंट शहरांत झालें. उद्योगी, संपत्तिमान्, बलाढ्य, तामसी, व दांडग्या घेंट शहरानें या प्रसंगीं राजपुत्राच्या मसलतीचा फायदा घेतला असता तर सर्व नेदर्लंडचें एक स्वतंत्र लोकसत्ताक राष्ट्र होऊन त्याचें घेंट शहर हें आदिपीठ झालें असतें. या वेळीं घेंट शहरच्या रस्त्यांत गवत वाढून गुरें चरत होतीं. लोक-समूह बहुतेक नवीन पंथाचा असून बेदिल लोकांचा समाचार घेण्यास तयार झाला होता. दोन्ही पक्षांचे पुढारी दोन बदमाष, घातकी, क्रूर, अपमतलबी व गांवगुंड इसम होते. इम्बाईझला राजपुत्राचा नेमस्तपणा न आवडून तो विरुद्धपक्षास जाऊन मिळाला होता. रायहो अद्याप आपणास ऑरेंजचा मित्र ह्मणवीत होता. बेदिल लोक मोठ्या जमावानें घेंटवर येणार असें समजतांच अधिकाऱ्यांनीं त्यांच्याशीं सामना करण्या-चा रायहोला हुकूम केला. त्यानें ही कामगिरी पतकरण्यापूर्वीं व्हिश व यमासनाचा प्रसिद्ध सदस्य हेसेल्स यांस कैदेंतून काढून मोठ्या निर्दयपणानें जंगलांत फांशीं दिलें. बेदिल लोक कॅथोलिक धर्मगुरूंचें संरक्षण करण्याच्या मिषानें मुलुख लुटून लोकांची हिंसा करीत होते; व घेंट शहरांत स्वातंत्र्याच्या नांवाखालीं कॅथोलिक पाद्र्यांची हिंसा चालली होती. याप्रमाणें वाल्लून लोक व घेंटचे शहरवासी यांच्या दरम्यान

द्वेषाचा अतिरेक झालेला पाहून राजपुत्रास उभय पक्षांची कांहीं समजूत काढणें जरूर भासलें. घेंटच्या वकिलांची व राजपुत्राची कांहीं दिवस वाटाघाट होऊन ता. ३ नोवेंबर १५७८ रोजीं घेंटच्या प्रतिनिधींनीं एक तडजोड कबूल केली. त्यांत, कॅथोलिकधर्मीयांच्या प्रार्थनेस हरकत होऊं नये व त्यांच्या मिळकती त्यांच्याकडे निर्वेध चालाव्या; अटकेंत असलेल्या कॅथोलिक सरदारांची कायदेशीर रीतीनें चवकशी व्हावी व विदेशी सैन्य हांकलून लावून घेंटचें संरक्षण करण्याची जोखीम ऑरेंज, मॅथिअस व राष्ट्रसभा यांच्यावर रहावी, असें ठरलें. ता. ११ रोजीं राजपुत्रानें या अटी पाळण्याविषयीं घेंटच्या लोकांस आज्ञापत्र पाठविलें. इंग्लिश वकील डेव्हिसन यानेंही इलिजाबेथच्या वतीनें असाच उपदेश घेंटच्या लोकांस केला. दोन दिवसांनीं ब्रुसेल्स-तर्फें वकील येऊन त्यांनींही घेंटच्या मॅजिस्ट्रेटांस राजपुत्राच्या शब्दास मान देऊन झालेली तडजोड मान्य करण्याविषयीं विनवणी केली.

परंतु घेंट शहरांत उनाड, घातकी व स्वार्थसाधु गांवगुंड लोक लोकांस बंड करण्यास उत्तेजन देत होते. त्यांच्या चिथावणीवरून रागाच्या आवेशांत जनसमूहानें कॅथोलिक लोकांवर हल्ला केला, कॅथोलिक मंदिरांतील मूर्ति फोडून त्यांचे तुकडे तुकडे केले; होमशाळेंतील तसबिरा फोडल्या; मूल्यवान् जिनसा लांबविल्या; व सर्व पोपभक्तांना गांवाबाहेर घालविलें; मोठा दंगा झाला. मॅजिस्ट्रेटांचें या लोकांपुढें चालेना. देवळें फोडण्याचें काम संपल्यावर आपोआप दंगा बंद झाला. राजपुत्राला या गोष्टीचा फार राग आला. सर्व वर्गांच्या पुढाऱ्यांत आपणाविषयीं अविश्वास उत्पन्न झाल्यामुळें एक आत्मसमर्थनपर लेख लिहावा अगर देशत्याग करावा असें त्यास वाटूं लागलें. परंतु त्यानें हा विचार तूर्त रहित केला.

फ्लँडर्सच्या सभेनें त्यास प्रांताचा सुभेदार निवडलें. ती जागा त्यानें नाकारली. लोकांचा त्याजविषयीं प्रेमभाव अद्याप कायम होता. त्याला घेंटला स्वतः येण्याविषयीं आग्रहपूर्वक विनंति झाल्यावरून आपल्या जिवाची सुद्धां परवा न करतां तो घेंट शहरांत गेला. तेथें मॅजिस्ट्रेट लोकांबरोबर त्याच्या रात्रंदिवस वाटाघाटी होऊं लागल्या. कॅसिमीरशीं रहस्य ठेवून त्यानें त्याला आपल्या बगलेंत घेतलें. खुद्द इम्बाईझबरोबर

सुद्धां जेवणखाण करून त्यानें त्याचें मन शांत केलें. ता. २७ डिसेंबर १५७८ रोजीं त्यानें पूर्वी ठरलेल्या तत्त्वांवर एक धर्मसंगोपक तहनामा तयार करून त्याच्यावर सर्वांच्या सह्या मिळविल्या. कॅथोलिक लोकांस त्यांचीं देवळें परत मिळालीं व त्यांस उपसर्ग होऊं नये असें ठरलें. तुरुंगांत सांपडलेल्या लोकांसंबंधाचा प्रश्न मोघम राहिला. बेदिल लोकांना ही व्यवस्था पसंत पडली नाहीं. नवीन धर्माचें निर्मूलन व्हावें अशी त्यांची इच्छा होती. कॅसिमीरचा कोणताच डाव साधेना; त्याचें सैन्य पगार न मिळाल्यामुळें मुलुखभर लुटालूट करून लोकांस त्रास देऊं लागलें; इंग्लंडच्या राणीनें त्याच्या धरसोडीच्या, स्वार्थसाधु व गाफिल वर्तनाबद्दल त्यास तंबी दिली. अशी प्रतिकूल परिस्थिति पाहून कॅसिमीरनें राष्ट्रसभेस आपला योग्य परामर्श न केल्याबद्दल एक दिलगिरीचें व धमकीचें पत्र पाठवून व आपल्या सैन्यास रजा देऊन जर्मनीस प्रयाण केलें. तेथून तो इंग्लंडला गेला; तेथें त्याचा बराच सन्मान झाला. त्याच्या सैनिकांस पार्मानें जर्मनींत घालवून दिलें.

कांहीं काल सरहद्दीवर घालवून अँजूही स्वदेशीं निघून गेला. तेथून त्यानें राष्ट्रसभेस आपल्याशीं केलेले करार न पाळल्याबद्दल दोषदर्शक पत्र देऊन मुद्दाम वकील पाठविला. त्यांत नेदर्लंडनें राजाशीं लौकर एकोपा करावा अशीही इच्छा प्रगट केली होती. या वेळीं इलिजाबेथ राणीचा अँजूशीं विवाह होण्यासंबंधानें वाटाघाट चालली होती; त्यामुळें इलिजाबेथनेंही अँजूशीं योग्य वर्तन न ठेवल्याबद्दल राष्ट्रसभेस दूषण दिलें होतें. हा संबंध जुळल्यास इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही राष्ट्रांचें नेदर्लंडला पाठबळ असावें अशा हेतूनें अँजूला प्रसन्न राखण्याची खटपट राजपुत्रानें चालविली होती. राष्ट्रसभेनें इलिजाबेथचें पत्र येण्यापूर्वीच झालेल्या चुकीबद्दल त्याची भरपूर माफी मागून त्यानें नेदर्लंडांत केलेल्या महत्वाच्या कामगिरीबद्दल त्याचें योग्य अभिनन्दन केलें; त्याच्या जाण्याबद्दल खेद प्रदर्शित केला; व त्याचे लोकोत्तर गुण चिरस्मरणीय असल्याबद्दल शिफारस लिहून पाठविली. पुढील मार्च अखेर राजाशीं कांहीं तडजोड न झाल्यास त्याच्याशीं आपण आपला संबंध तोडणार व मग श्रीमन्त अँजूसाहेब यांस राजपद देण्याचा आम्ही विचार करूं: मध्यंतरी साहेबांचे पितळेचे

पुतळे करून अँट्वर्प व ब्रुसेल्स येथील सार्वजनिक चौकांत बसविण्याचा विचार चालू आहे; वगैरे पोकळ व हास्यास्पद गोष्टी सभेनें अजूला लिहून पाठविल्या.

या सालअखेर राष्ट्रपक्षाचा सेनापति बॉस्यु एकाएकीं मरण पावला.

पार्माचें शौर्य व युद्धकलाप्रावीण्य हीं तर बिनमोल होतीं; परंतु त्याच्या गुप्त, सूक्ष्म व धाडसी कारस्थानांचा याबेळीं सरकारपक्षास विशेष उपयोग झाला. लांच देण्याची कला त्याच्यासारखी कोणासच अवगत नसेल; व तिचा उपयोग करण्यांतही त्याची हातोटी बिलक्षण होती. मोठमोठ्या पदांवर असलेले घरंदाज लोक, नामांकित वीर, त्याच्या जाळ्यांत सांपडून आपल्या राष्ट्राचा घात करण्यास तयार होऊं लागले. पार्मा अधिकारारूढ होण्यापूर्वींच लामॉटनें प्रजापक्षांत फूट उत्पन्न करण्याचा हा प्रशस्त मार्ग दाखवून दिला होता. हा सरदार ग्रॅव्हेलिन्सचा सुभेदार असून त्याच्या हाताखालीं राष्ट्रसभेची एक पलटण होती. मागील वर्तनाबद्दल माफी, हल्लींच्या जागा त्याच्याकडे चालविण्याचें अभिवचन, दरमहा तीनशें फ्लोरिनची नेमणूक व आपल्या तबेल्यांतील दोन उमदे घोडे देऊं करून डॉन जॉननें या गृहस्थास फितविलें होतें. राष्ट्रद्रोहाबद्दल हा मोबदला ठरविण्याच्या कामीं बरीच घासाघीस झाली. लामॉटबरोबर त्याच्या हाताखालचें सैन्य व ग्रॅव्हेलिन्स शहर येवढ्यांसच राष्ट्रसभा मुकली नाहीं; ज्या व्यापक व तीक्ष्ण राजद्रोहकुठारानें नेदर्लंडचे दोन तुकडे झाले त्याचा हा पहिला घाव होता; ज्या नीच व्यापारामुळें नेदर्लंडमधील मोठमोठ्या नांवास काळिमा लागला त्यांपैकीं हा पहिला सवदा होता.

लामॉटची देवघेव चालली असतां राष्ट्रसभेच्या वतीनें आर्ट्वा प्रांताकडून वरिष्ठ सरकारास मिळावयाचा हिस्सा मागण्याकरितां आरास शहरीं आल्डेगोंड येऊन पोंहोचला. आर्ट्वाच्या सभेस या देण्याचें फार ओझें वाटूं लागलें होतें. या सभेपुढें आल्डेगोंडनें मतस्वातंत्र्याकरितां व स्वराज्याकरितां युद्धप्रसंग चालला आहे, त्याच्या खर्चाचा बोजा सर्व खऱ्या देशभक्तांनीं सोसला पाहिजे वगैरे मजकुराचें भाषण केलें. पार्माचे दूत सभेंत फितवाफितवी करण्यांत रात्रंदिवस गुंतले होतेच. सभेपैकीं धर्मखात्याच्या लोकांनीं हा केवळ दरवडा व दांडगाई आहे,

असें बोलून सभेंतून आपलें अंग काढून घेतलें व आपली एक स्वतंत्र सभा भरविली. या सभेंत जॉन सॅरेसिन नामक हुषार, धीट व खटपटी राजदूतानें एक खुबीदार भाषण केलें. फितवेखोरपणांत सरकारचा हा फार विख्यात सेवक होऊन गेला. बेदिल सरदारांस राजपक्षास मिळवून वालून प्रांत सरकारला परत मिळवून देण्याचें सर्व श्रेय त्याला आहे. तो आपलें काम मोठ्या खुबीनें, बिनबोभाट व धाडसानें करीत असे. तो म्हणाला, "देशभक्तीच्या नांवानें ऑरेंजला पदरचें रुपें देत बसण्यापेक्षां राजभक्त होऊन सोनें खिशांत घालणें बरें! रूवर्ड वुइल्यम आपल्या दव्याच्या जागेंत पळून गेल्यावर आपण शत्रूच्या दाढेंत सांपडूं; आपण कड्यावर आहों; हा भोंवरा कठिण आहे! इ." या भाषणाचा तात्काल परिणाम झाला. श्रोतेमंडळींत राष्ट्रसभेचा अधिकार झुगारून देण्याचा निश्चय ठरला. इकडे ब्रुसेल्समधून असा हुकूम आला कीं, धर्माधिकारी आपला हिस्सा न देतील तर त्यांच्या जिनसा, जवाहीर वगैरे जप्त करून रक्कम वसूल करावी. हा हुकूम समजतांच आल्डेगोंडला या वर्गाकडून साफ नकार मिळाला; व फार बडबड केल्यास ऑरेंज व त्याचा वकील या दोघांचीही गठडी वळेल अशी हे लोक धमकी देऊं लागले. बंडाचा गड्डा राजपुत्र ऑरेंज यास नाहींसा करण्याविषयीं सॅरेसिन सरकारला वारंवार सूचना करीत होता. जॉन सॅरेसिन व सरकारचे दुसरे दूत यांस पकडून राष्ट्रसभेनें त्यांच्या जबान्या घेतल्या; त्यांत कांहीं निष्पन्न न झाल्यामुळें त्यांस सोडून द्यावें लागलें.

यावेळीं वालून प्रांतांत तीन मसलतींचीं स्थानें झालीं होतीं. अलन्सनची स्वारी मॉन्सशहरांत होती. राजपक्षाचा पुरस्कर्ता लामॉट ग्रव्हेलिन्स येथें पैशाची थैली घेऊन बसला होता. व राष्ट्रसभेचा आर्द्रवाचा सुभेदार स. घेंट हा आरास येथें होता. लामॉटनें व्हास्टचा पाद्री जॉन सॅरेसिन याच्या मदतीनें लालेन, मॉंटिनी (धाकटा), हावे, एग्मॉन, वगैरे सर्व तरुण कॅथोलिक सरदार व बहुतेक लहानमोठे लष्करी अंमलदार सरकारपक्षास वश करून घेतले होते. हे सरदार व कॅथोलिक धर्मोपदेशक राजा व स्वधर्म यांच्या सावलींत पुन्हा राजरोस जाऊन बसण्यास तयार झाले. परंतु आरासशहरांत ऑरेंज व स्वराज्यभक्तांचा मोठा जमाव होता.

त्यांचा पुढारी गॉसन हा फार श्रीमान व नामांकित वकील, व मोठा वक्ता होता. त्यानें आपल्या पक्षाच्या लोकांस उत्तेजन देऊन अंब्रोजें नामक गृहस्थाच्या हाताखालीं पांच सहाशें लोक पाठवून सर्व बदफैली मॅजिस्ट्रेट लोकांना बिड्या ठोकल्या. गॉसनच्या अध्यक्षतेखालीं एक पंधरा नवीन मॅजिस्ट्रेटांची मंडळी स्थापन झाली. यांत सर्व धर्मांच्या अस्सल देशभक्तांचा समावेश झाला होता. आरासचे देशभक्त ब्रुसेल्समधून कुमक येण्याची वाट पहात होते. परंतु व्हास्टच्या पाद्र्याचें फितवाफितवीचें काम चाललेंच होतें; त्याच्या जाळ्यांत खुद्द अंब्रोज सुद्धां सांपडला. गॉसनच्या वक्तृत्वाचा कांहीं उपयोग होईना. पुढें तिसऱ्या दिवशीं पुढील कमाबद्दल गॉसनची आपल्या सोबत्यांबरोबर एका वसतिगृहांत वाटाघाट चालली असतां सरकारच्या शिपायांनीं त्यांच्यावर छापा घालून त्यांस पकडलें. स. कॅप्रे नामक कॅथोलिक सरदार बरेच दिवस पार्मा व पाद्री सॅरोसिन यांच्या मोहांत सांपडला होता, तो या संधीस आपल्या सैन्यासह शहरांत शिरला; व या वसतिगृहासमोर त्यानें एक उंच वधस्तंभ उभा केला. कॅप्रेनें लागलीच सर्व प्रमुख देशभक्तांस चौकशीकरितां आपल्यापुढें आणविलें. गॉसनशिवाय इतर आरोपींची चौकशी त्या दिवशींच पुरी झाली; कारण कॅप्रे व त्याचे साथीदार यांस खटल्यांचा ब्रुसेल्सला वर्ग होईल अशी भीति वाटत होती. अपील करणें असल्यास ताबडतोब करावें अशी कैद्यांस परवानगी मिळाली, परंतु अपील-कोर्ट शिक्षा कायम करण्याकरितां शेजारच्या खोलींत येऊन बसलें असल्यामुळें अपिलाच्या भानगडींत कोणीही पडला नाहीं. त्या दिवशीं रात्रीं दोन लोक फांशीं गेले. दुसरे दिवशीं सायंकाळपर्यंत गॉसनची चौकशी होऊन त्यास ठरलेली शिक्षा झाली; अपिलाचा निकाल, मध्यरात्रीच्या सुमारास होतांच त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. पुढील आठवड्यांत सर्व प्रमुख देशभक्त व खुद्द अंब्रोज यांचा निकाल लागला.

ही स्थानिकक्रान्ति व प्रतिक्रांति या इतिहासांत अत्यन्त महत्वाची आहे. वालून प्रांतांत स्वातंत्र्याकरितां ही शेवटची झटापट होती. यावेळीं वालून प्रांतांतील धर्माधिकाऱ्यांनीं व बेदिल व स्वार्थसाधु सरदारांनीं उत्पन्न केलली फूट आजमितीपर्यंत कायम आहे. वालून प्रांताचें स्वातंत्र्य विकन त्याचा

मोबदला या राष्ट्रद्रोही सरदारांनीं खिशांत टाकला. मोंटेनी, कँप्रे वगैरेंचे सवदे ठरून ते आतां पक्के राजाच्या गोटांत शिरले. खुद्द राष्ट्रसभेचा आर्ट्वाचा सुभेदार स. घेंट राजाकडून हेंच सुभेदारपद व दरोबस्त रिसाल्याचें आधिपत्य पतकरून पार्माचा वशवर्ती झाला. या व्यापारांत निरनिराळ्या उमेदवारांचे एकाच मागणीवर झडप पडून आपापसांत अत्यंत लांछनास्पद, हास्यास्पद व बीभत्स कलह होत. व्हास्टच्या पाद्र्याला त्याच्या एकनिष्ठ व मेहनतीच्या राजसेवेबद्दल व्हास्टच्या धर्माध्यक्षाचें पद व त्या जागेंचें जड वेतन व वतनें देऊन राजानें कृतार्थ केलें. याप्रमाणें आरास येथील धामधुमीचा शेवट झाला. ता. ६ जानेवारी सन १५७९ रोजीं आर्ट्वा, हेनो, लिली, डुए व ऑर्चीज या प्रांतांचा एक गुप्त तह होऊन त्यांनीं आपला एक स्वतंत्र संयोग ( कट ) केला.

सरदार लोकांची राजानें पसरलेल्या आमिषांकरितां एकमेकांत झुंज चालली होती; व राजा कार्यभाग झाल्यावर आपला योग्य परामर्श घेत नाहीं अशी तक्रार होती. शिवाय पुनः सरकारच्या गोटांत शिरलेल्या या सरदारांची पार्माच्या दरबारांत थट्टा होत असल्याबद्दल व्हास्टच्या धर्माध्यक्षाचे लेख पकडून ते राष्ट्रसभेनें प्रसिद्ध केल्यामुळें या धर्माध्यक्षाच्या व सरदार लोकांच्या दरम्यान मोठी कलागत जुंपली. हा पत्रव्यवहार राष्ट्रसभेनें मॉंटेनी व स्थानिक अधिकारी यांजकडे पाठवून त्याचें योग्य मनन करण्याविषयीं त्यांस आग्रहपूर्वक विनंति केली. राष्ट्रसभा व राष्ट्रभक्त यांना आपल्या राष्ट्रांत होत चाललेली फूट पाहून फार चिन्ता उत्पन्न झाली. त्यांनीं वरचेवर मुखत्यार पाठवून वाल्लूनप्रांतांस त्यांनीं स्वीकारलेल्या दुष्ट मार्गापासून परत फिरण्याविषयीं विज्ञप्ति केली. परंतु घेंटच्या तहानें नेदर्लंडाभोंवतीं राजपुत्रानें निर्माण केलेला भक्कम तट राष्ट्रद्रोह व फितवेखोरपणा यांनीं अगदीं पोखरून टाकला होता. राष्ट्रैक्य कायम राखण्याकरितां कांहीं नवें साधन निर्माण करण्याच्या हेतूनें राजपुत्रानें डिसेंबर महिन्यांत हॉलंड, फ्रीजलंड, ग्रॉनिंजेन वगैरे ठिकाणच्या आपल्या मुखत्यारांशीं व प्रमुख लोकांशीं पत्रव्यवहार सुरू केला. यावेळीं त्याचा भाऊ जॉन हा हेल्डर्लंडचा सुभेदार होता. त्याच्याकडून सन १५७८ च्या डिसेंबर महिन्यांत हेल्डर्लंड, झुट्फन, घेंट, फ्रीजलंड, युट्रेक्ट, रीसल व

ऑनिंजेन या प्रांतांचा एक नवा संयोग करण्याचा ठराव त्यानें हॉलंडच्या सभेपुढें आणिला. डिसेंबर व जानेवारी महिन्यांत या गोष्टीची वाटाघाट होऊन हेल्डर्लंड, झुट्फन हॉलंड, फ्रीजलंड, यूट्रेक्ट येथील प्रतिनिधींनीं ता. २३ जानेवारी १५७९ रोजीं जॉनच्या अध्यक्षतेखालीं जमून इतर प्रांतांची वाट न पाहतां एक संयोगलेख तयार केला. हा ता. २९ रोजीं यूट्रेक्टच्या सभागृहांतून प्रसिद्ध करण्यांत आला. हाच लेख नेदर्लंडच्या प्रजासत्ताक राज्याचा पाया होय. या लेखाचीं सव्वीस कलमें होतीं. त्यांचा सारांशः—

या संयोगांत सामील झालेल्या संस्थानांनीं निरंतर एकविचारानें एका राजसत्तेखालील प्रजेप्रमाणें चालावें; प्रत्येक प्रांताचे विशिष्ट हक, सनदा, रुढी व कायदे पूर्ववत् चालविले जातील. त्यासंबंधानें कांहीं वाद उपस्थित झाल्यास त्याचा पंचमार्फत निकाल व्हावा. राजापासून अगर परचक्रापासून कांहीं भीति उत्पन्न झाल्यास त्यापासून एकमेकांचें संरक्षण करण्यास सर्वांनीं आपले जीव, वित्त व रक्त खर्ची घातलें पाहिजेः या कामीं लागणारा खर्च सर्वांनीं कांहीं विवक्षित प्रमाणानें वांटून घ्यावाः लढाया, तह व समाईक खर्चाची वाटणी सर्वांच्या विचारानें व्हावीः या शिवाय अन्य प्रश्नांचा विचार बहुमतानें व्हावाः बाहेरच्या एखाद्या राष्ट्रास अगर संस्थानिकास या संयोगांत घेणें झाल्यास सर्व प्रांतांची त्या गोष्टीस संमति पाहिजेः या प्रांतांत एक नाणें असावेंः धर्माच्या बाबतींत व्यक्तीचें स्वातंत्र्य कायम राखून प्रत्येक प्रांतानें आपल्यापुरती लोकांत अस्वस्थता उत्पन्न न होईल अशा तऱ्हेची पाहिजेल तशी व्यवस्था करावीः कोणत्याही दोन संस्थानांच्या दरम्यानचा वाद इतरांनीं मिटवावाः संयोगाच्या प्रतिनिधींनीं वेळोवेळीं यूट्रेक्ट येथें जमावेंः या लेखावर सर्व सुभेदार, मॅजिस्ट्रेट, स्थानिक अधिकारी व मंडळ्यांचे मुखत्यार यांच्या सह्या असाव्या.

या लेखावर प्रथम जॉन हेल्डर्लंड व झुट्फनचे प्रतिनिधी, व मागून इतर प्रतिनिधी यांच्या सह्या झाल्या. राजपुत्रानें इतर प्रांतांस मिळवून घेण्याकरितां थोडी वाट पाहून ता. ३ मे १५७९ रोजीं या लेखावर सही केली. पुढें ज्या विश्रुत प्रजासत्ताकराज्याचा देशविस्तार सर्व भूगोलावर होऊन, व्यापार व राज्यसत्ता यांच्या योगानें दोन शतकें यूरोपच्या राष्ट्र-

मालेंत त्यास अग्रस्थान मिळालें होतें त्याची निर्मिति कांहीं कालानें याच लेखापासून झाली. मात्र यावेळीं ती कल्पना अस्तित्वांत नव्हती. हा संयोग घेंटच्या तहास धरून होता, व घेंटच्या तहांत राजाची सत्ता मानली होती. जुन्या राज्यव्यवस्थेंतही यावेळीं कांहीं फेरफार करण्याचा हेतु नव्हता. हा संयोग विदेशी जुलुमाच्या प्रतिकारापुरताच होता; व त्यानें विशेषेंकरून धर्मस्वातंत्र्याची स्थापना झाली. याप्रमाणें गृहभेदाचें व स्वराष्ट्रनिर्मितीचें काम एकदम चाललें होतें.

पुढील ऋतूंत सुरू झालेल्या युद्धप्रसंगामुळें दोन्ही गोष्टींची अखेर होण्याची वेळ समीप येत चालली. ता. २ मार्च १५७९ रोजीं पार्मानें अँट्वर्प शहरापुढें येऊन लढाईचा आविर्भाव केला. उभय पक्षांची लहानशी चकमक होऊन पार्माचे चारशें लोक रणांत पडले. अँट्वर्पकडेही हूल दाखवून पुढें ता. १२ रोजीं पार्मा सुमार वीस हजार सैन्य घेऊन मास्ट्रिच शहरावर आला; मास्ट्रिच शहर म्यूज नदीच्या दोन्ही तीरावर वसलें असून त्याला सभोंवती भक्कम कोट व खंदक होता. हें शहर जर्मनींतून नेदर्लंडमध्यें जाण्यायेण्याचें द्वार आहे. शहरांत यावेळीं सुमार एक हजार शिबंदी, बाराशें कवाईत शिकलेले रहिवासी व सुमार दोन तीन हजार शेतकरी इतके लढाऊ लोक होते. शहरची लोकसंख्या चोवीस हजार होती व सुमार तितकेंच सैन्य पार्मानें आणलें होतें. शहरांत मुख्य लष्करी अंमलदार मेल्शियर हा होता. सेबास्टिन टॅपिन हा नामांकित वीर त्याच्या हाताखालीं होता. या उभयतांनीं तटाची दुरुस्ती व तटाच्या आंतल्या बाजूनें भुयारें वगैरे करून आत्मसंरक्षणाची तयारी केली. खंदक रुंद करून मोकळा करण्यांत आला, व वेशीजवळील बुरुज लोकांनीं नवे बांधले. अलेक्झँडरनें नदीवर शहरच्या वरच्या बाजूस एक व खालीं एक असे दोन पूल टाकून शहरास गराडा दिला. शहराच्या कोणत्या वेशीवर प्रथम हल्ला करावा याबद्दल पार्माच्या सैन्यांत वाटाघाट सुरू झाली.

इकडे वालून प्रांत निरंतरचे विभक्त होऊं नयेत अशाविषयीं ऑरेंज व राष्ट्रसभा यांनीं वकिलावर वकील, व जाहिरविनंतीपत्रें वगैरे पाठवून सारखी खटपट चालविली होती. दोन्ही पक्ष घेंटचा तह आधारभूत

मानीत होते; मात्र आपणास अनुकूल असा त्यांचा ओढून ताणून अर्थ करण्याचा कॅथोलिक सरदारांचा यत्न चालला होता. या सरदारांच्या खटपटीमुळें आर्द्वा, हेनो व अंशतः फ्लँडर्स येथील सभा सरकारपक्षास अनुकूल झाल्या. या प्रसंगीं स्वराष्ट्रस्थितींत राहिलेल्या प्रांतांनीं व ब्रुसेल्सच्या अधिकाऱ्यांनीं आपापले कांहीं मुखत्यार वाढून प्रांतांतील स्थानिक सभांकडे पाठविले. हे मुखत्यार प्रथम स. घेंटला भेटण्याकरितां गेले; त्यानें त्यांच्याशीं फार उद्धट रीतीनें वर्तन करून त्यांस अशा राजद्रोही कामाकरितां आपल्या प्रांतांत आल्याबद्दल शासन करण्याची धमकी दिली. त्यावर या वकिलांनीं बरोबर आणिलेले विनंतीलेख आर्द्वाच्या सभेपुढें मांडले. सभेनें या विनवून कळकळीनें लिहिलेल्या विनंतीपत्रांस ताबडतोब झोंबण्यासारखीं उत्तरें दिलीं. त्यांचें असें म्हणणें पडलें कीं घेंटचा तह मोडण्यास कारण राष्ट्रभक्तच झाले; कारण त्यांत कॅथोलिकधर्माचें वर्चस्व कायम राखण्याचें ठरलें असतां ते तसें वागण्यास तयार झाले नाहींत. स्पॅनिश सैन्य परत पाठविण्यासंबंधानें पार्माचें आश्वासन त्यांस विश्वसनीय वाटत होतें. "आम्ही बहुसमाजापासून वेगळे होत नाहीं; आम्हालाच तुम्ही सोडून देत आहां;" असें सांगून ते राजा आपणास चांगल्या सवलती देत आहे; त्यांचा उपयोग करून घ्यावा, असें प्रतिपादन करूं लागले. राष्ट्रसभेच्या वकिलांनीं, 'गेलेली सत्ता परत मिळविण्याकरितां राजे लोक सोन्याचे डोंगर देऊं करतात व पाहिजेल ते चमत्कार घडवून आणण्याची आशा दाखवितात. त्यांच्यावर भरंवसा ठेवितां येत नाहीं' अशी त्यांस विनंति केली. पुढें हे वकील हेनो प्रांताचें मुख्य शहर मॉन्स येथें गेले; तेथें स. लालेन यानें प्रथम त्यांचें नीट स्वागत करून व गोड बोलून, शेवटीं त्यांस राजद्रोहात्मक कामगिरी पतकरल्याबद्दल दोष देऊन एकदम निघून जाण्याविषयीं हुकूम दिला. ऑरेंजच्या सूचनेवरून राष्ट्रसभेनें वाढून प्रांतांकडे एक विज्ञप्तिलेख पाठविला. त्यांत घेंटच्या तहास अनुसरून नव्याजुन्या धर्मांस आपापल्या तत्त्वांप्रमाणें आचरण करण्यास मोकळीक ठेवावी व राष्ट्रैक्य कायम राखावें असें मोठ्या प्रेमळ व आवेशयुक्त भाषेंत प्रतिपादन केलें होतें. त्यावर पार्मानें राजाची सत्ता कायम राखून घेंटच्या तहाचा फायदा सर्वांनीं घ्यावा व

पांचव्या चार्लसची राज्यपद्धति चालवावी असा जबाब प्रसिद्ध केला. पांचव्या चार्लसची लोकांस जिवंत जाळण्याची पद्धति या कालांत बिलकुल चालणार नाहीं असें उलट जबाबानें राष्ट्रसभेनें पार्मास जाहिर केलें. यानंतर वेळोंवेळीं वालूनप्रांतांस विज्ञप्तिलेख लिहून ऑरेंज व राष्ट्रसभा यांनीं पार्माच्या जाळ्यांत न सांपडण्याविषयीं शक्य तितकी खटपट केली. मास्ट्रिच शहर हातीं लागल्यावर पार्मा सैन्य परत पाठविणार नाहीं; ऑग्स्बर्ग येथें सर्व ख्रिस्ती राष्ट्रांनीं ठरविलेला तह सोडून पार्माबरोबर स्वतंत्र करार करण्यापासून फायदा होणार नाहीं; लामॉट वगैरे राष्ट्रद्रोही लोकांची दरबारांत काय किंमत आहे हें पाद्री व्हास्टच्या पत्रांवरून स्पष्ट झालें आहे वगैरे गोष्टींचें यांत यथास्थित प्रतिपादन केलें असे.

राष्ट्रसभेच्या वकिलांस व विज्ञप्तीस याप्रमाणें वाटाण्याच्या अक्षता देऊन एप्रिल अखेर वालून प्रांतांनीं आपले प्रतिनिधी पार्माकडे पाठविले. त्यांचा बहुमान करून पार्मानें त्यांस आपल्या स्वरूपानें, वर्तनानें व भाषणानें अगदीं दिपवून सोडिलें. त्यांचा या षड्गुणैश्वर्यसंपन्न राजपुत्राशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागण्याचा तत्क्षणींच विचार ठरला. त्यांनीं लागलीच पार्माशीं एक तुर्तातूर्त तह ठरविला. या लेखांत या प्रांतांचे हक्क यथापूर्व चालविले जातील; राजघराण्यापैकीं पुरुषांची सुभेदारीच्या जागीं नेमणूक करून त्यांच्या हातून नेहमीं राज्यकारभार चालविला जाईल; स्पॅनिश सैन्य परत पाठविलें जाईल; वगैरे अचळपचळ अश्वासनें राजाच्या वतीनें उदारपणानें दिलीं होतीं. या तहाची बातमी चोहोंकडे पसरतांच कॅथोलिक लोक आनंदानें उडूं लागले. राष्ट्रभक्त निराशेनें अगदीं स्तब्ध झाले. ऑरेंजनें राष्ट्रांत अशी कायमची फूट न व्हावी ह्मणून पुनःपुनः वालून प्रांतांस विनंतीपत्रें पाठविलीं; व आपल्या वर्तनाबद्दल कांहीं संशय असल्यास त्यासाठीं आपलीं मुलें सुद्धां ओलीस ठेवण्याची खुषी दर्शविली! परंतु व्यर्थ. धर्माग्रह, सरदार लोकांचा मत्सर व लांचलुचपती यांनीं नेदर्लंडचे कायमचे दोन भाग करून टाकले. सर्व ख्रिस्ती राष्ट्रांतील स्वातंत्र्यशत्रूंस अत्यानंद झाला. फ्रान्समध्यें त्यांनीं महोत्सव केले. अँट्वर्प येथें स. १५६५ सालाप्रमाणें देवी मेरीची मिरवणूक निघाली असतां नवीन धर्मी लोकांनीं दंगा करून

कांहीं लोक मारले. राजपुत्रानें नवीनपंथी लोकांचा या कृत्याबद्दल निषेध केला. यूट्रेक्ट वगैरे ठिकाणीं नव्याजुन्या पंथांत असेच दंगे झाले.

स. एग्मॉनचा मुलगा फिलिप एग्मॉन या संधीस कांहीं मोबदला मिळवून राजाच्या आश्रित मंडळींत शिरण्याचा विचार करीत होता. त्याच्या डोक्यांत यावेळीं अशी कल्पना आली कीं, ब्राबंटची राजधानी ब्रुसेल्स शहर सरकारास मिळवून दिल्यास आपला राजापाशीं विशेष उच्च प्रतीचा सत्कार होईल. ब्राबंटच्या सभेचें कांहीं पायदळ व घोडदळ त्याच्या तैनातीस होतें. ता. ४ जून रोजीं सूर्योदयाचे सुमारास त्याच्या घोडेस्वारांनीं वेशींतील पहारेकरी मारून तेथें आपल्या चौक्या बसविल्या. एग्मॉनचे लोक पुढें शहरांत शिरून कोलाहल करूं लागले. शहरवासी लोक जागे होऊन त्यांनीं शस्त्रास्त्रें घेतलीं; हत्यारबंद शहरवासी चोहों-बाजूंनीं बाहेर पडतांच एग्मॉनचे लोक कोंडले गेले. अशा स्थितींत अन्ना-वांचून दुसरे दिवसपर्यंत त्यांना काल कंठावा लागला. ही तारीख एग्मॉनच्या बापाची मरणातिथि होती व ही जागा एग्मॉनचें वधस्थान होतें. त्याच्या बापाच्या मृत्यूसंबंधानें शोकोद्दीपक व मर्मभेदक शब्द चोहोंबाजूनें त्याला त्या दिवशीं ऐकूं येऊं लागले. ता. ५ जून रोजीं त्याला त्याच्या सर्व अनुयायांसह माफी देऊन अधिकाऱ्यांनीं सोडून दिलें. यानंतर फिलिप एग्मॉननें ब्रुसेल्सच्या मॅजिस्ट्रेटांना पत्र पाठवून असें कळविलें कीं, आपला दुष्ट स्पॅनिश लोकांना जाऊन मिळण्याचा हेतु बिलकुल नसून कांहीं दुष्ट लोकांनीं तशी बातमी व्यर्थ पिकविली आहे. मॅजिस्ट्रेटांनीं एग्मॉनची नीट कानउघाडणी केली; व स्पॅनिश लोकांशीं संबंध ठेवण्याची कल्पनासुद्धां एग्मॉनच्या मनांत येणें अश्लाघ्य आहे असें त्यास कळविलें. परंतु हा पत्रव्यवहार चालला असतांच एग्मॉननें राजा व कॅथोलिकधर्म यांच्या सावलींत जाऊन बसण्याची आपली इच्छा पार्मास कळविली होती. पार्मा व राजा यांनीं यथास्थित आश्वासनें व वचनें देऊन एग्मॉनच्या सदिच्छेचा लाभ करून घेतला.

पार्मानें मास्ट्रिचच्या टाँग्रीस नामक वेशीवर शेंहेचाळीस तोफांचा भडिमार सुरू केला. ता. २५ मार्च रोजीं बुरुजावरील विटांचा पातळ थर सुटून खालीं पडला. पण त्याच्या आंतील भक्कम दगडी बांधकाम

अगदीं शाबूत होतें. तें स्वरूप पाहतांच टाँग्रीसवेशीखालीं शिल्पकार शिपायांकडून भुयारें खणविण्याचें काम सुरू करून अलेक्झँडरनें ब्रूलीडक्र-वेशीकडे मोर्चा फिरविला. शहरांत बचावाकरितां आलेले शेतकरी व स्त्रिया यांनीं टोळ्या करून उलट बाजूनें तटाखालीं पोखरण्याचें काम चालविलें होतें. या रीतीनें अदृश्य मायावी राक्षसकृतीप्रमाणें आंतून व बाहेरून शहरच्या संरक्षणाचें व नाशाचें काम चाललें होतें. आंतील लोकांनीं आधणाच्या पाण्यानें व धुराचे लोळ फुंकून शत्रूंची फार खराबी केली. त्यामुळें तो भाग सोडून दुसऱ्याच ठिकाणीं भुयारें करून व सुरुंग लावून त्यांनीं तट उडवून दिला. तटाच्या सामानानें खंदक भरून गेला. त्यावरून स्पॅनिशलोक शहरांत चालून जाऊं लागले. शहरवासी लोकांनीं मोठ्या निकरानें त्यांस सामना देऊन हल्ला मागें हटविला. ब्रूलीडक्रवेशीवर पंधरा दिवस सारखा तोफांचा भडिमार चालला होता. ता. ८ एप्रिल रोजीं पडलेल्या तटाजवळ पार्माच्या नामांकित स्पॅनिश, इटालियन, व बर्गंडियन शिपायांचें मास्ट्रिचच्या शहरवासी लोकांशीं मोठें युद्ध जुंपलें. यावेळीं शहरच्या स्त्रिया वाघिणीप्रमाणें तटावर अग्रभागीं लढत होत्या. त्यांनीं वेढा घालणारांवर आधणाचें पाणी, कोलितें व जळकीं कडीं फेकण्याचा सपाटा चालविला. शेतकरीलोकही पिकांप्रमाणें राजभक्तांना कोयत्यांनीं कापून काढीत होते. सुमारें एक हजार राजपक्षीय लोक ब्रूलीडक्रवेशीला बळी पडले; टाँग्रीसवेशीजवळ राजभक्तांवर शहरवासी लोकांनीं तोफांचा भडिमार चालविला होता. एक दुसरें भुयार खणून तें त्यांनीं पेटवून दिलें. त्यांत पांचशें राजभक्त वातावरणांत उडून गेले. मास्ट्रिचच्या संरक्षकांपैकीं कोणीही इसम दगावला नाहीं. या वेळ्यांत सहाशेंसत्तर अंमलदार व चार हजार सामान्य शिपाई हा वेळपर्यंत पतन पावले होते; तथापि हल्ला नेटानें चालविण्याचा दुराग्रह पार्मा सोडिना; व तो स्वतः पुढें शिरण्याचा विचार करूं लागला. शेवटीं त्याच्या हाताखालच्या अंमलदारांच्या विनवणीवरून व खुद्द राजाच्या हुकुमास मान देऊन त्यानें आपलें सैन्य परत बोलाविलें. त्यानें यापुढें स्वस्थपणें वेढा चालवून व तटाखालीं सुरुंग उडवून शत्रूस जेर करण्याचा निश्चय केला. त्याच्या सैन्यास

राहण्यास चांगली जागा व विपुल अन्नसामुग्री मिळाली होती; व शहरच्या लोकांस कुमक मिळण्याचा बिलकुल संभव नव्हता. ऑरेंजनें मोठ्या कष्टानें सात हजार लोक शहरच्या मदतीस पाठविले; परंतु या लोकांनीं पार्माची तयारी पाहतांच पाय मागें फिरविले. मास्ट्रिचच्या भोंवतीं स्पॅनिशलोकांनीं प्रतिमास्ट्रिच निर्माण केलें होतें.

पार्मानें पुन्हा रंगभूमि बदलून ब्रुसेल्सवेशीवर मारा सुरू केला. या वेशींत शहरच्या लोकांनीं एक नवा बुरूज करून त्यास पार्मा असें थट्टेचें नांव दिलें होतें. त्यावर तोफांचा मारा करून व हल्ला करून पार्मानें तो सर केला. तटामागून तट पाडीत स्पॅनिश सैन्य आंत शिरत असतां एक हजार राष्ट्रभक्त धारातीर्थीं पडले. शेवटीं एक कोट राहिला. वेशीजवळ या शेवटच्या कोटाखालीं पोखरण्याचें काम पार्मानें सुरू केलें. शहरांत आतां शिबंदीपैकीं चारशें लोक राहिले होते. ते लोक टंगळमंगळ करूं लागले. शहरवासी लोकांची हिंमत अद्याप कायम होती. त्यांनीं शिबंदीच्या लोकांस कापून काढण्याची जरब देऊन तटावर पाठविलें. ब्रुसेल्सवेशीच्या आंत एक नवा भक्कम तट व त्याच्या आंत एक मातीचा उंचवटा लोकांनीं तयार केला होता; त्याच्यावर आतां त्यांची सर्व भिस्त होती. या तटाच्या बाहेरच्या बाजूस एक तीस फूट खोलीचा खंदक खणला होता. या खंदकावर लांकडी पूल करण्याच्या उद्योगास पार्मा स्वतः कुदळ, खोरें घेऊन लागला. त्याच्याभोंवतीं शिपाई व बर्लेमॉनप्रभृति सरदार लोक पटापट तोफांच्या गोळ्यांखालीं मरून पडत होते; तथापि त्यानें आपला निश्चय सोडिला नाहीं. पूल तयार करून त्याच्यावरून त्यानें तोफा पलीकडे नेल्या. तोफखाना सुरू झाला; सुरुंग उडाले; तट पडून स्पॅनिश लोक पुढें सरसावले. मातीचा उंचवटा तेवढा आतां शिलुक राहिला. त्याच्यावर आतां गांवांतील तरुण लोकांनीं सक्त पहारा ठेविला. ऑरेंजकडून, 'आठ दिवस कुमक येण्याची वाट पहावी,' अशी शहरांत चिठ्ठी आली. हल्ल्याचें काम रात्रभर तहकूब राहिलें.

रात्रौ एक स्पॅनिश संत्री तटाबाहेर पहारा करीत असतां त्याला या उंचवट्यामध्यें एक मोठें भोक दिसलें. त्यांतून आंत शिरून पाहतो तों त्यास सर्व सामसूम दिसलें. रखवालदार व गांवचे लोक श्रमानें व दगदगीनें

थकून गाढ झोपी गेले होते. बाहेर येऊन या शिपायानें पाहिलेली हकीकत पार्मास कळविली. लागलीच स्पॅनिश लोक आंत शिरून त्यांनीं कापाकापी सुरु केली. लोक जागे होऊन इकडे तिकडे पळूं लागले; परंतु त्यांस सुटकेस मार्ग नव्हता. शहरांत एकदम मोठा आक्रान्त सुरु झाला. तो चारपांच मैलांच्या अंतरावर ऐकूं येऊं लागला. या वेळीं नेहमीच्या क्रमाप्रमाणें स्पॅनिश लोकांनीं असंख्य अघोर कृत्यें केलीं; बायकांवर विशेष कटाक्ष होता; त्यांना माडीवरून, छपरावरून फेकून देण्याचा धडाका सुरु झाला. कांहीं नदींत बुडवून मारल्या गेल्या, व कांहीं बायकांचे त्यांनीं वन्यपशूप्रमाणें फाडून तुकडे तुकडे केले. एकंदर सहा हजार लोक या अखेरच्या कत्तलींत मेले असावे. अवशिष्ट राहिलेले सुमार चारपांचशें लोक शहर सोडून पळून गेले. शहरचा सुभेदार सेबास्टिन टॅपिन वगैरे सर्व लोक या संग्रामांत पडले. शेवटच्या प्रसंगीं पार्मा तापानें पडला होता. त्याला ही आनंदाची वार्ता समजतांच त्यानें रक्तानें व प्रेतांनीं शृंगारलेल्या या शहरांतून आपली मिरवणूक काढून प्रार्थनामंदिरांत या जयाबद्दल ईश्वराचा स्तव केला. या नाटकाचा असा शोकपर्यवसायी शेवट होतांच लोक राजपुत्राच्या नांवानें खडे फोडूं लागले. त्यानें ब्रुसेल्सच्या सभेपाशीं प्रथमपासून मास्ट्रिचच्या संरक्षणाची तयारी करण्याविषयीं विनवणी केली होती. एप्रिल व मे महिन्यांत द्रव्याची थोडी मदत होतांच त्यानें मास्ट्रिचला कुमक करण्याकरितां सैन्य तयार केलें. दुर्दैवानें त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्याच्या विरुद्ध एक निनांवी अश्लील लेख सभेपुढें वाचनाकरितां आला. तो वाचण्याचें कोणास धैर्य होईना. राजपुत्रानें तो स्वतः मोठ्यानें वाचून दाखविला. व आपण आड झाल्यानें देशांत शांतता व सुख हित असल्यास आपली देश सोडून जाण्याची त्यानें तयारी दर्शविली. त्यावर सभेंत त्याचा जयजयकार होऊन लोकांनीं आपली त्याजविषयीं विश्वासबुद्धि व प्रेम दाखविलें व त्याचें समाधान केलें.

इकडे घेंट शहरांत लोकांस उत्तेजन देऊन इम्बाईजनें दंगा उत्पन्न केला. कॅथोलिक लोकांची मालमत्ता लुटून लोक त्यांस गैरशिस्त रीतीनें वागवूं लागले. मॅजिस्ट्रेटांची या गोष्टीस फूस होती. राजपुत्रानें घेंटच्या

लोकांस पत्र पाठवून हे अत्याचार बंद करण्याविषयीं सूचना पाठविल्या. या सूचनांचा लोकांच्या मनावर परिणाम होऊं लागला. परंतु इम्बाईज व धर्मोपदेशक डॅथीनस यांनीं ऑरेंज हा मनांतून कॅथोलिकधर्मी असून धर्मतहाच्या मिषानें त्याचा तो धर्म स्थापन करण्याचा विचार आहे; फ्रान्सशीं खलबतें करून त्याचा नेदर्लंडमध्यें आपला डाव साधण्याचा बेत आहे; वगैरे खोट्या बातम्या पसरून त्याची निंदा चालविली. ऑरेंजनें आत्मसमर्थनात्मक एक पत्र घेंटला पाठवून असें जाहीर केलें कीं, ' आमच्या आयुष्यक्रमावरून आमच्या हेतूंबद्दल लोकांस संशय बाळगण्यास बिलकुल जागा नाहीं;.......... आमच्या हॉलंड-झीलंड प्रांतांतील वर्तनावरून आह्मी लोकमतास किती मान देतों हें व्यक्त झालें आहे;...... खऱ्या धर्मासंबंधानें आह्मी इतका स्वार्थत्याग केला असून तो धर्म वाढविण्यांत आमची कसूर होईल असें बिलकुल संभवनीय नाहीं. आजपर्यंत लोकांस धर्मस्वातंत्र्य मिळण्यास आमचीच खटपट कारणीभूत झाली आहे ' ता. २५ जुलै रोजीं इम्बाईजनें दोन हजार सैनिक जमवून मॅजिस्ट्रेट लोकांस बिड्या ठोकल्या; व अठरा नवे मॅजिस्ट्रेट निर्माण केले. लागलीच इम्बाईजनें एक जाहिरनामा व कांहीं हस्तपत्रकें प्रसिद्ध केलीं. यांत आपण केलेल्या व्यवस्थेचें समर्थन करून ऑरेंजवर दुष्ट शब्दांचा वर्षाव केला होता. वाक्संयमी बुइल्यमनें या दोषारोपांकडे लक्ष दिलें नाहीं. तो घेंट येथें आला. तो येतांच हा गांवगुंड व त्याचे साथीदार नाहींसे झाले. राजपुत्रानें मोठ्या जोरदार व त्वेषयुक्त भाषेनें लोकांची कानउघाडणी केली. त्यानें इम्बाईजचे मॅजिस्ट्रेट कमी करून कायद्याप्रमाणें नवे मॅजिस्ट्रेट निवडण्याचा लोकांस हुकूम केला. इम्बाईज एका जहाजांत लपून बसला होता; त्याला त्याच्याच एका साथीदारानें राजपुत्रापुढें आणिला. ऑरेंजनें त्यास तंबी देऊन सोडून दिलें. या-प्रमाणें या बडबड्या लोकनायकाच्या चरित्राचा शेवट झाला. त्यानें पुढें उघड राष्ट्रद्रोह करून आपण होऊन आपला गळा फासांत अडकवून घेतला. याप्रमाणें घेंटमध्यें स्थिरस्थावर करून व फ्लँडर्सची सुभेदारी शेवटीं पतकरून राजपुत्र अँट्वर्पला परत आला.

मे महिन्यापासून सरकार व राष्ट्रसभा यांचे मुखत्यार कोलोन येथें

जमून तहासंबंधीं शुष्क वाटाघाट करीत होते. या वाटाघाटीपासून कांहीं निष्पन्न होईल असें कोणासही वाटलें नाहीं; तथापि लोक लढाई व रक्त-पात यांस इतके विटले होते कीं, कोणत्या तरी तऱ्हेनें युद्धाचा शेवट व्हावा अशी त्यांस उत्कंठा वाटत होती. कोलोनच्या मंडळींत पोपचा वकील सरधर्माध्यक्ष रोसॅनो, स. टेरानोव्हा (फिलिपचा वकील), आर्शो, शेंक्ष वगैरे राष्ट्रसभेचे सात मुखत्यार, कोलोनचा धर्माध्यक्ष व जर्मन बादशहाच्या तर्फें श्वार्झन्बर वगैरे बडीं बडीं धेंडें होतीं. स्पेन, रोम, वगैरे ठिकाणचे वकील राजसत्ता व कॅथोलिकधर्म हें पालोपद निदान मास्ट्रिच शहर हस्तगत होईपर्यंत गात बसण्या करण्याकरितां आले होते; व त्यांनीं आपापले भाग चोख बठविले. धर्मभेदाचें विषारी बीं पसरून वालून प्रांतांची झालेली फूट कायम करण्याकरितां हा बूट पार्मानें काढला होता. कोलोन येथें जमलेल्या सरकारपक्षीय वकीलांनीं प्रथम ऑरेंजला राष्ट्रद्रोहाच्या जाळ्यांत ओढण्याचा यत्न केला. "द्रव्य, बायकामुलें किंवा खुद्द स्वतःचे प्राण यांपैकीं कोणत्याही गोष्टीच्या आशेनें आपण आपल्या अन्नांत स्वराष्ट्रद्रोहाचें विष कालविणार नाहीं," अशी राजपुत्राची प्रतिज्ञा होती; त्यामुळें हा प्रश्न त्याच्यापुढें प्रत्यक्ष काढण्यास कोणास धैर्य होईना. राजाच्या मुखत्यारांनीं ऐश्वर्य, सत्ता, बायकामुलें वगैरे वस्तु त्याला देऊं केल्या; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. स्वतःकरितां किंवा स्वतःच्या नांवानें तो कोणतीही गोष्ट सुद्धां बोलेना. "राष्ट्रसभेचें समाधान झाल्यास त्यांतच आमचें समाधान आहे......ज्या महत्कृत्यावर आमचें सुखदुःख अवलंबून आहे तें आह्मी कधींही सोडणार नाहीं......विभक्त झालेले प्रांत व पार्मा हें युद्ध आमच्याविरुद्ध व आमच्या नांवानें चाललें आहे असें समजतात...... परंतु तह होण्यास आमचाच अडथळा असल्यास आह्मी तुमचा मार्ग खुला करण्यास तयार आहों!" जगाच्या इतिहासांत जे राजेलोकांसही विकत घेतां आले नाहींत अशांपैकीं हा एक पुरुष होता. ता. १८ मे रोजीं राष्ट्रसभेच्या वतीनें एक चौदा कलमांचा खर्डा कोलोनच्या समाजा-पुढें आला; यांत धर्मस्वातंत्र्य व नेदर्लंडचे सनदी हक्क चालविण्याविषयीं मागण्या केल्या होत्या. बादशहाच्या प्रतिनिधींस हा लेख दुःसह झाला;

त्यांनीं त्याचा स्पष्टपणें निषेध केला. नंतर फिलिपच्या वकीलांनीं आपल्या मागण्या पुढें केल्या; त्याही नापसंत ठरल्या. पुढें बादशहाच्या वकिलांनीं फिलिपच्या प्रतिनिधींचा पूर्वी सल्ला घेऊन ठरविलेला एक मसुदा सभेपुढें आला त्यांत पांचव्या चार्लस राजाच्या वेळीं अमलांत असलेली राज्यव्यवस्था नेदर्लंडच्या लोकांनीं चालवावी; व दुसऱ्या सर्व धर्मतत्त्वांस सोडून कॅथोलिकधर्म चालवावा असें प्रतिपादिलें होतें. राष्ट्रसभेच्या वकीलांनीं व खुद्द राष्ट्रसभेनें या एकदेशीय व दुराग्रही मागण्यांचा धिकार करून, राजानें योग्य सवलती न दिल्यास आपण राजाचें स्वामित्व उघडपणें झुगारून देऊं असें या पंचांस समक्ष कळविलें. जमलेल्या प्रतिनिधींनीं एकमेकांवर दोषारोप करून नोवेंबर महिन्यांत आपापल्या ठिकाणीं प्रयाण केलें. आर्शोनें या संधींत राजाश्रयाचा लाभ संपादन केला. याप्रमाणें सात महिने हजारों कागदपत्र, टिपणें व यादी होऊन, व बरींच दारूचीं पिंपें व मिष्टान्न यांचा व्यय होऊन विरुद्ध पक्षाचे वकील ज्या ज्या मुद्यास धरून कोलोन येथें आले होते तेच डोक्यांत घेऊन परत आपापल्या गांवीं गेले. मध्यंतरीं बालून प्रांतांचा राजाशीं निराळा तह झाला; मास्ट्रिच शहर सरकारपक्षास मिळालें.

या सालांत दुसरीं मोठीं संकटें राष्ट्रसभेवर येत चाललीं होतीं. राष्ट्रद्रोहाचें पिशाच नामांकित देशभक्तांमध्यें संचार करूं लागलें होतें. बालून-प्रांतांतील बेदिल सरदारांचा मार्ग आर्शो व हाव्रे यांनीं तर स्वीकारलाच; परंतु अँटवर्पचा बुरूज सर करण्याचे कामीं नांव मिळविलेला शूर स. डीबूर्स व फ्रुंडर्झचा सुभा स. रेनेबर्ग हे ऑरेंजचे पूर्ण विश्वासुपात्र असतांही त्यांच्यावर या संधीस स्वजनद्रोहाच्या विषाचा चमत्कारिक व दीर्घ परिणाम झाला. डीबूर्स मेलिनचा मुख्य अधिकारी होता. मेलिन येथील एक पाद्री शहर सरकारपक्षास मिळवून देऊन आपणास नेमूरच्या धर्माध्यक्षाची मोठ्या पगाराची जागा मिळविण्याच्या खटपटींत होता. त्यानें डीबूर्सवर वशीकरणमन्त्र फुंकला. राजपुत्र ऑरेंज, डीबूर्सचे स्नेही व खुद्द राष्ट्रसभा यांनीं त्याचें मन फिरविण्याचा केलेला सर्व यत्न फुकट गेला. डीबूर्सनें शहर स्वाधीन करून राष्ट्रद्रोहाबद्दल ठरलेली पांच हजार

फ्लोरिनची रकम व एका पायदळ पलटणीचें स्वामित्व पटकावलें; व तो पार्माच्या छावणींत पळून गेला.

कोलोन येथील वाटाघाट चालली असतां कांहीं तडजोड न ठरल्यास राजाचें स्वामित्व झुगारून देण्याविषयीं ऑरेंजनें सर्व प्रांतांचें वचन घेतलें होतें. तशी स्थिति झाल्यावर राष्ट्रास कोणी नियंता अवश्य होता; लोकसत्ताकराज्याची कल्पना अद्याप कोणाच्या डोक्यांत स्पष्ट आली नव्हती. येथपर्यंत नेदर्लंडच्या लोकांची एकंदर खटपट आपलें जुनें राष्ट्र-स्वातंत्र्य कायम राखण्यापुरतीच होती; राज्यक्रान्तीकरितां नव्हती. धर्मा-च्या बाबतींत मनुष्यमात्र हे ईश्वराचेच सेवक आहेत हें मत आतां कायमचें स्थापित झालें. राजकीय बाबतींत परंपरागत राजघराण्याचें स्वामित्व लोक मानीत होते; परंतु समाजस्वातंत्र्यास शोभेल अशी भाषा हळूं हळूं प्रचारांत येऊं लागली होती. लोक आतां धडधडीत असें प्रतिपादन करूं लागले कीं, राजानें न्याय व नीति यांस धरून लोकांचें पालन केलें पाहिजे; राजा मेंढपा खरा; परंतु तो मेंढरांच्या कळपाचे गळे कापूं लागल्यास त्याच्या हातांतील कोयता काढून घेतला पाहिजे. "राजास दरवडे घालून, जाळपोळ करून, फाशीं देऊन व खून करून या राष्ट्रावर जुलूम करण्याचा काय हक्क आहे? व असा जुलूम झाल्यावर भल्या राजाप्रमाणें त्याला मान देऊन त्याचें नांव आपण कां चालवावें? जसा राजाचा वंशपरंपरेनें राज्य करण्याचा हक्क आहे, तसेच लोकांचे हक्क प्राचीन आहेत. हे हक्क चालविणें हें राष्ट्रसभेचें मुख्य कर्तव्य आहे. राजा व प्रजा यांच्या दरम्यान वागणुकीसंबंधाचे कांहीं करार ठरले असतात; ते चालविण्याच्या शर्तीवरच राजास राज्यपद प्राप्त होत असतें." हीं तत्त्वें लोक आतां बाजारांत व चवाठ्यावर उघडपणें बोलूं लागले. ऑरेंजला हीं तत्त्वें पूर्णपणें मान्य होतीं. परंतु राष्ट्राच्या हल्लींच्या स्थितींत कोणी नियंता असावा; व तो लोकसत्ताक राज्याचा मुख्य शासक या नात्यानें असावा, असा त्याचा अभिप्राय होता. हें पद या वेळीं त्याच्या हातांत होतें, व तें सध्या पतकरून त्याला पुढें मागें या राष्ट्राचें राजपद प्राप्त करून घेतां आलें असतें. परंतु त्याचा स्वार्थत्याग अलौकिक होता. उलट तो असें ह्मणे कीं, 'मी आपले सर्व अधिकार सोडून देऊन लोक ठरवितील

त्या नायकांच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास तयार आहें.' कोलोन येथील बाटाघाटीच्या स्वरूपावरून फिलिपच्या सत्तेचा अंतकाल समीप येत चालला आहे असें वाटूं लागलें. जर्मनींतील प्रॉटेस्टंट संस्थानिकांपैकीं कोणी नेदर्लंडचें शासकपद स्वीकारील असा अदमास दिसेना. मॅथिअसची योग्यता ठरून गेली होती. इंग्लंडच्या स्वातंत्र्यभाक् लोकांनीं या महा-युद्धांत नेदर्लंडच्या लोकांस व्यक्तिशः बरीच मदत केली होती; परंतु इंग्लिश राणीची गोड शब्द व पोकळ सहानुभूति यांशिवाय या गांजलेल्या लोकांस आपल्या अधिकारांत विशेष मदत झाली नव्हती. इलिजाबेथनें आपलें पहिलें स्वरूप पालटून आतां फ्रेंच राजपुत्र अँजू याजबरोबर लग्नाची वाटाघाट चालविली. इंग्लिश मुत्सद्यांच्या मतें हा अँजूचा केवळ नेदर्लंड देश मिळविण्याकरितां डाव होता.

ऑरेंज अँजूविषयीं हॉलंड, झीलंड प्रांतांच्या सभांशीं रदबदली करीत होता. या प्रांतांची ऑरेंजवरच निःसीम भक्ति असल्यामुळें त्याचें अँजूविषयीं मागणें ते कबूल करीनात. राजपुत्रानें राष्ट्रसभेकडून हॉलंड-च्या सभेस एक यादी पाठविली; त्यांत अँजूबरोबर ता. १२ आगष्ट १५७८ रोजीं ठरलेला करार, त्यानें नेदर्लंडाकरितां सोसलेली दगदग व फ्रान्सशीं एकोपा झाल्यापासून नेदर्लंडला होणारे फायदे यांचें पूर्णपणें विवेचन केलें होतें; व नेदर्लंडदेश स्पेनपासून स्वतंत्र झाल्याची द्वाही फिरवून अँजूच्या निवडणुकीसंबंधानें विचार करण्याकरितां राष्ट्रसभेंत आपले प्रतिनिधी पाठवावेत अशी सभेस विनंति होती. या वेळीं ऑरेंजचा निरनिराळ्या स्थानिक संस्थांशीं व सभांशीं तोंडीं व लेखी व्यवहार सारखा चालला होता. तो दरोबस्त सार्वजनिक मंडळ्यांचे दोष निर्भिडपणें दाखवून त्यांस शब्दांचे कोरडे देत असे: "आमचे दोष काढण्याकडे दोन्ही पक्षांतील लोकांची प्रवृत्ति आहे. परंतु आमचें नवीन धर्माविषयीं व राष्ट्राविषयीं प्रेम आमच्या आचरणावरून व्यक्त होईल; व आमच्या टीकाकारांचीं तोंडें बंद होतील .... आमचेंच हित आह्मास साधावयाचें असतें, तर सर्व इष्टवस्तु प्राप्त करून घेण्यास हल्लीं फार उत्तम संधि होती. परंतु आजपर्यंत आह्मी राष्ट्राच्या हिताकडे नजर देऊन चाललों आहों. राजाशीं तह करण्यास आमच्याकडून कांहीं प्रत्यवाय नाहीं;

परंतु राजा मायावी आहे. तो सामाच्या मिषानें राष्ट्रांत जास्त फूट उत्पन्न करण्याचा यत्न करीत आहे. त्याला कोणी फसूं नये." स. १५७९ अखेर राजपुत्राचीं राष्ट्रसभेंत दोन तीन महत्वाचीं भाषणें झालीं. त्यांत आपणावर व आपल्या राज्यव्यवस्थेवर लोक करीत असलेल्या आक्षेपांचें खंडन करून, राष्ट्राच्या सर्व अनर्थांचीं कारणें, प्रांतिक सरकारांची वरिष्ठ सरकारासंबंधानें अविश्वासबुद्धि व कृपणपणा हीं होत असें त्यानें प्रतिपादन केलें. शिवाय राष्ट्राच्या तत्कालीन स्थितीचें वर्णन करून राष्ट्राच्या बचावाकरितां निवडक लोकांचें एक मोठें सैन्य ठेवणें जरूर आहे असें त्यानें सुचविलें.

सन १५८० च्या प्रारंभीं राजपुत्र ऑरेंजनें भावाप्रमाणें विश्वासूक मानलेला फ्रीजलंडचा सुभेदार स. रेनेबर यानें राजास आपला देह विकला. हा गृहस्थ मोठा विद्वान्, काव्यप्रिय, मधुरभाषी, विनीत, शूर होता; परंतु राष्ट्रद्रोहाच्या विषाची त्याला बाधा झाल्यावांचून राहिली नाहीं. राजपक्षास मिळण्याचा सुनिश्चय केल्याबद्दल त्याला दहा हजार क्राऊन रोख, पुढें तीन महिन्यांनीं दुसरा दहा हजारांचा हप्ता, व दरसाल दहा हजारांची नेमणूक, व सरदारमालिकेंत वरच्या दर्ज्याची पदवी इतका मोबदला देण्याचें ठरलें होतें. आपल्या देहविक्रया-संबंधानें त्यानें एका स्नेह्याच्या पत्रांत लिहिलें: " ही सर्व काहिली नॅसा घराण्याच्या लोकांनीं आपल्या स्वार्थाकरितां शिजविली आहे; व त्यांनीं आपली पोळीही पिकविली आहे. त्यांनीं सर्व मोठमोठे प्रांत व्यापले आहेत. आमच्या वांट्याला लहानसहान प्रांत घातले आहेत. यामुळें मीं राजाशीं सख्य केलें आहे; कारण त्याच्यापासूनच मला जास्त फायदा होण्याचा संभव आहे. " त्याची बहीण कॉर्नेलिया लालेन ही यावेळीं ग्रॉनिंजेन येथें त्याला भेटण्याकरितां आली; व या दुष्ट स्त्रीनें या विद्वान् व सद्गुणसंपन्न देशभक्ताच्या मनांत भलतेच विकार उत्पन्न केले. रेनेबरनें अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या हतभागी देशाची पाठ सोडली. ता. ३ मार्च १५८० रोजीं रेनेबरनें आपल्या वाड्यांत ग्रॉनिंजेन मधील सर्व बड्या देशभक्तांस खाना दिला व रात्रौ नाच झाला. जेवणाच्या वेळीं ग्रामाध्यक्षानें रेनेबरसंबंधीं जनप्रवाद त्यास कळविल्यावरून,

"असा संशय तरी आपल्या मनांत यावा कां?" असे रेनेबरनें उद्गार काढले. नाच संपून मंडळी आपापल्या घरीं जाऊन निजल्यावर त्यांस रेनेबरच्या दूतांनीं झोंपेतून उठवून कैद केलें. दुसरे दिवशीं सूर्योदयापूर्वी नावाडी व फिरस्ते लोकांचा समुदाय मशाली व निशाणें घेऊन शहरच्या चौकांत जमला त्यांच्या आरोळ्यांनीं शहर जागें झालें. रेनेबरनें या चौकांत तोफा रोखून नाकेबंदी केली होती. रेनेबर चिलखत व शिरस्त्राण घालून तीस हत्यारबंद स्वारानिशीं चौकांत दाखल झाला. तो अगदीं निस्तेज दिसत होता. त्यानें आपल्या संरक्षकांना जवळ उभे राहण्यास सांगून जमलेल्या लोकांस "मी आतां खरा सुभेदार झालों आहें" असे ओरडून सांगितलें. गांवचे मॅजिस्ट्रेट दंगाधोपा बंद करण्याकरितां पुढें आले; त्यांपैकीं ग्रामाध्यक्षास रेनेबरच्या लोकांनीं गोळी घालून ठार केलें. त्यामुळें दरारा उत्पन्न होऊन दंगा एकदम मोडला. ग्रानिंजेन शहर खालसा करण्यांत आलें. परंतु फ्रीजलंड प्रांतांत अद्याप लोकमतांत फरक झाला नव्हता. या प्रांतांत एन्टीस, होहेन्लो, फिलिप नॅसा यांच्या हाताखालील राष्ट्रीय सैन्यानें ग्रॉनिंजेन शहरास एकदम वेढा दिला.

लढाई सावकाशीनें ठिकठिकाणीं चालली होतीच. एका चकमकींत डीलानू नामक शूर व विद्यासंपन्न फ्रेंच वीर सरकारच्या हातीं सांपडला. ग्रॉनिंजेनचा वेढा चाललाच होता. पार्मानें वेढ्यांतील लोकांच्या मदतीकरितां कांहीं सैन्य पाठविलें. राष्ट्रसभेच्या छोट्या सैन्याचा शहरावर कांहीं परिणाम होईना. यावरील सेनानींच्या अंगीं लष्करी शिक्षणापेक्षां पूर्ववयांतील उद्दामपणाच विशेष होता. एके दिवशीं भोजन झाल्यावर दारूनें उन्मत्त होऊन मुख्य सेनानी बार्थोल्ड एंटीस यानें तरवार फिरवीत शहरच्या तटाकडे धांव मारली; लागलीच तटावरून एक गोळी लागून त्याचा प्राण गेला. सन १५७२ सालीं ज्या अडदांड लोकांनीं ब्रिलशहरावर उतरून डच् स्वराज्याचा पाया घातला त्यांपैकीं एंटीस हा एक होता. हा पुरुष जरी जुगार खेळणारा, विषयलंपट व लुटारू होता; तथापि स्पेनच्या प्रबल बादशाहीस पुढें भयप्रद झालेल्या डच् स्वराष्ट्राच्या पायाचा दगड बसविणाऱ्या हॉलंडच्या देशभक्तमालिकेंत त्याचें नांव खोदून ठेविलें आहे. ग्रॉनिंजेन येथील राष्ट्रसैन्याचें नायकत्व आतां होहेन्लो याजकडेस

आलें. हा गृहस्थ देखणा, परंतु दुराचरणी व सुखाभिलाषी होता; युद्ध-कलेचें ज्ञान त्याला बिलकुल नव्हतें. ता. १६ जून रोजीं हार्डेन्बर हीथ येथें पार्माचा सेनापति मार्टिन शेंक यानें त्यास गाठलें, व त्याच्या सैन्याची एका तासांत वाताहत केली. ग्रॉनिंजेनचा वेढा उठला. रेनेबर मोकळा होऊन त्यानें मोठ्या प्रमाणावर युद्धाची तयारी सुरू केली. आसपासच्या प्रदेशांतील गांवढे जमून त्यांनीं लुटालूट व दंगेधोपे सुरू केले. लहान सेनापती, लहान सैन्यें, लहान मोहिमा व वेढे यांचें एक लहानसें युद्ध आतां चालू झालें. ऑरेंजला होहेन्लोच्या हातूनच युद्ध चालविण्याचा प्रसंग येऊन पोंहोचला होता.

या सालच्या उन्हाळ्यांत स. जॉन हा ग्वेल्डर्लंडच्या सुभेदारीचें काम सोडून चालता झाला. या प्रांतांतील स्थानिकसभा एकमेकांशीं व खुद्द प्रांतिकसरकाराशीं वारंवार कलह करीत; व प्रांतिकसभेकडून जॉनच्या खर्चापुरता सुद्धां पैसा मंजूर होईना, त्याला अन्नसामुग्री विकत आणण्यास साधन न मिळाल्यामुळें पुष्कळ वेळ उपाशी निजावें लागे; त्याची राहण्याची जागा ह्मणजे बराकीचा एक भाग असून, त्यांत सामान-सुमान सुद्धां पुरतें नव्हतें. जॉनला मुलें फार होतीं; त्यांच्या शिक्षणाची वगैरे तजवीज करणें आतां त्याला जरूर होतें; व त्याच्या जहागिरीची व्यवस्थाही त्याला पहावयाची होती. त्याचा वडील मुलगा बुइल्यम लुई यावेळीं राष्ट्र-सभेच्या सैन्याबरोबर होता. हार्डेनबरच्या लढाईंत त्याला निशाणी होऊन त्याच्या वीरचरित्रात्मक कुलव्रतास सुरवात झाली होती. जुलै महिन्यांत राष्ट्रसभेनें आल्डेगोंडप्रभृति वकील फ्रान्समध्यें पाठवून अँजूशीं प्लेशिस येथें ता. २९ सप्टेंबर रोजीं कांहीं करार ठरविले; व ते पुढें बोर्डोच्या समयावरून कायम करण्यांत आले. हॉलंड, झीलंड प्रांतांनीं मात्र या व्यवहाराशीं बिलकुल संबंध ठेविला नाहीं. त्यांनीं राजपुत्र ऑरेंजला आपलें स्वामित्व स्वीकारण्याविषयीं विनंति केली.

कार्डिनल ग्रॅन्व्हिलचा ऑरेंजविषयीं द्वेष अद्याप प्रदीप्त होताच. त्यानें ऑरेंजला भीति उत्पन्न करण्याकरितां व त्याचे प्रयत्न बंद करण्याकरितां त्यास बहिष्कार घालावा, व त्यास धरून आणणारास किंवा मारणारास मोठालीं बक्षिसें लावावीं अशी राजास सूचना केली. ता. १५ मार्च

रोजीं हा बहिष्काराचा ठराव प्रसिद्ध झाला. हें कार्डिन ग्रॅन्व्हिलच्या मेंठिपणाचें अपूर्व स्मारकच होऊन बसलें आहे. सोळाव्या शतकांतील या सर्वश्रेष्ठपुरुषाला रानटी जनावराप्रमाणें मारणारास तीस लक्षांची देणगी व स्पेनच्या दरबारीं जहागिरदारीचा मान देऊं करणाऱ्या फिलिप-च्या व त्यास तसा सल्ला देणाऱ्या ग्रॅन्व्हिलच्या थडग्यावरील हा दुष्कीर्तीचा दगड काढण्याची जिवलग मित्र अगर उदार शत्रु यांपैकीं कोणाचीही छाती होणार नाहीं. या बहिष्कार लेखांत फिलिप व त्याचा बाप यांनीं वुइल्यमवर केलेले उपकार व त्याची त्यानें कृतघ्नपणानें केलेली निष्कृति यांची प्रस्तावना केली होती. विज्ञप्तिअर्ज, मूर्तिध्वंस, मैदानांतील प्रार्थनेचे जमाव यांचें उत्पादकत्व त्याजकडे देऊन त्यांजबद्दल त्यावर या लेखांत दोषारोप केले होते; त्यानें आल्व्हाच्या विरुद्ध केलेल्या स्वाऱ्या, हॉलंडमध्यें उपस्थित केलेलें बंड, व त्याच्या राजद्रोही वर्तनामुळें स्पॅनिशलोकांनीं केलेला जनसंहार या गोष्टींबद्दल त्यांस दूषणें दिलीं होतीं. त्यानें आपलें वर्तन संशयात्मक ठेवून मतस्वातंत्र्याचा प्रस्ताव केल्याबद्दल, आपली रूवर्डच्या जागीं नेमणूक करून घेतल्याबद्दल, घेंटचा तह मोडल्याबद्दल, डॉन जॉनचे सद्धेतु विफल केल्याबद्दल, व कोलोन येथील मसलतींत मोडा घातल्याबद्दल त्यावर दोषारोप केले होते. शेवटीं, 'या कारणास्तव आम्ही त्यास राजद्रोही, बंडखोर, आमचा व राष्ट्राचा शत्रु ठरविला आहे; व त्यास निरंतरचा बहिष्कार घातला आहे. आमच्या प्रजेपैकीं कोणीही इसमानें त्याच्याशीं उघड अगर गुप्त व्यवहार ठेवूं नये अगर त्यास अन्न, पाणी वगैरे वस्तूंचा पुरवठा करूं नये अशी आमची सक्त ताकीद आहे. त्याच्या जिवाला अगर मालमत्तेला पाहिजेल त्यानें अपाय करावा. वुइल्यम नॅसा हा मनुष्यसमाजाचा शत्रु असल्यामुळें त्याची मिळकत पाहिजेल त्यांनीं बेलाशक धरावी असा आमचा हुकूम आहे. आणि या दुष्ट व्याधीपासून आह्मास मुक्त करणारा कोणी सत्पुरुष या देशांत किंवा अन्य देशांत निघाल्यास व त्यानें त्याला जिवंत अगर मृत पकडून दिल्यास किंवा निदान त्याचा प्राणापहार केल्यास आम्ही त्यास पंचवीस हजार मोहोरा रोख व ताबडतोब देऊं. त्यानें कांहीं गुन्हा, मग तो कितीही निंद्य असो, केला असल्यास त्याबद्दल त्याला माफी

मिळेल व तो जहागिरी पेशांत नसल्यास त्यास एकदम सरदारवर्गांत जागा मिळेल, ' असें जाहीर केलें होतें.

याला जबाब ह्मणून "आत्मसमर्थन" नामक सुप्रसिद्ध लेख राजपुत्रानें प्रसिद्ध केला. जुलुमास निर्भयपणें टोणपे देणारा इतका कडक लेख इतिहासांतरीं दुसरा कोठेंही आढळणार नाहीं. लक्षावधि रुपये देऊन, किंवा कुटुंबांतील माणसांस मोठमोठ्या हुद्याच्या जागा देऊं करून अगर खुषामत करून किंवा मोठ्या गृहस्थांशीं मैत्रीची लालूच दाखवून राजपुत्राला वश करण्याचे सर्व उपाय थकलेसे पाहून अँटोनिओ पेरेझच्या उपदेशाचें राजास स्मरण झालें; व भीतीनें त्याला दूर पळविण्याचा अगर खून करून नाहींसा करण्याचा हा शेवटचा उपाय त्यानें आतां योजिला होता. बहिष्कारलेखांत या "नीच ढोंगी" मनुष्यास अन्नपाणी, विस्तू अगर विसाव्याची जागा मिळूं नये, त्याची मिळकत दरवडेखोरास मिळावी व त्याचा आत्मा पिशाचयोनींत जावा असा ठराव केला होता; परंतु बंडाच्या प्रारंभीं राजा आपल्या गळ्यांत अडकवून घेण्यास फास तयार करीत आहे असें प्रसिद्धपणें बोलणारा व पुढें उघडपणें सरकाराशीं सामना करणारा हा "नीच ढोंगी" आपल्या नीतिश्रेष्ठपणानें व उच्च सामाजिक पदवीनें असले असंख्य बहिष्कारलेख तुच्छ मानण्यास समर्थ होता. त्यानें नेदर्लंडांत राजा ही कल्पनाच विसंगत आहे असें प्रतिपादन केलें. राजा हा शब्द कॅस्टिल, नेपल्स अगर पश्चिम गोलांतील फिलिप इंडीज बेटें यांच्या मालकास लावणें योग्य असेल; परंतु नेदर्लंडांत जुन्या सनदी सरंजामीदाराच्या ठिकाणीं आला असल्यामुळें त्याला आपणास तेथील राजा ह्मणवून घेण्याचा अगर ऑरेंजची बंडखोरांत गणना करण्याचा बिलकुल अधिकार पोंहोचत नव्हता. फिलिपचेच पूर्वज ऑरेंज घराण्याचे एकवेळ मानकरी होते; नॅसाघराणें मोठें सत्ताधीश होतें त्यावेळीं फिलिपचे पूर्वज स्विट्झर्लंडमध्यें छोटे शिलेदार होते. "शिवाय फिलिपचे नेदर्लंडमध्यें कुलक्रमागत अधिकार कांहींही असोत, त्यानें राज्यारोहणाच्या वेळीं घेतलेल्या शपथा मोडून, राष्ट्राच्या जुन्या सनदा जबरदस्तीनें धुळीस मिळवून आपले सर्व अधिकार नष्ट करून घेतले आहेत; व आपण स्वतः अनेक अपराध करून आपल्या प्रजाजनांच्या आचरणाचा इनसाफ

करण्याचा हकही नाहींसा करून घेतला आहे. राजानें राष्ट्राचे सर्व कायदे पायाखालीं पदोपदीं तुडविल्यावर प्रजेस त्याच्या सत्तेवर घाव घालण्यास अधिकार पोंहोचत नाहीं काय " ? राजानें केलेले अघोर गुन्हे या लेखांत उघडपणें त्याजपुढें मांडले होते; तसेंच संशयपूर्ण वातावरणांत राहणाऱ्या फिलिप व ग्रेन्व्हिल या मंडळींनीं राजपुत्रावर संशययुक्त आचरणाचा आरोप करावा हें केवळ हास्यास्पद होतें. त्यासंबंधानें मॅसिडॉन-( ग्रीसच्या पुर्वेकडील प्रांत ) च्या फिलिपला सुप्रसिद्ध वक्ता व मुत्सद्दी डेमॉस्थिनीस यानें बोलून दाखविलेल्या शब्दांचा राजपुत्रानें यावेळीं पुनरुच्चार केलाः "जुलुमाशीं झगडण्यांत संशयवृत्ति हें स्वातंत्र्यभाक् लोकांस एक मोठें चिलखत आहे." हीं अक्षरें राष्ट्राच्या अंतःकरणावर खोदण्याकरितां आपण मुद्दाम शोधून काढिलीं आहेत; व ईश्वरकृपेनें त्यांचा राष्ट्राच्या मनावर पूर्ण संस्कार होवो असें यांत लिहिलें होतें. मारेकऱ्याची कल्पना नवी नव्हती; राजपुत्रानें फिलिपला असें जाहिर केलें कीं, "माझे प्राण घेण्याकरितां आपण वेळोवेळीं रचलेले बेत व केलेले करार मला पूर्णपणें विदित आहेत; परंतु माझे प्राण व ऐहिक संपत्ति मी ईश्वरचरणीं अर्पण केलीं आहेत; व त्यांचा तो आपलें वैभव वाढविण्याच्या कामीं व मला कृतार्थ करण्याकरितां योग्य दिसेल त्याप्रमाणें विनियोग करण्यास समर्थ आहे. " पुढें राष्ट्रास उद्देशून तो लिहितो; "परंतु जर माझ्या विदेशगमनानें राष्ट्राचा फायदा होत असेल तर मी देश सोडून जाण्यास तयार आहे. माझ्या जाण्यानें किंबहुना माझ्या मृत्यूनें तुमची या अनर्थपरंपरेपासून सुटका होत असल्यास मला त्या जाण्यापासून किती आनंद होईल ! मला तें मरण किती सुखाचें होईल ! कारण मी आपली सर्व संपत्ति कशाकरितां गमावली आहे ? श्रीमान् होण्याकरितां काय ? मी आपल्या भावांस कशाकरितां मुकलों ? दुसरे भाऊ मिळतील ह्मणून काय ! मी आपला मुलगा इतके दिवस अटकेंत कां राहूं दिला ? तुह्मी मला दुसरा मुलगा देतां काय ? मी आपला जीव वेळोवेळीं कशाकरितां धोक्यांत घातला ? इतकी तुमची सेवा करून व सर्व संपत्तीला मुकून तुमच्या स्वातंत्र्यापेक्षां मला काय मिळवावयाचें आहे ! तर माझे मालकहो, जर माझ्या जाण्यानें अगर मरणानें तुमचें कार्य होत असेल तर मला

तशी एकदम आज्ञा करा! मला हुकूम फर्मावा; पृथ्वीच्या शेवटच्या सीमेवर जाऊन राहण्यास सांगा; मी तयार आहें! हें माझें डोकें! याच्यावर कोणाही राजाची अगर राजपुत्राची मालकी नाहीं; हें तुमच्या स्वाधीन आहे!! याचा तुमच्या हितार्थ, डच स्वराष्ट्राच्या बळकटीकरितां वाटेल त्याप्रमाणें उपयोग करा! परंतु माझ्या अनुभवाचा व अल्प प्रयत्नांचा, माझ्या अवशिष्ट जीविताचा व वित्ताचा तुह्मास कांहीं उपयोग असेल तर तीं मी तुमच्या सेवेस पुन्हा एकवार अर्पण करतों." या आत्मसमर्थन लेखावर त्याची सही, मुद्रा, व "सत्याकरितां मेरेन" हें त्याचें आवडतें वाक्य शेवटीं होतें. या लेखाचें युरोपांतील सर्व अर्वाचीन भाषांत भाषांतर करून तें प्रसिद्ध करण्यांत आलें. डेल्फच्या सभेनें हा लेख वाचून पसंत केला.

सन १५८० च्या अखेर व पुढील सालच्या प्रारंभीं आग्नेय दिशेकडे उभयपक्षांत लहान लहान चकमकी चालल्या होत्या. रेनेबरनें स्टीन्विक किल्ल्यास वेढा दिला. शहरचे लोक कांहीं केल्या शरण जाईनात. शेवटीं रेनेबरनें ऑरेंजनें अँजूस पाठविलेलीं ह्मणून कांहीं बनावट पत्रें तयार करून तीं शहरांत पाठविलीं. यांपैकीं एका पत्रांत अँजूस फ्लँडर्स व ब्राबंट प्रांतांतील शहरें काबीज करण्याविषयीं आग्रहपूर्वक सुचविलें होतें; व धर्माच्या बाबतींत राजेलोकांनीं विशेष विचार करूं नये; शहरें ताब्यांत आल्यावर पाहिजेल तो धर्म लोकांवर लादतां येईल असें लिहिलें होतें. हें पत्र रेनेबर वारंवार प्रसिद्ध करून त्याच्या असंख्य प्रति लोकांस वांटीत होता. राजपुत्रानें हें पत्र बनावट आहे असें जाहिर केलें. स्टीन्विक येथें त्यापासून लोकांच्या मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं. पुढें सैन्याची कुमक येऊन स्टीन्विकचा वेढा फेब्रुवारी १५८१ अखेर उठला. जुलै महिन्यांत देशभक्तांनीं रेनेबरच्या सैन्याचा पुन्हा पराभव केला; व त्याच सुमारास राष्ट्रद्रोही रेनेबरचा पश्चात्ताप, दुःख व निराशा यांच्यायोगानें शेवट झाला. मरणसमयीं राष्ट्रद्रोहास प्रवृत्ति करणाऱ्या आपल्या बहिणीचें त्यानें मुखावलोकनसुद्धां केलें नाहीं. मेल्यावर त्याचें काळिज खारकेसारखें व खारकेच्या आकाराचें झालें होतें. हा विषाचा परिणाम होता, किंवा पश्चात्तापाचा होता हें निश्चयात्मक ठरवितां आलें नाहीं.

# भाग १५ वा.

स्वातंत्र्याचा विचार—राजसत्तानिषेध–समाजबंधनाच्या कल्पना–अँजूचें आगमन—राज्यारोहणसमारंभ—बोर्डो येथील करार—जॉरिगायचा प्रयत्न–फ्रेंच आपात—ऑरेंजचे विचार—घेंट—जीरार्ड—राजपुत्राचा शेवट—मनोधर्म व जीवितकर्तव्य.

राष्ट्राच्या अंतस्थ राज्यव्यवस्थेंत यावेळीं मोठे महत्त्वाचे फेरफार होऊं लागले होते; सन १५८१ च्या जानेवारी महिन्यांत डेल्फ येथें भरलेल्या सभेनें संयुक्त संस्थानांचा कारभार पाहण्याकरितां एक नवें तीस सभासदांचें कारभारीमंडळ नेमिलें. हे सभासद नेदर्लंडवासी असावे व ते निरनिराळ्या प्रांतांनीं कांहीं प्रमाणानें निवडून द्यावे असें ठरलें होतें. या मंडळाच्या विचारावांचून परराष्ट्रांशीं कोणतेही व्यवहार चालूं नयेत; परंतु राष्ट्रसभेच्या कारभारांत अगर अँजूशीं चाललेल्या वाटाघाटींत त्यानें कोणतीही ढवळाढवळ करूं नये असा निर्बंध ठरला होता. या संधीस ॲलेक्झँडर नेदर्लंडमध्यें आपला सर्व कारभार आटोपीत चालला आहे असा राजास भास होऊन त्यानें मार्गरेट पार्माला नेदर्लंडमध्यें पाठविलें; व तिनें राज्यव्यवहाराचें काम पहावें व ॲलेक्झँडरनें सेनापत्य करावें असा हुकूम फर्माविला. ॲलेक्झँडरनें राजाचा हुकूम मान्य केला नाहीं. मार्गरेटचें आपल्या मुलापुढें कांहीं चालेना. शेवटीं दोन वर्षें अज्ञातवासांत काढून ती नेदर्लंड सोडून निघून गेली.

सर्व नेदर्लंड देशाचें ऐक्य करून त्याला एका राज्यव्यवस्थेखालीं आणण्याची राजपुत्राची फार दिवसांपासून खटपट चालली होती; व त्यानें स्वतः राजपद स्वीकारिलें असतें तर हें कामही तेव्हांच उरकून गेलें असतें. पण त्याच्या निरपेक्षबुद्धीमुळें वालून प्रांत इतर प्रांतांपासून कायमचे विभक्त झाले होते. स्वतंत्र झालेल्या प्रांतांपैकीं हॉलंड व झीलंडखेरीज इतर प्रांतांनीं अँजूशीं वाटाघाट करून त्याचें स्वामित्व पतकरण्याचें कबूल केलें. हे दोन प्रांत मात्र ऑरेंजाशिवाय इतर कोणाचेंही स्वामित्व कबूल करण्यास तयार होईनात. सन १५८० च्या मार्च व एप्रिल महिन्यांत या प्रांतांच्या

सभांनीं फिलिपचा सर्व संबंध तोडून राजपुत्रानें आपलें राजपद स्वीकारावें असे ठराव केले होते; परंतु वुईल्यमनें ती गोष्ट नाकारल्यामुळें हे ठराव तसेच गुप्त ठेवावे लागले. त्यानंतर ता. ५ जुलै १५८१ रोजीं सभांनीं पुन्हा राजपुत्रास आग्रहपूर्वक व विनयपूर्वक तीच मागणी केली व लढाई संपेपर्यंत तरी वुईल्यमनें लष्करी अंमलदार नेमणें व लढाईचें काम चालविणें, सभेच्या सल्ल्यानें मुलकी व जमाबंदी कामगार नेमणें, कोणत्याही धर्मास उपसर्ग न लावतां नवा धर्म चालविणें, वगैरे सर्व कारभार आपल्या मुखत्यारीनें चालवावा अशी विनंति केली. राजपुत्रानें राजाचा सुभेदार या नात्यानें सन १५७६ सालीं आपणास मिळालेले अधिकारच हल्लीं चालवावयाचे आहेत असा विचार करून शेवटीं ही विनंति मान्य केली. सभेनें पुढें राजपुत्रास न कळवितां त्याजकडे त्याच्या हयातीपर्यंत हें पद चालावें असें ठरविलें. ता. २४ जुलै रोजीं राजपुत्र ऑरेंज व हॉलंड व झीलंड येथील प्रांतिकसभा यांच्या दरम्यान इमानाच्या शपथा झाल्या. ता. २६ जुलै १५८१ रोजीं विभक्त झालेल्या प्रांतांच्या मुखत्यारांची मोठी मजालस हेग येथें जमून त्यांनीं आपण स्वतंत्र झाल्याचा ठराव प्रसिद्ध केला. या लेखाचें नांव राजसत्तानिषेध असें होतें; परंतु यांत राष्ट्राच्या पूर्वापार राज्यव्यवस्थेंत कोणताही फरक केला नव्हता.

या लेखाच्या प्रारंभीं या डच स्वराष्ट्रजनकांनीं अनुशासनधर्माचीं कांहीं हितकर सामान्यतत्त्वें नमूद करून ठेविलीं आहेत. उदाहरणार्थः ईश्वर राजास आपल्या प्रजेचें रक्षण करण्याकरितां नेमतो; परंतु जर राजा प्रजेवर जुलूम करूं लागला, त्यानें त्यांचे जुने हक्क नाहींसे केले, प्रजेस तो गुलामाप्रमाणें वागवूं लागला; तर तो राजा जुलमी झाल्यामुळें राष्ट्राच्या प्रतिनिधींनीं त्याला पदच्युत करून त्याच्या ठिकाणीं दुसरा नेमावा. पुढें हे नियम नेदर्लंड देशाला लागू करून दाखविले आहेत. त्यांत प्रथम गेल्या पंचवीस वर्षांच्या इतिहासाचें त्रोटक वर्णन करून राजावर भाराभर दोषारोप केलेले आढळतात. यांपैकीं एक दशांशसुद्धां राजास पदच्युत करण्यास बस्स होते. नेदर्लंडच्या लोकांनीं आपल्या दुःखाची जगास सांगितलेली काहणी या लेखांत सत्य स्मरून, खऱ्या

कळवळ्यानें परंतु फार नेमस्त व साध्या भाषेनें लिहिली आहे. राजाचा प्रथमपासून नेदर्लंडवर तद्देशीय लोक बाजूस ठेवून निवळ स्पॅनिश अधिकाऱ्यांच्या हातून राज्य करण्याचा, पादाक्रान्त केलेल्या देशाप्रमाणें या नियन्त्रित राजसत्तेच्या राष्ट्रांत अनियन्त्रित अंमल चालविण्याचा, तेथील लोकांस शत्रूप्रमाणें वागविण्याचा व या देशांत स्पॅनिश धर्मसंशोधनपद्धति सुरू करून लोकांचा छल करण्याचा इरादा होता. हा हेतू मनांत धरून प्रथम नवे धर्माध्यक्ष नेमण्यांत आले; पुढें विज्ञप्ति-अर्ज, बर्घेन व मॉंटिनी यांचा वध, आल्व्हाच्या कारकीर्दीतील धराधरी, यमासनाचीं कृत्यें, प्राणहानि, लोकांचें विवासन, मिळकतींच्या जप्त्या, रेकिसन्सच्या कारकीर्दींतील अँट्वर्पचा आपात, सैन्याचें बंड व त्यास राजाचें अनुमोदन, डॉन जॉनचें धरसोडीचें वर्तन, घेंटचा तह मान्य केल्याचें खोटेंच आश्वासन, राष्ट्रांत फूट पाडण्याचा यत्न, जर्मन पलटणांशीं खलबतें, कोलोन येथील वाटाघाट व सरकारचा मायावीपणा, व ऑरेंजवर बहिष्कार वगैरे प्रकार एकामागून एक घडून आले. याप्रमाणें वीस वर्षें राजानें नेदर्लंडच्या प्रजाजनांवरून दयेची सावली काढून घेतल्यामुळें सृष्टिक्रमास अनुसरून आपल्या राष्ट्राचे हक्क, सनदा, व स्वातंत्र्य कायम राखण्याकरितां व स्पॅनिश लोकांच्या गुलामगिरींतून आपणास निरंतरचें सोडवून घेण्याकरितां व हा आपला विचार जगास जाहिर करण्याकरितां या लोकांनीं फिलिपला पदच्युत केल्याचा ठराव केला, व यापुढें आपण त्याची पदवी अगर अधिकार मान्य करणार नाहीं अशी शपथ घेण्याचें ठरविलें. हाच पुढें दोनशें वर्षें भरभराटीच्या स्थितींत राहिलेल्या डच् लोकसत्ताक राज्याचा पाया होय. यावरून नेदर्लंडच्या देशभक्तांनीं केवळ कल्पनेच्या जोरावर एखादी नवी राज्यव्यवस्था निर्माण केली नाहीं; पूर्वींपासून ऐतिहासिक परंपरेनें चालत आलेली व्यवस्था कायम करण्याचा हा प्रयत्न होता. राजांनीं वेळोवेळीं शपथपूर्वक व आपले शिक्के मोर्तब घालून दिलेल्या सनदांप्रमाणें राज्यव्यवस्था चालावी व जुन्या राजकीय संस्था कायम रहाव्या असें त्यांचें मागणें होतें. 'राजा प्रकृतिरञ्जनात्' या तत्त्वास धरून ते राजाच्या ईश्वरदत्त हक्कांचा विचार करीत होते; व तें तत्त्व

उल्लंघन केल्यामुळें राजास त्यांनीं पदच्युत केलें होतें. पुढें शंभर वर्षांनीं उद्भवलेल्या समाजस्वातंत्र्याच्या अगर राजा मनुष्यांश असून प्रजेचा मुखत्यार आहे वगैरे एकदेशीय कल्पना या वेळीं डच् लोकांच्या डोक्यांत आल्याचें दिसून येत नाहीं. राजाला योग्य कारणावरून पदच्युत करण्याचा हक्क प्रजेस आहे असें निर्विवाद ठरल्यावर त्यास ईश्वरांश मानणें अशुद्ध आहे अशी शंका या वेळीं उद्भवली नाहीं.

त्याचप्रमाणें पुढें बारा महिन्यांनीं ऑस्बर्ग येथें भरलेल्या जर्मनमहामंडळांत हेगच्या सभेनें आपले वकील पाठवून राजसत्तापरित्यागाचें समर्थन करण्याकरितां त्यांना जें मुद्यांचें टिपण दिलें होतें, त्यांतही 'राजा हा ईश्वरांश आहे' व 'तो लोकनियुक्त असावा' अशीं विरोधी विधानें एकाच वाक्यांत केलेलीं आढळतात. 'पांचामुखीं परमेश्वर' हें लोकसत्तावादी लोकांचें आदितत्त्व घेऊनच या परस्परविरोधी विधानांचा मेळ घालणें शक्य आहे. पुढें सभेनें या टिपणांत, ऑस्ट्रियाच्या राजघराण्यानें प्रजेशीं कांहीं करार पाळण्याचें कबूल केल्यावरून त्यास नेदर्लंडचें शासकपद मिळालें होतें; त्यांपैकीं कोणताही एक करार मोडतांच त्या घराण्यांतील राजपुरुषांचा नेदर्लंडवरील वारसहक्क नष्ट व्हावयाचा ठराव होता; ते करार फिलिपनें मोडले असल्यामुळें, व या करारांच्या मुळाशीं असलेलीं स्वभावसिद्ध व सर्वसंमत नीतितत्त्वें उल्लंघन केल्यामुळें त्याला पदच्युत करण्याचा हक्क लोकांस प्राप्त झाला आहे, असें प्रतिपादन केलें होतें. "ईश्वरानें कोणत्याही व्यक्तीस सर्व कायदे व न्यायपद्धति उल्लंघन करून आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याचा हक्क दिला नाहीं." नेदर्लंडच्या लोकांच्या मागण्या केवळ तार्किक किंवा काल्पनिक नव्हत्या. राजांच्या व लोकसमाजाच्या सामान्य हक्कांचा प्रश्न त्यांनीं हातीं घेतला नव्हता. प्रकृत व न्याय्य अशा गोष्टींसंबंधानें त्यांचें भांडण होतें. मात्र येवढी गोष्ट खरी कीं धर्मविषयक प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागला असता तर केवळ राजकीय हक्कांचा उच्चार इतक्या स्पष्ट रीतीनें होण्याचा कदाचित् प्रसंगही आला नसता. सत्तानिषेधाच्या लेखांत कॅथोलिकधर्मीयांचा कोणत्याही प्रकारें उपमर्द न करितां धर्मच्छल व धर्मसंशोधन हीं बंडाचीं मुख्य कारणें होत असें नमूद करून ठेविलें आहे.

या नामांकित स्वातंत्र्यलेखावर सह्या करणारांनीं नेदर्लंडच्या जानपदाच्या नांवानें व मुखत्यारीनें हें कृत्य केलें होतें. या वेळच्या मुत्सद्यांनीं लोकांच्या प्रतिनिधींच्या ठिकाणीं लोकसत्तेची भावना करून स्थानिकसभांचे मुखत्यार हेग येथें जमविले; व त्यांच्या हातून हें राजसत्तापरित्यागाचें कृत्य करविलें. समाजसमयाच्या ( Social Compact ) कल्पना यावेळीं या सीमेच्या पुढें गेल्या नव्हत्या.

हॉलंड व झीलंडचें शासकपद राजपुत्रानें मोठ्या कष्टानें पतकरलें होतें. इतर संयुक्तप्रांतांकडून आपलें स्वामित्व पतकरण्याविषयीं त्याला वारंवार विनंति होत होती; परंतु आपल्याविषयीं लोकांत गैरसमज होईल या भीतीनें त्यानें ती मान्य केली नाहीं. अँजूशीं या विषयासंबंधानें करार अद्याप मुक्रर झाले नव्हते; त्यामुळें कांहीं कालपर्यंत ऑरेंजला स्वतंत्र झालेल्या सर्व प्रांतांचें स्वामित्व राष्ट्रसभेच्या विनवणीवरून स्वीकारावें लागलें. या नवीन व्यवस्थेवरून मॅथिअसचें नेदर्लंडमधील काम आपोआप संपलें. तो या सालच्या आक्टोबर महिन्यांत स्वदेशीं निघून गेला. त्याला राजपुत्राच्या अंगावर घालण्याकरितां एक प्यादें ह्मणून कॅथोलिक सरदारांनीं झोंपेंतून उठवून घाईघाईनें नेदर्लंडांत आणिलें होतें. परंतु तो पुढें त्याच महामुत्सद्याच्या हातांतील बाहुलें होऊन बसला. त्याच्या हातून या दुष्ट कालांत कांहीं स्वजनद्रोही, निंद्य अगर नृशंसपणाचें कृत्य झालें नाहीं असें जाणून राष्ट्रसभेनें त्याला अल्पशी नेमणूक करून दिली.

अँजूला नेदर्लंडला आणण्यांत ऑरेंजचाच आग्रह विशेष होता. लोकांचे त्याच्याविरुद्ध आक्षेप बरेच होते. फ्रेंचअंमल स्पॅनिश अमला-प्रमाणेंच घातक होण्याचा संभव होता. अँजू हा फार चैनबाज व खर्चिक असल्यामुळें त्याच्यापासून बराच उपसर्ग लागण्याची भीति होती. नव्या धर्मतत्त्वांवर त्याची श्रद्धा दृढ नव्हती. राजपुत्राचें यावर असें उत्तर होतें कीं जर्मनी वगैरे राष्ट्रें नेदर्लंडाविषयीं फार उदासीन असल्यामुळें नेदर्लंडानें आतां कोणाची वाट न पाहतां मिळेल त्या राजपुत्राचें साहाय्य घेऊन आपलें कार्य उरकून घेतलें पाहिजे. मोठीं पक्वान्नें मिळविण्याच्या आशेनें चार दिवस उपास करीत बसल्यास प्राणास अपाय होण्याची भीति

असते. फ्रेंच मुत्सद्यांची नेदर्लंडाला मनापासून मदत करण्याची इच्छा होती; परंतु फ्रान्सच्या राजाच्या खाजगी परिवाराचा उलट कल होता. कदाचित् नेदर्लंडच्या शासकपदावर अँजूस मूर्तिमंत स्थापन केल्यावर फ्रेंचराजा या राष्ट्रास मनोभावानें मदत करील अशी आशा होती. निदान स्पॅनिश जुलुमाची बरोबरी आतां कोणत्याही राजपुत्राच्या हातून होणें शक्य नव्हतें. अँजू हा नेदर्लंडच्या लोकसत्ताक राज्याचा केवळ नियंता होणार असल्यामुळें त्याला राष्ट्राच्या प्राचीन सनदांचे निर्बंध होतेच; व धर्माच्या बाबतींत कोणत्याही पंथास त्रास न पोंहोचण्याविषयीं प्रथम ठराव करावयाचा असल्यामुळें अँजूच्या धर्मविचारापासून नेदर्लंडला कांहीं अपाय होणार नाहीं असें ऑरेंजपक्षीय लोकांचे विचार होते. उन्हाळ्यांत पांच हजार नामांकित शिलेदार बरोबर घेऊन अँजू नेदर्लंड-च्या पश्चिम सरहद्दीवर दाखल झाला. या वेळीं पार्मानें कँब्रेशहरास वेढा दिला होता; तो एकदम उठवून पार्मा टुर्नेवर परतला. कँब्रेशहरांत युद्धाची बरीच तयारी करून अँजूनें पुढें एकाएकीं आपल्या सैन्यास फाटा दिला. त्यांपैकीं बरेच सैनिक टुर्नेचा सुभेदार स. एस्पिनॉय याच्या तैनातीस राहिले. अँजू एकाएकीं इंग्लंडला निघून गेला. नंतर पार्मानें टुर्नेला वेढा दिला. स. एस्पिनॉय आपल्या सैन्यासह उत्तरेकडे गेला होता. त्याच्या शूर बायकोनें शिबंदीस उत्तेजन देऊन शत्रूशीं सामना दिला. वेढा दोन महिने चालला. अखेर पार्माच्या दूतांनीं शिबंदी पलटणांत फितवाफितवी केल्यामुळें, कॅथोलिक लोकांनीं शहरांत उघडपणें बंड केल्यामुळें व नव्या धर्माच्या लोकांचाही शत्रूस शरण जाण्याविषयीं आग्रह पडल्यामुळें श्रीमती एस्पिनॉय इजला शत्रूस शरण जावें लागलें. शत्रूंनीं तिला सैन्यासह बाहेर निघून जाण्यास परवानगी दिली; व जाते-वेळीं तिचा जयजयकार केला.

सन १५८२ सालच्या प्रारंभीं देशाची अराजक स्थिति झालेली पाहून व निरनिराळ्या प्रांतांचा परस्परांविषयीं मत्सरभाव व राष्ट्रीय कामांसंबंधानें उदासीनता व कार्पण्य वगैरे मनांत आणून पुन्हा एकवार राजपुत्रानें सर्व राष्ट्रास मोठ्या कळकळीनें राष्ट्राच्या संरक्षणाची तयारी करण्याविषयीं व अँजूची राजपदावर स्थापना करण्याविषयीं विनंति केली. टुर्नेसारखें

पुराण, संपत्तिमान् व सुंदर शहर शत्रूंनीं आक्रमण केलें असतां सर्व राष्ट्र डोळे मिटून स्वस्थ बसलें होतें. आपल्या गांवावर किंवा शहरावर कांहीं अरिष्ट आल्याशिवाय सार्वजनिक कामांकडे कोणाचें लक्ष जाईना. अशा स्थितींत राजपुत्राच्या विनंतीवरून जागें होऊन राष्ट्रसभेनें अँजूशीं बोलणें करण्याकरितां आपले वकील इंग्लंडमध्यें पाठविले. आल्डेगोंड व इतर कांहीं वकील पूर्वींच इंग्लंडमध्यें गेले होते. ता. २२ नोवेंबर १५८१ चें आल्डेगोंडचें राजपुत्रास पत्र आलें; त्यांत अँजूचा व इलिजाबेथचा विवाह त्याच दिवशीं ठरला असें लिहिलें होतें. ही वार्ता ऐकून नेदर्लंड-मध्यें लोकांनीं मोठे महोत्सव केले. खुद्द इंग्लंडमध्येंसुद्धां लग्नसमारंभा-शिवाय बाकीचे सर्व समारंभ झाले. परंतु पुढील सालचा जानेवारी संपेपर्यंत लग्नाची कांहींच आशा न दिसल्यामुळें अँजूनें नेदर्लंडच्या वकीलाचें निमंत्रण पतकरून या उत्तरसमुद्राच्या कोंकणपट्टीकडे मोर्चा फिरविला. इलिजाबेथ राणी त्याला पोंहोचविण्याकरितां कांहीं मुक्कामा-पर्यंत आली; व तिनें नेदर्लंडपर्यंत पोंहोचविण्याकरितां बरेच इंग्लिश सरदार त्याजबरोबर पाठविले. ता. १० फेब्रुवारी रोजीं फ्लशिंग बंदरांत तो एकंदर लवाजम्यासह उतरला. त्याचें स्वागत करण्याकरितां राजपुत्र ऑरेंज, स. एस्पिनॉय व राष्ट्रसभेचे मुखत्यार आले होते. अँजूचें वय अठ्ठावीस वर्षांचें होतें; परंतु चेहेरा कुरूप व आकार बेढब होता. त्याच्या बुद्धींत थोडी तरतरी दिसे; त्यामुळें तो थोर मनाचा, बुद्धिमान् व सचोटीचा असावा असा लोकांचा प्रथम ग्रह झाला. परंतु त्याचा नीच व घातकी स्वभाव लौकरच व्यक्त झाला. महत्वाकांक्षी परंतु क्षुद्र, साहसप्रिय परंतु भित्रा, कारस्थानी परंतु मूर्ख असा हा गृहस्थ नेदर्लंडचें संरक्षण करण्यास सर्वस्वी असमर्थ होता. तो फ्लशिंग येथें उतरतांच तोफांची सलामी, वाद्यांचे गजर व लोकांचे जयघोष सुरू झाले. फ्लशिंगचे अधिकारी, झीलंडचे निरनिराळ्या ठिकाणचे मुखत्यार यांचीं स्वागतपर भाषणें झालीं; शेवटीं बडा खाना झाला. फेब्रुवारीच्या १७ व्या तारखेस अँजू अँट्वर्पला निघाला. येथें प्राचीन रिवाजाप्रमाणें शहराबाहेर राज्या-भिषेक व राजाच्या शपथा होऊन नंतर नगरप्रवेश करण्याची योजना केली होती. समुद्रतीरावर मोठा दरबार भरला. यावेळीं एका नामांकित

न्यायपंडितानें थोडें स्तुतिपर भाषण करून, " सानंद प्रवेश " सनद फ्लेमिश भाषेंत वाचून दाखविली. अँजूनें ती मान्य करून जुन्या पद्धतीप्रमाणें शपथा घेतल्या; व ब्राबंटचें स्वातंत्र्य कायम राखण्याकरितां आपण आपलें सर्व रक्त आटवूं असें आश्वासन दिलें. पुढें राजवस्त्रें परिधान केल्यावर आणखी कांहीं भाषणें होऊन शहरांत जाण्याकरितां स्वारी निघाली. निरनिराळ्या देशचे व्यापारी व सरदार यांनीं या समारंभास अपूर्व शोभा आली होती. भर दिवसा रस्त्यांनीं मशाली पेटल्या होत्या. शहरच्या वेशीपाशीं येतांच साहित्यमंडळ्यांच्या प्रयोगांनीं सर्व वातावरण गजबजून गेलें; पलटणें व शहरवासी लोक यांनीं सर्व रस्ते दोहोंबाजूंनीं रोखले होते. गवाक्षें व सौधशिखरें रम्य मुखकमलांनीं भरून गेलीं होतीं. स्वारी मुक्कामाच्या ठिकाणीं येऊन पोंहोंचेपर्यंत बरीच रात्र होऊन गेली. निरनिराळ्या राजकीय व धर्मसमाजांचीं अभिनंदनपर मानपत्रें ऐकून त्यांस ' वचने किं दरिद्रता ' या न्यायानें उत्तरें देण्याच्या भाषणसमारंभांत दुसरा दिवस गेला. कॅथोलिकधर्मीयांस नवीन पंथांकडून कांहीं निर्बंध होणार नाहीं असें यावेळीं अँजूनें आश्वासन दिलें. या समारंभाची खरी किंमत पुढें ठरावयाची होती. मध्यंतरीं बोर्डो येथें अँजूशीं ठरलेल्या कराराचीं सत्तावीस कलमें प्रसिद्ध करण्यांत आलीं. यांचा सारांशः—डच् लोकसत्ताक राज्याचें शासकपद वंशपरंपरेनें अँजूच्या घराण्याकडे चालावें. अँजूनें सर्व प्राचीन सनदा, हक्क, कायदे व रूढि यथावत् चालवाव्या; त्यांपैकीं एकाचेंही उल्लंघन झाल्यास त्याला पदच्युत करावा; त्यानें राष्ट्रसभा वर्षांतून एक वेळ तरी भरविली पाहिजे; नेहमीं नेदर्लंडमध्यें राहिलें पाहिजे; सर्व अधिकाराच्या जागा तद्देशीयांशिवाय इतरांस देतां कामा नये; व एखाद्या रिकाम्या झालेल्या जागेस प्रांतिकसभा तीन उमेदवार पसंत करील त्यांपैकीं एका इसमाची निवड केली पाहिजे; त्यानें धर्माच्या बाबतींत हल्लीं अमलांत असलेली व्यवस्था कायम ठेवावी; फ्रान्सशीं नेदर्लंडचें सख्य ठरवावें; व राष्ट्रसभेकडून नक्त वीस लक्ष चार हजार फ्लोरिनची खंडणी घेऊन आपल्या खर्चानें स्पेनशीं युद्ध चालवावें. राष्ट्रसभेनें आपल्या सैन्यास रजा द्यावी. राष्ट्राच्या संमतीवांचून अँजूनें स्पेनशीं कसल्याही प्रकारचा तह अगर करार करूं नये.

फ्रान्स, स्पेन व इंग्लंड यांच्या दरम्यान यावेळीं कोणत्याही प्रकारचें भांडण नसतां फ्रेंचराजाच्या भावानें स्पेनविरुद्ध केलेल्या करारांवरून त्यावेळच्या अंतःराष्ट्रीय कायद्याचें स्वरूप फार विलक्षण असावें असें दिसतें.

ता. २८ मार्च १५८२ हा अँजूचा जन्मदिवस होता. त्या सणानिमित्त राजवाड्यांत सायंकाळीं बडी मजलस झाली. त्या समयास राजपुत्र ऑरेंज व फ्रेंच सरदार यांस निमंत्रण होतें. राजपुत्रानें आपल्या नेहमीच्या रिवाजाप्रमाणें किल्ल्यानजीक एका खाजगी घरांत आपला मुलगा मॉरिस, स. होहेन्लो, लाव्हल व फ्रेंच सरकारचे दोन नामांकित वकील यांसह सायंकाळीं जेवण केलें. जेवणाचेवेळीं स्पॅनिशलोकांच्या अत्याचारांच्या कांहीं चमत्कारिक गोष्टी ऑरेंज मंडळीस सांगत होता. जेवण झाल्यावर दुसऱ्या दिवाणखान्यांत स्पॅनिश शिपायांचे चित्रांतील कांहीं नमुने आपल्या पाहुण्यांस दाखविण्याकरितां ऑरेंज चालला असतां लहान आकाराचा, गांवढळ स्वरूपाचा, काळसर असा एक तरुण मनुष्य पुढें आला, त्यानें राजपुत्राच्या हातांत एक अर्ज टाकला; व राजपुत्राचें लक्ष अर्जाकडे असतां पिस्तुल काढून त्याच्या डोक्यावर झाडलें. गोळी उजव्या कानाखालीं मानेंत शिरली; व दाढेचे दोन दांत घेऊन वरच्या जबड्यांतून बाहेर निसटली. कांहीं वेळ राजपुत्र तसाच निश्चेष्ट उभा राहिला. शुद्धीवर आल्यावर त्यानें "त्याला मारूं नका, मीं त्याला माफी केली आहे !" असे उद्गार काढले; व फ्रेंच सरदाराकडे वळून " अरेरे माझ्या मृत्यूनें महाराजांचा केवढा विश्वासू नोकर नाहींसा होणार आहे!" त्याचे माफीचे उद्गार निघण्यापूर्वींच जवळच्या लोकांनीं या मारेकऱ्याचे भोंसकून हजारों तुकडे केले होते. ताबडतोब वैद्यलोक येऊन त्यांनीं राजपुत्राच्या जखमेवर उपचार चालविले. दारूच्या आगीनें जखम भाजली गेल्यामुळें रक्तस्राव बंद होऊन तो जगेल अशी आशा वाटत होती. त्याला वैद्यांनीं बोलण्याची मनाई केल्यामुळें अशा अनर्थाच्या प्रसंगांत सुद्धां त्याच्या लेखणीचें काम सारखें चाललें होतें. मरेतोंपर्यंत या राष्ट्राचा निदिध्यास त्याला सुटणें शक्य नव्हतें. शहरच्या रखवाली पलटणीचा कप्तान शहरांत राजपुत्र मेल्याची बातमी पसरल्यामुळें त्याला

प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहण्याकरितां थेट त्याच्या दिवाणखान्यांत आला. त्याला राजपुत्र सुखरूप असल्याची बातमी शहरांत प्रसिद्ध करण्याचा हुकूम झाला. अँजूवरच प्रथम लोक संशय घेऊं लागले; व ज्या गृहस्थांनीं मारेकऱ्यास मारला ते त्याचेच साथीदार असल्यामुळें आपलीं नांवें उघडकीस येऊं नयेत या हेतूनें त्यांनीं तें कृत्य केलें असा प्रवाद सुरू झाला. मॉरिस नॅसानें गुन्ह्याचा बारकाईनें तपास केल्यावरून ॲनास्ट्रोनामक दिवाळखोर झालेल्या अँट्वर्प येथील स्पॅनिश व्यापाऱ्यानें राजा व पार्मा यांजकडून बक्षीस मिळविण्याचा करार करून आपल्या जॉरेगाय नामक नोकराच्या हातून हें कृत्य करविलें असें ठरलें. गुन्हा घडण्याच्या पूर्वींच ॲनास्ट्रो पार्माच्या छावणींत जाऊन पोंहोचला होता. राजपुत्राला जगण्याची आशा वाटेना. त्यानें आपली निरवानिरव चालविली; राष्ट्रसभेस अँजूचा अधिकार चालविण्याविषयीं त्यानें निरोप पाठविला. ता. ३१ मार्च हा दिवस अँट्वर्प शहरांत लोकांनीं उपवास करून भजन व प्रार्थना यांत घालवावा अशी दंवडी झाली. दिवसभर लोक भक्तिपुरःसर व डोळ्यांनीं सतत अश्रु ढाळीत देवळांतून राजपुत्रास आराम पडण्याकरितां ईश्वरस्तव करीत होते. कांहीं दिवस राजपुत्राला उतार पडूं लागला. ता. ५ एप्रिल रोजीं जखमेवर धरलेली खपली उडून जाऊन पुन्हा जोराचा रक्तस्राव सुरु झाला. जखम कांहीं केल्या बंद होईना. राजपुत्राच्या जीविताची आशा मावळत चालली. पुढें कांहीं दिवस जखम बोटानें दाबून धरून मंडळी रात्रंदिवस बसली. पुन्हा खपली धरून उतार पडत चालला. ता. २ मे रोजीं राजपुत्र आपल्या पायानें सार्वजनिक मंदिरांत प्रार्थनेस गेला. या धास्तीनें राजपुत्राची प्रियगृहिणी मात्र ता. ९ मे रोजीं त्याला सोडून परलोकीं गेली. या स्त्रीच्या सहवासापासून राजपुत्राला अत्यंत सुख व समाधान वाटत असे. तिच्या पोटच्या त्याला सहा मुली होत्या. ॲनास्ट्रोनें ऑरेंजचा निकाल लागला असें खात्रीनें कळविल्यावरून पार्मानें अँट्वर्प, ब्रुसेल्स, ब्रूज वगैरे शहरांत राजाच्या सत्तेचा आश्रय करण्याविषयीं तावडतोब आज्ञापत्रें पाठविलीं. हॉलंड व झीलंडच्या सभा राजपुत्राच्या स्वास्थ्याची सुवार्ता येण्याची वाट पहात बसल्या होत्या. ती वार्ता समजतांच त्यांच्या आनंदास सीमा उरली नाहीं. या

आनंदोमींच्या सपार्ट्यांत ता. १४ आगष्ट १५८२ रोजीं त्या प्रांतांचें राजपद ड्यूईल्यमला बिनतकरार पतकरावें लागलें. यानंतर त्याचे प्रजेशीं लेखी करारमदार व शपथा होऊन पुढें अधिकारदानाचा समारंभच व्हावयाचा राहिला होता.

राजपुत्राशीं या प्रांतांनीं नवी राज्यव्यवस्था ठरविली; त्यांत राज्ञी मेरीची 'ग्रेट प्रिव्हिलेज' ही सनद आधारभूत धरली होती. त्यांत पूर्वीपासून चालत आलेले हक्क, रूढि व कायदे यांचें पुनरुज्जीवन करावें: हे प्रांत यापुढें एक स्वतंत्र राष्ट्र गणलें जावें; त्यांचा वंशपरंपरागत संस्थानिक या नात्यानें राजपुत्रानें लढाई चालू असेपर्यंत राजानें पूर्वी दिलेल्या अधिकारांबरहुकूम राज्यकारभार चालवावा, असें ठरलें. यावरून त्याच्या हातांत कायदे करण्याचा, न्यायमनसुबा व मुलकी अंमल चालविण्याचा वगैरे सर्व अधिकार अंशतः येऊन पोंहोचले. परंतु या अधिकारांत लोकांस वेळोवेळीं मिळालेल्या सनदांवरून बरेच अपवाद उत्पन्न झाले होते. राजपुत्रास स्वार्थपर महत्वाकांक्षा असती तर खुद्द पूर्ण मुखत्यारीचें राजपद प्राप्त होत असतां त्याच्या ठिकाणीं असलें नियन्त्रित शासकपद पतकरून तो स्वस्थ बसला नसता. यापुढें सर्व राज्यकारभाराचीं सूत्रें त्याच्या हातांत राहिलीं नाहींत; व त्याला आपणास ईश्वरापासून राज्य करण्याचा हक्क मिळाला असेंही प्रतिपादन करण्यास अवकाश राहिला नाहीं. त्याची नेमणूक राष्ट्रसभेकडून झाली होती व त्या सभेनें दिलेले अधिकारच फक्त त्याला चालवावयाचे होते; यापुढें त्याला राष्ट्रसभेच्या संमतीवांचून साम, दण्ड करण्याचा अधिकार उरला नाहीं; तसेंच हुद्याच्या अधिकाऱ्यांची निवडणूक सभेनें पसंत केलेल्या त्रयीमधून कारभारीमंडळाच्या सल्ल्यानें त्यानें करावी असें ठरलें; जागच्या जागीं योग्य रीतीनें सर्वांस सारखा न्याय मिळण्याची जबाबदारी त्याच्यावरच आली; प्रांतिक व राष्ट्रीय सभेंत सर्व सभासदांचें एकमत झाल्याशिवाय त्याला कोणताही नवा कर बसविण्याचा अधिकार राहिला नाहीं; नाण्यांत सभेच्या संमतीवांचून ऑरेंजनें कोणत्याही प्रकारची ढवळाढवळ करूं नये असें ठरलें; सेनाधीशपदाचे अधिकार सोडून बाकी त्याचे सर्व अधिकार नियमांनीं बांधून टाकिले होते; न्यायखात्यांत फक्त देखरेखीचें

व बजावणीचें काम त्याजकडे राहिलें; कायदे करण्याकरितां राज्यसभांनीं आपापल्या प्रांतांत पाहिजेल तितके वेळ सभा भरून कायदेकानू करावेत असें ठरल्यामुळें राजपुत्राचा कायदे करण्याचा हक्क सभांच्या अंगभूत झाला. सभांनीं केलेल्या कायद्यास दरबारी-मंडळाची संमती घेऊन राजपुत्रानें तो पसार करावा एवढाच त्याचा अधिकार होता. याप्रमाणें एक स्वतंत्र लोकसत्ताक राज्य निर्माण झालें. आतां राजपुत्राची समारंभपूर्वक शासकपदावर स्थापना होण्याचेंच अवशिष्ट राहिलें होतें.

स. १५८२ साल संपेपर्यंत लढाई आस्ते आस्ते चाललीच होती. पार्मानें ऊडर्नाड, निनोव्ह वगैरे गांवें सर केलीं. हिंवाळा संपण्यापूर्वी त्यानें स्पेन, इताली वगैरे ठिकाणांहून मागविलेलीं दळें येऊन त्याच्या सैन्यांत साठ हजार निवडक लोकांची भरती झाली. संयुक्तसंस्थानांची फौजही बरीच वाढविण्यांत आली. स. १५८२ सालच्या जुलै व आगष्ट महिन्यांत गेल्डर्स, फीजलंड, घेंट वगैरेंनीं अँजूचा स्वागतपूर्वक स्वीकार केला. या सालचा नाताळचा सण अँट्वर्पच्या कॅथोलिक प्रजाजनांस कांहीं विशिष्ट सवलती मिळाल्यामुळें त्यांनीं मोठ्या महोत्सवांत घालविला. त्यावेळीं अँजूस भेटण्याकरितां फ्रान्समधून बरेच वडेवडे दरबारी लोक आले. त्यांनीं अँजूची नेदर्लंडच्या राष्ट्रसभेनें केलेली परावलंबी स्थिति पाहून फार खेद व तिरस्कार दर्शविला; व अँजूच्या कानांत नेदर्लंडदेश फ्रान्सच्या राज्यास सामील करून फ्रेंच राज्याचें महत्व वाढविण्याचा मन्त्र फुंकला. त्याच्या मनांत ऑरेंजविषयीं त्यांनीं पूर्ण मत्सरभाव उत्पन्न केला. अँजूनें ऑरेंजच्या सावलींत शून्यरूपी न राहतां आपले हक्क स्वतंत्रपणें चालविण्याचा निश्चय केला. सन १५८३ च्या जानेवारी महिन्यांत एके दिवशीं रात्रौ आपले सोबती शय्यागृहांत बोलावून अँजूनें त्यास फ्लँडर्सप्रांतांतील शहरें स्वतंत्र हक्कानें कबजांत घेण्याचा आपला निश्चय कळविला. गांवोगांव शहरवासी लोक व शिबंदी फौजेचे लोक यांजमध्यें कावेबाजपणानें दंगेधोपे उत्पन्न करून, ते मिटविण्याकरितां फौज नेऊन डंकर्क वगैरे शहरें काबीज करावीं असा या मंडळीचा बेत ठरला; अँट्वर्पची कामगिरी अँजूनें स्वतः पतकरली. अँजूनें आनंदाच्या झटक्यांत गुडघे टेकले व ईश्वराचा धावा केला. ता.

१५ जानेवारी रोजीं कांहीं फ्रेंच लष्करी अंमलदारांनीं डंकर्क, डेंडर्मांड, ॲलॉस्ट वगैरे शहरें पूर्वसंकेताप्रमाणें सर केलीं. ब्रूज येथें मात्र बंडवाले फसले. ता. १६ रोजीं ॲंटवर्प शहरांत कांहीं दगा असल्याबद्दल लोकांस संशय आला. शिबंदी पलटणीचे कप्तान व दुसरे अधिकारी या गोष्टीची विचारपूस करण्याकरितां ऑरेंजकडे आले. राजपुत्राला ॲंजूविषयीं पूर्ण विश्वास होता. त्यानें खुद्द ॲंजूकडे लोकांत असलेला बोभाटा कळविण्याकरितां ग्रामाध्यक्षास पाठविलें. या गृहस्थापाशीं व दुसरे दिवशीं मुद्दाम कांहीं लोक भेटीस गेले त्यांजपाशीं ॲंजूनें या बातम्यांचा पूर्णपणें निषेध करून आपण नेदर्लंडच्या स्वातंत्र्याकरितां मरण्यास तयार आहों असें शपथेवर कळविलें. त्याच दिवशीं दोनप्रहरचें जेवण झाल्यावर ॲंजूनें आपला घोडा मागविला; व आपल्या तीनशें शरीररक्षक स्वारांसह शहरच्या किपडोर्प वेशींत प्रवेश केला; तेथें बरोबरच्या स्वारांस शहर कबज्यांत घ्या असा हुकूम करून त्यानें जवळच्या बोर्जहूटच्या छावणीकडे घोडा फेकला. लागलीच या छावणींतून सहाशें स्वार व तीनशें बंदुकवाले येऊन, त्यांनीं वेशींतील पाहरेकरी मारले व तेथें आपला पहारा बसविला. गांवांतील रस्ते व्यापून त्यांनीं फ्रान्सच्या नांवानें जयजयकार सुरू केला. घरोघर लोकांनीं काय गडबड आहे ती पाहण्याकरितां बाहेर तोंडें काढतांच त्यांच्यावर गोळ्यांचे वर्षाव होऊं लागले. शिपाई लोक मोकळें रान पाहून लोकांच्या घरांतून, व्यापाऱ्यांच्या वखारींतून, व जवाहिरवाल्यांच्या दुकानांतून शिरताहेतसें पाहून नागरिकांनीं शस्त्रें धारण केलीं. शहरचे पहारेकरी व सर्व दर्जाचे व धर्माचे लोक क्षणांत मोठ्या उत्साहानें बोर्जचौकांत जमले. तेथून त्यांनीं बंडवाल्यांस हकलून काढिलें. स्त्रिया व पोरें घरांच्या सौधांवरून व खिडक्यांतून कौलें, खुर्च्या वगैरे जड पदार्थ रस्त्यांत बंडवाल्यांवर फेकीत होते. काडतुसें संपलीं असतां नागरिक लोक कोटाचे बुदाम बंदुकींत घालून बंडवाल्यांवर उडवूं लागले. अशा बाणेदार व बेफाम झालेल्या जनसमूहाच्या लाटांत चार हजार फ्रेंच लोक अगदीं हताश झाले. या सपाट्यांत अगदीं गोंधळून, मार खाऊन व एक तृतीयांश लोक रणभूमीवर मेलेले टाकून फ्रेंच लोक पळूं लागले. पुष्कळांनीं खंदकांत उड्या टाकल्या; बऱ्याच लोकां-

चा किपडोर्प वेशीकडे परत जातांना शेवट झाला. या वेशीजवळ मुडद्यांचे ढीग पडले होते. अँजूच्या या विश्वासघातकी मोहिमेंत अडीचशें उच्च घराण्यांतील फ्रेंच सरदार बळी पडले. याशिवाय शिलेदार पेशाचे बरेच फ्रेंच लोक व दोन हजार सामान्य शिपाई या चकमकींत प्राणास मुकले. बाकीचे लोक शत्रूच्या अटकेंत सांपडले. अँट्वर्पच्या नागरिकांपैकीं एकंदर शंभर लोक सुद्धां या झटापटींत पडले नाहींत. अँजूच्या पदरच्या पुष्कळ पोक्त व उदार बुद्धीच्या फ्रेंच मुत्सद्यांनीं या कृत्याबद्दल त्याची निर्भर्त्सना केली. फ्रेंच सैन्याची पळापळ सुरू झाल्याबद्दल खात्रीलायक बातमी समजतांच अँजूला कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन मनाच्या टोचण्या खात तो बाहेरच्या बाहेर पळून गेला. हा सर्व कारभार एका तासांत संपल्यामुळें राजपुत्राला ही बातमी अगदीं अखेर अखेर समजली. त्यानें येऊन नगरवासी लोकांचीं मनें शांत करून पळत सुटलेल्या शत्रूवरील तोफांचा मारा बंद करण्याविषयीं त्यांस विनंति केली. याप्रमाणें "फ्रेंच आपाताचा" शेवट झाला. "स्पॅनिश आपातांत" व या प्रसंगांत मुख्य फरक असा होता कीं, पूर्वीच्या प्रसंगीं हल्ला उघडपणें शत्रू समजलेल्या लोकांकडून येणार असल्यामुळें लोक तयारी करून सावधपणानें होते. हल्लीच्या प्रसंगीं लोक गैरसावध असतांना मित्र व रक्षक समजलेल्या लोकांनीं त्यांच्यावर एकाएकीं हल्ला केला. हल्लीच्या प्रसंगीं लुटीच्या लालुचीनें फ्रेंच लोक एकदम दुकानांतून शिरल्यामुळें शहरवासी लोक तत्काळ चवताळून उठले; व फ्रेंच सैन्यानें प्रथमपासून धास्ती खाल्ल्यामुळें त्याचा सर्वस्वी नाश झाला. शिवाय अँजू डेंडर्मांडकडे पळत असतां वाटेंत मेलिनच्या लोकांनीं समुद्राचे धक्के फोडून त्याचे एक हजार अनुयायी समुद्राच्या पाण्यांत बुडवून मारले.

बर्चेमजवळ सुखरूपपणें छावणी देऊन बसल्यावर अँजूनें ऑरेंज व अँट्वर्पचे अधिकारी यांजबरोबर पत्रव्यवहार सुरू केला. या वेळीं अँजूनें आपल्या लेखांत दाखविलेला बेशरमपणा अत्यंत आश्चर्यकारक होता. त्यानें संयुक्तसंस्थानांशीं व राजपुत्राशीं केलेलीं इमानें व करार मोडून, व जिकडे तिकडे आपली स्वतंत्रसत्ता व कॅथोलिकधर्माची स्थापना करण्याचा बुद्धिपुरःसर यत्न करून नेदर्लंडमध्यें आपल्या श्रमाची योग्य

चीज न झाल्यामुळें व अंशतः सहजरीतीनें ही गोष्ट घडली असें तो प्रतिपादन करूं लागला. त्यानें आपलीं मागें राहिलेलीं भांडींकुंडीं वगैरे सामान पाठवून देण्याविषयीं व फ्रेंच कैदी मुक्त करण्याविषयीं राजपुत्राला निरोप पाठविले. संयुक्तप्रांतांच्या सभेसही त्यानें याच मजकुराचीं पत्रें पाठविलीं. सर्व अधिकाऱ्यांनीं जमून असें ठरविलें कीं फ्रेंच कैदी मुक्त करावे व अँजूचें सामानसुमान पाठवून यावें. शिवाय पुढील व्यवस्था ठरविण्याकरितां अँजूकडे मुखत्यार पाठवावे. असा जबाब मिळतांच आपला गुन्हा पचला असें वाटून अँजूनें जास्तच भुवया चढविण्यास सुरवात केली. त्यानें आतां राष्ट्रसभेकडून आपल्यासंबंधीं झालेल्या गैरवर्तनाबद्दल तीस माफी करून हा दंगा आपल्या सैन्याच्या उच्छृंखलपणामुळें एकाएकीं घडून आला असेंही प्रतिपादन केलें. अँट्वर्पच्या अधिकाऱ्यांनीं नेदर्लंडच्या राज्यव्यवस्थापकांकडून अँजूचा कोणताही अपराध झाला नाहीं हें अँजूच्याच विरोधी लेखांवरून व एकाच वेळीं अनेक शहरांत झालेल्या क्रान्तीवरून सिद्ध करून दाखविलें; व ती गोष्ट जाहिरपणें प्रसिद्ध केली. या गोष्टीमुळें नेदर्लंडच्या वकिलांची व अँजूची बरीच बाचाबाच होऊं लागली. या भांडणांत ऑरेंजनें मध्यस्थी करावी असें अँजूचें लिहून आल्यावरून, त्यानें अँजूनें स्वीकारलेला आत्मसमर्थनाचा मार्ग अशुद्ध व हास्यास्पद होता हें त्यास स्पष्टपणें कळविलें; व पूर्वपदास्थ होण्यास त्यानें सरळ व न्याय्य मार्गाचें अवलंबन करावें असें सुचविलें. फ्रेंच राजपुत्राशीं उत्पन्न झालेलें द्वैत मिटवितां आल्यास मिटवून टाकण्याचा ऑरेंजचा विचार होता. कारण नेदर्लंडांत पुन्हा बेबंदशाही माजण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. रुडोल्फ बादशहा, इंग्लिश दरबार, जर्मनींतील प्राटेस्टंट संस्थानिक यांची नेदर्लंडविषयीं उदासीनवृत्ति अद्याप कायम होती. अशा स्थितींत फ्रेंच राष्ट्राचें वैर संपादन केल्यापासून नेदर्लंडवर फार अनिष्ट परिणाम घडण्याचा संभव होता. सर्व नेदर्लंड देशाचें एक बलाढ्य राष्ट्र बनविण्याची त्याला अद्याप आशा होती; व हें काम एखाद्या विदेशी राजपुत्राच्या सहाय्यानें का होईना, परंतु तो देशांत चिरस्थायी होऊन घडल्यास तें घडवून आणण्याचा त्याचा निश्चय ठरला

होता. पार्मा ऑरेंजच्या प्रत्येक चुकीचा फायदा घेण्यास टपूनच बसला होता. त्यानें मोठ्या आवेशयुक्त भाषेनें नेदर्लंडच्या लोकांस नुकत्याच घडलेल्या प्रकाराबरून सावध होण्याविषयीं जाहिर विनंति केली. खुद्द अँजूसुद्धां इकडे राजपुत्र ऑरेंज व संयुक्तसभा यांस अंशतः खेदाचीं व रागाचीं पत्रें पाठवून तिकडे पार्माशीं गुप्तपणें आपलें स्वातंत्र्य स्पेनच्या राजास विकण्याच्या शर्ती निर्लज्जपणें ठरवीत होता. अँजूनें या बाबतींत केलेल्या मागण्या पार्मास फार जबर वाटल्या; तथापि तो त्याला उघडपणें नाराज करण्यास भीत होता. ऑरेंजला हें कारस्थान समजलें होतें. राष्ट्रांत लोकांच्या मनाची चलबिचल दिसूं लागली. त्यामुळें अँजूसारख्या अधम व उलट्या काळजाच्या पुरुषाशीं सख्य करणें त्यास अवश्य वाटूं लागलें. फ्रान्समधून आलेला वकील मिरँबो यानेंही एकंदर परिस्थितीचें चित्र सभेपुढें मांडून, अँजूला दोन गोष्टी सांगून राष्ट्रपक्षाशीं पुन्हा सलोखा करण्याची आपणास आज्ञा आहे असें फ्रान्सच्या तर्फे कळविलें. या वकिलानें राजपुत्र ऑरेंजशीं सल्लामसलत करून, त्यास मध्यस्थ होऊन हें भांडण मिटविण्याविषयीं विनंति केली. राजपुत्रानें, अँजू खऱ्या भावानें वागत असल्यास, व कृतकर्माबद्दल मोकळ्या मनानें पश्चात्ताप दर्शवून पूर्वी ठरलेला करार पाळण्यास तयार असल्यास बिघडलेली घडी पुन्हा बसवितां येईल, असें मिरँबोला कळविलें.

या संधीस संयुक्तसंस्थानांच्या सभेनें राजपुत्राला हल्लींच्या घोटाळ्या-संबंधानें आपला अभिप्राय प्रसिद्ध करण्याविषयीं सूचना केली. त्यावरून त्यानें यावेळीं एक महत्त्वाचा लेख प्रसिद्ध केला. त्याच्या प्रारंभीं अँजूशीं येथ-वर घडलेल्या व्यवहारांचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें होतें. नंतर, "राज्य-व्यवस्था सुरळीत चालण्यास कांहीं अन्य उपाय न सुचल्यामुळें निरुपाय होऊन अँजूशीं तह ठरला; असें असतां त्याचा दोष सर्वस्वी आमचेवर लादला जात आहे. अँजूची कृति निःसंशय फार दुष्ट व विश्वासघातकी होती व त्याच्या योगानें बोर्डोच्या तहावरून त्यास मिळालेले हक्क नष्ट झाले आहेत. आतां पुढें स्पेनच्या राजाशीं तह करणें, अँजूशीं पुन्हा सलोखा करणें किंवा आपल्याच सामर्थ्यावर आपलें संरक्षण करणें हे तीन उपाय आपणास उरले आहेत. वाळून प्रांतांशीं करार करून पार्मानें

मागोमाग इताली व स्पेन येथील सैन्य नेदर्लंडांत आणून भरलें; यावरून स्पॅनिश लोकांनीं शपथपूर्वक केलेले करार कितपत पाळले जातील हें विचारार्ह आहे. शिवाय सद्यस्थितींत स्पॅनिशसरकार कोणतेही करार सुद्धां करण्यास तयार होईलसें वाटत नाहीं. फ्रेंच लोक शत्रु झाले तर आपलें फार नुकसान होईल; परंतु स्पॅनिश लोकांच्या मित्रत्वापासूनच घात होण्याचा संभव आहे; व धर्मसंशोधनेचें पुन्हा सत्र बसेल. अँजूची गत-संग्रामांत बरीच हानि झाली असल्यामुळें तो विरुद्ध पक्षांत राहिल्यास नेदर्लंडवर सूड उगविल्याशिवाय राहणार नाहीं. इलिजाबेथ राणीचें मनही शुद्ध नाहीं. फ्रान्सचें शत्रुत्व संपादन केल्यास स्पेनला ही संधि चांगलीच सांपडेल. फ्रान्स व स्पेन या दोन राष्ट्रांशीं विरोध करण्याचें सामर्थ्य आपणास नाहीं. आत्मसंरक्षणाचा मार्ग सर्वांत उत्तम. परंतु शिबंदी ठेवण्याच्या व एकविचारानें कारभार चालविण्याच्या कामीं वारंवार येणाऱ्या अडचणी, प्रांतिकसभांचीं आपसांतील मात्सर्यमूलक भांडणें, खर्चाच्या कामांत व वरिष्ठ सरकारासंबंधानें अनुदारपणा, व आणीबाणीच्या प्रसंगीं स्तब्धपणा व शिथिलता यांचा विचार करितां ती गोष्ट संभवनीय दिसत नाहीं." करितां अँजूशीं तडजोड करावी असा त्यानें निश्चयात्मक अभिप्राय दिला; व कोणतीही गोष्ट कर्तव्य ती एकदम केली नाहीं तर राजकीय हक्कास व धर्मस्वातंत्र्याला मोठा धक्का पोंहोचेल असें निर्भयपणें प्रतिपादन केलें.

तडजोड करण्याविषयीं इलिजाबेथचा अभिप्रायही लिहून आला. व अँजूनें व फ्रेंच वकिलांनीं सढळपणानें आश्वासनें दिल्यावरून ता. २८ मार्च रोजीं एक हंगामी व्यवस्था ठरली. अँजूच्या सैन्यास खर्चाकरितां सभेनें तीस हजार फ्लोरिन द्यावे व अँजूनें काबीज केलेलीं शहरें परत करावीं; फ्रेंच कैदी मुक्त करावे व अँजूचें सामान त्यास पाठवावें; व निरंतरची व्यवस्था ठरविण्याकरितां उभयपक्षाच्या वकिलांनीं वाटाघाट करावी, असें ठरलें. ही वाटाघाट सावकाशीनें चालली होती. ता० २८ जून रोजीं अँजू पारिसला गेला, तो पुन्हा परत आला नाहीं. ता. १२ एप्रिल रोजीं ऑरेंजचें प्रसिद्ध नवीनधर्मी फ्रेंच वीर कॉलिनी याच्या मुलीशीं लग्न झालें.

सन १५८३ च्या उन्हाळ्यांत हॉलंड व झीलंड प्रांतांनीं अँजूशीं सर्व

संबंध तोडून टाकण्याबद्दल राजपुत्राला विनंति केली; व सैन्य वाढवून राष्ट्रानें आपलें आपणच संरक्षण करावें असें सुचविलें. राजपुत्रानें राजपद स्वीकारावें असा आगष्ट महिन्यांत मिडलबर्ग येथें भरलेल्या संयुक्त-संस्थानांच्या सभेनें ठराव करून ऑरेंजकडे विज्ञाप्ति पाठविली. ऑरेंजनें या गोष्टीबद्दल नाखुषी दाखवून त्याचा पूर्ण विचार शहरोशहरच्या स्थानिक सभांनीं पुन्हा करावा व सैन्याच्या व राज्यकारभाराच्या खर्चाची प्रथम योग्य तजवीज करावी असें सुचविलें. शिवाय आपली कोणत्याही प्रकारची स्वार्थपर महत्वाकांक्षा नाहीं; आपण राष्ट्रीय व धर्म स्वातंत्र्या-करितां आपलें व आपल्या कुटुंबाचें सर्व तन, मन, धन अर्पण करून शक्य ती खटपट पंधरा सोळा वर्षे केली; त्याचा झालेला परिणाम हेंच आपलें मोठें बक्षीस व वृद्धापकाळीं समाधानाचें साधन होय. आतां आपल्या हातून राज्यकारभाराची दगदग होणार नाहीं; करितां त्या कामावर दुसऱ्या कोणाची योजना व्हावी, असें त्यानें सभेस कळविलें. ब्राबंटकडून राजपद स्वीकारण्याविषयीं त्याला मुद्दाम विनंति आली. "परंतु स्पेनच्या राजास माझा हेतु स्वार्थपर होता असें ह्मणण्यास मी संधि देणार नाहीं" असा त्यांस निरोप पाठवून त्यानें अँजूची पुन्हा स्थापना करण्याची खटपट चालविली.

इकडे सरदार पार्माचा उद्योग सतत चाललाच होता. राजाच्या सांवलींत परत येण्याविषयीं त्यानें संयुक्तप्रांतांस केलेलें आव्हान सफळ झालें नाहीं. अँजूनें उघडीं टाकलेलीं डंकर्क, न्यूपोर्ट वगैरे शहरें त्याच्या सेनानींनीं परत मिळविलीं. सप्टेंबरच्या २२ व्या तारखेस झुट्फन शहर सरकारपक्षास मिळालें. तेथें व्हान्डेन्बरच्या दप्तरांत गेल्ड्रेज प्रांतांतील झुट्फन वगैरे शहरें पार्माच्या स्वाधीन करण्यासंबंधानें एक पत्र सांपडलें. व्हान्डेन्बरला पकडून राष्ट्रपक्षानें कांहीं दिवस अटकेंत ठेवलें. त्याच्या जबानींत कांहीं निष्पन्न न झाल्यामुळें त्याला सोडून द्यावें लागलें. पुढें त्यानें सरकारची नोकरी पतकरली. सन १५८३ सालअखेर घेंट व फ्लँडर्समधील इतर शहरें शत्रूच्या स्वाधीन करण्यासंबंधानें झालेला एक राष्ट्रद्रोही कट उघडकीस आला. सरदार शिमे यास यावेळीं घेंटच्या सुभेदारांचीं वस्त्रें प्राप्त झालीं होतीं. त्यानें प्रथम नवीन धर्माकडे अनुकूल

वृत्ति दाखवून हा अधिकार मिळतांच घेंट शहर व फ्लँडर्स प्रांत राजाच्या स्वाधीन करून आपणास माफी व बहडती मिळविण्याची गुप्त मसलत सुरू केली. चॅम्पेनी यावेळीं घेंट येथें कैदेंत होता; तो या गुप्त बेताचा मुख्य कल्पक असावा. लोकसत्ता व धर्मस्वातंत्र्य यांची गर्जना करणारा लोकनायक इम्बाइझ हा आपलें राष्ट्र फिलिप व धर्मसंशोधन यांचे स्वाधीन करण्याच्या या कामांत पुरस्कर्ता होता. हा यावेळीं ग्रामसभेचा अध्यक्ष होऊन स. १५८४च्या उन्हाळ्यांत पार्मशीं या गोष्टीसंबंधानें बोलणें सुरू करण्याचा ग्रामसभेंत ठराव झाला. संयुक्तराष्ट्रीयसभा, अँट्वर्पचे अधिकारी, ब्राबंटची सभा यांनीं घेंटची फार कळकळीच्या व जोरदार भाषेनें कानउघाडणी केली. फिलिपनें नेदर्लंडांत किती प्राणनाश केला; स्पॅनिश लोकांच्या शब्दावर कितपत विश्वास ठेवितां येईल; फ्लँडर्स प्रांतानें राजाचें जूं मानेवर घेतलें असतां नव्या धर्माची काय स्थिति होईल याचें त्यांनीं आपल्या लेखांत चांगलें विवेचन केलें. राजपुत्रानेंही या प्रसंगीं घेंटला उपदेशपर पत्र पाठविलें. फ्लँडर्स प्रांत गेल्यावर नेदर्लंड देश संयुक्त व स्वतंत्र राष्ट्र होत नाहीं अशी त्याची खात्री होती. हा उपदेश व्यर्थ गेला नाहीं. याच सुमारास डेंडरमांड येथें कांहीं राष्ट्रद्रोही खटपट केल्याबद्दल इम्बाइझला देहान्तशासन मिळालें. पुढें कांहीं दिवसांनीं घेंट शहरानें राष्ट्रपक्षास धरून चालण्याचा ठराव केला. फ्लँडर्समधील इतर शहरांनीं घेंटचें अनुकरण केलें. ब्रूझ शहर मात्र स. शिमेंने सरकारच्या स्वाधीन केलें व राजाश्रय संपादन केला. स. १५८४च्या एप्रिल महिन्यांत अँजूच्या तर्फे वकील फ्रेंचसरकारचीं आश्वासनपत्रें घेऊन नेदर्लंडांत आले; व बोर्डोच्या तहास धरून अँजूशीं तडजोड ठरण्याचा रंग दिसूं लागला. परंतु ता. १० जून १५८४ रोजीं अँजू रक्त ओकून एकाएकीं मरण पावल्यामुळें हें प्रकरण कायमचें शेवटास लागलें.

राजाचा बहिष्कार प्रसिद्ध झाल्यापासून राजपुत्राचा प्राण हरण करून त्या कामगिरीबद्दल लागलेलें बक्षीस मिळविण्याचे वारंवार प्रयत्न होऊं लागले. प्रथम जॅरेगायचा अँट्वर्प शहरीं व बाझाचा ब्रूझ येथें असे दोन प्रयत्न झाले. सन १५८३ सालीं डोर्डोनो नामक गृहस्थ मुद्दाम स्पेनमधून येऊन त्यानें लामॉटच्या सल्ल्यानें याच प्रकारचा एक

यत्न केला. सन १५८४ च्या एप्रिल महिन्यांत फ्लशिंग येथील हॅन्स हँझुन नामक व्यापाऱ्यास अशाच यत्नाबद्दल फाशीची शिक्षा झाली. याच सुमारास ली गॉथ नामक सरकारच्या कैदेंत असलेल्या फ्रेंच अंमलदाराकडून एक असाच प्रयत्न करण्याचा पार्मानें घाट घातला. परंतु हा गृहस्थ राजपुत्राचा भक्त असल्यामुळें त्यानें या मिषानें आपली मुक्तता करून घेऊन, पुढें ऑरेंजपाशीं येऊन झालेला वृत्तान्त त्यास कळविला.

सन १५८४ च्या उन्हाळ्यांत वुइल्यम ऑरेंज हा डेल्फ शहरीं रहात होता. या ठिकाणीं मागील हिंवाळ्यांत त्याला फ्रेडरिक हेनरी नांवाचा मुलगा होऊन त्याच्या नामकरणानिमित्त समारंभ चालला होता. डेल्फ नांवाच्या मोहल्यांत प्रार्थनामंदिरासमोर राजपुत्र एका दुमजली घरांत रहात असे. ता. ८ जुलै रोजीं अँजूच्या मरणाची बातमी घेऊन फ्रेंच दरबारचा एक जासूद या ठिकाणीं आला. अँजूच्या मरणाची खुलासेवार हकीकत ऐकण्याकरितां वुइल्यमनें या जासुदाला आपल्या निजण्याच्या खोलींत बोलविलें. त्यानें फ्रान्सिस गियान असें आपलें नांव प्रख्यापित केलें होतें. तो एका नवीनधर्मी उपदेशकाचा आपण मुलगा आहों असें सांगून फार धार्मिकपणानें वागत असे. त्याचें वय सत्तावीस वर्षांचें असून आकृति लहान व सडपातळ, चेहेरा क्षुद्र व काळवट रंगाचा, व एकंदर स्वरूप अगदीं सामान्य निरुपद्रवी माणसाप्रमाणें दिसत होतें. परंतु या सौम्य व साध्या बाह्यस्वरूपाखालीं फार धाडशी व डावेरपणाचे विचार चालले होते. हा गृहस्थ बाल्थाझार जीरार्ड नामक पक्का धर्मवेडा कॅथोलिक होता. यौवनदशा प्राप्त होण्यापूर्वीच त्यानें वुइल्यम ऑरेंजचा खून करण्याचा निश्चय केला होता. ऑरेंजविरुद्ध बहिष्काराचा हुकूम प्रसिद्ध होतांच त्याचा लहानपणचा विचार फार प्रबल झाला. त्यानें आपला बेत दोन तीन प्रसिद्ध जेसूट पंडितांपुढें व एका मठाधिपतीपुढें मांडला. त्यांनीं त्याला पार्माकडे जाण्याविषयीं सुचविलें. फिलिप व ग्रेनव्हिल यांजप्रमाणेंच पार्माची राजपुत्राचा जीव घेतल्यावांचून नेदर्लंडांत राजाची सत्ता कायम रहात नाहीं अशी खात्री झाली होती. हें काम साधण्याकरितां त्यानें पुष्कळ लोकांची योजना केली होती व बरेच पैसेही खर्च केले होते. जीरार्डला पाहून त्याच्या हातून हें काम

उरकेल असें त्यास वाटलें नाहीं. त्यानें त्याला एकदम रजा दिली. परंतु पुढें त्याचा कॅथोलिकधर्मासंबंधानें तीव्र अभिमान व त्या-बद्दल देह खर्ची घालण्याची तयारी पाहून त्यानें त्यास आपले मुखत्यार पाठवून उत्तेजन देण्याचा क्रम चालविला. मात्र या कामा-करितां किरकोळ खर्च सुद्धां जीरार्डला त्याजपासून मिळाला नाहीं. परंतु जीरार्डचा निश्चय ढळला नाहीं. त्यानें 'सहा आठवड्यांत तुह्माला माझी हकीकत कळेल' असा पार्माला निरोप पाठविला. नंतर स. मॅन्स्फील्ड याची चोरलेली मुद्रिका ऑरेंजच्या कारभारीमंडळास दाखवून राष्ट्रपक्षाकडून अँजूकडे निघालेल्या वकीलमंडळीच्या अनुयायीवर्गांत आपला समावेश करून घेऊन जीरार्ड फ्रान्सला गेला. तेथून अँजूच्या मरणाची बातमी घेऊन तो ता. ८ जुलै रोजीं ऑरेंजपुढें तो एकांतांत असतांना पुढें येऊन उभा राहिला होता. त्यानें हातीं घेतलेल्या कामास ही संधी अमूल्य होती; परंतु हा सुयोग अकल्पित येऊन पोंहोचल्यामुळें त्याची अद्याप कोणतीच तयारी झाली नव्हती.

रविवारीं जिकडे तिकडे प्रार्थनेच्या घंटानादानें शहर दणाणून गेलें होतें. लोक चांगले पोषाक करून प्रार्थनामंदिराकडे जाण्याच्या गडबडींत होते. अशा समयीं जीरार्ड ऑरेंजच्या वाड्याच्या पुढील मैदानांत उदास व सचिन्त चेहेरा करून उभा होता. त्याला पाहारेकऱ्यांनीं 'कां उभा राहिलास?' ह्मणून प्रश्न केला. कपडे धड नाहींत, बूट फाटले आहेत त्यामुळें समाजांत प्रार्थनेस जाण्याससुद्धां लाज वाटत आहे, अशी आपली रडकथा त्यानें गाइल्यावरून पाहारेकऱ्यांनीं ही गोष्ट राजपुत्रा-च्या कानावर घातली. त्यानें लागलींच त्याला बरीचशी रकम देण्याचा हुकूम केला. ती घेऊन जीरार्डनें एका शिपायापासून एक पिस्तुल व काडतुसें खरेदी केलीं. या शिपायास आपल्या पिस्तुलाचा काय उपयोग झाला हें दुसरे दिवशीं समजतांच त्यानें आत्महत्या केली. मंगळवार ता. १२ जुलै १५८४ रोजीं वाक्संयमी वुइल्यम आपल्या बायकोस हातांत धरून दिवसा बाराच्या सुमारास जेवणाच्या खोलीकडे निघाला. त्याचा पोषाक या वेळीं नेहमीच्या पद्धतीप्रमाणें फार साधा होता. जीरार्डनें दारांत येऊन त्याजपाशीं एक परवाना मागितला. त्याचा निस्तेज व

कावराबावरा चेहेरा पाहून वुइल्यमच्या पत्नीस संशय आला. परवाना देण्याविषयीं ऑरेंजनें चिटणिसास हुकूम केला. लुईझानें या गृहस्था-संबंधीं विचारपूस केली; व असला दुष्ट व खुनशी चेहेरा आपण कधींही पाहिला नाहीं असे उद्गार काढिले. राजपुत्रानें जेवणाचे वेळीं लीवार्डन शहरचा ग्रामाध्यक्ष पंक्तीस होता त्याजबरोबर फ्रीजलंडच्या सामाजिक व राजकीय स्थितीसंबंधानें वाटाघाट चालविली होती. जेवण संपून वुइल्यम देवडीच्या कोपऱ्यांतील खोलींत येऊन वर जाण्याकरितां जिना चढूं लागला. इतक्यांत जिन्याच्या कोपऱ्यांतून येऊन जीरार्डनें त्याच्यावर तीन गोळ्या झाडल्या. वुइल्यमच्या तोंडांतून "ईश्वरा, माझ्या आत्म्यावर कृपा कर, माझ्या देशबांधवांवर कृपा कर!" असे उद्गार निघाले. त्याच्या बहिणीनें 'ईश्वर-स्मरण केलें कां' म्हणून त्यास विचारलें; त्यावर तो "होय" म्हणाला. नोकरांनीं त्याला कांहीं वेळ पायरीवर बसवून नंतर जेवणाच्या खोलींत नेऊन निजविलें. थोड्याच वेळांत या ठिकाणीं त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

जीरार्डला मागच्या वाटेनें पळून जातांना शिपायांनीं पकडला. शहरच्या मॅजिस्ट्रेटांस "मी धर्मशत्रू मारला" असें त्यानें सांगितलें. त्यानें आपला सविस्तर कबूलजबाब लिहून दिला. त्याला असह्य यमयातना केल्या तरी त्यांपासून त्याला दुःख झाल्याचें दिसेना. मात्र त्यानें पार्माचीं वगैरे नांवें पुढें कबूल केलीं. वुइल्यम ऑरेंज जिवंत नसल्यामुळें त्याला कोणी वाली राहिला नाहीं. त्याला शिक्षेचा हुकूम झाला तो असाः जीरार्डचा उजवा हात तापविलेल्या पाहारेनें जाळून टाकावा; त्याचें मांस हाडांवरून फाडून काढावें; त्याच्या अवयवांचे तुकडे करावे; त्याचीं आंतडीं फाडून काढावीं; त्याचें काळीज जिवंतपणीं तोडून काढून त्याच्या तोंडावर फेंकावें. ही शिक्षा शब्दशः अमलांत आली. व प्राण जाईपर्यंत तिची बजावणी होत असतां जीरार्ड हंसत होता! जीरार्डच्या बापाला या कामगिरीबद्दल तीन मोठ्या जहागिरी मिळाल्या. मरणाचे वेळीं वुइल्यमचें वय एकावन्न वर्षांचें होतें. त्याला, पहिली बायको ॲनी एग्मॉन इजपासून फिलिप नांवाचा एक मुलगा व मेरी नांवाची एक कन्या होती. सॅक्सनीची ॲना इजपासून त्याला इतिहासप्रसिद्ध मॉरिस नॅसा हा एक पुत्र व दोन मुली होत्या. बोर्बोनच्या शार्लटच्या पोटच्या त्याला सहा

मुलीच हात्या; व लुइसा कॉलिनीच्या पोटीं त्याला या लोकसत्ताक राज्याच्या भरभराटींत सुभेदारपद पावलेला फ्रेडरिक हेनरी नांवाचा मुलगा होता. ता. ३ आगस्ट रोजीं डेल्फ येथें सर्व राष्ट्राच्या अश्रुपातांत त्याच्या देहाचा अन्त्यविधि झाला. एका मनुष्यदेहाकरितां इतका अश्रुपात कधींच झाला नसेल.

वुइल्यमनें जन्मभर परिश्रम करून एक स्वतंत्र लोकसत्ताक राज्य निर्माण केलें. त्याच्या मरणानें त्याचा विस्तार मर्यादित झाला. बेल्जिल सरदारांचे यत्न, धर्मद्वेष, पार्माचें खोल राजकारण व युद्धचातुर्य व वुइल्यमचा मृत्यु यांच्या योगानें उत्तरेकडील संयुक्त संस्थानें व दक्षिणेकडील कॅथोलिकधर्मी प्रांत यांत झालेली फूट कायम राहिली. अँट्वर्प शहर पार्मानें आतां आपल्या पक्षांत सामील करून घेतलें. हॉलंड, झीलंड प्रांतांचें शासकपद मोकळेंच राहिलें. वुइल्यम जिवंत असेपर्यंत तो सर्व राष्ट्राचा 'मायबाप' होता; राजा, ग्रॅन्व्हिल यांच्या कुटिल राजनीतीस तो भारी होता. त्याच्या मरणानें नेदर्लंड देशाचें ऐक्य होण्याची, राज्यव्यवहाराचें एक धोरण राहण्याची, व सर्व राष्ट्राचा इतिहास एक स्वरूपाचा होण्याची आशा संपली. नेदर्लंडच्या स्वातंत्र्याचें जुनें खोड संभाळून वुइल्यमनें त्याला नवा जोम आणण्याची कामगिरी केली होती. वुइल्यमचें जीवनवृत्त हाच डच स्वराष्ट्राभ्युदयाचा इतिहास होय. हें जीवनवृत्त ह्मणजे एका महान् ख्रिस्ती विभूतीची पुण्यकथा आहे. या महापुरुषासंबंधानें चार सामान्य विचार लिहिले ह्मणजे हा इतिहास संपला.

वुइल्यम ऑरेंज हा शरीरानें बराच उंच व सडपातळ पुरुष होता. त्याचे डोळे व केस पिंगट असून डोकें लहान आकाराचें परंतु सप्रमाण होतें. भुंवया विशाल व कपाळ सुरकुतलेलें होतें. त्याचा मुख्य मनोधर्म ईश्वरभक्ति हा होता. त्याच्या जोरावर येतील तीं संकटें व श्रम सोसण्यास ईश्वरावर हवाला टाकून तो सदैव तत्पर असे. शिवाय परधर्माविषयीं पूर्ण सहिष्णुता हें त्याचें मुख्य तत्त्व होतें. त्याचा दृढनिश्चय हें ईश्वरभक्तीचेंच एक अंग होतें. स्पेनसारख्या अवाढव्य राजसत्तेशीं संग्राम करण्यांत त्यानें दाखविलेला एकनिष्ठपणा त्याच्या शत्रूंसही आश्चर्यचकित करून टाकीत होता. त्याला "प्रवातनिष्कंपशैल" अशी सार्वत्रिक

संज्ञा मिळाली आहे. फ्रान्समध्यें ओलीस असतांना फिलिपचा गुप्तबेत समजल्यापासून तों मरेपर्यंत धर्मस्वातंत्र्य व राष्ट्राचे जुने हक्क हे स्थापन करण्याकरितां त्याची सर्व खटपट चालली होती. हेंच त्याचें जीवितकर्तव्य होतें. व त्याच्यासंबंधानें तोंडावाटे एक चकार शब्द न काढतां, येईल त्या संकटास पाठ देऊन व पडेल तो स्वार्थत्याग करून त्यानें आजन्म धिमेपणानें आपलें कर्तव्य चालविलें होतें. या कामाकरितां त्यानें आपल्या सर्व जहागिरी व संपत्ति गमावून कचित्प्रसंगीं आपणास अन्नास महाग करून घेतलें; दारिद्य व विदेशवास पतकरला. त्यानें मनांत आणिलें असतें तर त्याला जहागिरीच काय परंतु पाहिजेल ती वस्तु प्राप्त झाली असती. असे प्रसंग वारंवार येत होते. त्यावेळीं त्यानें किती निरपेक्षबुद्धि प्रगट केली हें मागें व्यक्त झालेंच आहे. खुद्द राष्ट्रपक्षाकडून मिळणारें राजपद स्वीकारण्यास सुद्धां तो तयार झाला नाहीं. केवळ राष्ट्रहिताकरितां तो इतका पाण्यासारखा पैसा ओतीत होता कीं त्याच्या मरणोत्तर त्याचा भाऊ जॉन यास मृत्युपत्र चालविणार या नात्यानें सावकारांचें देणें सुमार चौदा लक्ष व बहुतेक आप्तबांधवांच्या देण्याच्या मोठमोठ्या रकमा कबूल कराव्या लागल्या. मरतांना, ' ईश्वरा माझ्या देशबांधवांवर करुणा कर ! " असे त्याचे शेवटचे उद्गार होते.

त्याच्या ज्ञानशक्ती विलक्षण होत्या. मोठें सेनापत्य करणारास लागणारा नियमितपणा वगैरे व्यावहारिक गुण त्याच्या अंगीं भरपूर होते परंतु त्याला मोठा सेनानी ह्मणणें रास्त होणार नाहीं. चार्लस बादशहाच्या वेळीं त्यानें मारलेले कांहीं प्रसंग, म्यूज नदी आल्व्हाच्या डोळ्यासमोर उतरून येण्यांत त्यानें दाखविलेलें धैर्य, व लीडनच्या विमोचनार्थ त्यानें रचलेले बेत हे त्याच्या युद्धचातुर्याचें कायमचें स्मारक झाले आहेत. शिपाईगिरीला लागणारा दृढनिश्चय, कर्तव्यपरता, पराभवांच्या वेळचें मनोधैर्य त्याच्या इतकें कोणत्याच व्यक्तींत आढळणार नाहीं. धर्मच्छला-च्या मार्‍याखालीं जगांतील तत्कालीन महान्साम्राज्याशीं टक्कर देऊन त्यानें एक स्वतंत्र लोकसत्ताक राज्याचा रोपा लावला हेंच त्याचें मुख्य शौर्यकृत्य होय. त्यानें पराक्रम करून एका राष्ट्राला स्वातंत्र्य व स्वराज्य हे मोठे लाभ संपादन करून दिले. या कामाकरितां त्याला दीर्घ संग्राम

करावा लागला, व त्यांत अखेर त्याचा देह खर्ची पडला; परंतु त्यांत त्याला अखेर पूर्ण यश प्राप्त झालें. त्यानें भाडोत्री सैन्य व एका लुई-शिवाय सामान्य सेनापती यांच्या सहाय्यानें आल्व्हा, रेकिसन्स, डॉन जॉन, अलेक्झँडरसारख्या जगद्विख्यात सेनानींशीं सामना करून फिलिपचा तुरा खालीं पाडला. आर्द्वा, हेनो या प्रांतांशिवाय बाकी पंधरा प्रांतांनीं या वेळीं राजसत्तेचा निषेध केला होता. त्याची राजषाड्गुण्य-चक्षुता अद्वितीय होती. तो त्या कालचा सर्वांत श्रेष्ठ मुत्सद्दी होता. त्याची सूक्ष्मबुद्धि, मानवी स्वभावाचें परिज्ञान, व सावधगिरी याला उपमाच नाहीं. आपल्या मुत्सद्दिरीच्या जोरावर त्यानें तीन वेळ बँटशहर शत्रूच्या तावडींतून सोडविलें. त्याच्या मरणानंतर घेंट, अँट्वर्प वगैरे शहरें पटापट शत्रूच्या हातीं जाऊन सर्व दक्षिण नेदर्लंड कायमचें गुलामगिरींत राहिलें. लोकसमाजाच्या मनोवृत्तींवर एखाद्या तंतुवाद्याच्या तारांप्रमाणें त्याचा हात चालत असे. लोकांच्या मनोवृत्ती आकर्षण करण्यास लागणारें वक्तृत्व त्याच्या अंगीं पूर्णपणें भरलें होतें. त्याचें भाषण कधीं आवेशयुक्त, कधीं युक्तिपर परंतु नेहमीं यथार्थ व न्याय्य असे. त्यानें लोकांची खुषामत करून प्रीति संपादन करण्याकरितां आपल्या वक्तृत्वाचा कधींच उपयोग केला नाहीं. तो राष्ट्राच्या छंदानें कधींच वागला नाहीं; राष्ट्राला सन्मार्गानें आपल्या मागून तो नेहमीं नेत असे. कृपणपणा, मत्सर, आज्ञोल्लंघन, असहिष्णुता, द्रोह यांना प्रसंगानुरूप कोरडे देण्यास अगर राष्ट्रसभा किंवा जनसमाज यांची भर रागाच्या वेळीं कानउघाडणी करण्यास त्यानें कधींही मागें पुढें पाहिलें नाहीं. हा उच्च अधिकार त्याची कर्तव्यपरता, स्वार्थत्याग, व लोकहितनिरति या गुणांमुळेंच त्याला प्राप्त झाला होता. त्याचें वक्तृत्व तेव्हांच खात्री करणारें अगर मन वळविणारें असे. त्याचीं भाषणें व पत्रव्यवहार यांत दिसून येणारा शब्दांचा नैसर्गिक ओघ, विचारांचा पूर, भाषेची मार्मिक योजना, ठिकठिकाणीं येणारे ऐतिहासिक उल्लेख, कल्पनाशक्तीची भरारी, विकारांचा जोरदार ठसा, बुद्धीची व्यापकता, व मुद्देसूदपणा यांच्या योगानें त्याचे लेख व वक्तृत्व हींच त्याची कीर्ति होण्यास बस्स होतीं. हें त्याचें भाषाज्ञान फ्रेंच, जर्मन व फ्लेमिश या तिन्ही भाषांत सारखें दिसून येत होतें. त्याचा पत्रव्यवहार इतका

अवाढव्य आहे कीं तो जरी बराच प्रसिद्ध झाला आहे; तथापि अद्याप पुष्कळच ठिकठिकाणच्या संग्रहालयांत शिलक पडला आहे. त्याचें मानवी स्वभावाचें परिज्ञान लोकोत्तर होतें; एकदां एखादा मनुष्य, किंवा स्थल किंवा प्रसंग त्याच्या नजरेखालून गेला कीं त्याचा त्याच्या मनावर वज्रलेपच होतु असे. लोकांचीं मनें व चेहेरे तो छापील पुस्तकांप्रमाणें वाचीत असे. त्याला रेनेबर, अँजू व खुद्द ॲना वगैरे लोकांनीं फसविलें; परंतु हें अंधविश्वासाचें फल होतें. ज्या मनुष्यासंबंधानें तो सावध असे त्यांच्या हातून तो कधींच फसला नाहीं. आर्शो, हाने, शिमे वगैरे सरदारांस त्यानें कधींच दाद दिली नाहीं. मॅथिअस, डॉन जॉन व अँजू यांचीं दुष्ट कारस्थानें हाणून पाडण्यांत त्यानें कुटिल राजनीतीचा सत्कर्माकडे केलेला विनियोग त्याच्या अप्रतिम मुत्सद्दिरीची यावच्चन्द्रदिवाकरौ साक्ष देईल. त्यानें फिलिपचींच दुष्ट आयुधें घेऊन त्याच्या धर्मच्छलाचा नाश केला व स्वातंत्र्य स्थापना केली. त्यानें स्पेनच्या राजमालिकेंतील या कापटिकशिरोमणी राजाचें चिलखत चढवून त्याच्याच तीक्ष्ण राजनीतीचे त्याच्यावर प्रहार केले. दहा वर्षेंपर्यंत सतत राजाचा सर्व गुप्तव्यवहार त्याच्या हातीं पडत होता. सन १५८१ च्या हिवाळ्यांत राजाचा चिटणीस कॅस्टिलो यानें ऑरेंजकडून यथास्थित वेतन घेऊन चालविलेला द्रोह उघडकीस आला; व त्यास त्याबद्दल घोर शासन मिळालें. या कृत्याबद्दल बुइल्यम ऑरेंजवर पुष्कळ लोकांचे आक्षेप आहेत; परंतु त्या कालच्या राजनीतीचें धोरण, ऑरेंजला लहानपणापासून मिळालेलें शिक्षण, व नेदर्लंडवर राजानें चालविलेला जुलूम यांच्याकडे लक्ष पुरविलें असतां त्याचें आचरण सयुक्तिक होतें असेंच ह्मणावें लागेल. तो महत्वाकांक्षी व स्वार्थसाधु होता असे कित्येकांचे आक्षेप आहेत; त्यांचें निरसन मागील कथानकावरून आपोआप झालें आहे. त्याचे शब्द व त्याच्या कृती अद्याप कायम आहेत. त्यांचें यथार्थ निरीक्षण केलें असतां या आक्षेपांची सत्यासत्यता निःसंशय ठरणार आहे. बुइल्यम ऑरेंजसंबंधानें हे आक्षेप खरे मानल्यास देशभक्तीचें खरें स्वरूपच ठरविणें दुष्कर होईल. त्याचें धैर्य अप्रतिम होतें. त्याच्या जिवावर बारं-

वार प्रयत्न चालले असतां त्याचा सहजानंद बिलकुल ढळला नाहीं व त्यानें आपल्या देहाविषयीं विशेष खबरदारीही घेतली नाहीं. 'माझा देह मीं ईश्वराच्या सेवेंत अर्पण केला आहे; तो आपलें वैभव वाढविण्यास व माझें सार्थक करण्यास त्याची योग्य वाटेल त्या रीतीनें व्यवस्था लावण्यास समर्थ आहे,' असें तो ह्मणत असे. त्याचें शरीर अगदीं निरोगी होतें; व स्वभाव आनंदी असे. संकटाच्या वेळीं त्याची समता कधींही ढळली नाहीं. राष्ट्राच्या दुःखाचें ओझें खांद्यावर घेऊन तो आनंदानें जीवयात्रा कंठीत होता. आपल्या देशबांधवांचें नांवच मरतांना त्याच्या तोंडून आलें. त्यानें आपला देह ईश्वरास अर्पण केला होता. लोकांचें 'मायबाप वुइल्यम'वर प्रेम व विश्वास होता. लोकापवादानें तो कधींही ढळला नाहीं. तो जिवंत असेपर्यंत याच ध्रुवाकडे नजर देऊन लोक चालले होते. तो मेल्याची वार्ता समजतांच लहान मुलें रस्त्यांतून ढळढळा रडूं लागलीं.

# उपसंहार.

या नवीन डच् स्वराष्ट्राच्या भाग्यानें वुइल्यम ऑरेंजचें ब्रीद त्याचा दुसरा मुलगा मॉरिस याच्यांत पूर्णपणें उतरलें होतें. त्या सतरा वर्षांच्या मुलाचें पाणी ओळखून तत्कालीन राज्यकार्यधुरंधरांनीं त्यास लीडनच्या विद्यापीठांतून काढून त्याची संयुक्तसंस्थानांच्या सुभेदारीच्या जागेवर स्थापना केली. मॉरिसच्या अंगीं नॅसा घराण्याचे इतर सर्व गुण भरपूर असून त्याचें समरपाटवही अद्वितीय होतें. या पुरुषानें चाळीस वर्षे डच् राष्ट्राचें स्वामित्व चालवून, आपल्या बापानें लावलेला कोमल रोपा युद्धाच्या झंजावातांतून रक्षण करून वाढविला. ॲलेक्झँडर फार्नीज व त्याच्या मागून आलेला राजाचा प्रतिनिधि ऑल्बर्ट यांस मॉरिसनें युद्धांत इतकें जेरीस आणिलें कीं, सन १६०९ सालीं उभयपक्षांचा द्वादशवार्षिक तह ठरला; त्याअन्वयें डच् संयुक्तराष्ट्रांत दोन नवे प्रांत, कित्येक नवीं शहरें व सरहद्दीवरील किल्ले सामील झाले. डच् राष्ट्र समुद्रावर अप्रतिरथ झालें; व व्यापाराच्या कामांत तें जगांत पहिल्या

पदवीस जाऊन पोंहोचलें. या तहाची मुदत संपल्यावर यूरोपच्या लहानमोठ्या राष्ट्रांतें धर्मसुधारणेच्यासंबंधानें जो तीस वर्षांचा भारतीय संग्राम जुंपला त्यांतही डच्वीरांना आपलें शौर्य दाखविण्याचे अनेक प्रसंग आले. शेवटीं सन १६४८ सालीं स्पेन व हॉलंड यांचा तह होऊन स्पेननें हॉलंडचें स्वातंत्र्य स्पष्टपणें कबूल केलें; व या अशीतिवार्षिक स्वातंत्र्ययज्ञाचा शेवट झाला.

याप्रमाणें फिलिपच्या राज्यारोहणापासून ऑरेंजच्या मृत्यूपर्यंत सुमारें तीस वर्षांच्या अवधींत स्पेनच्या बादशाही अमलाखालीं असलेल्या नेदर्लंड देशांत उत्तरेकडील सात प्रांतांचें एक स्वतंत्र व बलाढ्य लोकसत्ताक राज्य निर्माण झालें.

जगाच्या इतिहासांत ही राज्यक्रान्ति अत्यंत महत्वाची आहे. तिच्या आगमाविषयीं थोडा सामान्य विचार येथें केला पाहिजे. इतिहासज्ञांनीं यूरोपच्या अर्वाचीन इतिहासाचा प्रारंभ पंधराव्या शतकाच्या मध्यभागापासून कल्पिला आहे. सोळाव्या शतकाच्या प्रारंभापासून जवळ जवळ सतराव्या शतकाच्या शेवटपर्यंत यूरोपांत धर्मविषयक धामधूम चालली होती. प्रसिद्ध धर्मसुधारक मार्टिन ल्यूथर यानें सन १५१९ सालीं जर्मनींत पेरलेलें बीं थोडक्याच अवकाशांत यूरोपच्या इतर राष्ट्रांत पसरून त्याचा समाजाच्या इतर सर्व व्यवहारांवर इतका ज़बरदस्त परिणाम झाला कीं या धार्मिक चळवळीचें राष्ट्रीय व अंतर्राष्ट्रीय घडामोडीशीं कांहीं काल तादात्म्यच होऊन गेलें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्यामुळें या अवधींत झालेल्या सर्व राजकीय व्यवहारांस नवीन धर्मविचार पुष्कळ अंशीं कारणीभूत झाले असें दिसून येईल. पांचव्या चार्लसराजानें प्रथम जर्मनींत जुन्या धर्माची सामोपचारानें संस्थापना करण्याचा यत्न केला; त्यावरून ऑग्स्बर्गच्या पहिल्या परिषदेंत (१५३०) जर्मन संस्थानिकांनीं व लोकनायकांनीं उलट बादशहासच आपल्या धर्मतत्त्वांचा उपदेश करण्याची संधि साधून घेतली. सन १५५५ सालीं सर्व जर्मन सामंतचक्रांत धर्मतह चार्लसच्या विद्यमानें ठरून त्यांत धर्माच्या बाबतींत व्यक्तीस पूर्ण स्वातंत्र्य मिळालें. या तहांत अर्थातच नेदर्लंडचा समावेश झाला होता. चार्लस बादशहाचा अंमल राजकीय बाबतींत फार करडा होता व

तो प्रजेच्या राजकीय हक्कांस बिलकुल मान देत नसे हें त्यानें घेंटच्या लोकांस दिलेल्या शासनावरून उघड झालें आहे (१२). तथापि या कारकीर्दींत लोकांस धर्माच्या बाबतींत विशेष उपसर्ग न लागल्यामुळें, व व्यापारासंबंधानें या बादशहाच्या साम्राज्यांत डचलोकांस विशेष सवलती व फायदे मिळाल्यामुळें लोक या बादशहास विरोध करण्यास तयार झाले नाहींत. फिलिप राजा हा दुर्बल व भित्रा असल्यामुळें त्याच्या अमदानींत स्पॅनिश झेंड्याचें महत्व बरेंच कमी होत चाललें; राजाचा बिलकुल दरारा राहिला नाहीं. अर्थातच डचलोकांना व्यापारांत सवलती अगर फायदे मिळेनातसे झाले. उलट फिलिप हा कॅथोलिकधर्माचा मूर्तिमंत पुतळा असल्यामुळें या कारकीर्दींत प्रथमपासून धर्मच्छलास फार उग्र स्वरूप आलें; नवीन धर्मपंथाचा उच्छेद व जुन्या धर्माची रक्ताच्या पुरांत सहस्रशः मनुष्य बळी देऊन स्थापना करणें हेंच त्याच्या राजनीतीचें सुकाणूं झालें. धर्मशासनें, नवे धर्माध्यक्ष, धर्मसंशोधक सभा, व ट्रेंटपरिषदेच्या अघोर शासनांचा अंमल यांच्यायोगानें त्यानें नेदर्लंडच्या लोकांस त्राहि त्राहि करून सोडिलें. फिलिपचें धर्मवेड हेंच प्रस्तुत बंडास मुख्य कारण झालें.

समाजाच्या रचनेंत व नियामकशक्तींत आजपर्यंत जीं मोठमोठीं स्थित्यन्तरें झालीं आहेत, त्यांस धर्मकल्पना किंवा राजकीय हक्क, स्वातंत्र्यप्रीति व राजव्यवस्थेसंबंधी विविध कल्पना, याच कमी-अधिक प्रमाणानें कारणीभूत झाल्याचें दिसून येतें. यांपैकीं दुसऱ्या प्रकारचीं कारणेंही हल्लींच्या क्रान्तीस बऱ्याच अंशीं कारणीभूत झालीं हें निर्विवाद आहे. येवढी गोष्ट खरी कीं पुढील एक दोन शतकांत अस्तित्वांत आलेल्या समाजसमयाच्या ( Social Compact ) एकदेशीय कल्पना हल्लीं बिलकुल लोकांच्या डोक्यांत आल्या नव्हत्या. अराजक स्थितींत समाजांत माजणारी यादवी मोडण्याकरितां लोकांनीं आपल्यापैकींच एखाद्या व्यक्तीवर अगर समुदायावर नियामकशक्तीचा समारोप करून शासकसंस्था निर्माण केली; किंवा मनुष्यप्राणी तेथून निसर्गतः स्वतंत्र व सुखी असतां आपापले व्यवसाय निर्विघ्नपणें चालविण्याकरितां व आपणास समाजसुखाचा लाभ करून घेण्याकरितां त्यांनीं समाजांत शासकशक्ति

निर्माण करून आपल्या नैसर्गिक हक्कांचा कांहीं अंश तीस तोडून दिला, वगैरे कल्पनांचा उद्गम अद्याप झाला नव्हता. राजा ईश्वरांश असून त्याचा राज्य करण्याचा हक्क ईश्वरदत्त आहे ही कल्पना अद्याप या पिढीच्या डोक्यांत दृढ बसली होती. मात्र डच् स्वराष्ट्रस्थापनेच्या वेळीं राजा आपल्या प्रजेवर जुलूम करील किंवा त्यांस दिलेले सनदी हक्क चालविणार नाहीं तर त्यास पदच्युत करण्याचा अधिकार प्रजेस आहे असें डच्लोकांनीं ठरविलें होतें. परंतु निरनिराळ्या समाजांवर वारंवार विदेशी शासकांचा अंमल होऊं लागल्यामुळें राष्ट्राचें स्वरूप व जीवनशक्ति कायम राखण्याकरितां राजाकडून कांहीं करार सनदेच्या रूपानें करून घेणें व त्यांची बजावणी करणें हें आपलें कर्तव्य आहे असें प्रजाजनांस हळूहळू वाटूं लागलें होतें. या लेखांतून राष्ट्राच्या प्राचीन व प्रधान हक्कांचा व रूढींचा उद्धार केला असे. सोळाव्या शतकांत नेदर्लंड-ची राज्यव्यवस्था सर्वांशीं प्रजासत्ताक व फार अर्वाचीन पद्धतीची होती; स्थानिकसभांनीं सर्व राज्यकारभार आटोपिला होता; प्रांतिक व राष्ट्रीय सभांचें काम केवळ राष्ट्रीय व देखरेखीचें होतें. नेदर्लंडच्या राजकीय हक्कांची बडी सनद् ह्मणजे लेडी मेरीची "ग्रेटप्रिव्हिलेज" ही होय (९). या सनदेचा आधार घेऊन डच् स्वराष्ट्राची इमारत सन १५८३ सालीं रचण्यांत आली. या सनदेचें दुसऱ्या पुष्कळ प्राचीन व अर्वाचीन हक्कदर्शक सनदांशीं साम्य आहे. राष्ट्रांतील नियामक शक्तीचीं कायदे करणें, न्याय देणें, राज्यकारभार चालविणें वगैरे मुख्य कर्तव्यें लोकमताच्या अनुरोधानें चालावीं, विदेशी विचारांचा राष्ट्रीय संस्थांवर परिणाम होऊं नये, राष्ट्रहितविघातक गोष्टी करण्यास अन्य राष्ट्रास अवकाश मिळूं नये, अशा हेतूनें राष्ट्रीय लोकमतास या सनदेंत किती प्राधान्य दिलें आहे हें त्या सनदेचें सूक्ष्म परीक्षण केल्यानें दिसून येणार आहे. एखाद्या राष्ट्रशासकानें परदेशस्थ व्यक्तीशीं आपल्या इच्छेनुरूप संबंध केल्यानें त्या व्यक्तीच्या विचारांचा या राष्ट्राच्या घडामोडींवर परिणाम होण्याचा, किंबहुना त्या व्यक्तीच्या प्रवेशानें या राष्ट्राच्या वस्तुस्थितींत मोठें स्थित्यन्तर होण्याचा संभव असतो; स्वदेशीयांशिवाय इतरांस हुद्याच्या जागा देऊन राज्यकारभार चालविणें ह्मणजे राष्ट्रांतील लोकमतास बाजूस ठेवण्यासारखें,

किंबहुना त्या राष्ट्राच्या शहाणपणाचा व ज्ञानशक्तींचा उपमर्द करणें आहे; दोन अधिकार एकाच व्यक्तीस दिल्यापासून राज्यसंस्थेच्या एकाच भागाचें महत्व वाढून तो भाग एकंदर संस्थेस विघातक होण्याचा संभव असतो; मक्त्यानें कामें लावल्यापासून नियामकशक्तीचा एकंदर राज्यव्यवस्थेवर देखरेख करण्याचा हक्क बहुतेक नष्ट होतो व प्रजाजनांस तेवढ्यापुरतें समाजनियन्त्याचें रक्षण मिळत नाहीं; या गोष्टींचा या सनदेंत प्रथम बंदोबस्त केला आहे. नंतर राष्ट्राची न्यायपद्धति पूर्वीप्रमाणें चालण्याविषयीं खबरदारी घेतली आहे. नंतर परचक्रापासून राष्ट्राचें रक्षण करण्याचे कामीं, किंवा त्याचें महत्व कायम राखण्याकरितां किंवा वाढविण्याकरितां लढाया करण्याच्या कामांत लोकमताचें योग्य वजन राखलें आहे. पुढें राज्यकारभारांत राष्ट्रीय लोकमताचें प्राधान्य रहावें अशी योजना केली आहे. नवे कर बसविण्याचा अगर राज्यव्यवस्थेच्या खर्चाकरितां पैसा मंजूर करण्याचा अधिकार लोकांनीं आपणाकडे ठेविला आहे. याचा आनुषंगिक हक्क ह्मणजे नाण्याची किंमत ठरविण्याचा; हाही इंग्लोकांनीं प्रथमपासून आपणाकडे ठेवून घेतला होता. शेवटीं राष्ट्राचें राष्ट्रीयत्व कायम राखण्याकरितां सरकारी दप्तरांत राष्ट्रीय भाषा वापरली पाहिजे असा नियम केला आहे; व ही सनद दप्तरांत घोरत पडूं नये एवढ्याकरितां सनदी हक्कांविरुद्ध राजानें केलेले हुकूम मोडणें बेकायदेशीर होणार नाहीं असें यांत स्पष्टपणें नमूद करून ठेविलें आहे. एवंच या सनदेंत शासकशक्तीस लोकमताच्या जड शृंखलांनीं केवळ जखडून टाकिलें आहे. अर्थात् जरी आपल्या राष्ट्राची राज्यव्यवस्था एखाद्या विशिष्ट पद्धतीनें चालावी अशाबद्दल इंग्लोकांचा हा वेळपर्यंत आग्रह असल्याचें दिसून येत नाहीं, तथापि आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य कोणत्याही स्थितींत कायम रहावें अशाविषयीं त्यांनीं या सनदेवरून पूर्ण खबरदारी घेतल्याचें सिद्ध होत आहे. राजानें आरंभिलेल्या नवीन धर्मव्यवस्थेमुळें या राजकीय हक्कांचीही पायमल्ली होऊं लागली. उदाहरणार्थ, पूर्वापार चालीच्या विरुद्ध एका प्रधानमंडळाच्या ठिकाणीं तीन मंडळ्यांची योजना; गुप्त त्रयीच्या मार्फत राज्यकारभार चालविणें; न्यायसभेचें स्थलांतर; प्रांतिकसभांच्या विचारावांचून नव्या धर्माधिकाऱ्यांच्या नेमणुका; बेकायदेशीर रीतीनें मिळकतींच्या जप्त्या करणें,

लोकांस कैद करणें, व देहान्त शिक्षा देणें; शांततेच्या काळांत राष्ट्रीय सभेच्या विचारावांचून राष्ट्रांत परदेशी सैन्य ठेवणें; स्थानिक अधिकारी नेमण्याचा संस्थानिकांचा हक्क आपण चालविणें; राष्ट्रीय सभा न भरविणें; लोकसभांच्या विचारावांचून नवे कर बसविणें; खजिन्यांतून सभेच्या मंजुरीवांचून लागेल तसा पैसा काढून खर्च करणें; या सर्व गोष्टी सनदी हक्कांविरुद्ध होत्या. व त्यामुळें कोणत्यांना कोणत्या तरी व्यक्तींत अगर वर्गांत असंतोष उत्पन्न होऊन लोकांचीं मनें बंडास तयार होत गेलीं. या प्रत्येक अत्याचारासंबंधानें डचलोकांनीं दाखविलेला तीव्र तिरस्कार हें स्वातंत्र्यभाक् व स्वातंत्र्यार्ह लोकांचें मुख्य लक्षण आहे.

या क्रान्तीच्या प्रसंगांत सरदार लोकांनीं प्रथम लोकसमुदायाचें पुढारपण घेतलें व त्याच वर्गापैकीं एका अद्वितीय पुरुषानें तें काम मोठे अमानुष स्वार्थत्याग करून व कष्ट सोसून शेवटास नेलें. बंडाच्या पूर्वावस्थेंत सरदार लोकांनीं केलेली गडबड बिनधोरणी, अव्यवस्थित, व बाष्कळ होती हें परिणामावरून व्यक्त झालें आहे. परंतु त्याच्या योगानेंच लोकांस अवसान येऊन त्यांनीं स्वतः आत्मसंरक्षणाचें काम हातीं घेतलें यांत संशय नाहीं. पुढें बंडाचीं सूत्रें चालविणारांस बलाढ्य स्पॅनिश राजसत्तेशीं झगडण्यास कसलें मनोधैर्य, दृढनिश्चय, कल्पकता व साधनबाहुल्य अवश्य होतें याचीही या पूर्वप्रसंगावरून बरोबर कल्पना आली. वतनदार सरंजामीदारांनीं व सरदारांनीं अशा प्रवृत्तींत पुढाकार घ्यावा हें स्वाभाविकच होतें. कारण सामान्यतः परचक्राच्या सपाट्यांत या वर्गाइतकी हानि कोणत्याच वर्गाची होत नाहीं. शिवाय फिलिपच्या कारकीर्दीच्या प्रारंभापासून या लोकांचा दरबारांत फार अपमान होऊं लागला होता व त्यांच्या हक्कांची सर्वस्वी पायमल्ली झाली होती. लोकांचे स्थानिक व राष्ट्रीय सभेंतील प्रतिनिधि यांचीही निर्माल्यवत् स्थिति झाल्यावर व धर्मच्छलाच्या यज्ञांत सामान्य लोकांचे अतोनात बळी पडूं लागल्यावर या खवळलेल्या सरदार लोकांस अर्थातच दुजोरा झाला. याप्रमाणें सर्व राष्ट्राच्या मनाची उचल झाल्यावर त्वेषाच्या झटक्यांत राज्यक्रांतीचें दुर्घट काम तेव्हांच उरकून गेलें नेदर्लंडाच्या

कांहीं भागांत राहणाऱ्या साध्या, समुद्रगामी, स्वतंत्र, निरुपाधिक व नीतिमान् कोळ्यांच्या व धनगरांच्या डोक्यांत, व अन्य ठिकाणीं राहणाऱ्या निरुपद्रवी, सदाचारसंपन्न, उद्योगी व संपत्तिमान् व्यापाऱ्यांच्या डोक्यांत बंडाची कल्पना अगर ती सिद्ध करण्याचें साहस उत्पन्न व्हावें हें फार आश्चर्यकारक आहे. संपत्तींत व ऐषआरामांत गुंगलेलें राष्ट्र शांतताप्रियच असावयाचें खरें; परंतु तेंच राष्ट्र दरिद्रावस्थेस पोंहोचलें कीं त्यांत शौर्याचा संचार तात्काल होतो. याप्रमाणें एकंदर जनसमूहाची राजसत्तेशीं विरोध करण्याची तयारी झाली नसती तर विशिष्ट व्यक्तींच्या अगर वर्गाच्या प्रोत्साहनानें राष्ट्रांत उत्साहाची व साहसाची एवढी मोठी लाट उसळली असती किंवा नाहीं याचा संशय आहे. स. १५६६ सालच्या धामधुमीवरून राष्ट्राच्या मनाची स्थिति समजल्यावर, त्यास ऑरेंजनें योग्य वळण देऊन इष्टसिद्धि करून घेतली. त्याचप्रमाणें स. १५७२ सालीं राष्ट्राच्या मनाची योग्य चिकित्सा करून व एकंदर परिस्थितीचें सूक्ष्म परीक्षण करून त्यानें हॉलंडांतच आपलें ठाणें दिलें. राष्ट्राच्या नाड्यांत जीवनशक्तीची थोडी ऊब असल्यास एखादा जबरदस्त राष्ट्रनायक त्याजवर योग्य उपचार करून राष्ट्रास पुष्टि आणील; तिच्या अभावीं समाजवैद्य कितीही कल्पक व साधनसंपन्न असला तरी त्याच्या हातून मरणासन्न राष्ट्राचा कांहीं उपयोग होणार नाहीं. ही जीवनशक्तीची ऊब राष्ट्रांतील प्राचीन संस्थांचें संगोपन करून सर्वकाल व सर्व अवस्थेंत कायम राखणें हें समाजाचें व त्यांतील पुढाऱ्यांचें मुख्य कर्तव्य आहे.

ही शक्ति कायम राखून योग्य वेळीं तिजवर उपचार करून सौराष्ट्राची इमारत उभारणारे कर्ते पुरुष अनुकूल परिस्थिति असल्यावांचून निर्माण होतात अगर नाहीं; किंवा तसे पुरुष आपोआप निर्माण होऊन ते आपल्या कार्यास अनुकूल परिस्थिति स्वतःच निर्माण करतात याजविषयीं सिद्धान्त ठरविणें अवघड आहे. तथापि असले अलौकिक पुरुष आपल्या कालापेक्षां फारच पुढच्या कालांतील [illegible]स शोभणारे असतात; व त्यांच्या अवतारानें समाजास अगदीं नवें स्वरूप येतें यांत संशय नाहीं.

या बंडाच्या सुरवातीच्या वेळीं व त्याच्या मध्यावस्थेच्या वेळीं राजाची व बंडवाल्यांची असलेली स्थिति पाहिली असतां मन थक्क झाल्यावांचून राहणार नाहीं. बंडाच्या प्रारंभीं फिलिपचा केवढा राज्यविस्तार! त्याला प्राप्त झालेल्या वर्चस्वामुळें यूरोपच्या राष्ट्रांना आपलें स्वातंत्र्य कायम राहण्याविषीं सुद्धां दहशत उत्पन्न झाली होती; त्याची संपत्ति केवढी अपार! व त्याचें सैन्य केवढें अप्रतिरथ! धर्मच्छलाच्या कामीं या सर्व साधनांचा उपयोग करून शेवटीं त्याची काय स्थिति झाली! या युद्धाच्या खटपटींत अमेरिकेंतील सोन्याच्या खाणी अटल्या; नेदर्लंडचें उत्पन्न अटलें; सर्व साम्राज्याचें उत्पन्न या युद्धास पुरेना. मरणाचे वेळीं फिलिपराजास जबरदस्त कर्जाचें ओझें शिरावर घेऊन प्राण सोडावे लागले! सैन्याची स्थिति तीच झाली. लक्षावधि लोक या युद्धास बळि पडल्यामुळें नवी भरती होण्याची सुद्धां मुष्किल पडूं लागली! तीच नेदर्लंडची स्थिति युद्धाच्या पहिल्या सपाट्यांत बरीच खालावली. परंतु स्वराष्ट्रस्थापनेच्या वेळीं या राष्ट्राची स्थिति फार सुधारली होती; व कांहीं कालानें या राष्ट्रास यूरोपच्या राष्ट्रमालिकेंत बरेंच अग्रस्थान मिळालें. आपलें भांडण न्याय्य आहे अशी खात्री होऊन एखादें राष्ट्र जुलमाशीं निश्चयानें झगडूं लागल्यास ईश्वर त्यास हात देणार नाहीं काय?

सत्यसंकल्पाचा दाता भगवान।



